## प्रकाशकांचें निवेदन

'*मराठी भाषेचे वाक्प्रचार व म्हणी*' या पुस्तकाची पहिली आवृत्ति इ. स. १९१० साली निघाली होती. अशा तऱ्हेनें सर्व तऱ्हेचे वाक्प्रचार एकत्र समाहित करण्याची कल्पना त्या वेळीं अगदींच नवी होती आणि त्यामुळें या पुस्तकाचें त्या वेळीं सर्वत्र उत्तम स्वागत झालें. इ. स. १९२३ व १९२७ या सालांत या पुस्तकाच्या पुढील दोन आवृत्त्याहि निघाल्या होत्या. त्यानंतर या पुस्तकाला सतत मागणी असून सुद्धा या पुस्तकाची आवृत्ति आम्ही काढू शकलों नव्हतों. आता जवळ जवळ तीस वर्षांनी ही चौथी आवृत्ति प्रकाशित करण्याचा आज योग येत आहे.

गेल्या तीस चाळीस वर्षांत मराठी भाषेचा अभ्यास सर्वत्र पुष्कळच वाढला आहे. म्हणून अशा काळात या तऱ्हेच्या पुस्तकाची फारच गरज आहे आणि म्हणूनच या पुस्तकाची ही आवृत्ति कागदाच्या दुर्मिळतेच्या काळांतहि आज आम्ही काढीत आहोंत. तिचें सर्वत्र यथोचित स्वागत होवो, हीच इच्छा.

बलिप्रतिपदा
शके १८८१

प्रकाशक

# कै. विद्याधर वामन भिडे

'*मराठी भाषेचे वाक्प्रचार व म्हणी*' व '*मराठी भाषेचा सरस्वती-कोश*' इत्यादि ख्यातनाम कोशवाङ्मयाचे कर्ते कै० विद्याधर वामन भिडे यांचा जन्म बेळगांव येथे ता. १४ नोव्हेंबर १८६० रोजी झाला. त्यांचे वडील डॉक्टर असून सरकारी नोकरींत होते. ते नोकरीनिमित्त बेळगावीं असतांनाच विद्याधरपंतांचा जन्म झाला.

विद्याधरपंतांचें प्राथमिक शिक्षण हुबळी येथे झालें. शाळेंत कानडी व घरीं मराठी अशा प्रकारें पांच इयत्ता पुऱ्या झाल्यावर ते हुबळी येथेच इंग्रजी शाळेंत गेले. तेथे तीन इयत्ता पुऱ्या झाल्यावर पुढे ते धारवाड येथे हायस्कुलांत गेले. याच अवधींत इ० स० १८७३ मध्ये त्यांचे वडील वारले. यानंतर इ. स. १८७५ मध्ये ते पुण्यांत गेले व तेथील सरकारी हायस्कुलांत जाऊं लागले. त्या वेळीं तेथे त्यांना कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे शिक्षक होते. इ. स. १८७७ सालीं ते मॅट्रिक झाले. पुढे इ. स. १८८३ मध्ये डेक्कन कॉलेजमधून बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले. यानंतर इ. स. १८८४ ते १९१० पर्यंत त्यांनी पुण्यात शाळा-खात्यांत नोकरी केली. इ. स. १९१० मध्ये त्यांनी पेन्शन घेतलें. यापुढेहि अनेक प्रापंचिक अडचणींमुळे पेन्शन घेतल्यावरहि पुष्कळ वर्षे खाजगी शाळांतून त्यांनी शिक्षकाची नोकरी केली.

कै. विद्याधरपंतांनी पुष्कळच गद्य व पद्य-रचना केली. त्यांच्या कांही ग्रंथांचे रचना-काल पुढीलप्रमाणे आहेत.

| | |
|---|---|
| इ. स. १८८७ | म्हणींविषयीं चार शब्द |
| इ. स. १८९० | मराठी शब्दांचें उद्घाटन |
| इ. स. १९०२–०८ | अनेक काव्यें व गोष्टी |
| इ. स. १९०९–२० | मराठी भाषेचे वाक्प्रचार व म्हणी, निबंध लेखन व अनुवाद, इंग्रजी मराठी कोश |
| इ. स. १९११ | जीवजागृती काव्य |
| इ. स. १९१२–२२ | या कालांत त्यांनी फारसें लेखन केलें नाही. मात्र या कालांत फ्रेंच, पाली व पर्शियन या भाषांचा अभ्यास केला व याच भाषांच्या ते शिकवण्या करीत असत. |



कै. विद्याधर वामन भिडे

जन्म : ता. १४-११-१८६०    मृत्यु : ता २५ १ १९३६

| | |
|---|---|
| इ. स. १९२२ ते २७ | कोरलईचा किल्लेदार, केंजळगडचा कबजा, पण तिसरा कोण, गुणवतगडचा गडकरी, प्रपितामहाच्या पदावर, संस्कृत-इंग्रजी कोश, अर्थालंकाराचें निरुपण. |
| इ. स. १९२७-३० | मराठी भाषेचा सरस्वती-कोश |
| इ. स. १९३२ | साहित्यकौमुदी |

अशा प्रकारें अव्याहतपणें जवळ जवळ पंचेचाळीस वर्षे विविध प्रकारची साहित्य-सेवा करून त्यांनी आपलें नाव मराठी वाङ्मयसेवकांत चिरस्थायी करून ठेवलें आहे यांत शंका नाही. त्यांचा ' मराठी भाषेचा सरस्वती-कोश ' हा एकच ग्रंथ घेतला तरी त्यायोगें त्यांनी मराठी भाषेची केवढी सेवा केली आहे याची उत्कृष्ट साक्ष पटते. आयुष्याच्या उत्तर-कालांत सुमारें चार वर्षे अखंड परिश्रम करून त्यांनी तयार केलेला हा कोश म्हणजे त्यांच्या साहित्य व भाषा यांच्या व्यासंगाचा पुरावाच होय.

अशा या थोर साहित्यिकास वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षी ता. २५-१-३६ रोजी पक्षघाताच्या विकारानें देवाज्ञा झाली.

• • •

## अनुक्रमाणिका





# मराठी भाषेचे वाक्प्रचार व म्हणी

## १ : उपोद्घात

१. मनात आलेला विचार शब्दाच्या रूपाने टापटिपीने व्यक्त करणें, तसेंच वाक्यामध्ये योजनेसाठी मूळ शब्दाचीं रूपें तयार करणें व तीं रूपें तयार झाल्यावर वाक्यामध्ये तीं विशिष्ट ठिकाणीं मांडणें, यासंबंधानें प्रत्येक भाषेचे विशिष्ट असे कांही प्रकार असतात, उदाहरणार्थ, मराठी आणि गुजराथी ह्या भाषांमध्ये नामें आणि सर्वनामें ह्यांना तीन लिंगें असतात, पण हिंदी भाषेमध्ये दोनच असतात, मराठी, गुजराथी व हिंदी ह्या भाषांत क्रियापदांना दोन वचनें असतात, पण बंगालींत एकच वचन असतें. तसेंच वाक्यामध्ये शब्दांची जी मांडणी करणें, तिच्यासंबंधानेंहि प्रत्येक भाषेचे कांही, तरी विशिष्ट प्रकार असतात. मराठींत वाक्यामध्ये कर्ता, कर्म आणि क्रियापद, असा सामान्यतः क्रम असतो उ०—रामा गाय बांधतो, परंतु इंग्रजींत कर्ता, क्रियापद आणि कर्म असा क्रम असतो

२. भाषेतील मूळ शब्दाचीं रूपें तयार करणें व रूपें तयार झाल्यावर तीं वाक्यामध्ये मांडणें, तसेंच मनात आलेला विचार व्यक्त करण्याची घाटणी ह्या तीन गोष्टींसंबंधानें प्रत्येक भाषेचा कांही तरी विशेष असतोच. ह्या विशेषाला त्या भाषेचा "स्वभाव" असें म्हणतात. भाषा जों जों प्रगल्भतर होत जाते, तों तों तिच्या ठायीं विचार व्यक्त करण्याच्या साधनांची अनुकूलता वाढत जाते, शब्दांचीं रूपें घडविण्याचे प्रकार सोपे होऊं लागतात, व मनांतील विचार ततोतंत रीतीनें आणि भिन्न भिन्न तऱ्हांनी व्यक्त करण्याची ताकद वाढत जाते. परंतु भाषा कितीहि प्रगल्भ झाली, तरी तिचा जो वर वर्णिलेला हा स्वभाव, त्यांत कांही फरक पडत नाही, निदान त्यांत फारसा फरक पडत नाही. त्या त्या भाषेचें व्याकरण चांगलें शिकल्यानें त्या त्या भाषेचा स्वभाव आपणास समजतो.

३. एखाद्या भाषेचा स्वभाव जाणावयाचें उत्तम साधन व्याकरण होय, हें जरी खरें आहे, तरी व्याकरणावरून समजणारा हा जो भाषेचा स्वभाव, तो तिचा केवळ "उत्तान स्वभाव" होय. व्याकरणावरून भाषेचा गूढ स्वभाव समजत नाही. याचें कारण हें उघड आहे की, व्याकरणांत प्रत्येक शब्दाचें प्रत्येक रूप देणें शक्य नसतें. मुख्य मुख्य

शब्दांचीं मुख्य मुख्य रूपें मात्र व्याकरणकार देत असतो; आणि आपणास व्याकरणाच्या नियमानी व व्याकरणात दिलेल्या रूपाच्या साम्यावरून बहुतेक शब्दांचीं बहुतेक रूपें तयार करून घ्यावीं लागतात. हीं अशीं रूपें तयार करताना तीं रूपें भाषेमध्ये ग्राह्य होण्याजोगीं आहेत किंवा नाहीत, हेंहि आपणास पाहावें लागतें. तसेंच एखादा नवीन शब्द प्रचारात आणावयाचा असल्यास तो भाषेमध्ये सुबक रीतीनें शिरकावता येईल किंवा नाही, हेंहि आपणास पाहावें लागतें.

४. भाषेला देहाची उपमा दिली, तर वरील विधान वेगळ्या शब्दानी पुढे दिल्याप्रमाणें करितां येईल. भाषारूपी देहाच्या कोठ्यांत हीं आपण तयार केलेलीं रूपें व हे नवीन बनविलेले शब्द पचतील किंवा बोचतील, इकडे आपण लक्ष्य दिलें पाहिजे. प्रत्येक भाषेच्या ठायीं नवीन शब्द किंवा घाटणी बनविण्याची ताकद व बनविल्यानंतर ते शब्द किंवा ती घाटणी सामील करून घेण्याची पात्रता, कमी-अधिक प्रमाणांत असते: ह्या पात्रतेला तिचा "गूढ स्वभाव" असें म्हणावयास हरकत नाही. प्रमाणभूत म्हणून गणलेल्या ग्रंथकाराचे लेख वाचणें, चांगल्या वक्त्याचीं भाषणें ऐकणें, विद्वान लोकांशीं संभाषण करणें, इत्यादिकांवरून भाषेचा हा गूढ स्वभाव कळण्याजोगा असतो; तो केवळ व्याकरण शिकून कळण्याजोगा नसतो.

५. विशेषणाला "आवणें" हा प्रत्यय लाविल्यानें क्रियापद तयार होतें, असा नियम व्याकरणात दिलेला असतो आणि "जुनें" ह्यापासून "जुनावणें" (जुनें होणें ह्या अर्थी), "स्थिर" ह्यापासून "स्थिरावणें" (स्थिर होणें ह्या अर्थी), "खरें" ह्यापासून "खरावणें" (खरें म्हणून ठरवून घेणें ह्या अर्थी), हीं किंवा असलींच दुसरीं उदाहरणें दिलेलीं असतात. परंतु "आवणें" हा प्रत्यय लावून ज्या ज्या विशेषणापासून क्रियापदें तयार होतात व ज्या ज्या विशेषणांपासून क्रियापदें तयार होत नाहीत, त्या त्या सर्वांच्या याद्या व्याकरणात देणें शक्य नसतें. व्याकरणात सांगितलेल्या ह्या अशा प्रकारच्या नियमाची व्याप्ति कोठपर्यंत करावयाची, हें भाषेचा गूढ स्वभाव ज्याला समजला आहे, त्यालाच ठरवितां येईल. "जुनें" ह्यापासून "जुनावणें" हें रूप होतें, तसें "नवें" यापासून "नवावणें," "कठीण" ह्यापासून "कठिणावणें," किंवा "भक्कम" ह्यापासून "भक्कमावणें," "खोटें" ह्यापासून "खोटावणें," हीं रूपें घडविणें हें भाषेच्या गूढ स्वभावाच्या विरुद्ध आहे.

६. तसेंच व्याकरणात विभक्तिप्रत्यय लावताना शब्दाचें सामान्यरूप करावें लागतें, असा नियम दिलेला असतो. परंतु परभाषांतून आलेल्या शब्दाना हा नियम किती प्रमाणात व कोणत्या प्रत्ययासंबंधानें किंवा कधींपासून लागू करावयाचा, हें भाषेचा गूढ स्वभाव जाणणारास सांगतां येईल, तिऱ्हाइतास सांगता येणार नाही. आफ्रिका, ऑस्ट्रिया, युनायटेड् स्टेट्स्, पोर्तुगाल, रशिया, आयर्लंड वगैरे शब्दांचीं तृतीयादिक विभक्तींचीं रूपें कोणते प्रत्यय लागून कशीं होतात हें आपण तपासूं लागलों, म्हणजे भाषेचा गूढ स्वभाव हा कसा असतो, हें आपणास कळून येईल.

७. आणखीहि असें की, षष्ठीचा प्रत्यय लावताना शब्दाचें सामान्यरूप होतें, हा नियम व्याकरणांत दिलेला असतो; आणि हा नियम घर, दार, गाव, हात, तोंड वगैरे शब्दाना लागू न केला तर विशिष्ट अर्थ उत्पन्न होतात, हें व्याकरणांत सांगितलेलें असतें. तरी 'घराच्या' गणातील सर्व शब्द व्याकरणांत; देतां येत नाहीत आणि प्रसंगविशेषीं कोणता नवा शब्द सफाईने त्या गणांत समाविष्ट करतां येईल, हें ठरविणें भाषेचा गूढ स्वभाव ज्याला समजतो, त्यालाच शक्य आहे.

८. तसेंच धातूच्या पुढचा 'णें' हा प्रत्यय काढून टाकला म्हणजे आज्ञार्थक क्रियापद होतें. बोलणें, बांधणें, जाणें, इत्यादिकांपासून "बोल," "बांध," "जा," अशीं आज्ञार्थक क्रियापदें होतात; ह्या नियमाप्रमाणें "इच्छिणें," "वांच्छिणें," "अपेक्षिणें," इत्यादिकापासून "इच्छ," "वान्छ," "अपेक्ष," वगैरे आज्ञार्थक क्रियापदें घडविणें, हें भाषेच्या गूढ स्वभावास जुळत नाही व तें कां जुळत नाही, ह्याचीं कारणें प्रत्येक उदाहरणात देता येतीलच, असे नसतें.

९. भाषा शुद्ध रीतीने वापरतां येण्यास तिचा स्वभाव उत्तान आणि गूढ, आपणास चांगला अवगत असावा लागतो. तो व्याकरणाच्या अभ्यासाने व प्रमाणभूत म्हणून गणलेल्या ग्रंथांच्या परिशीलनाने अवगत होतो. परंतु भाषा शुद्ध रीतीने वापरावयाची असतां आणखीहि एका गोष्टीकडे लक्ष्य द्यावें लागतें. ती कोणती म्हणाल तर रूढि. भाषेमध्ये रूढीचें प्राबल्य अतोनात असतें, व अमुक उदाहरणांत अमुकच रूढि कां असावी आणि दुसऱ्या एका उदाहरणात उलट रूढि कां असावी, हें आपणास सांगतां येण्याजोगें नसतें. 'उर' आणि 'छाती' हे शब्द अगदी समानार्थक आहेत; आपण—

क. त्याच्या उरावर दाट केस आहेत.

ख. त्याच्या छातीवर दाट केस आहेत.

ग. त्याचें दुष्कर्म पाहून माझी छाती दडपून गेली.

घ. त्याचें दुष्कर्म पाहून माझें उर दडपून गेलें.

असे वैकल्पिक प्रयोग करूं शकतों. पहिल्या जोडींत 'छाती' व 'उर' ह्या शब्दांनी शरीराचा एक विशिष्ट भाग दर्शविला जातो; दुसऱ्या जोडीत 'धैर्य,' असा अर्थ आहे. सारांश, 'छाती' आणि 'उर,' हे दोन्ही शब्द मूळच्या आणि लाक्षणिक अशा दोन्ही अर्थांनी एकमेकांबद्दल घालतां येतात, असें आपणास दिसतें. आता पुढील वाक्यें पाहा :—

ङ. माझ्याशीं कुस्ती खेळावयाची कोणाची छाती आहे!

च. माझ्याशीं कुस्ती खेळावयाचें कोणाचें उर आहे!

छ. ह्या नारळीच्या झाडावर चढण्याची तुझी काय छाती लागली आहे!

ज. ह्या नारळीच्या झाडावर चढण्याचें तुझें काय उर लागलें आहे!

आता वरील वाक्यांपैकीं च आणि ज हीं वाक्यें ग्राह्य नाहीत. घ ह्या वाक्यांत "उर" ह्याचा अर्थ धैर्य असा घेतां येतो, तसाच च आणि ज ह्या वाक्यात कां घेतां येत नाहीं, हें सांगणें अशक्य आहे. रूढीला तीं वाक्यें मान्य नाहीत, एवढें खरें.

१०. आता तुलनेसाठी 'अगदी' आणि 'बिलकूल' हे दोन शब्द आपण घेऊं.

क. माझें भाषण अगदी योग्य होतें.

ख. मीं त्याला अगदी चोख उत्तर दिलें.

ग. त्याचें वर्तन मला अगदी संमत नाही.

घ. ह्या बाबतींत तुला अगदी कांही समजत नाही.

ङ. त्याला बिलकूल अक्कल नाही.

च. माझ्या कामांत तूं बिलकूल पडूं नको.

ह्या सहा वाक्यांपैकी क आणि ख हीं करणरूपी वाक्यें असून बाकीचीं सारीं अकरणरूपी आहेत व तीं सहाहि ग्राह्य आहेत. आता पुढील वाक्यें पाहा :—

छ. तूं बिलकूल गाढव आहेस.

ज. तो बिलकूल शहाणा आहे.

येथें हीं दोन्ही वाक्यें अग्राह्य आहेत. 'अगदी' हा शब्द विकल्पेंकरून करणरूपी व अकरणरूपी योजण्याची रूढीने सवलत दिली आहे. परंतु 'बिलकूल' हा शब्द अकरणरूपीच योजला पाहिजे, अशी नियंत्रणा रूढीने लावून दिली आहे.

११. अमुक विचार व्यक्त करावयाचा असतां अमुक शब्दाच्या शेजारीं अमुकच शब्द, अमुकच रूपाने, अमुक क्रमाने आले पाहिजेत. ही जी भाषेची रूढि म्हणजे प्रचार, तिला आपण "वाक्प्रचार" ही संज्ञा देऊं, आणि अशा रीतीचा जो शब्दांचा समुदाय, त्याला आपण "शब्दसंहति" असें म्हणूं.

१२. रूढि अमुक प्रकारची कां असावी हें सांगणें जरी कठीण आहे, तरी रूढीच्या प्रकारांचें वर्गीकरण करणें कठीण नाही. ह्या विषयाचें आजपर्यंत शास्त्रीय रीत्या विवरण झालेलें नसल्याकारणानें आणि भाषाशास्त्ररूपी मंदिरांत प्रवेश करूं इच्छिणारांना द्वार दाखविणें हाच आमचा उद्देश असल्याकारणाने, आम्ही सांगोपांग विवरण करावयाचें धाडस न करतां, ह्या उपोद्घातात फक्त प्रसंग, साहचर्य, अनुक्रम, लक्षणा, साम्य, वचन, लिंग, इत्यादिकासंबंधाने रूढीची कशी नियंत्रणा असते, हें आणखी कांही उदाहरणें देऊन स्पष्ट करून दाखवितों.

१३. 'घबाड' शब्द नाम असतां त्याचा अर्थ 'लाभ' असा होतो; व तो शब्द विशेषणाप्रमाणे योजला असता 'फार मोठा' असा त्याचा अर्थ होतो. विशेषण असतां घबाड हा शब्द फक्त मुहूर्त, माप, चुकी, दैव आणि वशिला, ह्या पांच शब्दांच्या मागे येऊं शकतो. घबाड मुहूर्त, घबाड माप, घबाड चुकी, घबाड दैव

आणि घबाड बशिला, असे प्रयोग ग्राह्य म्हणून गणले आहेत. परंतु घबाड पेटी, घबाड शरीर, घबाड अमलदार, घबाड दिवस, वगैरेसारखे प्रयोग हास्यास्पद होतील.

१४. वाक्प्रचाराने ज्या शब्दसंहति ठरून गेल्या आहेत, त्या तशाच योजाव्या लागतात; त्यांच्यामध्ये यत्किंचित् फेरबदल करू गेल्यास त्याचा काहीच अर्थ होत नाही, किंवा भलताच काही अर्थ होतो, किंवा त्याना काहीतरी हास्यास्पद असें रूप प्राप्त होतें. यासाठी वाक्प्रचाराचा ज्यांच्यावर छाप पडला आहे, अशा शब्दसहति, आणि पुन्हा त्याहि ठरलेल्याच रूपाने योजावयास पाहिजेत. 'नाऱ्याच्या डोक्यात एकदा जें वेड शिरलें तें घालविणें हें महा कर्म कठीण आहे.' ह्या वाक्यांत 'महा' हें 'कर्म' ह्याचें विशेषण नसून 'कठीण' ह्याचें आहे; म्हणजे तें क्रियाविशेषणाच्या कोटींत पडणारें आहे. तरीहि 'महा' हा शब्द वाक्प्रचाराने 'कर्म' ह्याच्या अगोदर घालावा लागतो. तसेंच "उलट्या चोराच्या बोंबा" ह्या वाक्प्रचारामध्ये "उलट्या" स्त्रीलिंगी अनेकवचनी रूप असून 'बोंबा' याचें विशेषण आहे. उलट्या हें "चोर" ह्या शब्दाच्या विशेषणाचें सामान्यरूप नव्हे म्हणून "चोराच्या उलट्या बोंबा" असा प्रयोग व्हावयास पाहिजे होता. परंतु रूढीने तो तसा ठरलेला नाही. 'पोट पाठीस लागणें,' ह्या शब्दसहतीचा अर्थ "आपला चरितार्थ चालविण्याची जबाबदारी एखाद्यावर असणें" असा आहे; उदाहरणः—आम्हाला हीं कामें करावयाला फुरसद आहे कोठे? पोट पाठीस लागलें आहे ना? परंतु "पोट पाठीस लागलें आहे" ह्या शब्दसहतींतील शब्दांची माडणी थोडीशी बदलून जर "पाठीस पोट लागलें आहे" असें आपण म्हटलें, तर "पोट बगलेटीस गेलें आहे" असा भलताच अर्थ होईल.

१५. तसेंच काही शब्द अगदी समानार्थक किंवा बहुतेक अंशाने समानार्थक असतात; अशा शब्दाच्या शेकडो जोड्या आपण हरहमेश वापरतों. परंतु एका एका जोडींतील दोन्ही शब्द समानार्थक आहेत, ह्या सबबीवर जर आपण त्यांच्या स्थानात अदलाबदल केली, तर वाक्प्रचाराचें उल्लंघन केल्याचा दोष आपल्याकडे येईल. कोनाकोपरा (किंवा कानाकोपरा), ताळमेळ, चीजवस्त (चीजवस्तु) दिवाबत्ती, मुलेंबाळें, झाडझुडूप, चूकभूल, चिरगूटपांघरूण, दाणागल्ला, ध्यानींमनीं, व्यापारउदीम, गुरेंढोरें, लाकूडफाटा, निगरगट्ट (निबरघट्ट), भूतपिशाच, गप्पागोष्टी, साधाभोळा, कथावार्ता, धागडधिंगा, धिंगामस्ती, जाळपोळ, वगैरे जोड्यातील शब्द पुढचे मागे आणि मागचे पुढे केले, तर वाक्प्रचाराचें उल्लंघन होईल. कोपराकोना, मेळताळ, वस्तचीज, वगैरेसारख्या जोड्या करतां येणार नाहीत. तसेंच रंग दाखविणाऱ्या शब्दांच्याहि जोड्या असतात. ह्या दुसऱ्या शब्दाने त्या त्या रंगाचा गडदपणा, व्यक्त करावयाचा असतो. पांढरा सफेद, पिवळा जरद, तांबडा लाल, काळा कुळकुळीत, हिरवा चार, इत्यादि जोड्यांतील जे दोन शब्द, त्यांच्या स्थानांची अदलाबदल करतां येणार नाही.

१६. कित्येक शब्दसंहतींत लक्षणा समाविष्ट झालेली असते. एखाद्याला 'तोंड काळें कर' म्हणून आपण म्हटलें, म्हणजे त्याने आपल्या तोंडाला काजळ फासावें, अशी आपली इच्छा नसते; तर त्याने निघून जावें, इतकाच आपला अभिप्रेत अर्थ असतो. तसेंच "रामभाऊच्या आयुष्याची दोरी तुटली," हीहि लक्षणा आहे. ह्या वाक्याचा अर्थ "रामभाऊंचें आयुष्य संपलें," किंवा "रामभाऊ मरण पावले," असा आहे. येथें आयुष्याला दोरीची उपमा दिली आहे, आणि तदनुसार "तुटणें" हें क्रियापद आपण योजिलें आहे. वाक्प्रचाराने आयुष्याला दोरीचीच उपमा दिली पाहिजे, आणि "तुटणें" हेंच क्रियापद योजिलें पाहिजे, असें ठरून गेलें आहे. म्हणून 'आयुष्याचें मडकें फुटलें,' 'आयुष्याचा कागद फाटला,' 'आयुष्याची काठी मोडली,' 'आयुष्याची बागडी पिचकली,' वगैरेंसारखे प्रयोग करतां येणार नाहीत. इतकेंच नव्हे तर "दोरी" हा शब्द स्त्रीलिंगीच योजला पाहिजे; "आयुष्याचा दोर" ही लक्षणा ग्राह्य नाही.

१७. गढणें, बुडणें (मराठी), निमग्न होणें (संस्कृत), गर्क होणें (फारसी), ह्या तिन्ही शब्दांचा अर्थ 'पाण्याच्या पृष्ठभागाखाली जाणें,' असा एकच आहे. परंतु ते ते शब्द त्या त्या विशिष्ट प्रसंगींच योजले पाहिजेत, असें वाक्प्रचाराने ठरून गेलें आहे. 'ती मुलगी कादंबरीवाचनांत गढून गेली आहे,' किंवा 'गर्क झाली आहे,' असें आपणाला म्हणतां येतें, पण 'ती विधवा शोकसागरांत गर्क झाली आहे' किंवा 'गढून गेली आहे,' असें म्हणता यावयाचें नाही.

१८. साम्याच्या सरणीचा अवलंब करणें, हेंहि पुष्कळ प्रसंगीं धोक्याचें असतें. उदाहरणार्थ, 'दुखणें' या क्रियापदाचा कर्ता शरिराचा कोणताहि अवयव किंवा कोणतेंहि इंद्रिय होऊं शकतें. "माझें पोट दुखत आहे," "डोकें दुखत आहे," "गुडघा दुखत आहे," वगैरे सर्व प्रयोग शुद्ध आहेत. आता "माझें पोट दुखत आहे," ह्याच्याबद्दल माझ्या पोटांत दुखत आहे," असें म्हटलें तरी चालतें, म्हणून साम्याच्या सरणीने 'माझ्या डोक्यांत दुखत आहे, किंवा 'गुडघ्यांत दुखत आहे,' असे प्रयोग करणें हास्यास्पद होईल.

१९. शरिरावर दागिने, कपडे, वगैरे यथास्थान घालावयाच्या क्रिया दाखविणारीं जीं वाक्यें, त्यांची रचनाहि बहुतकरून विलक्षण आणि हास्यास्पद असते. परंतु ती रचना तशी असली, तरी ती वाक्प्रचाराने शुद्ध म्हणून ठरविलेली असते. त्यामुळे तिच्या अगचा हास्यास्पदपणा नाहीसा झालेला असतो. असल्या विलक्षण रचनेबद्दल आपण जर शुद्ध आणि खरा अर्थ दाखविणारी रचना करूं गेलों, तर आपलीच रचना अशुद्ध होऊन हास्यास्पद ठरेल.

२०. अंगांत अंगरखा, कोट, सदरा, इत्यादि घालणें; पायांत जोडा, बूट, पायमोजे, सांखळ्या, वगैरे घालणें; हातांत बागड्या भरणें; अंगात चोळी घालणें;

बोटात अंगठी घालणें; वगैरे प्रयोग खरें पाहिलें असतां विचित्र आणि म्हणून हास्यास्पद असे आहेत. कारण, आपण अंगरख्यात अंग घालतों, जोडयांत पाय घालतों, वागडयात हात घालतों, चोळींत अंग घालतों, आणि अंगठींत बोट घालतों; परंतु वाक्प्रचाराने शुद्ध म्हणून ठरविलेले जे प्रयोग आहेत, ते वस्तुस्थितीच्या दृष्टीने हास्यास्पद असले, तरी ते तसेच योजिले पाहिजेत; त्यात फेरबदल करून चालणार नाही. हा फेरबदल काही विशेष कारणासाठी करावयाला हरकत नसते. चांभाराने जोडा बांधून आणला, आणि सोनाराने अंगठी घडवून आणिली, तर जोडा व अंगठी हीं आपल्या पायाच्या व बोटाच्या मेजाचीं आहेत किंवा नाहीत, हें ठरवावयाचें असता मात्र "मीं जोडयात पाय घालून पाहिला," "मीं अंगठींत बोट घातलें," असे प्रयोग वाजवी होतील, अन्यथा होणार नाहीत.

२१. कित्येक शब्दसंहतींतील वचनेंहि वाक्प्रचाराने ठरलेलीं असतात. माझा किंचित् डोळा लागलेला होता, इतक्यात तू मला हाक मारलीस; येथे खरोखरी दोन्ही डोळे लागलेले असतात, तरी वाक्प्रचाराने एकवचनच शुद्ध ठरलेलें आहे.

२२. आशाळभूतपणाने खाद्य वस्तु मागून मागून खायाला सतावणें ह्या अर्थाने "जिभा काढणें," ह्या वाक्प्रचाराचा उपयोग होतो. उ० "मघापासून पेढ्यासाठीं जसा काय "जिभा काढीत बसला आहेस!" माणसाला जीभ एकच असते. तरी वरील वाक्प्रचारांत "जिभा" हें अनेकवचनी रूपच रूढिसमत आहे. जशीं वचनें, तशींच लिंगेंहि ठरलेलीं असतात. "आयुष्याची दोरी," हीच रूढि ग्राह्य आहे. "आयुष्याचा दोर," ही संहति शुद्ध लक्षणेवर आधारलेली असली तरी ग्राह्य होऊ शकत नाही. तसेंच "संसाराचा गाडा" ह्या संहतींतील लक्षणा शाबूत ठेवून "संसाराची गाडी" अशी शब्दसंहति आपणास योजता येणार नाही. तसेंच "मीं काय तुझें घोडें मारलें आहे?" ह्या शब्दसंहतीचा अर्थ "मीं काय तुझें नुकसान केलें आहे?" ह्या शब्दसंहतींत "घोडें" हा नपुसकलिंगी शब्दच वापरला पाहिजे. तदर्थक "घोडा" हा पुल्लिंगी शब्द वापरणेंच हास्यास्पद होईल.

२३. वाक्प्रचारांचें वर्गीकरण अनेक रीतींनी करता येण्याजोगें आहे. आम्हीं जी रीति ह्या पुस्तकात स्वीकारिली आहे, ती अशी आहे. व्याकरणात शब्दांच्या नाम, सर्वनाम इत्यादि आठ कोटि आहेत. ज्या कोटींतील शब्दाने एखादा वाक्प्रचार घटित झालेला असेल, तो त्या कोटींत आम्हीं समाविष्ट केला आहे, आणि ह्या कोटींना अनुसरून आम्हीं वाक्प्रचाराचे समूह केले आहेत; ते समूह आठ असावयाचे; परंतु उभयान्वयी व केवलप्रयोगी ह्या अव्ययांनी घटित वाक्प्रचार फारसे नाहीत. म्हणून आमचे समूह सहा झाले आहेत. ते असेः—

| | | |
|---|---|---|
| १ नाम | घटित | वाक्प्रचार. |
| २ सर्वनाम | " | " |
| ३ विशेषण | " | " |

२ अंग वोढाविणें—स्वतःला पुढे लोटणें. उ०

आपुलेंच अंग तुम्हीं वोढाविलें । त्याचें निवारिलें महादुःख ॥

३ अंग काढणें किं० अंग काढून घेणें— एखाद्या कामाशीं असलेला आपला संबंध तोडणें; एखाद्या कामातून बाहेर पडणें. उ० नारायणरावाची मसलत परिणामीं हितकर नसल्यामुळे तिच्यातून मीं आपलें अंग काढून घेतलें.

४ अंग घालणें—मदत करणें. उ० आमच्या कामात तूं अंग घातल्याने आमची फार सोय होईल (म्ह० आम्हाला तूं मदत केलीस तर, इत्यादि).

५ अंग चोरणें—

(क) कुचरपणाने काम करणें. उ० तो मजूर मला आवडत नाही, कारण तो नेहमी अंग चोरून काम करीत असतो.

(ख) कसला तरी तडाखा चुकविण्यासाठी शरिराचा विशिष्ट भाग आकुंचित करणें किंवा दूर सारणें.उ०मीं त्या माकडाच्या बरगड्यावर नेम धरून धोंडा मारला,पण त्याने आपली जागा न सोडता अंग चोरून धोंड्याचा मार चुकविला.

(ग) शरीर किंवा शरिराचा कोणताहि भाग आकुंचित करणें. उ० पिंजऱ्याचें दार अर्धवट उघडें राहिलें होतें, त्याच्या फटींतून पोपट अंग चोरून बाहेर पडला.

६ अंग झाकणें किंवा लपविणें—एखाद्या कामाशीं आपला काही संबंध आहे, हें लोकास न कळूं देणें.

७ अग झाडणें—नाकबूल करणें; अव्हेरणें.

८ अंग टाकणें—

(क) रोडावणें. उ० आई मेल्यापासून ह्या मुलाने अंग टाकलें आहे (म्ह० हें मूल वाळत चाललें आहे).

(ख) फार श्रम झाल्यामुळे किंवा दमल्यामुळे, विश्रांतीसाठी आडवें होणें.उ० आमच्या रामभाऊंची कचेरी फार लांब आहे. संध्याकाळीं ते घरीं येतात, तेव्हा घटकाभर झोपाळ्यावर अंग टाकून पडतात आणि मग हातपाय धुवावयास जातात.

९ अंगाबाहेर टाकणें—एखादी गोष्ट किंवा कृत्य न पतकरणें; एखाद्या कृत्याशीं असलेला संबंध तोडून टाकणें. उ० महाराजाची भेट घालून देण्यांत सदूभाऊंचा उपयोग होईल, अशी मला फार आशा होती. पण मीं त्याच्यापाशी ही गोष्ट काढताच तीं त्यानी अंगाबाहेर टाकली. (म्ह० महाराजाच्या भेटीचा योग घडवून आणण्याच्या कामीं मी तुम्हास मदत करणार नाही असें ते म्हणाले.)

१० अंग दर्शविणें—एखाद्या कामाशीं आपला काही संबंध आहे, हें प्रकट करणें. उ० ह्या कामीं महाराजाना तुम्हीं आपलें अंग न दर्शविलें तर बरें, असें मला वाटतें.

११ अंग दाखविणें—एखाद्या कामीं आपलें कर्तृत्व किंवा चातुर्य गाजविणें.

१२ अंग धरणें—चढीनें अंग दुखणें. उ० तुम्ही अंगणात निजू नका, तुमचें अंग धरेल. [ येथें "धरणें" हें अकर्मक क्रियापद आहे. ]

१३ अंग धरणें—पुष्ट होणें; गुटगुटीत होणें. उ० ह्या मुलाला तुम्ही डोंगरे यांचें बालामृत द्या, म्हणजे तें अंग धरील. [ येथे "धरणें" हें सकर्मक क्रियापद ]

१४ अंग घेणें—पुष्ट होणें.

१५ अंग मरणें—त्वचा बधिर होणें ( पक्षवातादिकामुळें ). उ० त्याचें अंग मेलें आहे; त्याच्या उजव्या हाताला चिमटा घेऊन पाहा, म्हणजे तुमची खात्री होईल.

१६ अंग मुरडणें—ऐटीनें हातवारे वगैरे करणें, दिमाख दाखविणें. उ० साडी नेसून गोदी पाहा कशी अंग मुरडीत आहे ती !

१७ अंग मोडून काम करणें—आपली सारी शक्ति किंवा करामत खर्चं करून एखादें काम करणें.

१८ अंग मोडून येणें—ताप यावयाच्या पूर्वी गात्रें कसकसणें. उ० माझें अंग मोडून आलें आहे, लवकरच ताप भरेल, असें वाटतें.

१९ अंग राखणें किंवा वांचविणें—कुचरपणानें काम करणें. उ० असा अंग राखून काम करू नको ! बारा आणे मजुरी घेणार ती फुकटची आहे काय ?

२० अंग सावरणें—

( क ) तोल सांभाळणें. उ० केळ्याच्या सालीवरून माझा पाय घसरला, पण मीं मोठ्या शिताफीनें अंग सावरलें, म्हणून पडलों नाहीं !

( ख ) पूर्व स्थितीवर येणें.

२१ अंगाखालीं पडणें—परिपाठाचा होणें.

२२ अंगाचा आंकडा होणें—पेटके वगैरेंच्या कारणानें गात्रें ताठ होणें किंवा आखडणें.

२३ अंगाचा आळापिळा करणें—

( क ) गात्रें पिळवटणें.

( ख ) एखाद्या कामीं असेल नसेल ती शक्ति खर्चिणें.

२४ अंगाचा खुर्दा होणें ( किंवा करणें )—श्रमादिकानीं अगदीं थकून जाणें ( किं० थकविणें ); एकसारखे धक्के बसून बसून गात्रें खिळखिळीं होऊन जाणें ( किं० खिळखिळीत करणें ). उ० खोडाळ्याची वाट किती खराब होती म्हणून सांगूं ? बैलगाडींत बसून माझ्या अंगाचा खुर्दा होऊन गेला ! उ० माझ्यापासून जरा दूर खेळ, मघापासून तूं माझ्या अंगाचा जसा खुर्दा करून सोडला आहेस !

२५ अंगाचा होरपळा होणें—तापानें किंवा रागानें, अंग भाजत असणें.

२६ अंगाची चौघडी करणें—अंग चार वेळा दुमडणें. उ० डोंबाऱ्याच्या कसरतींत लहान लहान पोरें अंगाची चौघडी करतात, तें माझ्याने पाहवत नाही !

२७ अंगाची लाही होणें (किंवा करणें)—

(क) अंग आतिशय तापणें (किंवा तापविणें). अंगाचा भडका होणें (किंवा करणें). उ० उन्हाळ्याच्या दिवसात ज्ञासुदी फार खाली असतां अंगाची लाही होते. आजच्या उन्हाने माझ्या अंगाची लाही करून सोडली आहे.

(ख) क्रोधानें क्षुब्ध होणें (किंवा करणें). उ० माझ्या मुलाने तुमचा अपमान केला, हें ऐकून माझ्या अंगाची लाही झाली. उ० अपमानकारक भाषणाने त्याने माझ्या अंगाची लाही करून सोडली.

२८ अंगाची होळी होणें (किंवा करणें)—तापाने किंवा क्रोधाने अंग अतिशय तापणें (किंवा तापविणें) किंवा संतप्त होणें (किंवा करणें).

२९ अंगाचें अंथरूण करणें—स्वतःच्या शरिराची किंवा सुखाची पर्वा न बाळगतां दुसऱ्याची सेवाचाकरी करणें. उ० त्याला नोकरी लावून द्यावी म्हणून मीं अंगाचें अंथरूण केलें, पण तो हे उपकार स्मरत नाही !

३० अंगाचें अंथरूण होणें—ताप वगैरे आजाराने अशक्त होऊन अंथरुणाला खिळून राहणें.

३१ अंगाचें कातडें काढून जोडा शिवणें—एखाद्या माणसासाठी पराकाष्ठेची झीज सोसणें. उ० मीं आपल्या अंगाचें कातडें काढून तुझ्या पायात जोडा शिवून घातला, तरी तुझे उपकार फिटणार नाहीत !

३२ एखाद्याच्या अंगाचे धुडके उडविणें किंवा चकदे काढणें किंवा अंगाचीं चकंदळें काढणें—त्याला खूप मारणें किंवा झोडपणें.

३३ अंगाचा तिळपापड होणें—रागाने बेफाम होणें.

३४ अंगाचें पाणी होणें—एखाद्या कामीं फार कष्ट, त्रास, पीडा होणें.

३५ अंगाचें पाणी करणें—एखाद्या कामीं फार मेहनत करणें, कष्ट सोसणें किंवा तसदी घेणें. उ० तुझ्यासाठी मीं आपल्या अंगाचें पाणी केलें आणि तुला तर त्याचे काहीच उपकार वाटत नाहीत !

३६ अंगाबाहेर टाकणें किंवा अंगानिराळें करणें—एखादें काम न पत्करणें. एखाद्या कामाशीं असलेला संबंध तोडणें.

३७ अंगानें अंगीं, किंवा अंगें—स्वतः. उ० कोणतेंहि काम अंगाने केल्यास चांगलें होतें.

३८ अंगाला (किंवा अंगांत) बसणें; अंगाला येणें—अंगाला ठीक, बेताचें होणें किंवा अंगात घालावयाला पुरेसा मोठा असणें. उ० ही बंडी

माझ्या अंगाला चांगलीशी बसत नाही. उ० हा अंगरखा माझ्या अंगाला येत नाही (म्ह० मला नीटसा पुरत नाही)

३९ अंगाबरोबर होणें किंवा असणें—अंगाला पुरण्याइतका म्ह० कमी नाही, आणि जास्तीहि नाही, असा असणें. उ० हा सदरा मला अगदी अंगाबरोबर (म्ह० अगदी ठीक) होतो.

४० अंगावर—स्वत म्ह० दुसऱ्याच्या मदतीची, संमतीची, अनुकूलतेची वाट न पाहता किंवा पर्वा न बाळगतां. उ० सान्याचे रुपये मीं अंगावर भरले

४१ अंगावर येणें (कोसळणें) किंवा अंगाशीं येणें—एखादें काम फिसकटून त्याबद्दलची अडचण सोसावी लागणें. उ० ती मसलत माझ्या अंगाशीं आली.

४२ अंगावर घेऊन—आपलें असें समजून, प्रेमपूर्वक, जबाबदारी शिरावर वाहून, मनापासून उ० आम्ही या गावीं परकी आहों, आपणच हें त्याचें कार्य अंगावर घेऊन पार पाडलें पाहिजे!

४३ अंगावर घेणें—पतकरणें. उ० तो लक्ष्मणराव कृतघ्न मनुष्य आहे त्याचें काम तू कशाला अंगावर घेतोस?

४४ एखाद्याच्या अंगावर तुटून पडणें—त्याच्यावर निकाराने हल्ला करणें. उ० लाटणें-बोरगावच्या रानांत ते चोर आमच्या अंगावर तुटून पडले

४५ अंगावर येणें किंवा जाणें—एखाद्यावर हल्ला करावयास धावून येणें किंवा जाणें. उ ते चोर कुऱ्हाडी घेऊन आमच्या अंगावर आले.

४६ अंगावर येणें—एखाद्याला रागें भरू लागणें, एखाद्यावर ताशेरा झाडावयास सरसावणें उ० मी त्याच्या बुकाला नुसता हात लावला, तों तो माझ्या अंगावर आला!

४७ अंगावर पडणें—

(क) अप्रिय किंवा गैरसोयीची किंवा महागाईची किंवा मनाजोगी नसलेली जिन्नस पतकरावी लागणें उ० आंबेमोहोर म्हणून मीं हे तांदूळ विकत आणिले ते निघाले कमोदाचे. कमोद आमच्या यजमानाच्या माणसांना मुळीच चालत नाहीत त्यामुळे हे पल्लाभर तांदूळ माझ्या अंगावर पडले.

(ख) एखाद्याला करावें लागणें किंवा निस्तरावें लागणें उ० जेवण आटोपताच सर्व बायका घरोघर निघून गेल्या, तेव्हा उष्टीं खरकटीं, शेणपाणी, हीं कामें माझ्या एकटीच्या अंगावर पडलीं.

(ग) एखाद्यावर ताशेरा झाडणें

४८ अंगावर शेकणें—हानिकारक होणें उ० हा व्यापार तुमच्या अंगावर

होईल. (म्ह० ह्या व्यापारांत तुम्हांस चूड लागेल). पुढे "समिध शेकणें" हा वाक्प्रचार पाहा.

४९ अंगावरचें मूल—आईच्या अंगावरचें दूध पिण्याइतकें लहान मूल.

५० अंगावरचें मूल तोडणें—मुलाचें स्तनपान बंद करून त्याला वरचें दूध किंवा अन्न ( भात वगैरे ) देऊं लागणें. उ० रामाला अंगावरचा तोडावयाला मला भारी प्रयास पडले.

५१ अंगावरून वारा जाणें—अर्धांगवायूनें आजारी पडणें, पक्षघाताचा रोग होणें. उ० गजाननभाऊंच्या डाव्या अंगावरून वारा गेला आहे.

५२ अंगाला कुयले लागणें—मत्सराने व्याकूळ होणें; अंगाचा चरफडाट होणें. उ० मला बढती मिळाली, तेव्हा गोंद्याच्या अंगाला कुयले लागले !

५३ अंगास येणें. किंवा अंगीं येणें—नुकसानीची बाब होणें. उ० चिंचेचा व्यापार हरिभाऊंच्या अंगास आला.

५४ अंगास किंवा अंगीं लागणें—

( क ) फलद्रूप होणें; लाभप्रद, हितकारक. होणें. उ० रोज अर्धा तास व्यायाम केलास, तर हें पितोस तें दूध तुझ्या अंगास लागेल.

( ख ) एखाद्यावर शाबीत होणें. उ०खून मारुत्याच्या अंगीं लागावयाचा नाही.

( ग ) सोसावें लागणें. उ० हें नुकसान उगीचच्या उगीच माझ्या अंगास लागलें.

५५ अंगीं असणें—ठायीं असणें. उ० आल्याच्या अंगीं पित्त शमविण्याचा गुण आहे. उ० त्याच्या अंगीं गायनाची कला आहे. उ० त्याच्या अंगीं विनय नाहीं. उ० लोहचुंबकाच्या अंगीं लोखंड आकर्षिण्याचा गुण असतो. उ० अंगीं असेल तो जाणे खाणाखुणा.

५६ अंगीं आणणें—( क ) बिंबवून घेणें, साध्य करून घेणें, शिकणें. उ० वक्तशीरपणा अंगीं आणण्याचा प्रयत्न करा. ( ख ) प्रसंगापुरतें अवलंबिणें. उ० नुसतें शौर्य अंगीं आणून त्याने मजवर हल्ला केला.

५७ अंगाची सावली करणें—आपल्या संरक्षणाखाली एखाद्याला घेणें. उ० साधु पुरुष आपल्या अंगाची सावली करून दीनाचें रक्षण करतो.

५८ अंगीं जिरणें—एखादी खोडी, व्यसन, लकब, जडणें. उ० रामभाऊला वेडावून दाखविता दाखविता बोबडें बोलण्याची खोडी शिवरामाच्या अंगीं जिरली.

५९ अंगीं ताठा भरणें—मगरूरी येणें. उ० विष्णुपंताला हेड्क्लार्कची जागा मिळाल्यापासून त्याच्या अंगीं भारी ताठा भरला आहे.

६० अंगीं तुटणें—रोड होणें. उ० आई मेल्यापासून तें मूल पार फार अंगीं तुटलें.

६१ अंगीं नसणें—अवगत नसणें. उ० म्हशीचें दूध काढणें माझ्या अंगीं नाही.

६२ अंगीं फुटणें—लठ्ठ होणें, जाडी होणें. उ० माणकोबाने मलईचा खुराक सुरू केल्यापासून तो खूप अंगीं फुटला आहे.

६३ अंगीं भिडणें—जडणें. उ० नान्याची संगति लागल्यापासून गोंद्याच्या अंगीं टवाळकी भिनली.

६४ अंगींमाशीं भरणें किंवा अंगीं भरणें—लठ्ठ, गुटगुटीत होणें. उ० द्वारकानाथ तालीम करूं लागल्यापासून अंगींमाशीं भरत चालला आहे.

६५ अंगीं (किंवा अंगाला) मिरच्या लागणें (किंवा झोंबणें)—चरफडाट होणें. उ० दुकानदारानें मला कापड स्वस्त्या दराने दिलें, म्हणून तुझ्या अंगीं कां मिरच्या झोंबल्या? उ० हेडमास्तरने माझें काम दोन तास कमी केलें, म्हणून इतराच्या अंगाला मिरच्या लागल्या.

६६ अंगीं मुरणें—पुरतेपणीं न फुटणें, उगवणें, पिकणें किंवा बाहेर पडणें, पुरतेपणीं बरा न होणें. उ० तुमच्या बाबूला केळें खायला द्या, म्हणजे कांजिण्या त्याच्या अंगीं मुरणार नाहीत. उ० योग्य उपचार न झाल्याकारणानें त्या मुलीच्या अंगीं ताप मुरला.

६७ आपल्या अंगीं, अंगें किंवा अंगानें—स्वतः.

६८ आपल्या अंगीं विन्हाड देणें—दुर्व्यसनाला आपल्या ठायीं थारा देणें. उ० मगरूरीला आपल्या अंगीं बिन्हाड देऊं नको.

६९ एका अंगावर असणें किंवा होणें—एका बाजूस राहणें.

## २७. ऊर

१ ऊर—छाती, वक्षःस्थळ.

२ ऊर काढून चालणें—ऐटीनें किंवा बेपर्वाईनें चालणें किंवा वागणें.

३ ऊर दडपणें—(भीतीनें, आश्चर्यानें, वगैरे) स्तब्ध किंवा ग्रस्त होणें.

४ ऊर दबणें, बसणें, फाटणें, उलटणें—आश्चर्यचकित होणें; भीतिग्रस्त होणें; घाबरणें; गांगरणें.

५ ऊर दाटणें किंवा भरणें—

(क) छातींत बांध बसणें.

(ख) दुःख, प्रेम, वगैरे भावनांनी अंतःकरण आक्रान्त होऊन जाणें.

६ ऊर फोडणें किंवा फोडून घेणें—फार श्रम करणें. उ० तूं हेस्ट मनुष्य आहेस! तुझ्यापुढे ऊर फोडणें व्यर्थ!

७ एखाद्याचें ऊर फोडणें—त्याच्याकडून फार काम करून घेऊन त्याला त्रास देणें किंवा सतावणें. उ० या घोड्याला दामटून तुम्हीं त्याचें ऊर फोडलें!

८ ऊर बडविणें—दुःखानें किंवा आश्चर्यानें छातीवर हातानी ताडन करणें.

९ उराला ( किंवा छातीला ) हात लावून किंवा उरावर ( किंवा छातीवर ) हात ठेवून—मनःपूर्वक; निश्चयानें; खात्रीपूर्वक; न कचरता, न डगमगतां. उ० ह्या आर्येचा अर्थ मला समजला आहे, असें मी छातीला हात लावून तुम्हाला सांगतों !

१० उरापोटावर उचलणें—मोठ्या कष्टानें किंवा श्रमानें उचलणें. उ० तें तांदुळाचें पोतें भारी जड होतें, परंतु रामानें तें उरापोटावर उचलून कसें तरी एकदाचें घडवंचीवर ठेवून दिलें !

११ एखाद्याच्या उरावर असणें—

( क ) अगदी करावयास पाहिजे असें काम त्याच्या शिरावर असणें. उ० तुमच्याबरोबर पत्ते खेळावयाला मला वेळ नाही. माझ्या उरावर हीं पाच समीकरणें सोडवून मास्तराला दाखवावयाचीं अशीं आहेत ना ?

( ख ) त्याच्यावर अंमल करणारा किंवा अधिकार चालविणारा मनुष्य असणें. उ० कचेरींत उशिरा जाऊन कसें चालेल ? आमच्या उरावर तो साहेब आहे ना ? ( म्ह० आम्हांला रागें भरणारा इ० ).

( ग ) भारभूत झालेला असणें. उ० दहा रुपयात माझा संसार कसा भागेल ? माझ्या उरावर भाचा आहे ना ? ( म्ह० त्याला पोसण्याची जबाबदारी माझ्या शिरावर आहे ना ! )

१२ उरावर घेणें—एखादें कठीण काम करण्याचा पत्कर घेणें किंवा तें करावयास निघणें.

१३ एखाद्याच्या उरावर धोंडा ठेवणें किंवा देणें—त्याला अवघड काम करावयास सांगणें. [ 'धोंड' असा स्त्रीलिंगी शब्दहि येथें योजण्यात येतो. ]

१४ एखाद्याच्या उरावर बसणें—

( क ) करावयाला पाहिजेच असें त्याच्याकडे किंवा त्याच्या वाट्याला कांही काम येणें.

( ख ) त्याला कैचींत धरणें. त्याच्यावर जबरदस्ती करणें. उ० त्या मजुराच्या उरावर बसून मीं हें काम त्याच्याकडून एका दिवसात करवून घेतलें.

१५ उराशीं धरणें—( माणसासंबंधानें )

( क ) त्याला नम्रपणानें विनविणें किंवा प्रार्थिणें.

( ख ) त्याला प्रेमानें कवटाळणें.

( वस्तूसंबंधानें )—ती संभाळून ठेवणें; तिची जोपासना करणें; ती शाबूत ठेवणें; तिचा भंग होऊं न देणें.

१६. उरीं डोंगर घेणें—

(क) महत्त्वाचें किंवा कठीण काम पतकरणें.

(ख) फार परिश्रम करणें.

१७ उरीं पोटीं करणें—फार परिश्रमानें किंवा कष्टानें करणें.

१८ उरीं पोटीं धरणें—नम्रपणानें विनवणी करणें; दादा बाबा करणें.

१९ उरीं फुटणें किंवा भरणें—जिवाविशेष श्रम केल्यामुळे छाती दुखू किंवा ठणकू लागणें; अतिशय थकून जाणें

## २८. ओटी

१. ओटी—

(क) बेंबीच्या खालचा व कंबरेच्या वरचा पोटाचा भाग.

(ख) लुगडें किंवा धोतर नेसल्यावर त्याचा जो खोळीसारखा भाग होतो तो. उ० त्या मुलीनें आम्याच्या झाडाखाली पडलेल्या साऱ्या कैऱ्या आपल्या ओटींत भरल्या.

(ग) मंगलप्रसंगीं तांदूळ, गहू, हळकुंडें, वगैरे पदार्थ स्त्रीच्या ओटींत घालतात ते.

२. ओटी भरणें—

(क) स्त्रीच्या लुगड्याच्या ओटींत तांदूळ, गहू, नारळ वगैरे पदार्थ यथाविधि घालणें.

(ख) एखाद्याच्या आवडत्या नातलगाला औषधें वगैरेंच्या योगानें, बरें करणें; जिव्हाळ्याच्या माणसाला जीवदान देणें. उ० वैद्यबोवा, माझ्या मुलाला बरें करून माझी ओटी भरा.

३. ओटींत घालणें—

(क) एखाद्याच्या हवालीं करणें. उ० पोरीला मी तुमच्या ओटींत घालीत आहे. तिचा पोटच्या मुलीप्रमाणें सांभाळ करा.

(ख) अपराध, दोष, वगैरे एखाद्याच्या माथीं बसविणें. उ० हा अन्याय तुम्ही उगीचच्या उगीच माझ्या ओटींत घालीत आहां!

(ग) दत्तक देणें उ० जनाबाई आपला मुलगा कधींहि माझ्या ओटींत घालावयाची नाहीं.

४ ओटींत देणें किंवा घेणें—दत्तक देणें (किंवा घेणें). उ० मी आपल्या मुलाला कोणाच्याहि ओटींत देणार नाहीं.

५ भरल्या ओटीनें—(आसन्नप्रसव अशा स्त्रीसंबंधानें) मुलासकट. उ० प्रसून न्हावयास माहेरीं जाऊं निघालेल्या सुनेस सासू म्हणाली, "भरल्या ओटीनें परत ये बरें!"

२९. ओठ

१ ओठ—मुखाच्या वरचा आणि खालचा असे जे दोन अवयव, ते प्रत्येक.

२ ओठ फुटणें—थंडीमुळे ओठाला चिरा किंवा भेगा पडणें.

३ ओठाचा जार वाळणें—जार म्ह० मूल जन्मताच त्याच्या ओठावर, गालांवर, वगैरे जो चिकटा किंवा बुळबुळीत पदार्थ असतो तो. ओठाचा जार वाळणें = अर्भकदशा समाप्त होऊन मोठें होणें. उ० अजून तुझ्या ओठांवरचा जार देखील वाळला नाही. (म्ह. तूं अजून लहानच आहेस). ह्याच अर्थाने ओठाचे वाळणें किंवा जिरणें, ह्या वाक्प्रचाराचा उपयोग केला जातो.

४ (त्याचा किंवा तुझा) ओठ पिळला तर दूध निघेल!—तो (किंवा तूं) अजून लहानच आहे (किंवा आहेस). पाजलेल्या दुधाचीं पुटें अजून त्याच्या (किंवा तुझ्या) ओठावर आहेत.

५ ओठाबाहेर काढणें—बोलून दाखविणें; प्रकट करणें. उ० मीं तुला सांगितलेली बातमी ओठाबाहेर काढूं नको.

६ पोटांत एक आणि ओठांत एक—मनांत एक विचार आणि बोलण्यांत दुसराच!

७ एखाद्याच्या ओठापर्यंत येणें—बोलून दाखविण्याच्या तो अगदी बेतांत असणें.

८ ओठापर्यंत आलें पण पोटांत गेलें नाही!—ऐन उपभोगाची वेळ प्राप्त झाली. पण दुर्दैवाने उपभोग घेतला नाही.!

३०. कंठ

१. कंठ—

(क) गळा; छातीच्या वरचा आणि हनुवटीच्या खालचा भाग, डोकें आणि धड ह्यांना जोडणारा शरिराचा भाग. उ०

*अनोर्शी सुंदर उटि शेंदुराची। कंठीं झळके माळ मुक्तापळांची॥*—रामदास.

(ख) घसा. उ० दुःखामुळे त्याच्या कंठातून शब्द निघेना.

(ग) आवाज (गायनांत); उच्चाराचा प्रकार. उ० त्या स्त्रीचा कंठ मधुर आहे.

(घ) प्रौढ, खणखणीत उच्चार. उ० त्या मुलाचा कंठ नुकताच फुटला. (म्हणजे त्याचा पोरकट किंवा कोवळा आवाज जाऊन आता त्याला मारदस्त आवाज आला आहे.)

(ङ) राघूच्या किंवा कबूतराच्या गळ्यावरील परांचें वर्तुळ. ह्या पक्ष्यांचा आवाज स्फुट किंवा मधुरतर झाला म्हणजे हें वर्तुळ काळ्या रंगाचें असतें.

२ कंठ दाटणे किंवा दाटून येणें किंवा सद्गदित होणे—प्रेमातिशयामुळे घसा भरून येणें असें झालें असतां शब्दोच्चार किंवा स्पष्ट शब्दोच्चार, होऊं शकत नाही.

३. कंठ फुटणें—

(क) शब्दोच्चार प्रौढ किंवा खणखणीत होणें.

(ख) घशातून पिंजका आवाज निघू लागणें. उ० फार उच्च स्वरांत गाऊं नको, कंठ फुटला तर अगदी रंगाचा भंग होऊन जाईल

४ कंठीं प्राण उरणें—आसन्नमरण होणें. उ० मला वाटतें, जनार्दनपंतांच्या कंठीं प्राण उरला आहे! आता त्याला मात्रावित्रा देऊन काही उपयोग होईल, असें दिसत नाही!

५ कंठीं प्राण धरणें—एखादी इच्छा किंवा आशा सफळ झाल्यावर मरावें, अशा इराद्याने जीव धरून राहणें. उ० मरावयाच्या आधी मुलाची भेट व्हावी, अशी त्या म्हाताऱ्याची फार इच्छा होती. तो येऊन भेटेतोंपर्यंत म्हाताऱ्याने कंठीं प्राण धरून ठेवला होता, मुलगा भेटल्याबरोबर त्याने प्राण सोडला!

६ कंठीं प्राण येणें—भयाने घाबरगुंडी वळणें; तीव्र दुःखाने किंवा भुकेने व्याकुळ होणें उ० मी रानातून फिरत असता त्या पिंपळापाशी, जातों तों त्याच्या बुधाशीं वाघ बसलेला मीं पाहिला, तेव्हा माझ्या कंठीं प्राण आले उ० तुझें मूल केव्हाचें रडत आहे तरी? दुधावांचून त्याचे प्राण कंठीं आले आहेत! त्याला एकदम प्यायला घे

७ कंठ मोकळा करून रडणें—ओक्साबोक्शी रडणें. उ०—

मोकळा करुनि कंठ तेधवा। आठवूनि मनिं जानकीधवा।
ते रडे, भरतही तसा रडे। जोंवरी नयन होति कोरडे॥ वामन—भरतभाव

## ३१. कपाळ

१. (क) भिवयांच्या वरचा व मस्तकाच्या खालचा जो प्रदेश तो.

(ख) नशीब, दैव, पूर्वकर्माचा परिपाक. उ० पुत्राचें सुख माझ्या कपाळीं नाही.

२ कपाळ उठणें किंवा चढणें—त्रास, पीडा किंवा उपद्रव होणें

३ कपाळ काढणें—वैभवास चढणें उ० ह्या मुलाच्या विद्येला पैसा खर्च करावयास तुम्ही कचरू नका. तो चांगलें कपाळ काढील, असा मला रंग दिसत आहे. ह्याच अर्थाने 'नशीब काढणें' असाहि वाक्प्रचार आहे.

४ एखाद्यावर कपाळ टेकणें—त्याच्यावर भरवसा किंवा भिस्त ठेवून असणें.

५ कपाळ धुऊन पाहणें—नशिबीं काय आहे, तें पाहणें.

६ एखाद्याचें कपाळ फुटणें—त्याच्यावर दुर्दैव ओढवणें, उ० त्या बाईने

नवऱ्यासाठी किती पैसे खर्चिले ! किती नवस केले ! पण कांही उपयोग झाला नाही. शेवटीं तिचें कपाळ फुटलें ! ( म्हणजे तिचा नवरा मेला ).

७ कपाळाचें कातडें नेणें—दुर्दैवी स्थितींत पाडणें; विपत्तींत लोटणें.

८ एखाद्याच्या कपाळाची रेषा उघडणें (किंवा उपटणें)—त्याला अकल्पित रीतीनें सुदैव प्राप्त होणें.

९ कपाळाला केस उगवणें—अशक्य गोष्ट घडणें. उ० तो रामा पास झाला काय ? कपाळाला केस उगवले, असेंच म्हटलें पाहिजे !

१० कपाळावर हात मारणें—आश्चर्य, दुःख वगैरे भावनांनीं कपाळावर हातानें ताडन करणें; नशिबास दोष लावणें.

११ एखाद्याच्या कपाळाशीं कपाळ घासणें—त्याच्याशीं सहवास करणें; त्याच्या संगतींत राहणें; त्याच्या कच्छपीं असणें.

१२ एखाद्याच्या कपाळाला अपकीर्ति, अपयश, दारिद्र्य इ० येणें—त्याच्या भोगाला अपकीर्ति इ० येणें.

१३ एखाद्याच्या कपाळीं डाग लागणें—त्याची बेअब्रू, फजिती होणें.

### ३२. कंबर

१ कंबर—कटि. उ० कंबरेला करगोटा घाला. उ० तिच्या कंबरेवर मोठी घागर ठरत नाही. उ० सिंहाची कंबर त्याच्या शरिराच्या मानानें बारीक असते.

२ कंबर मोडणें ( किंवा मोडून जाणें )—कंबरेंत अशक्तपणा येणें. उ० आज विहिरीची मीं पन्नास घागर आणिली, माझी कंबर मोडून गेली !

३ कंबर खचणें किंवा बसणें किंवा मोडणें किंवा मोडून जाणें—निराश होणें, गलितोत्साह होणें. उ० माझ्या भावाची परीक्षा नापास झाली, असें ऐकून माझी कंबर खचली. वशिल्याशिवाय येथे कोणतेंहि काम होत नाही, हें ऐकताच माझी कंबर बसली.

४ कंबर ताठणें—आजारामुळे किंवा अशक्तपणामुळे, कंबर हालविण्याची किंवा वाकविण्याची ताकद नसणें.

५ कंबर बांधणें—कोणत्याहि कामाला सिद्ध होणें किंवा तयार राहणें; उत्साह बाळगणें; धैर्य धरणें. उ० मांडव मांडव म्हणजे काय गोष्ट आहे ! हा मी कंबर बांधून तयार आहे ! अर्ध्या तासाच्या आंत तुमचा मांडव पुरता करून देतों. यंदा नापास झालास म्हणून काय झालें ? कंबर बांध ! पुन्हा अभ्यासाला लाग ! पुढच्या वर्षी तूं खचित पास होशील !

६ कंबर धरणें किंवा भरणें—थंडी वगैरे कारणामुळे कंबर दुखत असणें. उ० आज चार पांच दिवस माझी कंबर धरली आहे.

टीप—ह्या प्रयोगांत "धरणें" हें क्रियापद अकर्मक आहे.

७ कवरेचें सोडून डोकीस गुडाळणें—कवरेचें धोतर सोडून तें डोक्याला गुडाळणें, म्ह० लाज सोडणें, निर्लज्जपणाचें वर्णन करणें.

## ३३. कान

१. कान—

( क ) प्राण्याचें श्रवणेंद्रिय.

( ख ) मोदकपात्र, कढई वगैरे भांडीं धरावयासाठीं किंवा उचलावयासाठीं केलेलीं जीं साधनें, तीं प्रत्येक

( ग ) कानाच्या पाळींत वगैरे दागिना अडकविण्यासाठीं पाडलेलें भोक. उ० तुमच्या गजाननाचा भिकबाळीचा कान बुजला आहे

( घ ) बंदुकीला बत्ती लावावयाची जागा. (ह्या अर्थानें 'काना' हा शब्द अधिक प्रचलित आहे ).

२ एखाद्याचे कान उघडणें—त्याचा मूर्खपणा दाखवून देऊन किंवा त्याचें हिताहित कशांत आहे हें समजावून देऊन त्याला सन्मार्गावर आणणें. उ० सदोबाचे कान उघडण्यासाठीं मीं पुष्कळ प्रयत्न केले, परंतु व्यर्थ! [ ह्याच अर्थानें "कान उघडणी" ह्या नामाचाहि उपयोग होतो उ० मीं त्याची चांगली कानउघडणी केली ].

३ एखाद्याचे कान उघडून सांगणें—त्याला स्पष्ट शब्दांनी बजावणें.

४ एखाद्याचा कान उपटणें-धरणें, पिळवटणें किंवा पिळणें—अपराधाला शिक्षा करण्यासाठीं त्याचा कान पिरगाळणें.

५ कान कापणें किंवा कान कापून हातावर देणें—

( क ) फसविणें. उ० दुकानदारानें माझा चांगला कान कापला!

( ख ) पराभव करणें, एखाद्याच्यावर चढ करणें उ० त्यानें सर्व लोकांपुढें प्रतिज्ञा केली की, जर तुम्ही उद्यां सारे याल, तर मी तुमच्या समक्ष ह्याचे कान कापीन.

छत्रे, इसापनीति

६ कान किटणें—तीच तीच गोष्ट वारंवार ऐकून कंटाळणें. उ० पुरे कर तुझें काशीयात्रेचें वर्णन! तें ऐकून ऐकून आमचे कान किटून गेले आहेत!

टीप—प्रयोजकभेदीं "कान किटविणें" ह्याचा अर्थ तीच गोष्ट पुन्हा पुन्हा सांगून कंटाळा आणणें," असा होतो.

७. कान झाडणें—

( क ) विनंती अमान्य करणें उ० मीं त्याला माझ्यासाठीं एक नागपुरी धोतरजोडा विकत आणायला आज सांगितलें, पण त्यानें कान झाडले

८ कान टवकारून ऐकणें (किंवा पाहणें)—लक्ष्यपूर्वक ऐकणें किंवा ऐकत

राहणें. उ० अभ्यासाकडे तुझें लक्ष असूं दे. आमच्या गोष्टी असा कान टवकारून कशाला ऐकत आहेस?

९ कान टोचणें—एखाद्याला एखादें काम करावयाला चेतविणें, चियावणें, किंवा उत्तेजन देणें.

१० सोनाराने कान टोचलेले पटतात—बलिष्ठ मनुष्याचा उपदेश मुकाट्याने पाळला जातो. शिरजोर माणसाचा हुकूम ऐकला जातो.

११ कानठाळ्या बसणें (किंवा बसविणें)—कशाच्यातरी मोठ्या आवाजानें कांही काळ श्रवणेन्द्रिय बधिर होणें (किंवा करणें). उ० त्या सिंहाच्या गर्जनेनें माझ्या कानठाळ्या बसल्या.

१२ एखाद्याचा कान धरून (किंवा) पिळून घेणें—जबरदस्तीनें घेणें; हिसकावून घेणें; कोणाच्या कांही सबबी न ऐकता घेणें; हक्कानें घेणें. उ० तें जाजम माझें आहे; त्याचें नव्हे. मी नाशकास जातांना तें त्याला वापरावयासाठी दिलें होतें,इतकेंच. कान धरून तें त्याच्यापासून मी घेईन.

१३ कान निवणें (किंवा थंड होणें)—आनंदकारक खबर ऐकून हर्ष पावणें. उ० तुझ्या मुलाचें एकदाचें लग्न झालें, हें ऐकून माझे कान निवले.

१४ कान पाडणें—गलितधैर्य होणें; निराश होणें; आशा सफल होण्याचा रंग न दिसल्यामुळे खचणें. उ० यदा तें घर विकलें जात नाही, हें पाहून त्याने कान पाडले. टीप—कांही प्राणी भयाच्या किंवा निराशेच्या प्रसंगीं आपले कान, (जे नेहमीं ताठ किंवा उभे असतात,) ते खाली पाडतात. यावरून "कान पाडणें" ह्याचा वरीलप्रमाणें अर्थ झाला.

१५ आपला कान पिळून घेणे किंवा कानाला खडा लावून घेणें—एखादी गोष्ट करून ती बिघडली, किंवा ती ज्याच्यासाठी केली असेल त्याला ती न आवडली, तर पुन्हा तसली गोष्ट न करण्याचा निश्चय करणें; एकदा ठेच लागल्यामुळे पुन्हा आपण तसें करणार नाहीं असा निर्धार करणें. उ० तुझ्यासाठी ही कढई मीं मुद्दाम पुण्याहून आणली; आणि तुला तर ती आवडत नाही. पैसे माझ्या अंगावर पडले; आता मी आपला कान पिळून घेतों (किंवा कानाला खडा लावून घेता) की पुन्हा कोणासाठी कांही जिन्नस विकत घ्यावयाची नाही!

१६ एखाद्याचें कानपूर ओस पडणें—तो बहिरा होणें. उ० त्याच्याशीं इतक्या हळू बोलून कांही उपयोग नाहीं; ओरडून बोला; त्याचें कानपूर ओस पडलें आहे!

१७ कानपूर ओस करून बसणें—आपणाला ऐकूं येत नाही, असा बहाणा करणें.

१८ कान पसरून ऐकणें—लक्ष्यपूर्वक ऐकणें ( पण करावयाला न उठणें ).

१९ एखाद्याचे कान फुंकणें, भरणें किंवा भारणें—त्याला दुसऱ्याबद्दल वाईट सांगून त्याचें मन कलुषित करणें. उ० वरिष्ठानें मला ही जागा देण्याचें कबूल केलें होतें; पण कोणी दुष्टानें त्याचे कान फुंकले; तेणें करून त्याचें मन फिरलें आणि त्यानें ती जागा दुसऱ्याच एका माणसास दिली !

२० कान फुटणें—

( क ) बहिरा होणें. उ० अरे, तुला मघापासून मी ती खिडकी लावावयास सांगत आहे आणि तू काही ती लावीत नाहींस ! तुझे कान फुटले आहेत काय ?

( ख ) कानामध्ये फोड येऊन कानांतून लस वाहूं लागणें. उ० तुमच्या मुलाचा कान फुटला आहे, त्यात गायीचें दूध घाला, म्हणजे तो बरा होईल.

२१ कान येणें—ऐकण्याची शक्ति प्राप्त होणें. उ० गर्भांतील मुलाला तिसऱ्या महिन्यांत कान येतात, असें म्हणतात.

२२ कान लांब होणें—अक्कल कमी होणें, मूर्ख होणें, चिकळणें. उ० अली-कंडे राम्याचे कान लांब झाले आहेत, असें दिसतें; कारण, तो अगदी कोणाचें कांही ऐकत नाही !

टीप—गाढवाचे कान लांब असतात आणि गाढव मूर्ख असतें, ह्यावरून हा वाक्प्रचार रूढ झाला आहे.

२३ कानाचा चावा घेणें—भलभलत्या ( किंवा खोट्यानाट्या ) गोष्टी सांगून दुसऱ्याचें मन कलुषित करणें.

२४ कानाच्या कोपऱ्याला कळूं न देणें—कोणाच्याहि जवळ न सांगणें. उ. तुझी माझी मैत्री म्हणून हा माझा बेत मी तुला सांगत आहें; तूं तो कानाच्या कोपऱ्याला कळूं देणार नाहीस, अशी माझी खात्री आहे.

२५ कानाचे किडे झाडणें—

( क ) चहाड्या ऐकून एखाद्याचें मन कलुषित झालें असलें तर, त्याला वस्तुस्थिति कळवून त्याचें मन शुद्ध करणें. उ० माझ्याबद्दल गोविंदरावानें नानासाहेबांचें मत कलुषित केलें होतें; परंतु मला ह्या प्रकाराची शंका येताच मी नानासाहेबांच्या कानाचे किडे झाडले, तेव्हा माझ्याविषयी त्यांचें मन निवळलें.

( ख ) एखाद्याला बोध करणें; रागें भरणें.

२६ कानांत जपणें किंवा मंत्र सांगणें—एखाद्याजवळ गुलगुल गोष्टी बोलणें ( त्याचें मन वळविण्यासाठी ). उ० प्रेमचंदाच्या कानांत तूं जपत आहेस, पण सारें फुकट होईल, असें मी तुला आज सांगून ठेवतों !

२७ कानांत तेल घालून निजणें—बेफिकीर राहणें किंवा असणें. उ० तो कानात तेल घालून निजला आहे, त्याच्या भरवशावर तुम्ही राहूं नका !

२८ कानाबाहेर किंवा कानावेगळा करणें—मनांत न घेणें. उ० मीं त्याची इतकी विनवणी केली, पण व्यर्थ! त्यानें माझी मागणी कानाबाहेर केली!

२९ कानांत सुंठ फुंकणें—एखाद्याला चिथावणें. उ० कोणीतरी तुझ्या कानांत सुंठ फुंकली आहे खास! एऱ्हवी तूं त्या म्हाताऱ्याच्या पाठीस इतका लागला नसतास!

३० कानामागून येणें आणि तिखट होणें—एखाद्याच्या मागून येणें आणि त्याच्यावर आपला अंमल गाजविण्याला प्रवृत्त होणें.

३१ कानामागे टाकणें—न ऐकणें; झिडकारणें. उ० मी तुला हिताची गोष्ट सांगत आहे! माझा उपदेश तूं कानामागे टाकूं नको!

३२ उजव्या (किंवा डाव्या) कानावर पडणें, निजणें, लोळणें—उजव्या (किंवा डाव्या) कुशीवर निजणें इ०; उजवें (किंवा डावें) अंग अंथरुणाला लागेल अशा रीतीनें निजणें इ०. उ० उजव्या कानावर नीज, म्हणजे तुझ्या डाव्या कानांत औषध घालीन!

३३ कानावर मान ठेवणें—आळसानें किंवा बेफिकीरपणानें, एका अंगावर वळून तक्क्याला टेकून पडणें. किंवा लोळणें उ० त्रिविक्रम शेटजींला मी भेटावयाला गेलों, तेव्हां ते कानावर मान ठेवून झोपाळ्यावर आडवे झाले होते.

३४. कानावर हात ठेवणें—

(क) आपणाला कांहीं एक माहिती नाहीं, असें म्हणणें. उ०

राम म्हणे, "कर्णी कर ठेवू ती तरि न दक्षिणा आशा।
मज फार दक्षिणेची विप्रा जसि तशिच लागली आशा॥
मोरोपंत–भारती रामायण.

(ख) न ऐकणें; हेळसांडीवर नेणें; न पत्करणें; अंगावर न घेणें. उ०

मला निरखिता भवचरणकन्यका आपगा
म्हणे, "अगइ, ऐकिलेंहि न कधी असें पाप गा!"
कर श्रवणिं ठेविते, मुघडि नेत्र, घे भीतिला,
न घालिन भिडेस मी, जरिहि कार्यलोभी, तिला॥
मोरोपंत–केकावलि.

३५, कानांत तुळशी (किंवा तुळशीपत्र) घालणें किंवा घालून बसणें—साधु लोक कानांत तुळशीचीं पानें घालतात, यावरून पुढील दोन अर्थ निघाले आहेत.

(क) प्रपंचांतील लबाडीचे धंदे सोडून देऊन आम्हीं साधुत्वाचा मार्ग धरला आहे, असा बहाणा करणें.

(ख) तें ऐकूं येत नाहीं, तिकडे लक्ष्य नाहीं किंवा त्याची आपणांस पर्वा नाहीं, असें दर्शविणें.

३६. कानांत बोटें घालणें (किंवा कान झाकणें)—
(क) एखादी गोष्ट आपणांस माहीत नाही, असें म्हणणें.
(ख) एखादी गोष्ट न पतकरणें.
३७ कानावरून जाणें—
(क) कानाला ओझरता स्पर्श करून जाणें. उ० चोरट्यानें गोफणीनें झोकलेल धोंडा माझ्या कानावरून गेला.

(ख) ऐकण्यात येणें.:उ० मुंबईला विहार, तुळशी आणि तानसा येथील पाणी येतें, हें तुझ्या कानावरून तरी गेलें आहे काय?

३८ कानाशीं कान लावणे—गुप्तपणें मसलती करणें. उ० गोविंदराव आणि लालजी यांनी कानाशीं कान लावून माझी उचलबांगडी करण्याचा बेत ठरविला!

३९ कानाशीं लागणें किंवा कानीं लागणें—एखाद्याला गुप्त गोष्ट सांगण्यासाठी त्याच्या कानाजवळ आपलें तोंड नेणें; एखाद्याच्या कानाशीं लागणें म्ह० त्याला गुप्त गोष्टी सांगणें किंवा त्याला चहाड्या सांगणें. उ० तूं लक्ष्मणरावाच्या कानाशीं इतका वेळ लागून त्याला काय सांगत होतास?

४० कानाला दडे (किंवा दट्टे) बसणें—कान बधिर होऊन त्यांची श्रवण करण्याची शक्ति नाहीशी होणें.

४१ कानीं कपाळीं रडणे किंवा ओरडणें—एकसारखा बोध, उपदेश, वगैरे करून वस्तुस्थिति नजरेस आणून देणें. उ० रोज चार-चार तास अभ्यास कर म्हणून मी आज सहा महिने तुझ्या कानीं कपाळीं ओरडत आहे, पण तूं काही माझें ऐकिलें नाहीस! आता नापास झालास, तो योग्यच झालास!

४२ कानीं कोचीं बसणें किंवा लागणें—कोणाचें संभाषण ऐकण्यासाठी गुप्त ठिकाणीं म्हणजे कोपऱ्यात बसणें.

४३ कानीं मनीं नसणें—ऐकण्यात आलेलें नसणें व मनातहि आणलेलें नसणें. ह्याच अर्थी "ध्यानीं मनीं नसणें" हें अधिक प्रचारांत आहे. उ० सगूताईच्या मुलीचें लग्न यदा होईल, ही गोष्ट माझ्या कानीं मनीं सुद्धा नव्हती (म्ह० ऐकण्यात आली नव्हती व मनांतहि आलेली नव्हती).

४४ आमच्या कानीं सात बाळ्या—आम्हाला आता, (म्हणजे यानंतर), कांही ऐकूं येणार नाही म्हणजे आम्ही ऐकणार नाही, किंवा आम्हांला ऐकूं आलें तरी ऐकिलें नाही, अशा रीतीनें वागणार! लहान मुलाच्या भाषेतील हें एक वाक्य आहे.

४५ ह्या कानाचें ह्या (किंवा त्या) कानास कळूं न देणे—अगदी गुप्त ठेवणें; कोणालाहि कळू न देणें. उ० ती गोष्ट मजजवळ बोलायाला कचरूं नका. मी ह्या कानाचे त्या कानाला कळूं देणार नाही!

४६ एखादी गोष्ट ह्या कानाने ऐकणें, आणि ह्या ( किंवा त्या ) कानाने सोडणें—ती गोष्ट ऐकल्यानंतर तिच्याबद्दल विचार न करणें; ती विसरण्याचा प्रयत्न करणें; ती जणों ऐकलीच नाही अशा रीतीने वागणें. उ० कोणीं आमच्याजवळ कोणाची निंदा केली, तर ती आम्ही ह्या कानानें ऐकतों आणि ह्या कानानें सोडून देतों. उ० असल्या गोष्टी आम्ही ह्या कानानें ऐकतों आणि त्या कानाने सोडून देतों.

३४. कास.

१. कास—

( क ) गाय, म्हैस, शेळी वगैरेंची दुधाची ओटी.

( ख ) धोतर किंवा लुगडें नेसल्यावर त्याचे सोगे मागे खोवतात, ते.

( ग ) कंबर. उ०

गळां तुळसीहार कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि ध्यान ॥

२ कास घालणें—एखाद्या कामासाठी सर्व सामग्री जुळवून तयार होऊन राहणें. एखादी गोष्ट करावयास उत्सुकतेने सिद्ध होणें. उ०

उत्तरहि पाण्डवांते वर्णुनि कळवी पुन्हा स्वजनकास।
की, " हेचि घालणारे व्यसनीं तारावया स्वजन कास " ॥

मोरो०—विराट.

३ कास कसणें—एखादी गोष्ट ईर्ष्येनें किंवा उत्साहाने करावयासाठी सिद्ध होणें. उ०—

हा सीते ! कशि कळली त्वद्व्यसनकथा विकास ? हा सीते ।
हा सीते ! जरि नत मी, कशितोंचि तथापि कास हा सीते ! ॥ मोरोपंत.

४ कासेला लागणें किंवा कास धरणें—कांही विशिष्ट उद्देशाने एखाद्या माणसाचा किंवा वस्तूचा आश्रय करून असणें. उ०

होतें सद्धर्मांच्या कासेला लागतां सदा शिव हो ! ।
येतों, वसा; प्रसन्न प्रभु मृत्युंजय तुम्हां सदाशिव हो ॥

मोरोपंत—वनपर्व, अ. १३, आर्या २७

शत्रुची धरुनि कास पीडितो । देशबांधवजना उगाचि तो ।
मेळवी न शम, अंतिं तो फसे । द्वेषपात्र उभयत्र होतसे ॥ वि०वा०भिडे.

३५. काळीज

१ काळीज—हृदय. देहांतील अत्यंत नाजूक भाग, मर्मस्थान. उ०
मेदीनि काळिजाला गेला लोकापवादधार इ०. मोरोपंत—भारती रामायण.

२ काळीज उडून जाणें, कांपणें, थरथरणें, धडकणें—भीतीने वगैरे छाती उडूं लागणें.

३ त्याच्यापुढे काळीज काढून टाकलें तरी त्याला विश्वास येणार नाही—कोणत्याहि प्रकारांनी त्याची खात्री पटणार नाही.

४ काळीज काढून देणें—आपली आवडती वस्तु देणें.

५ एखाद्याचें काळीज खाणे—त्याला फार उपद्रव देणें किंवा दु ख देणें.

६ मी बोलू नये ते बोललों म्हणून माझे काळीज मला खात आहे—जें मी बोललों, त्याबद्दल मला फार पश्चात्ताप होत आहे.

७ त्याचे काळीज पाठीमागे आहे किंवा त्यानें काळीज पाठीमागे टाकले आहे—त्याला कशाचीच भीति किंवा परवा वाटत नाही.

८ काळीज फुटणें—दु.खानें, भीतीनें, आश्चर्यानें वगैरे छातींत धक्का बसणें

९ एखाद्याचें काळीज फोडणे—मर्मभेदक शब्द बोलून त्याच्या हृदयास दु ख देणें.

१० काळजानें धीर सोडणें, काळजानें ठाव सोडणे, काळजाला भोक पडणें—अत्यंत दु खग्रस्त, भीतिग्रस्त किंवा आश्चर्यचकित होणें.

११ काळजाला घरें पडणे (किंवा पाडणे)—हृदयाला झोंबणें किंवा दु,खदायक होणें (किंवा करणें). उ० नाना आपले हे शब्द काळजाला कसे घरे पाडतात, तें काय सांगू ?

तोतयाचें बंड–न चिं केळकर.

१२ काळजाचें पाणी होणे—दु खग्रस्त, नष्टधैर्य, हतोत्साह होणें.

१३ काळीज फाटणे, काळीज दो जागा होणे—भीतीनें किंवा दु खानें अत्यत त्रस्त होणें.

१४ काळजाला फेस येणें—एखाद्या कामीं फार परिश्रम करून अगदी थकून जाणें.

१५ एखाद्याच्या काळजावर घाव घालणे (किंवा डाग देणें)—त्याला अत्यत दु:ख देणें, त्याच्या मर्मावर आघात करणें.

१६ काळजाला लागणे, भिडणे किंवा झोंबणे—मर्मस्थानापर्यंत जाऊन पोचणें, अत्यत क्लेशदायक होणें, खोल जाणें, आत भिनणें, हृदयाला झोंबणें.

१७ सात काळजाच्या पलीकडे ठेवणें—फार फार जपणें.

## ३६. खाक

१ खाक—छाती आणि पाठ याच्यामधील खांद्याखालचा खळगा, बगल.

२ खाक वर करणें—आपल्याजवळ काही नाही असें दाखविणें किंवा सांगणें.

३ त्यांनी खाका वाजविल्या—त्यांना अत्यानद झाला.

४ खाकेंतून काढून बाजारांत मांडणें—आपली खोटी कृति खरी म्हणून सांगत फिरणें.

५ एखाद्याला खाकेस मारणें—आपल्या संरक्षणाखाली किंवा आश्रयाखाली घेणें.

६ एखादी वस्तु खाकेस किंवा खाकोटीस मारणें—ती पळवून नेणें; ती आपली आहे, असें गृहीत धरून, बहाणा किंवा आविर्भाव करून घेऊन जाणें.

३७. गळा

१. गळा—

(क) मानेच्या पुढचा भाग; डोकें आणि छाती यांच्या मधला भाग.

(ख) घसा.

(ग) गाण्यांतील आवाजी. उ० त्या गवयाचा गळा मधुर आहे.

(घ) घागरीचा, तांब्याचा वगैरे गळ्याच्या आकाराचा भाग.

२. गळा धरणें—(क) घशामध्ये विकृति, आजार, वगैरे उत्पन्न होणें (धरणें अकर्मक). (ख) शब्दोच्चाराला किंवा खाण्याला हरकत करणें (धरणें सकर्मक). उ०

स्वद्गुणकीर्तन करितां लज्जा हे पापिणी धरूं न गळा ।
हे ताटकांतका ! हा परमार्थ हिणेंचि बुडविला सगळा ।।
मोरोपंत–आर्या केकावलि.

३ केसानें गळा कापणें—विश्वासघात करणें; गोड गोड बोलून, आपलेपणा दाखवुन किंवा प्रेम दाखवून, हळूच एखाद्याचा घात करणें.

४ गळा गुंतणें किंवा अडकणें—अडचणींत, पेचांत सापडणें.

५ गळा गोवणें—एखाद्याला वचनांत किंवा पेचांत अडकाविणें; संकटांत घालणें.

६ गळा दाटणें किंवा दाटून येणें—शोकानें कंठ भरून येणें; दुःखानें किंवा प्रेमानें कंठ सद्गदित होणें. उ०

दुर्योधन राजाचा मज पाहुनि दीन बहु गळा दाटे।
मोरोपंत–शल्यपर्व, अ. ३; आर्या ६०.

७ गळा पडणें किंवा बसणें किंवा फुटणें—फार बोलून किंवा गाऊन, घसा घोगरा होणें.

८ गळा फुटणें—मुलगा प्रौढ दशेंत येऊं लागला म्हणजे त्याच्या आवाजाचा नाजूकपणा नाहीसा होऊन आवाज प्रौढ आणि मारदस्त होणें; पोपट वगैरे पक्ष्याचा शब्दोच्चार स्पष्ट होणें.

९ गळा पिंजणें—कंठातून दुहेरी उच्चार निघूं लागणें. पित्त वगैरे ओकून पडल्यामुळें घसा नाजुक होणें किंवा सोलून निघणें.

१० गळां बांधणें किंवा गळीं बांधणें किंवा गळ्यांत बांधणें—

(क) वस्तु एखाद्याला पत्करावयास भाग पाडणें. उ० ही म्हैस तात्याने माझ्या गळ्यात बांधली.

(ख) एखाद्याच्या माथीं विनाकारण दोष बसविणें. उ० पोपट उडून गेल्याचा दोष तुम्ही उगीच माझ्या गळ्यांत बांधता!

११. गळा भरून येणें, गळा दाटून येणें—

(क) प्रेमादि मनोविकारांनी कंठ सद्गदित होणें.

(ख) कफादिकानीं गळा कोंदणें.

१२ गळा लागणे—गायनांत सूर किंवा आवाजी यथाशास्त्र होऊं लागणें.

१३. गळा सोडविणें—

(क) एखाद्याचा गळा कापणें.

(ख) पेचांतून किंवा सकटातून एखाद्यास मुक्त करणें.

१४ गळीं पडणें किंवा गळीं लागणे—

(क) एखाद्याला आलिंगणें.

(ख) एखाद्याला फार फार भीड घालणें किंवा प्रार्थिणें.

(ग) अमुक गोष्ट तूच केलीस असें विनाकारण एखाद्यास म्हणणें; एखाद्याच्या माथीं उगीचच्या उगीच दोष मारणें किंवा लादणें.

(घ) एखाद्यावर शिव्यांचा वर्षाव करणें.

(ङ) एखाद्यावर भारभूत होऊन राहणें.

(च) एखाद्याला जडणें. उ० तें व्यसन माझ्या गळीं पडलें.

१५. गळीं लागणें—

(क) एखाद्याला भार होणें. उ० मुलगी गळीं लागली आहे; तिला हें तेरावें वर्ष.

(ख) आरडाओरडा करणें. उ० असा काय गळीं लागतोस? जरा हळू बोल!

१६. गळ्याखालीं उतरणें—

(क) (शब्दश.) घशांतून खाली जाणें. उ० घास अडकला होता तो आता गळ्याखाली उतरला.

(ख) स्वाधीन होणें, पदरात पडणें. उ० न्यायाधिशाने लांच खाऊन माझ्या दावेदारासारखा निकाल दिला, पण मी तो लाच न्यायाधिशाच्या गळ्याखाली उतरू देणार नाही (म्ह० त्याला पचूं देणार नाही).

१७ तुला माझ्या गळ्याची शपथ आहे—माझा गळा न तुटावा असें तुला वाटत असेल, तर तूं हें काम करावें (आग्रह दाखविण्यासाठी ह्याचा उपयोग करतात).

१८ गळ्यांत असणें—एखाद्यावर अवलंबून असणें; एखाद्याने केलेंच पाहिजे असें काम असणें. उ० माझ्या गळयात सध्या पुष्कळ कामें आहेत, तुझें काम मला पतकरता येणार नाही.

१९. गळ्यांत गोणी येणें—

(क) एखादें संकट टाळण्यासाठी केलेल्या प्रयत्नाने तें संकट जास्तीच त्रासदायक होणें. [ हा वाक्प्रचार ओझ्याच्या बैलाच्या वर्तनावरून रूढ झालेला आहे. पाठीवरची गोणी झुगारून देण्यासाठी बैल धडपड करतो, पण तेणेंकरून गोणी खाली न पडता घसरून मानेवर पडून मानच जमिनीस खिळून राहते, आणि बैलाचा श्वासोच्छ्वास कष्टाने चालतो. बैलाच्या ह्या स्थितीवरून ' गळ्यांत गोणी येणें, ' हा वाक्प्रचार उत्पन्न झाला आहे ].

(ख) संकट ओढवणें.

२० गळ्यांत पाय येणें—अडचणींत, पेंचांत सापडणें. उ० त्याचे पाय त्याच्या गळ्यांत आले. ह्याच अर्थानें " त्याच्या तंगड्या त्याच्या गळयात आल्या, " असेंहि म्हणतात.

२१. गळ्यांत माळ घालणें—

(क) वरणें. (स्त्रीनें पति म्हणून पुरुषास किंवा पुरुषाने पत्नी म्हणून स्त्रीस यथाविधि पतकरणें).

(ख) एखाद्यावर काही काम सोपविणें. उ० लोकांनी अध्यक्षपदाची माळ माझ्या गळयात घातली.

२२ गळ्यांत येणें—एखादी अडचण येऊन पडणें. चांगल्या उद्देशाने एखादें काम करीत असता त्याचा अगदी अनिष्ट परिणाम होऊन पंचाईत होणें.

२३ गळ्यांत धोंगडें येणें—एखाद्यावर काही तरी लचांड येणें; इच्छा नसता एखादी गोष्ट करण्याचा किंवा पतकरण्याचा प्रसंग येणें.

२४ मुलगी गळ्याशीं (गळीं) लागली आहे—लग्नाला योग्य होऊन गेली आहे. (मागे गळीं लागणें पाहा).

२५ गळ्यांत हात घालणें—दादा बाबा करणें; एखाद्याची मर्जी सुप्रसन्न व्हावी म्हणून प्रेम दाखविणें.

२६ गळ्यांत गळा आणि नळ्यांत नळा—निकट मैत्री, घट्ट दोस्ती. उ० अलीकडे रंगोपत आणि सदूभाऊ ह्यांचा गळयात गळा असतो.

२७ गळ्यांत पडणें—हिताहिताची, रक्षणाची, पोसण्याची, बजावण्याची, निस्तरण्याची वगैरे जबाबदारी येणें. उ० माझी बहीण मेल्यापासून तिचीं मुलें माझ्या गळ्यांत पडलीं आहेत. उ० रामभाऊ मेल्यापासून त्याची बायको दिराच्या गळ्यांत पडली. उ० हेडक्लार्क रजेवर गेल्यापासून पगारआकारणीचें बिल माझ्या गळ्यांत पडलें.

२८ गळ्यांत धोंड पडणें—नावडतें किंवा कठीण काम करण्याचें ओझें येणें. उ० ह्या चाळीचें भाडें वसूल करण्याला मी अगदी नाखूष होतों; सदूभाऊंच्या हट्टामुळे ही धोंड माझ्या गळ्यांत पडली.

२९ गळ्यापर्यंत येणें—अगदी असह्य होणें.

३० गळ्याला फास किंवा दोरी लागणें—पंचाइतींत, पेचांत, अडचणींत असणें किंवा येणें किंवा सापडणें.

३१ गळ्यावर गाणें किंवा गळ्यावर म्हणणें—मधुर, शास्त्रशुद्ध रीतीनें किंवा चालीवर गाणें. उ० श्लोक नीट गळ्यावर म्हण, अशी घाई करूं नको.

३२ गळ्यावर बोलणें—मरकटल्यासारखें बोलणें; अविचारीपणाचें भाषण करणें.

३३ गळ्यावर सुरी ठेवणें—जीव घ्यावयाला सिद्ध होणें.

३४ गळ्याशीं येणें—नुकसानीची बाब होणें. उ० चिंचेचा व्यापार हरिभाऊंच्या गळ्याशीं आला ( म्ह० त्या व्यापारांत ते बुडाले ).

३५ मोठा गळा करून रडणें—मोठमोठ्यानें रडणें; ओक्साबोक्शी रडणें.

## ३८. गाल

१ मुखाच्या बाजूंचे जे दोहींकडील मांसल भाग ते प्रत्येक. उ० ज्या मुलाच्या गालावर खळग्या आहेत, तें मूल मला आवडतें. उ० ख्रिस्ती धर्माची अशी आज्ञा आहे की, कोणीं एका गालात मारिलें असता दुसरा गाल पुढें करावा. टीप—"गाल" ह्या शब्दाने बनलेल्या शब्दसंहतींत "गालफड" हा शब्द विनोदाने, मानें किंवा तिरस्कारानें योजण्यांत येतो.

२ गाल रंगविणें—थोबाडींत मारून एखाद्याचा गाल तांबडा लाल करणें.

३ गालांत बसणें—थोबाडींत बसणें.

टीप—"बसणें" ह्याचा कर्ता "चपराक" हा अध्याहृत असतो.

४ गाल फुगविणें—बढाई मारणें; शेखी मिरविणें; ऐट करणें.

५ गाल बसणें—रोडावणें. उ० तापानें त्याचे गाल बसले.

६ गालावर गाल चढणें किंवा येणें—सुखासमाधानाच्या राहणीमुळे किंवा पोणेपिणें यथास्थित मिळत असल्यामुळे, लठ्ठ होऊन गालाची जाडी वाढणें. उ० ह्यांची काय चैन विचारावी ! रोज घृतकुल्या आणि मधुकुल्या चालल्या आहेत ! मग त्यांचे गालावर गाल कां नाही चढणार ?

७ गालांत हसणें किंवा गालांतल्या गालांत हसणें—मंदस्मित करणें. उ० रुपया दक्षिणा मिळणार हें ऐकून भटजीबोवा गालातल्या गालात हसले.'

## ३९. छाती

१. छाती—

(क) ऊर, वक्षःस्थल.

(ख) धैर्य, धारिष्ट, निढळ्या छातीचा किंवा उरफाट्या काळजाचा म्ह० अतिशय साहसी, धाडसी.

टीप—"छाती" आणि "ऊर" ह्या शब्दाचे बरेच वाक्प्रचार सारखे आहेत. ते ऊर शब्दाखाली पाहा. त्याशिवाय जे वाक्प्रचार आहेत, ते पुढे दिले आहेत. तसेंच मागे ले० ९ पाहा.

२ छातीचा कोट करणे—येईल त्या प्रसंगाला तोंड देण्याचा निश्चय करणें. टीप—

किल्ल्याची बाहेरची जी भिंत किंवा गावाच्या रक्षणार्थ गावाभोवतीं बांधलेली जी भिंत, तिला 'कोट' असें म्हणतात. हा कोट शत्रूचे तडाखे सोसावयासाठी फार भक्कम बांधलेला असतो, ह्यावरून 'छातीचा कोट करणें' म्हणजे छाती हेंच स्वशरीराच्या संरक्षणाचें साधन असें म्हणून संकटाला तोंड देण्याचा निर्धार करणें.

३. छातीचा व्यापार—

(क) ज्या व्यापारात लवकर माल खपला नाही आणि लवकर पैसे हातीं पडले नाहीत, तरी चालतें, असा व्यापार.

(ख) धोक्याचा व्यापार—प्रसंगविशेषीं ज्यांत तोटा होण्याचा संभव आहे, असा व्यापार.

## ४०. जिव्हा

१. (क) जीभ.

(ख) अग्नीची ज्वाळा.

(ग) जिभेच्या आकाराची कोणतीहि वस्तु.

(घ) वाचा बोलण्याची प्रवृत्ति. योग्यायोग्याचा विचार न करतां काही तरी बोलण्याची प्रवृत्ति.

(ङ) खाण्याची लालसा, खाद्य पदार्थांत आवडनिवड करण्याचा स्वभाव; चोखंदळेपणा.

२ जिव्हा वाकडी पडणें—

(क) अर्धांगवायूने जीभ लटकी पडणें किंवा न हालेशी होणें.

(ख) न बोलावयाची गोष्ट गैरसावधपणें बोलून जाणें.

३ जिव्हा विटाळणें—

(क) जीभ अपवित्र करणें (शिव्या देऊन किंवा खोटें बोलून).

(ख) नालायक मनुष्यासाठी रदबदली करणें किंवा त्याची शिफारस करणें.

४. जिव्हा हातीं धरणें—

(क) शिव्या देत सुटणें.

(ख) खाण्याचे चोचले करणें; अधाशासारखें खाणें.

५ जिव्हेला आढावेढा असणें—भाषणाची नियंत्रणा असणें; बोलावयाला हरकत असणें. उ० हें काय तुम्ही मलभलतें बोलतां! जिव्हेला कांहीतरी आढावेढा असूं द्या! (म्ह० जिभेला आळा घाला).

## ४१. जीभ

१. जीभ—

(क) प्राण्यांच्या तोंडातील अवयवविशेष; याच्या योगाने खाद्य पदार्थांची रुचि समजते व खाद्य पदार्थ चर्वणासाठी दातांमध्ये किंवा दाढांमध्ये ढकलिता येतो; मानवी प्राण्यांत हा अवयव बोलण्याचेंहि एक इंद्रिय असतो. जिव्हा.

(ख) जिभेच्या आकाराचा अवयव किंवा (भाग) किंवा कोणताहि पदार्थ.

(ग) अग्नीची ज्वाळा.

टीप—"जीभ" ह्या शब्दाचे बहुतेक वाक्प्रचार "जिव्हा" ह्या शब्दाशीं मिळतेच आहेत. विद्यार्थ्यांनें ३९ आणि ४० हे लेखांक या बरोबर वाचावे.

२ जीभ चावलीशी करून बोलणें—संकोचवृत्तीनें बोलणें; नियंत्रितपणें बोलणें.

३ जीभ जड होणें—उच्चार करावयाला जीभ असमर्थ होणें. उ० करवंदें खाऊन माझी जीभ जड झाली आहे. उ० मुलांनी विडा खाऊं नये, विड्याने जीभ जड होते.

४. जीभ जड असणें—

(क) स्पष्ट उच्चार करावयास जीभ असमर्थ असणें. उ० तात्याची जीभ जराशी जड आहे.

(ख) लवकर पाठ करावयाला असमर्थ असणें. उ० त्याची जीभ जड आहे (म्ह० त्याला लवकर पाठ होत नाही).

५ जीभ झडणें—जीभ गळून पडणें. उ० मीं कांही खोटें बोलत असेन, तर माझी जीभ झडेल!

६ जीभ नरकांत घालणें—खोटें बोलणें; दिलेलें वचन न पुरविणें; बोललेली गोष्ट नाकबूल जाणें.

७ जीभ पाघळणें—अनियंत्रितपणें बोलून जाणें; स्वच्छंदानें बोलणें. उ० हा माझा बेत माझ्या मनात कोणाला कळवावयाचा नव्हता, पण माझ्या दोस्ताची जीभ पाघळली ना! तेथें मी काय करूं?

८. जीभ मोकळी सोडणें—

(क) मन मानेल तें खाणें.

(ख) स्वच्छंदाने अनियंत्रितपणें बोलणें

९ जीभ वळवळणें—बोलावयाला तयार होणें किंवा उत्सुक होणें; बोलण्याची उत्कट इच्छा होणें. उ० ह्या मुलाची जीभ वळवळूं लागली आहे, तें लवकर बोलूं लागेल, असा रंग दिसतो.

१० जीभ विटाळणें—जीभ अपवित्र होणें; (भलतेंच बोलल्यामुळें, भलतेंच खाल्ल्यामुळे, नालायक मनुष्याची शिफारस केल्यामुळे किंवा निष्फळ रदबदली केल्यामुळे).

११ जीभ सोकवणें किंवा लालचावणें—जीभ चटावणें; खाण्याला उत्सुक असणें. उ० रोज रोज पेढे खायाला तुझी जीभ लालचावली आहे!

१२ जिभा काढणें—एखादा पदार्थ खावयासाठीं आशाळभुताप्रमाणे मागणें. उ० पेढ्यासाठी अशा जिभा कशाला काढतोस? कधीं पेढे खाल्ले नाहींस की काय?

टीप—एका मनुष्यास जीभ एकच असते; परंतु वाक्प्रचाराने "जिभा काढणें," अशी अनेकवचनी शब्दसहति ग्राह्य म्हणून ठरविली आहे, हें विद्यार्थ्यांनी लक्ष्यात बाळगावें. मागें ले० २२ पाहा.

१३ जिभेचे फुटाणे फुटणें—मुखातून वक्तृत्वपूर्ण भाषण निघणें. उ० माधवराव कुठें बोलूं लागले म्हणजे त्यांच्या जिभेचे जसे फुटाणे फुटत असत!

१४ जिभेला चिमटा घेणें—एखादी रुचकर वस्तु खाण्यापासून किंवा एखादी समयोचित गोष्ट बोलण्यापासून जिभेला निवृत्त करणें. उ० रामभाऊची लबाडी चार मंडळींत सांगण्याच्या मी अगदी बेतांत होतों पण तो लहान तोंडीं मोठा घास होईल, अशा भयाने मी आपल्या जिभेस चिमटा घेतला! उ० बासुंदी आणखी दोन पात्रें देखील मीं खाल्ली असती; परंतु मी आजारी आहे, ही गोष्ट मनांत आणून मीं जिभेला चिमटा घेतला.

१५ जिभेला आडवा वेढा नसणें—मन मानेल तसें बोलणारी जीभ असणें उ० गोपाळरावाच्या जिभेला आडवा वेढा नाही (म्ह० स्थल, काल, वगैरेंचा विचार न करतां तो हवें तें बोलतो).

१६ जिभेचा लोळा होणें—अति उष्ण तिखट किंवा गार पदार्थ तोंडांत घातल्यामुळे जीभ हालविण्याची शक्ति एकदम नाहीशी होणें.

१७ जिभेला टाका देऊन एखादें खाद्य दुसऱ्यासाठी राखून ठेवणें— आपली इच्छा आवरून धरून दुसऱ्याला खावयासाठी एखादी वस्तु राखून ठेवणें. उ० हें पिठलें अतिरुचकर झालें होतें, तें सारें देखील मीं एकट्यानें खाऊन टाकिलें असतें; पण मीं जिभेला टाका देऊन तें तुझ्यासाठी ठेविलें.

१८ जिभेला हाड नसणें—जिभेला नियंत्रणा नसणें. खोटें बोलणें हें ज्याच्या खिजगणतींत नाही, अशा मनुष्याविषयीं बोलताना म्हणतात, "तो हवें तें बोलेल! त्याच्या जिभेला हाड नाही!"

१९ जीभ लांब करून बोलणे—स्थल, काल वगैरे मनांत न आणतां किंवा उर्मटपणानें बोलणें.

२० जीभ लांब होणें—मन मानेल तसें, खोटेंनाटें, पाजीपणाचें किंवा मूर्खासारखें बोलण्याकडे प्रवृत्ति होणें. उ० अलीकडे काशीचा घंट्याळ्याची जीभ फार लांब झाली आहे!

## ४२. टाच

१ टाच—पायाची खोट.

२ उंच टाच करून वागणें—अमंगल किंवा अपवित्र पदार्थावर पाऊल न पडावें म्हणून पायाच्या चवड्यावर चालणें.

३. टाचेचें काळिज—

(क) जिवाचा कलिदा; प्यारी वस्तु; आवडतें माणूस; उ० त्याला तुम्हीं वाईट म्हटलेलें मला खपावयाचें नाही. तो माझ्या टाचेचें काळीज आहे!

(ख) बायकोचा भाऊ, श्यालक. या अर्थी "टाचेचें काळीज" ही शब्द-संहति विनोद किंवा तिरस्कार दाखविते, किंवा खरें प्रेमहि दाखविते.

## ४३. टाळी

१. टाळी—

(क) एका तळहातावर दुसरा तळहात मारणें; ही मारण्याची क्रिया, किंवा तिजपासून झालेला आवाज.

टीप—अनुरूप क्रियापदः-वाजविणें, मारणें, पिटणें, वाजणें उ०

टाळ्या पिटोनि जन तेय सुरम्य घोष—
तेव्हां करी; अमित हो सकलांसि तोष।

वि० वा० भिडे, रा. प., स. ३, श्लो. ६१.

(ख) गायनाच्या सुरावर हातावर हात मारणें.

(ग) सट्टा किंवा व्यवहार ठरल्याची खूण म्हणून दोन व्यापारी एकमेकांच्या हातावर हात मारतात, ती टाळी.

२ ब्रह्मानंदीं टाळी लागणें—सच्चिदानंदस्वरूपांत लय होणें. उ०

ब्रह्मानंदीं लागली टाळी । तेथें कोण देहातें सांभाळी ॥

३ एकदांची टाळी वाजली—एकदाचें लग्न लागलें. (आतां जुळविलेलें लग्न कोणालाहि मोडतां किंवा फिसकटतां यावयाचें नाहीं!)

४ टाळीस टाळी देणें—खुशामत करणें; वरिष्ठाच्या मूर्खपणाच्या भाषणास अनुमोदन देणें; होस हो म्हणणें.

५ कानावर किंवा कर्णीं टाळी बसविणें—कानठळ्या बसविणें; ऐकण्याची शक्ति मोठ्या आवाजानें घालविणें. उ०

तों गर्जोनि कुरुकटककर्णीं बसवी ध्वजस्थ कपि टाळी ॥

मोरोपंत.

## ४४. डोकें

१ डोकें—

(क) मस्तक, शिर. उ० घाल डोक्याला पागोटें, आणि चल लवकर माझ्याबरोबर!

(ख) एक व्यक्ति. उ० घारापुरीचीं लेणीं पाहावयाचीं असलीं, तर दर डोक्याला चार चार आणे पी द्यावी लागते. उ० जिझिया कर दर हिंदु डोक्यावर घेतला जात असे.

(ग) पिढी. उ० या गावांत माझ्यापर्यंत आमच्या पांच डोया (म्ह० डोकीं) झाल्या (म्ह० या गावांत आमच्या पांच पिढ्यांचें वास्तव्य आहे). उ० देव कराया दोन डोया, किडवळ कराया तीन डोया. (पुढें म्हणींचें प्रकरण पाहा).

(घ) बुद्धि; मति; सारासारविचार करण्याची शक्ति; लक्ष; मेंदू. उ० गणितांत त्याचें डोकें अगदीं चालत नाहीं. उ० मारत्याचें डोकें बिघडलें आहे.

(ङ) कोणत्याहि वस्तूचा शिरोभाग. उ० काठीचें डोकें; मुसळाचें डोकें.

२ डोकें उचलणें—नावलौकिकास चढणें.

३ डोकें उठणें—

(क) डोकें दुखूं लागणें.

(ख) त्रास, उपद्रव होणें. उ० तुझी ही चर्पटपंजरी आतां बंद कर, माझें डोकें उठलें!

४ डोकें काढणें—उदयास किंवा वैभवास चढण्याच्या मार्गाला लागणें. उ०

आमच्या वडील चिरंजिवानी विद्याविद्या कधीच सोडून दिली, आणि ते सुखवस्तु होऊन राहिले, मधलेहि त्यांच्याच वळणावर जातात की काय अशी भीति होती, परतु अलीकडे त्यानी डोकें काढिलें आहे !

५ डोकें खाजविणें—

( क ) उपद्रव देणें, त्रास देणें उ० तू जा येथून ! उगीच माझें डोकें खाजवीत बसूं नको !

( ख ) विचार साफ व स्पष्ट करण्यासाठी डोकें चोळणें उ० अभ्यास कराव याच्या वेळीं तू खेळलास ! आता डोकें खाजवून तुला ह्या प्रश्नांचीं उत्तरें कशीं देतां येतील ?

६ डोकें टेकणें—

( क ) अवलबून राहणें, मिस्त ठेवणें, आश्रयाची अपेक्षा किंवा इच्छा बाळगून असणें उ० तुला मीं दोन वेळा नोकरी लावून दिली आणि दोन्ही वेळां तू ता आपल्या गुणानी गमावून घेतलीस यापुढे तू माझ्यावर डोकें टेकून बसू नको

( ख ) हार खाली असें म्हणणें, निराशेने सोडून देणें, आपला इलाज चालत नाही, असें कबूल करणें

( ग ) अशक्त होणें, थकणें, खचणें, आजारी पडणें उ० इतके दिवस त्यांनी कसेंबसें काम केलें, पण मागल्या सोमवारपासून त्यानी डोकें टेकलें ( म्ह० काम करण्याची त्याच्या अंगीं ताकद राहिली नाही )

७ डोके देणे, डोकें देऊन बसणें—

( क ) लोचटपणा, चिकटपणा करीत बसणें, निर्लज्जपणाने एखाद्यावर मार घालून बसणें किंवा राहणें उ० परीक्षेसाठीं तो माझ्या घरीं पाहुणा म्हणून आला, परीक्षा सपून आठ दिवस झाले ! अजून डोकें देऊन बसला आहे !

( ख ) एखाद्याला लुबाडून पुन्हा शात, निर्दर्द असणें

८ डोकें फिरणें—वेडें होणें, रागाने वगैरे बेफाम होऊन जाणें. उ० जगाची हरामखोरी पाहून त्याचें डोकें फिरून गेलें आहे ( म्ह० तो वेडा झाला आहे )

९ डोके मारणें—

( क ) शिरच्छेद करणें

( ख ) नुकसान करणें, नाश करणें उ० रामावर कां तुझा राग ? त्याने काय तुझें डोकें मारलें आहे ?

१०. डोकें हालविणें—

( क ) समति दर्शविण्यासाठी किंवा अनुमोदन देण्यासाठी मान हालविणें

(ख) वेडाच्या लहरींत किंवा अंगात आल्यामुळे डोकें जोरानें इकडून तिकडे फिरविणें.

११. डोक्याचे केस नाहींसे करणें, डोक्यावर केस राहूं न देणें—

शिव्या देणें; फजिती करणें; निर्भर्त्सना करणें; रागें भरणें. उ० आम्ही श्रीमंत-पूजनाच्या वेळीं सबंध सुपाऱ्या दिल्या नाहीत, म्हणून ह्या लोकांनी आमच्या डोक्यावर केस राहूं दिला नाही.

टीप—हजामत करणें ह्याचा यौगिक अर्थ डोक्यावरचे केस काढून टाकणें आणि लाक्षणिक अर्थ फजिती करणें किंवा निर्भर्त्सणें. यावरून लाक्षणिक अर्थ दाखविण्यासाठी यौगिक अर्थाची क्रिया ह्या वाक्प्रचारांत योजण्यात आलेली आहे.

१२ डोक्यावरचें खांद्यावर येणें—चिंता किंवा काळजी कमी होणें. उ० माझ्या मुलाचें लग्न ठरकलें. आता डोक्यावरचें खांद्यावर आलें!

१३ डोक्यानें चालणें—गर्वानें, अभिमानानें, ताठ्यानें वागणें. उ० सासऱ्याची दौलत मिळाल्यापासून रामभाऊ डोक्यानें चालूं लागला आहे; नारायणरावाला बढती मिळाल्यापासून तो जसा डोक्यानें चालूं लागला आहे!

१४ डोक्याने चालत येणें—नम्रपणाने येणें; आपल्या आपण येणें. उ० त्या पोराला जेवायला येण्यासाठी कशाला इतक्या हाका मारतोस! अमळ रान चरचरलें म्हणजे पोर डोक्याने चालत येईल! (म्ह० आपसूक येईल)!

१५ डोक्यावर खापर फोडणें—एखाद्याच्या माथीं दोष लादणें (तो निरपराधी असतां). उ० तुमचा मुलगा नापास झाला तो आपल्या गुणानी झाला! मीं शिकविण्यांत काही कसूर केली नाही. माझ्या डोक्यावर तुम्ही उगीच खापर फोडूं नका.

१६ डोक्यावर खापर फुटणें—एखाद्यावर एखाद्या गोष्टीबद्दल विनाकारण दोष येणें. उ० आमचे व्याही म्हातारे आणि दमेकरी होते. सृष्टिक्रमाप्रमाणेच त्याचा अंत झाला; परंतु त्याचें खापर आमच्या मुलीच्या डोक्यावर फुटलें.

१७ एखादें काम डोक्यावर घेणें—

(क) तें पतकरणें; त्याची जबाबदारी घेणें. उ० दत्तूचें लग्न जुळवून देण्याचें काम तूं कशाला आपल्या डोक्यावर घेतोस!

(ख) शाळा, वर्ग, घर वगैरे डोक्यावर घेणें म्ह० त्यांत अव्यवस्था, गोंधळ, धिंगामस्ती करणें किंवा चालविणें. उ० मी क्याटलॉग द्यावयाला जरासा ऑफिसांत गेलों होतों, तों पोरांनी वर्ग डोक्यावर घेतला. मी काशीअक्काच्या घरीं दोन घटका बसावयाला गेलें होतें, तों मागे पोरांनीं घर डोक्यावर घेतलें!

१८ डोक्यावर चढणें—एखाद्याला न जुमानणें. उ० तुम्ही मुलाचे इतके लाड करू नका. तो डोक्यावर चढेल!

१९ डोक्यावर सूर्य येणें—मध्याह्न होणें. उ० आता येथेच मुक्काम करावा. पालीस जाणें शक्य नाही. हा सूर्य अगदीं डोक्यावर आला आहे, पाहा.

२० डोक्यावर पदर येणें—वैधव्य येणें.

२१ एखाद्याच्या डोक्यावर बसणें—

(क) त्याला न जुमानणें. उ० मुलावर वचक बसविण्याचा प्रयत्न करा; नाहीतर तीं तुमच्या डोक्यावर बसतील.

(ख) आपली लायकी नसता त्याच्या वर जाणें, पुढे सरणें किंवा अगोदर चढती मिळविणें. उ० वरिष्ठाची लाळ घोटण्याचें कसब गोविंदरावाच्या अंगीं चांगलें आहे, म्हणून तो माझ्या डोक्यावर बसला.

२२ डोक्यावर बसविणें—

(क) वाजवीपेक्षा अधिक मान देणें; एखाद्याचा फाजील गौरव करणें. उ० नोकर लोकाना तुम्ही असें डोक्यावर बसवू लागला, तर ते माझी अवज्ञा करतील!

(ख) एखाद्याला भक्तिभावानें भजणें.

२३ एखाद्याच्या डोक्यावर मिरे वाटणें—त्याला शिव्या देणें; दोष देणें; त्याच्यावर ठपका ठेवणें. उ० आईबाप आधी मुलीचे लाड करतात, तिला चांगलें वळण लावीत नाहीत. पुढे ती मुलगी वाईट रीतीनें वागूं लागली म्हणजे विनाकारण सासूच्या डोक्यावर मिरे वाटतात!

२४ डोक्यावर शेकणें—परिणाम भोगावा लागणें; नुकसान होणें. उ० फळफळावळीचा व्यापार आजकाल भारी घोक्याचा झाला आहे. त्यात तुम्ही भांडवल घालूं नका! तो व्यापार खचित तुमच्या डोक्यावर शेकेल! [पुढे "समिध शेकणें" हा वाक्प्रचार पाहा].

२५ डोक्यावर हात घेऊन येणें—रिकाम्या हातानें येणें; इष्ट वस्तु न मिळविता तसेंच येणें. उ० तुला मोदकपात्र आणावयाला मीं पाठविलें आणि तू तर डोक्यावर हात घेऊन परत आलास! (म्ह० मोदकपात्र न आणतां तसाच आलास!)

२६ डोक्यावर हात ठेवणें—

(क) आशीर्वाद देणें.

(ख) फसविणें. उ० तू त्या लोकाच्या नादीं लागू नको, ते बदमाष तुझ्या-डोक्यावर हात ठेवतील!

२७ एखाद्याच्या डोक्यावरून हात फिरविणें—त्याला फसविणें. उ० एकनाथपंतानी आपली चीजवस्त आपल्या मेहुण्यापाशीं ठेवावयास दिली होती.

मेहुण्याने ती सारी बळकावली आणि एकनाथपंताच्या डोक्यावरून चांगला हात फिरविला!

२८ डोक्यावरून पाणी जाणें—

(क) परमावधि किंवा शिकस्त होणें. उ० हें रानड्यांचें स्थळ तुमच्या मुलीला योग्य आहे. तुमचा खर्च फार होणार नाही. पाचशे रुपयात सारें कार्य उरकेल! डोक्यावरून पाणी गेलें तर आणखी पन्नास रुपये लागतील!

(ख) असह्य नुकसानी किंवा संकट आल्याने अगदी लाचार होणें किंवा निस्त्राण होणें. उ० आम्हासारख्याला शंभर रुपयाची ठोकर लागणें म्हणजे डोक्यावरून पाणी गेलें म्हणावयाचें!

[ज्या मनुष्याला मुळीच पोहता येत नाही तो गळ्याइतक्या पाण्यात उभा राहून जिवत राहू शकतो, परंतु डोकें बुडून जाण्याइतक्या खोल पाण्यांत पडला असता तो मरणारच. ह्या उपमेवरून वरील दोन्ही वाक्प्रचार रूढ झालेले आहेत].

२९ डोक्यास पाणी लावून ठेवणे—शिक्षा भोगावयास तयार होऊन राहणें. [न्हावी डोईचे केस तासावयाच्या आधी डोक्याला पाणी लावतो हजामत करणें म्ह० फजिती किंवा निर्भर्त्सना करणें].

३० डोक्यांत राख घालणे किंवा घालून घेणें—संतापणें; चरफडणें.

## ४५. डोळा

१. डोळा—

(क) रंग, रूप, वगैरे जाणण्याचें इंद्रिय; नेत्र, नयन. उ० त्याचे डोळे विशाल आणि पाणीदार आहेत.

(ख) दृष्टि, नजर. उ० तो वक्ता वेदीवर येताच सर्व प्रेक्षकांचे डोळे त्याच्याकडे लागले.

(ग) छिद्र; लहान भोंक. उ० सुईचा किंवा दाभणाचा डोळा.

(घ) मोराच्या पिसाऱ्यावरील डोळ्याच्या आकाराचीं वर्तुळें; चंद्रक.

(ङ) डोळ्याच्या आकाराची आकृति. शिताफळ, रामफळ, वगैरेंवरचे खवले.

(च) अंकुर फुटण्याची जागा. उ० बटाट्याचा डोळा, उसाचा डोळा.

(छ) पायाच्या घोट्याजवळ दोन खळगे असतात, त्यांपैकीं प्रत्येक.

(ज) गुडघ्याच्या वाटीजवळच्या दोन खळग्यापैकी प्रत्येक.

(झ) (लाक्षणिक अर्थाने) माहिती सांगणारा; हकीकत कळविणारा; ज्ञानाचा उगम. उ० हेर हे राजाचे डोळे होत.

२ चार डोळे होणें—एकमेकास मदत करावयास दोन माणसें जुळणें उ० तुमचे आणि माझे असे चार डोळे झाले, म्हणजे चुका होण्याचा संभव कमी.

३ डोळा ओळखणें—आशय किंवा अभिप्राय जाणणें, समजणें किंवा ताडणें; मनाचा कल जाणणें किंवा ओळखणें. उ० त्याचा डोळा ओळखताच मीं आपलें भाषण आटोपतें घेतलें.

४ डोळा चुकाविणें—दृष्टीस न पडूं देणें. उ० ह्या पोराला सुपारीची मोठी चटक आहे. माझा डोळा चुकवून त्याने चंचींतून केव्हाच एक खांड काढून तोंडात टाकलें!

५ डोळ्यांत प्राण ठेवणें—अमुक एक गोष्ट पाहिल्याबरोबर मरावयास तयार होऊन राहणें. उ० मुलाला भेटावयासाठी सदाशिवराव डोळ्यात प्राण ठेवून जसा कांही जिवत राहिला आहे!

६ डोळाभर झोप—बरीचशी झोप. हुशारी वाटण्याइतकी झोप. उ० काल सारी रात्र मला जागरण झालें, आता डोळाभर झोप मिळाली तर बरें वाटेल.

७ एखाद्यावर डोळे उगारणें किंवा वटारणे—उग्र मुद्रेने त्याच्याकडे पाहणें.

८ डोळे उघडणें—(उघडणें सकर्मक) आपली स्थिति, कर्तव्य, हिताहित वगैरेंकडे लक्ष्य देणें. (उघडणें अकर्मक) खरी स्थिति दिसूं लागणें, कळून येणें

९ एखाद्याचा डोळा न उघडणे किंवा उघडेनासा होणें—गर्वानें किंवा श्रीमतीच्या मदानें किंवा तिरस्कारयुक्त नजरेनें पाहणें. उ० सदोबाला ही बढतीची जागा मिळाल्यापासून त्याचा डोळा अगदी उघडेनासा झाला आहे!

१० पावसाचा डोळा उघडणें—पाऊस खळणें. उ० आज चार दिवसात पावसाचा डोळा क्षणभरहि उघडला नाही.

११ डोळे उरफाटणें किंवा फिरणें—अधिकाराच्या किंवा श्रीमतीच्या मदानें किंवा वरिष्ठाची मर्जी आपल्यावर असल्याकारणाने उन्मत्त होऊन जाणें. उ० गोविंदरावाचे डोळे अलीकडे किती उरफाटले आहेत म्हणून सांगू?

१२ डोळेगावर्चीं कवाडें लागणें—अंध होणें.

१३ डोळे चढणे—उग्र दिसणें. (अमली पदार्थाच्या सेवनानें, किंवा उन्मादानें).

१४ डोळे चढवून बोलणे—रागानें किंवा मगरुरीने बोलणें.

१५ डोळे जळणें—मत्सरानें बरें न पाहवणें. उ० माझें वैभव पाहून त्याचे डोळे जळत असतात!

१६ डोळे जाणे—अंधता येणें. उ० देवीचीं फुलें पडून आठव्या वर्षी सुदररावाचे डोळे गेले.

१७. डोळे झाकणें—

(क) दुर्लक्ष्य करणें; बेपर्वाई दाखविणें. उ० मुलाच्या वर्तनाकडे तुम्हीं डोळे झाकले तर पुढे पस्तावाल!

(ख) काना डोळा करणें, मनावर न घेणें.

(ग) मरणें.

१८ डोळे ताठणें—गर्विष्ठ होणें. उ० मलकाप्पाला पाटिलकी मिळाल्यापासून त्याचे डोळे किती ताठले आहेत म्हणून सांगू?

१९ डोळे तांवारणें—उग्र नजरेनें पाहणें. उ० माझ्यावर डोळे तांवारून पांडोबा माझ्याशीं बोलत होता.

२० डोळे थंड होणें किंवा डोळे निवणें—एखादी प्रिय वस्तु पाहून समाधान पावणें. इच्छिलेली वस्तु मिळाल्यानें आनंदित होणें. उ० मुलाचे दोन हाताचे चार हात झालेले पाहून शंकररावाचे डोळे थंड झाले!

२१ डोळे निवळणें—

(क) डोळ्याचा कांहीं रोग बरा झाल्यानंतर डोळे स्वच्छ किंवा साफ होणें.

(ख) ताळ्यावर येणें (कोणत्याहि वेडानंतर, नादानंतर किंवा व्यसनानंतर).

२२ डोळे पठारास जाणें—आजार, अशक्तपणा, उपवास, वगैरे कारणांनीं डोळे खोल जाणें.

२३. डोळे पांढरे करणें—

(क) डोळे पांढरे होत तोंपर्यंत मारणें किंवा शिक्षा करणें. उ० माझ्या वाटेस जाऊं नको. माझा राग कठीण आहे. मी एकदा मारावयास लागलों की, तुझे डोळे पांढरे करून सोडीन!

(ख) भीतीनें किंवा घाबरल्यामुळे डोळे पांढरे करणें; घाबरून जाणें; भयामुळे गर्भगळित होणें. उ० मला पाहतांच व्यंकूनें डोळे पांढरे केले!

(ग) मरणाच्या द्वारीं येऊन पोंचणें. उ० पांडोबानें डोळे पांढरे केले. आता मात्राविनाचा उपयोग काय व्हावयाचा?

२४ डोळे पांढरे होणें—अतिशय भीतीनें किंवा तीव्र शारीरिक यातनामुळे किंवा एखादें मोठें संकट प्राप्त झाल्यामुळे डोळ्यांचा वर्ण पांढरा होणें. उ० हातीं कुऱ्हाडी घेतलेले दरोडेखोर पाहताक्षणीं विश्वासरावाचे डोळे पांढरे झाले!

२५ डोळे पाताळांत जाणें—अशक्तपणानें किंवा आजारामुळे डोळे खोल जाणें. उ० हें नारायणरावांच्या जिवावरचें दुखणें गेलें; त्याचे डोळे पाहा कसे पाताळांत गेले आहेत ते!

२६. डोळे पाहून वागणें किंवा चालणें—एखाद्याच्या मनाचा कल लक्ष्यांत घेऊन वर्तन करणें. उ० राममाऊ आपल्या वरिष्ठाचे डोळे पाहून वागत असतो, मग त्याला बढती कां नाहीं मिळणार?

२७. डोळे पिंजारणें, फिंदारणें किंवा फाडणें—एखाद्या मनुष्याकडे डोळे वटारून पाहणें किंवा उग्र नजर करणें.

२८. एखाद्याचे डोळे पुसणें—त्याचें सांत्वन करणें.

२९. डोळे फाटणें—

(क) मोठी आशा उत्पन्न होणें.

(ख) आश्चर्यचकित होणें. उ० त्या राजवाड्यांतील सामानसुमान पाहून गोपीनाथपंताचे डोळे फाटले.

३०. डोळे फाडणें—

(क) डोळे वटारणें.

(ख) अंतकाळीं डोळे निश्चल उघडे ठेवणें

३१. डोळे फिरणें—

(क) घेरी येणें. उ० राजवाड्याच्या गच्चीवरून मीं खालीं पाहिलें, तों माझे डोळे फिरले !

(ख) द्रव्यानें किंवा अधिकारानें अंगीं मगरुरी येणें. उ० काशीनाथपंताला ती जागा मिळाल्यापासून त्याचे डोळे फिरले आहेत !

(ग) अंतकाळीं डोळे वटारले जाऊन ते निश्चल होणें..

३२. डोळे फिरविणें—

(क) डोळे वटारणें.

(ख) अंतकाल आल्यामुळे डोळे उघडून निश्चल करणें.

(ग) रागानें डोळे उग्र करणें

(घ) नापसंतीची नजर करणें.

३३. डोळे फुटणें—

(क) अंधता येणें. उ० गोफणीचा धोंडा लागून जनार्दनपंताचा उजवा डोळा फुटला.

(ख) दुसऱ्याचा उत्कर्ष पाहून मत्सरग्रस्त होणें. उ० गुणी मनुष्याचें वैभव पाहून शिवरामपंताचे डोळे फुटतात !

३४ डोळे बांधणें—वस्त्रा दिकांच्या वेष्टनानें डोळ्यांना कांही न दिसेल असें करणें. उ० आंधळ्या कोशिंबिरींत ज्याच्यावर चोरपण आलें असेल, त्याचे डोळे बांधतात.

३५ डोळे भरून पाहणें—तृप्ति होईपर्यंत एखादी सुंदर, प्रिय किंवा आवडती वस्तु पाहणें.

३६ डोळे मुरडणें—वाकडी नजर करून पाहणें.

३७. डोळे मोडणें—

( क ) डोळ्यानें कांहीतरी खुणा करणें.

( ख ) गर्वाची किंवा मगरुरीची नजर करणें.

३८. डोळे येणें—

( क ) अंधता जाऊन पुन्हा दृष्टि प्राप्त होणें. उ०

शोकें रडतां डोळे जावे, गेले कधी न यावे गा ! ।
दिसतें कल्याण पुढें, शोकेंचि नको अधीन या वेगा ॥

मोरोपंत–वनपर्व, अ० १३.

( ख ) डोळ्यांना रोगविशेष होणें. उ० आम्ही बैलगाडीनें उन्हाळ्याच्या दिवसांत सासवडास गेलों; हा प्रवास आमच्या धाकट्या मुलास बाधला, आणि त्याचे डोळे आले.

३९ डोळा लवणें—डोळ्याच्या पापणीचें स्फुरण होणें. उ० पुरुषाचा उजवा डोळा आणि बायकांचा डावा डोळा लवणें, हें शुभसूचक समजतात.

४० डोळ्यांच्या खाचा होणें, डोळ्यांचें खोवरें होणें किंवा डोळ्यांची भिंत होणें—डोळ्यांचा अवलोकनाचा व्यापार बंद होणें. उ० हल्लीं तात्यांना एक्याण्णवावें वर्ष आहे, त्यांच्या डोळ्यांच्या खाचा होऊन गेल्या आहेत. उ० अरे, असा लोकांना पायाचे धक्के देत देत काय चालला आहेस ! मागे पुढे पाहून चालशील की नाही ? की तुझ्या डोळ्यांच्या खाचा झाल्या ?

४१ डोळ्यांचें पारणें फिटणें—उत्कंठेनें अपेक्षिलेली वस्तु एकदाची पाहावयास मिळणें. उ० नातवंड केव्हा दिसेल, केव्हां दिसेल म्हणून मोरोपंत आतुर झाले होते; आता त्यांना एकदाचें नातवंडाचें तोंड दिसलें; आता त्यांच्या डोळ्यांचें पारणें फिटलें.

४२ डोळ्यांत ( किंवा नेत्रांत ) खुपणें किंवा सलणें—पाहून डोळ्यांना वेदना होणें ( मत्सरानें, द्वेषानें, वैरानें इ० ). उ०

ब्राह्मण कणसा खुपतो तुमच्या नेत्रीं, नसो, सवे काढा ।
युक्तचि मरणाराला हितपरिणामहि न सोसवे काढा ॥

मोरोपंत आदिपर्व, अ० ९.

४३ डोळ्यांत जहर उतरणें—दुसऱ्याचें वैभव पाहून मत्सरग्रस्त होणें.

४४ डोळ्यांत तेल घालून—काळजीनें, खबरदारीनें. डोळ्यात तेल घालून जागणें किंवा रात्र काढणें म्ह० आजारी माणसाची काळजी घेण्यासाठी झोप न घेतां बसून राहणें.

४५ एखाद्याच्या डोळ्यांत धूळ किंवा माती घालणें—त्याला फसविणें.

४६ डोळ्यांत पाणी नसणें—लाज न वाटणें.

४७ डोळ्यांत पाणी असणें—लाज वाटणें.

४८ डोळ्यांत बोट घातलें असता दिसणार नाही इतका अंधार—निबिड काळोख.

४९ डोळ्यांत भरणें—

(क) फार फार आवडणें. उ० ही अंगठी माझ्या डोळ्यात भरली आहे, (म्ह० मला ती फार आवडे).

(ख) महत्त्वाचा वाटणें. उ० इंग्रज प्रथम हिंदुस्थानात आले, तेव्हा मुसलमानाचें राज्य होतें. अर्थात् त्या वेळीं इंग्रजांच्या डोळ्यात मुसलमान तेवढा भरण्याशारखा होता. मराठ्याकडे त्यांचें लक्ष्य कशाला जाईल?

न. चिं. केळकर–मराठे व इंग्रज.

५० डोळ्यात माती पडणें—मत्सर वाटणें.

५१ डोळ्यात न मावणें किंवा न समावणें—पाहतांक्षणी गर्भगळित न होणें; न भिणें. उ० मी काही तुझ्या डोळ्यांत मावणार नाहीं! (म्ह० मी तुला भीत नाही)

५२ डोळ्यांत वात घालून बसणें—जागत बसणें.

५३ डोळ्यात शरम नसणें—निर्लज्ज असणें.

५४ डोळ्यांनी उजाडणें—सारी रात्र जागून काढणें किंवा घालविणें

५५ डोळे मारणें—डोळ्यांच्या खुणांनी संकेत कळविणें.

५६ डोळ्यानी रात्र किंवा दिवस काढणें किंवा उगवणें—एकसारखें जागत बसून रात्र किंवा दिवस घालविणें.

५७ उघड्या डोळ्यानी—जाणून बुजून (फसगतीनें नव्हे.)

५८ डोळ्यावर धूर येणें—अधिकारानें, संपत्तीनें फुगून जाणें किंवा उन्मत्त होणें.

५९ डोळ्यावर येणें—

(क) डोळ्यात सलणें; असह्य होणें

(ख) उघडकीस येणें.

६० एखाद्याच्या डोळ्याशीं डोळा मिळविणें—त्याच्याकडे उद्धटपणानें टक लावून पाहत राहणें.

६१ डोळ्याशीं डोळा लागणें किंवा डोळ्याला डोळा लागणें—थोडीशी झोप येणें.

६२ डोळा लागणें—थोडीशी झोप येणें किंवा लागणें. उ०
चिंताज्वरात माझा रात्री नाहीच लागला डोळा।
जायासाठी कंठीं शतवार प्राण जाहले गोळा॥

मोरो०—बृहद्दशम.

६३ दोही डोळ्यांची मुरवत राखणें—एखाद्याकडे पाहावयाला भिणें किंवा कचरणें.

६४ दोन डोळ्यांची भीड—माणूस समोर उभें आहे तोंपर्यंत त्याच्याविषयी भीति, आदर किंवा प्रेम वाटणें आणि तें माणूस तेथून दुसरीकडे गेलें की; त्याचें स्मरणहि नाही, असें होणें; वरपांगीं भीति, आदर किंवा प्रेम.

६५ रुप्याचे डोळे होणें—अंतकाळ आल्यामुळे डोळे पांढरे किंवा निस्तेज होणें; मरणोन्मुख होणें.

६६ डोळे ताणून पाहणें—तीक्ष्ण नजरेनें किंवा टवकारून पाहणें.

६७ डोळ्यांपुढे काजवे येणें—मोंवळ येण्याची भावना होणें.

६८ डोळ्यांवर कातडें ओढणें—एखाद्या गोष्टीकडे दुर्लक्ष्य करणें; ती पाहिली न पाहिली असें दाखविणें; ती मनावर न घेणें.

६९ वाघाचा डोळा—रुपया. [ भिक्षुकमंडळींत ह्या शब्दाचा प्रचार आहे. *भिक्षुकलोकांच्या परिभाषेंत वाघाचा डोळा किंवा राम म्ह० रुपया; सीताबाई म्ह०* अधेली; चकारी म्ह० चवली; पकारी म्ह० पावली; तत्त्वमसि म्ह० द्रव्यलाभ ].

## ४६. टाळू किंवा टाळू

१. ताळू *किंवा* टाळू

( क ) डोक्याचा वरचा भाग.

( ख ) मुलाचें जावळ केलें म्हणजे डोक्यावर जो केसाचा झुबका राखून ठेवतात तो.

( ग ) तोंडाचा आंतील घुमटाकार भाग.

२ एखाद्याच्या ताळूवर मिरीं वाटणें—

( क ) त्याला टपका देणें.

( ख ) त्याच्यावर पूर्ण अंमल गाजविणें; एखाद्याच्या वरचढ होणें. [ डोक्यावर असेंहि म्हणतात ].

३. ताळूला किंवा ताळवेस किंवा टाळ्यास टिपरूं न लागूं देणें— .

( क ) न खळतां रडत राहणें. उ० काय मूल तरी, तें! सकाळपासून रडतें आहे! टाळ्यास टिपरूं लागूं देत नाही!

( ख ) एकसारखें बोलत सुटणें.

(ग) एखाद्या गोष्टीचा सुगावा किंवा पत्ता लागू न देणें

(घ) एखादी कामगिरी अगावाहेर टाकणें

४ ताळूचा दांत—आवडती किंवा प्यारी वस्तु किंवा मनुष्य उ० रामूची कोणीं निंदा केलेली मला खपावयाची नाहीं ? तो माझ्या ताळूचा दात आहे !

टीप—सापाच्या तोंडातील वरचा दात, ज्यात त्याचें विष साठलेलें असतें आणि ज्याला तो आपलें संरक्षणाचें साधन म्हणून जपत असतो असें समजतात, तो त्याच्या ताळूचा दांत.

५ ताळू भरणें—("भरणें" सकर्मक)—लहान मुलाला न्हाऊ घालताना त्याच्या ताळूत तेल जिरविणें

६ ताळू भरणें—("भरणें" अकर्मक)—ताळूचा भाग पूर्णपणें वाढणें किंवा टणक होणें उ० ह्या मुलाची ताळू अजून भरली नाहीं त्याच्या डोक्याला हात लावू नको

७ एखाद्याच्या ताळूवर किंवा ताळवेवरून हात फिरविणें—त्याला फसविणें उ० रंगोपंत प्रामाणिक मनुष्य आहे असें समजून त्याच्या हातीं मीं आपला सर्व कारभार दिला, पण अखेरीस त्यानें माझ्या ताळवेवरून चांगलाच हात फिरविला!

## ४७. तोंड

१. तोंड—

(क) अन्न वगैरे द्रव्यें शरिराच्या उपयोगासाठीं ग्रहण करणारें आणि शब्दोच्चार करणारें, इंद्रिय, मुख

(ख) चेहेरा उ० गोविंदा आज तीन दिवस तापानें आजारी आहे, पण त्याच्या तोंडावर अद्यापि आजाराची कळा दिसू लागली नाहीं

(ग) कोणत्याहि वस्तूचा पुढचा भाग किंवा दर्शन उ० ह्या घराचें तोंड उत्तरेस आहे

(घ) भोक, छिद्र, वाट उ० बाटलीचें तोंड उ० ह्या फोडाला सुईनें तोंड पाड उ० खिडकीच्या तोंडातच वाघ बसला होता, ज्वालामुखीचें तोंड

२ कोणत्या तोंडानें ?—तोंड म्हणजे धैर्य किंवा उजागरी उ० एका व्यवहारात पुढरिकानें मला फसविलें आता दुसरा व्यवहार करा, असें मला तो कोणत्या तोंडानें म्हणावयास येईल ? (म्ह० त्याला कसें धैर्य होईल ?)

३. तोंड आटोपणें किंवा आवरणें—मापण बंद करणें, बोलण्याला आळा घालणें, जपून बोलणें उ० तोंड आटोप, जास्ती बोललास तर मार खाशील !

४ तोंड आंबट करणें—असंतोषाची किंवा निराशेची मुद्रा धारण करणें

उ० तू आणलेलें चीट रामाला आवडलें नाही. तो मघापासून आंबट तोंड करून बसला आहे. दुकानदाराने हें चीट बदलून दिलें तर पाहा.

५ तोंड आहे की तोबरा आहे?—किती खातोस? किती बोलतोस? उ० अरे, शेरभर पोहे सपविलेस! आणि आणखीहि मागत आहेस! तोंड आहे की तोबरा आहे? (म्ह० तुझ्या खाण्याला काही मर्यादा आहे की नाहीं?). उ० मघापासून एकसारखा बोलतो आहेस! तोंड आहे की तोबरा आहे?

६ तोंड उतरणें—तोंडावरचें तेज नाहीसें होणें (आपला अन्याय उघडकीला आल्यामुळे, आजारानें, निराशेनें किंवा उपवासामुळे). उ० ह्या येवढ्याशा मुलीला एकादशी कशाला करावयाला लावता? ती सकाळपासून नुसत्या रताळ्याच्या चार फोडींवर आहे! तिचें तोंड पहा अगदीं उतरून गेलें आहे!

७ तोंड उष्टें करणें—अल्पमात्र आहार करणें उ० मला आगगाडीवर जावयाची घाई झाली, म्हणून मी नुसतें तोंड उष्टें करून उठलों (म्ह० फार न जेवता उठलों) उ० पोटभरीचें अन्न नाही, मग तोंड उष्टें तरी कशाला करू?

८ तोंड करणें—निर्लज्जपणें बोलणें, उद्धटपणाने बोलणें उ० तू खाली न पाहतां चालत होतास म्हणून तें दूध सांडलें, आता उगीच कशाला तोंड करतोस? (म्ह० ठेवणाराने तें तेथे ठेवावयाचें नव्हतें, दूध ठेवण्याची ती जागा नव्हे, वगैरे चायफळ बोलणें कशाला बोलतोस?)

९ तोंड करून बोलणें—निर्लज्जपणें किंवा आपला लहान दर्जा विसरून बोलणें उ० तुझ्या मुलाने पहिल्याने माझ्या मुलाची खोडी काढली, आता उगीच तोंड करून बोलूं नकोस!

१० तोंडाला काळोखी आणणें किंवा लावणें—अपकीर्तीला कारण होणें. उ० ह्या बदमाष पोराने माझ्या तोंडाला काळोखी लावली!

११ तोंड काळें करणें—निघून जाणें, पळून जाणें [यात निंदा किंवा तिरस्कार गर्भित असतो.] उ० तुला जर माझ्या म्हणण्याप्रमाणे चालावयाचें असेल, तर माझ्या घरीं राहा; नाहीतर एकदाचें तोंड काळें कर!

(ह्या शब्दसहतींत "तोंड" हा शब्द वगळला तरी चालतो).

१२ तोंड घालणें—मध्ये बोलणें उ० ज्यात त्यात तोंड घालावयाची तुझी खोडी फार वाईट आहे

१३ मध्ये तोंड घालणें—दोन माणसांचें बोलणें चाललें असता, व त्यांच्या बोलण्याच्या विषयाशीं आपला कांही संबंध नसतां, त्यांच्याबरोबर बोलणें उ० आम्ही आपले घरगुती गोष्टी बोलत आहों, तूं कशाला मध्ये तोंड घालतोस?

१४ तोंडसुख घेणें—यथेच्छ शिव्या देणें, खरडपट्टी काढणें

१५. तोंड चुकविणे—

( क ) आपल्या हातून कांही अपराध घडला असतां कोणी आपणास रागें भरल ह्या भीतीनें त्याच्यापासून दूर असणें किंवा त्याच्या नजरेस न पडणें.

( ख ) आपण एखाद्याच्या नजरेस पडलों असता तो आपणास काही कामगीर सांगेल आणि तें आपणास करावें लागेल, ह्या भीतीनें त्याच्या दृष्टीस न पडणें. उ० मी रंगोपंताला मायवळ्यावर पाठविणार आहे, पण आज आठ दिवस तो तोंड चुकवीत आहे !

१६. तोंड टाकणे—

( क ) शिव्यांचा वर्षाव करणें; अद्वातद्वा बोलणें. उ० तुझी जिव्हा तुझ्याच पेटींत सापडली, तूं नोकर-माणसांवर उगीच तोंड टाकिलेंस !

( ख ) चावण्यासाठी तोंड पुढें करणें. [ घोडा वगैरेसंबंधानें ह्या शब्दसहतीचा उपयोग होतो. ] उ० ह्या घोड्याला तोंड टाकावयाची भारी खोडी आहे, ती घालविली पाहिजे.

१७ तोंड दाबणें किंवा बांधणें—लाच वगैरे भरून एखाद्याचें तोंड बंद करणें आपलीं वर्मेंकर्में एखाद्यानें प्रकट करू नयेत, म्हणून त्याला पैसे देऊन गप्प करणें.

१८ तोंड दिसणें—निर्भर्त्सना केलेली लोकांच्या नजरेस येणें ( पण ज्याची निर्भर्त्सना केली, त्याचें वर्तन सुधारण्याची आशा नसणें किंवा त्याचें वर्तन लोकांच्या नजरेस न येणें ). उ० मी तुला रागें भरलों म्हणजे माझें तोंड मात्र दिसेल, पण तू आपला आहेस तसाच राहणार ! बोलणाराचें तोंड दिसतें, करणाराची कृति मात्र कोणाला दिसत नाही !

१९. तोंड देणें—

( क ) पारा वगैरे देऊन तोंडाची आंतली त्वचा सुजवून लाळेच्या रूपानें शरिरांतून रोग नाहींसा करणें. उ० वैद्यबोवा म्हणाले, "मीं त्याला तोंड दिलें आहे," ( म्हणजे तोंड सुजविण्याचें औषध दिलें आहे ).

( ख ) सैन्याच्या अग्रभागीं राहून शत्रूवर हल्ला करणें.

( ग ) प्रतिपक्षी होऊन राहणें; लढावयाला सिद्ध होणें. उ० मराठ्यांच्या सैन्याला तोंड देण्याची औरंगजेबाची छाती होईना !

२०. तोंड धरणें—

( क ) अन्नसेवन करण्याची तोंडाची शक्ति आजार वगैरेंच्या कारणानें नाहींशी होणें. उ० पाडोबाचें तोंड धरलें आहे, त्याला चमच्याचमच्यानें दूध पाजावें लागतें. [ " धरणें " अकर्मक ].

(ख) बोलण्याची शक्ति नाहीशी करणें. उ० मीं शाई सांडली नाही, असें तूं मास्तराला का नाही सांगितलेंस ? तुझें तोंड कोणीं धरलें होतें की काय ? [" धरणें " सकर्मक ].

(ग) एखाद्याला आपल्या कबजात किंवा तावडींत आणणें. उ० मीं त्याचें तोंड धरलें आहे. तो आता काय करणार ? [" धरणें " सकर्मक ].

२१ तोंड धरून किंवा दाबून बुक्क्यांचा मार—एखाद्याला विनाकारण बडविणें आणि पुन्हा त्याला कागाळी किंवा तक्रार करण्याचा मार्गहि खुला न ठेवणें. एखाद्याला अन्यायानें वागविणें आणि तो अन्याय तो चव्हाट्यावर आणूं लागला असतां त्याला निर्लज्जपणानें शिक्षा करणें.

२२ तोंड धुऊन या !—ही तुमची विनंती मी कदापि मान्य करणार नाहीं !

*टीप—पुणें शहरीं "नाक्झरीवरून तोंड धुऊन या," असेंहि म्हणण्याचा* प्रघात आहे.

२३ तोंड निपटणें—आजारानें किंवा उपासामुळे गाल खोल जाणें. उ० आज महिनाभर हें मूल तापानें आजारी होतें; त्याचें तोंड पाहा कसें निपटलें आहे तें ! [" निपटणें " अकर्मक ].

२४. तोंड पडणें—

(क) सुरुवात होणें. उ० लढाईस तोंड पडलें.

(ख) छिद्र पडणें. उ० ह्या गळवाला तुम्ही डिवचूं नका, आपल्या आपण तोंड पडेल तेव्हा-पडूं द्या.

२५ तोंड मातीसारखें किंवा शेणासारखें होणें—तोंडाची चव नाहीशी होणें. तापामुळे माझें तोंड अगदी शेणासारखें झालें आहे !

२६ तोंड पसरणें किंवा विचकणें—हीनदीनपणानें, केविलवाण्या स्वरानें, याचना करणें.

२७ तोंड पाघळणें—गुप्त गोष्ट बाहेर पडूं देणें. उ० मारवाड्याला चुकविण्यासाठीं मीं उद्या मुक्काट्यानें नाशकास जावयाचा बेत केला होता; सर्व तयारी झाली होती; पण आमच्या घरकरणीचें तोंड पाघळलें ! तिनें हा बेत गोपिकाबाईंच्या कानांत सांगितला; गोपिकाबाईंनीं चंद्रिकाबाईंच्या कानांत सांगितला; असें होतां होतां त्या मारवाड्यापर्यंत ही खबर जाऊन थडकली; तेव्हा तो माझ्या घरीं येऊन रुपये मागूं लागला !

२८. एखाद्याचें तोंड पाहणें—

(क) एखाद्याच्या आश्रयाची, मदतीची अपेक्षा करून असणें. उ० आम्ही पडलों गरीब, म्हणून आम्हाला सावकाराचीं तोंडें पाहण्याची पाळी वारंवार येते.

(ख) बोलणाराचें भाषण नुसतें ऐकणें, पण त्यानें सांगितलेलें काम करावयास किंवा केलेला बोध अनुसरावयास, प्रवृत्त न होता स्वस्थ बसून राहणें उ०—

म्हणती, "हाणा, मारा, पाडा, ध्या, काय पाहता तोंडा !।
कोंडा, प्राणव्यसनीं बाळ बुडो, कर्दमीं जसा घोडा ! ॥ १ ॥ मोरोपत

२९ आपलें तोंड पाहणें—आपल्या शक्तीचा अजमास करणें. उ० तूं असें करीन म्हणतोस, पण आधी आपलें तोंड पाहा !

३० एखाद्याच्या तोंडाकडे बघणें किंवा पाहणें—आपल्या अंगीं जो गुण नाही तो गुण त्याच्या अंगीं आहे, त्याच्याकडे मत्सरानें किंवा विषादानें बघत बसणें. उ० मराठी भाषेस आवेश, गांभीर्य व सरसता या गुणांकरिता कोणत्याहि अन्य भाषेच्या तोंडाकडे बघण्याची खास गरज नाही, अशी आमची खात्री आहे.

वि. कृ. चिपळूणकर,—निबंधमाला.

३१. तोंड फिरणें—

(क) तोंडाची चव नाहीशी होणें अनद्वेष उत्पन्न होणें. उ० तापामुळे माझें तोंड फिरलें आहे (म्ह० मला कोणताच पदार्थ तोंडांत घालावासा वाटत नाही).

(ख) तोंडांतून शिव्याचा वर्षाव होऊं लागणें. उ० नगोबा रागावला म्हणजे कोणावर त्याचें तोंड फिरेल, ह्याचा नेम नाही !

३२. तोंड फिरविणें—

(क) शिव्याचा वर्षाव करीत सुटणें. उ० निळोबा भारी तापट आहे, त्याला चिडवू नका; त्याला राग आला, म्हणजे तो तुमच्यावर देखील तोंड फिरवावयाला कचरणार नाही !

(ख) तोंडाची चव नाहीशी करणें.

(ग) रंगाचा फरक दाखविणें (वितळत असलेल्या धातूसबंधानें योजतात). उ० ह्या ताम्यानें अद्याप तोंड फिरविलें नाही, आणखी पुष्कळ आंच दिली पाहिजे.

३३. तोंड फुटणें—

(क) थंडीच्या योगानें तोंडाची बाहेरची त्वचा खरखरीत होणें किंवा भेगाळणें उ० पुण्याच्या थंडीनें माझें तोंड फुटलें आहे.

(ख) फजिती उडणें, पत नाहीशी होणें, नाचक्की होणें

३४ तोंड बंदावर राखणें—खाण्याला किंवा बोलण्याला आळा घालणें. उ० तू आपलें तोंड बंदावर राखिलें नाहीस, तर अजीर्णानें आजारी पडशील !

३५. तोंड बाहेर काढणें—

(क) राजरोसपणें समाजांत हिंडणें उ० तुरुंगातून सुटून आल्यावर तुकोबानें आज दोन वर्षांत एकदाहि तोंड बाहेर काढलें नाही !

(ख) फिरावयासाठी किंवा कामकाजासाठी, घराच्या बाहेर पडणें. उ० पावसाळा सुरू झाल्यापासून मीं दोन महिन्यांत तोंड बाहेर काढलें नाहीं !

३६ तोंड भरून बोलणें—कोणाची भीड, मुरवत, संकोच न बाळगतां बोलणें.

३७ तोंड भरून साखर घालणें—एखाद्यानें उत्तम प्रकारें कांहीं कामगिरी केली असतां बक्षिसादाखल तो खाईल तितकी साखर त्याला खाऊं घालणें.

३८. तोंड माजणें—

(क) पक्वान्नें खावयाची चटक लागणें. उ० पाडोबाचें तोंड अलीकडे भारी माजलें आहे !

(ख) शिव्या देण्याची खोडी लागणें. उ० काशीनाथपंताला ती बदलीची जागा मिळाल्यापासून त्याचें तोंड भारी माजलें आहे (म्ह० तो ज्याला त्याला शिव्या देत असतो).

३९ तोंड येणें—तोंडाच्या आंतल्या त्वचेवर फोड येऊन ती हुळहुळी होणें. उ० आज महिनाभर माझें तोंड आलें आहे; मला तिखट अगदी चालत नाही. उ० तुझें तोंड आलें आहे, तें सीतोपलादिचूर्णानें बरें होईल.

४०. तोंड रंगविणें—

(क) थोबाडींत मारून एखाद्याचें तोंड लालभडक करून सोडणें. उ० असें भलभलतें मला बोललास, तर ऐसें तुझें तोंड रंगवीन की ज्याचें नांव तें !

(ख) विडा खाऊन ओंठ तांबडेलाल करून घेणें. उ० गुडघ्यायेवढ्या पोराला असें तोंड रंगविणें शोभत नाही !

४१ एखाद्या गोष्टीला तोंड लागणें—तिची सुरुवात होणें. उ० समारंभास, लढाईस, तोंड लागलें. उ० सुदैवानें एक गोष्ट झाली आहे की, तोतया तळकोकणचा रस्ता सोडून घोरघाटाकडे वळला, त्यामुळे लढाईचें तोंड लागेल तें इकडेच लागेल.

न. चिं. केळकर,—तोतयाचें बंड

४२ तोंड लावणें—सुरुवात करणें; बोलावयास प्रारंभ करणें; प्यावयासाठी एखादें पेय ओंठाशीं नेणें.

४३ तोंड वाईट करणें—निराशेची मुद्रा धारण करणें.

४४. तोंड वाईट होणें—

(क) तोंडावर निराशेची मुद्रा येणें.

(ख) तोंडाची चव नाहीशी होणें.

४५ तोंड वाजविणें—बोलत सुटणें; गलागला बोलणें; निरुपयोगी बोलणें; बोलण्याची मेहेनत करणें.

४६ तोंड वासणें—निराशेनें, दुःखानें, तोंड उघडणें, याचना करण्यासाठी तोंड उघडणें.

४७ तोंड वासून पडणें—शक्तीच्या क्षीणतेमुळे आ पसरून पडणें. सामर्थ्य, उत्साह, तेज वगैरे नष्ट झाल्यामुळे लाचार होऊन आ पसरून पडणें. उ०

जो खळ म्हणे, "पृथेची सांगुनि दासीस कोंडवा सून"।
तो पडला सिंहनिहतमत्तद्विपसाच तोंड वासून ॥ मोरोपंत–गदापर्व.

४८ तोंड हातावर धरणें—शिव्या देत सुटणें. उ० गिरिधररावानें आताशा आपलें तोंड जसें काही हातावर धरिलें आहे! (म्ह० ज्याला त्याला तो शिव्या देत असतो!)

४९ एखाद्यावर तोंड सोडणें किंवा तोंड मोकळें सोडणें—त्याच्यावर शिव्यांचा वर्षाव करणें, त्याला शिव्या देणें, अद्वातद्वा बोलणें. उ० मालिनीबाईनें आपल्या अंगणात केर लोटला, म्हणून बोलाईनें तिच्यावर यथेच्छ तोंड सोडलें!

५० तोंड वेडावणें—एखाद्याला वेडावण्यासाठी त्याच्यापुढे तोंड वाकडें करणें.

५१ तोंड संभाळणें—जपून बोलणें, भलतेसलते शब्द न उचारले जावे, अशी काळजी घेणें, उ० वसिष्ठानें अन्याय केला आहे खरा, तथापि त्याच्याशीं तोंड संभाळून बोल, नाहीतर तो तुजवर दश धरील!

५२ एखाद्याचें तोंड सुटणें—चराचरा, फडाफडा किंवा अद्वातद्वा बोलण्याची त्याला प्रवृत्ति होणें. उ० आज तुझें भारी तोंड सुटलें आहे रे!

५३. तोंड सोडणें—

(क) अधाशासारखें खात सुटणें.

(ख) अद्वातद्वा बोलत सुटणें. [ "तोंड मोकळें सोडणें," असेंहि म्हणतात.] उ० तू ह्या लग्नात एकसारखें तोंड मोकळें सोडलें आहेस, तुला दुखणें खास येणार!

५४. तोंड हातीं धरणें—

(क) अद्वातद्वा बोलणें.

(ख) अधाशासारखें खाणें.

५५ तोंडचा (किंवा तोंडींचा) घास देणें—वेळ पडल्यास आपण उपाशी राहून आपलें अन्न त्याला देण्याला सिद्ध असणें (म्हणजे त्याशी अत्यंत प्रेमानें किंवा मायाळूपणानें वागविणें). उ० तो मोठा प्रेमळ म्हातारा आहे, तो एखाद्याला तोंडचा घास देखील काढून देईल!

५६ एखाद्याच्या तोंडचा घास काढणें किंवा हिसकावून घेणें—एखाद्याचीं चरितार्थाचीं साधनें नाहीशीं करणें उ० मला बदली मिळावयाची संधि आली होती, पण त्या गोविंदपंतानें माझ्या तोंडचा घास काढला!

५७ तोंडचे पाणी पळणे किंवा तोंडावरचें पाणी पळणें (किंवा उडणें)—घाबरून जाणें, भयभीत होणें उ० तो उन्मत्त हत्ती सुटून सैरावैरा धावत आहे, हें ऐकून सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. उ० माझ्या मुलाची नोकरी गेली हें ऐकताच माझ्या तोंडचें पाणी पळालें!

५८ तोंडाचा तोफखाना सुटणे—अद्वातद्वा बोलण्याची क्रिया चालणें; शिव्याचा वर्षाव सुरू होणें. उ० शेजारणीने आपल्या दारात केर लोटला असें मथूबाईनें पाहिल्याबरोबर तिच्या तोंडाचा तोफखाना सुटला!

५९ तोंडाचा पट्टा सुटणे किंवा चालणे—चगचरा बोलणें सुरू होणें, शिव्यांचा वर्षाव होऊ लागणें

६० तोंडाचा पट्टा सोडणे किंवा चालविणे—शिव्यांचा भडीमार सुरू करणें उ० गोपिकाबाईवर तिने चोरीचा आळ घातला, तेव्हा काय विचारता? गोपिकाबाईने जो तोंडाचा पट्टा सोडला, तो काही पुसू नये!

६१ तोंडाचा फटकळ—वडील किंवा प्रतिष्ठित माणसाची भीड न धरता, किंवा त्याची अदबी न राखतां, जो बोलतो तो.

६२ तोंडाची गोष्ट नाही!—नुसतें बोलून असलीं कामें कधी होत नसतात. उ० वाघ मारणें ही तोंडाची गोष्ट नव्हे!

६३ तोंडाची वाफ दवडणें—निरर्थक, निरुपयोगी, निष्फळ असें भाषण करणें, जें बोलून फायदा नाही, जें कोणीहि खरें समजणार नाहीत, असें भाषण करणें. उ० तुझ्या उपदेशाप्रमाणे जनार्दन कधी चालावयाचा नाही, मग उगीच तोंडाची वाफ का दवडतोस?

टीप—ह्या शब्दसहतींत "दवडणें" बद्दल "खरचणें," "गमावणें," "फुकट घालविणें" व एतदर्थक दुसरींहि क्रियापदें घालता येतात.

६४ तोंडात खाणें—चपराक सोसावी लागणें. उ० आता तुझी मस्ती पुरी कर, नाहीतर तोंडात खाशील! [येथे "खाणें" याचें कर्म "चपराक" हें अध्याहृत असतें.]

६५ तोंडांत देणें किंवा भडकावणें —चपराक लगावणें; थोबाडींत मारणें. [येथे "चपराक" हें कर्म योजलें किंवा अध्याहृत ठेविलें तरी चालतें].

६६ तोंडांत मारून घेणे—नुकसानी होऊन बोध मिळविणें. फजिती झाल्यावर शहाणपणा शिकणें; आपल्या हातून चुकी झाली किंवा आपण मूर्खपणा केला, असें कबूल करणें. उ० तुलें काम कमी करावें म्हणून मी हे घर शोधिलें, आणि तूं म्हणतेस की, मी तुझी गळेसरी विघडविली! मी आपली तोंडात मारून घेतें कशी! पुन्हा म्हणून तुझ्या कामाला बोट लावावयाची नाहीं.

६७ त्याच्या तोंडांत तिळभर राहात नाहीं—तो गुप्त गोष्ट पोटांत ठेवूं शकत नाहीं; गुप्त गोष्ट त्याच्या तोंडांत राहात नाहीं. उ० विनायकरावांच्या जवळ तुम्ही असल्या गोष्टी बोलत जाऊं नका. त्यांच्या तोंडांत तिळभर राहात नाहीं.

६८ त्याच्या तोंडांत तीळ भिजत नाहीं—गुप्त गोष्ट त्याच्याने गुप्त ठेववत नाहीं (म्हणजे तो गुप्त गोष्ट फटदिशीं बोलून जातो).

६९ तोंडांत तोंड घालणें—प्रेम, मैत्री, दोस्ती, वगैरेंच्या भावानें वागणें. उ० अलीकडे ते दोघेजण भारी तोंडांत तोंड घालीत असतात! कोणाला तरी बुडविण्याच्या त्यांच्या खटपटी चालल्या आहेत, असें वाटतें!

७० तोंडांत बोट घालणें किंवा घालून राहणें—आश्चर्यानें चकित होऊन स्तब्ध होणें. उ० रामानें रात्रीचा दिवस करून अभ्यास केला होता, तो नापास झाला, असें ऐकून मी तोंडांत बोट घालून राहिलों! उ० त्यानें अर्ध्या तासांत पांच श्लोक पाठ केले, हें पाहून मीं तोंडांत बोट घातलें!

७१ तोंडांत माती पडणें—उपास काढावे लागणें; मरणें. उ० त्याच्या तोंडांत माती पडली! (म्ह० तो मेला!)

७२ तोंडानें पाप भरणें—लोकांचीं पातकें उच्चारणें; लोकांचे दोष तोंडानें बोलून दाखविणें.

७३ तोंडापरीस जबडा थोर!—धन्यापेक्षा चाकराचा दिमाख जास्ती!

७४ तोंडापुढें!—अगदीं जिव्हाग्रीं! उ० ते श्लोक अगदीं माझ्या तोंडापुढें आहेत! (म्ह० हवें तेव्हा मी ते म्हणून दाखवीन!). उ० तो श्लोक अगदी माझ्या तोंडापुढें आहे, पण आता आठवत नाहीं.

७५ तोंडापुरता गोड किंवा तोंडावर गोड—खोटें प्रेम दाखविणारा. उ० काकोबा तोंडापुरता गोड आहे, पण मोठा कपटी आहे; त्याच्याशीं जपून वागावें.

७६ तोंडाला पानें पुसणें—फसविणें [शब्दशः—पत्रावळी सारीं आपण खाऊन उष्टय़ा पत्रावळी पुसल्याप्रमाणें तोंडाला पुसणें]. उ० पतपेढीच्या कामावर देखरेख करावयाला चार माणसें होतीं; पण त्यानें सर्वांच्या तोंडाला पानें पुसून आपला डाव साधला!

७७ त्याच्या तोंडाला फाटा फुटला—तो मन मानेल तें बोलूं लागला!

७८. तोंडावर—

(क) डोळ्यादेखत! पाहता पाहतां! भीड, मुरवत किंवा संकोच न बाळगतां; न कचरतां; निर्लज्जपणानें, धिटाईनें. उ० मी कशाला त्याला भितों आहे! मी त्याच्या तोंडावर "तूं लुच्चा आहेस" असें म्हणेन!

(ख) पूर्णपणें पाठ किंवा मुखोद्गत. उ० बारा ज्योतिर्लिंगांचीं नांवें अगदी माझ्या तोंडावर आहेत.

७९. तोंडाशीं तोंड देणें—बरोबरीच्या नात्यानें एखाद्याशीं बोलणें, वागणें किंवा व्यवहार करणें.

८० एखाद्याच्या तोंडावर थुंकणें—त्याची निर्भर्त्सना करणें किंवा छीथू करणें. उ० म्हातान्या आईला तूं लोकांच्या घरीं स्वयपाकीणबाईप्रमाणें राहण्याची वेळ आणलीस, तर लोक तुझ्या तोंडावर थुंकतील!

८१ एखाद्याच्या तोंडावरून हात फिरविणें—त्याला फसविणें.

८२ तोंडास तोंड देणें—आपला हलका दर्जा विसरून जाऊन एखाद्याशीं बरोबरीच्या नात्यानें बोलणें; बेफरटपणानें बोलणें. [ह्याच अर्थानें "तोंडाशीं तोंड देणें," ह्या शब्दसंहतीचाहि उपयोग करतात].

८३ तोंडाला काजळी लावणें—बेअब्रू करणें; नाचक्की किंवा नापत करणें. [ह्याच अर्थानें "तोंडाला काळोखी आणणें किंवा लावणें," असेंहि म्हणतात]. उ० सुनेनें माझ्या तोंडाला काळोखी आणली!

८४ तोंडाला कुत्रे बांधणें—ताळतंत्र सोडून बोलणें, अद्वातद्वा बोलणें; शिव्या देणें. उ० रामभ्यानें तर जसें तोंडाला कुत्रेंच बांधलें आहे!

८५ त्याच्या तोंडावरचा जार अजून वाळला नाहीं—अद्यापि तो लहान, बाल्दशेंत आहे. त्याला अनुभव नाहीं. त्याला जगाची माहिती नाहीं. [जार म्ह० मूल जन्मल्यावर त्याच्या ओंठावर आणि तोंडावर जो चिकट बुळबुळीत थाका असतो तो].

८६. तोंडास खीळ घालणें—

(क) बोलणें बंद करणें; अगदी न बोलण्याचा निश्चय करणें.

(ख) खाणें बंद करणें. जास्ती न खाण्याचा निश्चय करणें.

८७ तोंडास येईल तें बोलणें—आपलें बोलणें योग्य आहे की अयोग्य आहे, शहाण्यासारखें आहे की मूर्खासारखें आहे, याचा विचार न करितां बोलणें. उ० राममाऊला चिडवूं नका, कारण तो चिडला म्हणजे तोंडास येईल तें बोलतो!

८८ तोंडास बसणें किंवा तोंडीं बसणें किंवा तोंडाला लागणें—पाठ, बिनचूक, भरभर, म्हणतां येणें. उ० तो श्लोक दहा वेळा पुस्तकांत पाहून म्हण, म्हणजे तो तुझ्या तोंडाला लागेल. उ० कवि एकदा प्रसिद्ध झाला, म्हणजे त्याच्या ग्रंथाची चहा होऊन त्याच्या अनेक प्रति झाल्या व हरदासांच्या वगैरे तोंडीं त्याची कविता बसली, म्हणजे त्याचें काव्य बुडावें हें एका गडगेरीज दुसऱ्या कोणाहि शक्य नाहीं.

विष्णुशास्त्री चिपळूणकर,—निबंधमाला.

८९ एखाद्याच्या तोंडास लागणे किंवा तोंडीं लागणे—त्याच्याबरोबर वादविवाद करणें उ० तू पराचा कावळा करण्यांत पटाईत आहेस, तुझ्या तोंडाला कोणीं लागावें ?

९० तोंडासारखे बोलणें—खुशामतीपणानें बोलणें, स्तुति करण्याकरिता बोलणें. उ० मी तुमच्या तोंडासारखें बोलतों आहे, असें समजू नका ! मी खरें सागतों, की तुमचें कालचें व्याख्यान अत्यंत उत्कृष्ट झालें !

९१ तोंडीं तृण धरणें—शरण आलों असें कबूल करणें, मी आपला आश्रित सेवक आहे असें म्हणणें [ दांतीं तृण धरणें, " असाहि प्रयोग करतात ]

९२ तोंडीं देणें—दहाच्या वतीने मागणी किंवा विनंती करावयास, वरिष्ठाच्या पुढे त्यांच्यापैकी एकाला उभें करणें उ० मला तोंडीं देऊं नका. वरिष्ठाचे पुढे मी उभा राहिलों, की माझे पाय लटलटा कापतात, दुसऱ्या कोणाला तरी पुढे करा.

९३ तोंडीं येणे—अगदी परिपक्व स्थितीस येऊन उपभोगाला योग्य होणे

९४ तोंडीं लागणे—

(क) रोखठोक जबाब देणें उ० तो माझ्या तोंडीं लागला ( म्ह० मला रोखठोक जबाब देऊ लागला किंवा माझ्याशीं उद्धटपणें बोलूं लागला )

(ख) युद्धाच्या किंवा मारामारीच्या आघाडीस असणें उ० त्या मारामारीच्या तोंडीं लागू नको ! दूर उभा राहून पाहा ! ( म्ह० फार पुढे जाऊ नको ).

(ग) आवड लागणें उ० त्याच्या तोंडीं आंबेमोहोराचा भात लागला, त्याला आता कमोद आवडणार नाही

९५ तोंडीं लावणे—

(क) विसारादाखल पैसे देणें उ० गाडीवाला म्हणाला, "धनीसाहेब, आम्हांला तोंडीं लावायला आठ बारा आणे—काहीतरी द्या !"

(ख) रुचि पालटविणें उ० आज तोंडीं लावावयाला भाजीभिजी कांही केली नाहीस काय ?

९६ तोंडें मागितलीं किंमत—दुकानदाराने सांगितलेली किंमत, ह्याच्या उलट, गिऱ्हाइकाने ओढाताण करून उतरविलेली किंमत. उ० लुगड्याला तुम्हीं तोंडें मागितली किंमत मीं दिली, मग मला जुन्या घडीचें लुगडें तुम्हीं कां दिलें ?

९७ एखाद्याच्या पुढे तोंडें वाकडीं करणें—त्याला वेडावणें किंवा टिवल्याबावल्या दाखविणें.

९८ लहान तोंडीं मोठा घास घेणें—आपला लहान दर्जा न ओळखता

एखादी गोष्ट करणें; आपल्याच्याने होण्याजोगें नाही असें काम करावयास सिद्ध होणें; आपणाला न शोमेल अशी गोष्ट बोलणें किंवा करणें !

९९ एखाद्याच्या तोंडाला हात लावणें—त्याचें मूर्खपणाचें भाषण बंद करणें. उ० तुझ्या तोंडाला कोणीं हात लावावा ? ( म्ह० तुझें हें अविचारीपणाचें बोलणें कोणाला थांबवितां येईल ! )

१०० तुझ्या तोंडांत साखर पडो !—आनंददायक खबर सांगितल्याबद्दल तुझें तोंड गोड होवो ! शाबास ! !

१०१ त्याच्या तोंडावरची माशी उठत नाहीं—तो बावळट आहे !

१०२ तोंडघशी पडणें—जमिनीवर तोंड घासेल अशा रीतीनें पडणें. [ ह्या वाक्प्रचाराचा लाक्षणिक रीत्याहि पुढीलप्रमाणे अर्थ होतो. एखाद्या गोष्टीच्या भरंवशावर काही कृत्य करावयास उद्युक्त होणें आणि तो भरंवसा अस्थानी आहे, असें आढळून आल्यावर फसगत होऊन फजिती पावणें ! "तोंडघशी पाडणें," अशा प्रयोजकमेदींहि वरील दोन्ही अर्थ होतात ].

## ४८. दंड

१ खांद्यापासून कोपरापर्यंत बाहूचा किंवा भुजाचा भाग.

२ दंडाला काढण्या लावणें किंवा बांधणें—कैद्याच्या दंडाला दोरी बांधणें, ( त्याला पकडून नेत असतां ).

३ दंड थोपटणें—एका हाताचा दंड दुसऱ्या हाताने ठोकणें ( कुस्तीला उभे राहतांना ).

४. दंड थोपटून उभें राहणें किंवा ठाकणें—

( क ) युद्धाची तयारी करून उभें राहणें.

( ख ) वाग्युद्धास तयार होणें.

५ दंडाला माती लावणें—कुस्ती खेळावयाच्या वेळीं दंडाला माती लावून कुस्तीला तयार होणें. उ० मी तर केव्हांच दंडाला माती लावून उभा आहे, तुझ्याचकडून उशीर होतो ! चल, ये आतां कुस्तीला !

६ दंड धरून आणणें किंवा दंड खेचून आणणें—एखाद्याची यावयाची इच्छा नसतां त्याला जबरदस्तीनें आणणें.

७ दंड फुरफुरणें—मारामारीची, कुस्तीची, वगैरे उत्कट इच्छा होऊन दंड स्फुरण पावणें.

८ दंड भरणें—तालीम वगैरेंच्या योगानें दंड बळकट व जाडा होणें. उ० तुम्ही रोज जोडी करून दुधाचा खुराक चालवा म्हणजे तुमचे दंड भरतील. ( येथे "भरणें" हें अकर्मक क्रियापद आहे ).

९ दंड दरदरून फुगणें—आपल्यापाशी कुस्तीला योग्य असा गडी पाहिला म्हणजे पहिलवानाचे दंड स्फुरण पावून फुगणें.

१० दंडास दंड लावून किंवा घासून—बरोबरीच्या नात्यानें; सारख्या संमानानें.

११ दंडाला बिरीद किंवा विरुद बांधणें—एखाद्या कलेंत किंवा कौशल्यांत आपण पटाईत आहों, हें दाखविण्यासाठी दंडाला दोरा बांधण्याची चाल आहे. यावरून "दंडाला विरुद बांधणें," म्ह० एखाद्या गोष्टीच्या अभिवृद्ध्यर्थ किंवा पुरस्कारार्थ, आपण तयार आहों, असें जाहीर करणें. एखादी गोष्ट आपण करूंच करूं, अशी प्रतिज्ञा भोगणें. उ० गेल्या दशकांत लोककल्याणकर्ती मंडळीहि आर्यजननीचें बिरीद दंडाला बांधून जिकडे पाहावें तिकडे कंबरा बांधून उठली व पटापट देशहिताच्या कामाला लागली.

निबंधमाला,—विष्णुशास्त्री चिपळूणकर.

## ४९. दाढ

१. (क) चावण्याच्या क्रियेला जरूर असे जे मुखांत मागच्या दोन्ही बाजूंस दांत असतात, ते प्रत्येक.

(ख) जबडा.

२. एखाद्याची दाढ बांधणें—

(क) कांही मंत्राच्या योगानें अन्न वगैरे खाण्याची त्याची शक्ति नाहीशी करणें. उ० मांस लेंकरू अलीकडे जेवीनासें झालें आहे; जखिणीनें त्याची दाढ बांधली ह्यांत शंका नाही !

(ग) एखाद्याची बोलण्याची शक्ति नाहीशी करणें.

३ एखाद्याची दाढमुद्रा न भारणें—त्याच्या एका दाढेला देखील अन्न न पुरणें.

४ एखाद्याच्या दाढेंत सांपडणें—त्याच्या तावडींत जाणें.

## ५०. दाढी

१ तोंडावर, विशेषतः हनुवटीवर उगवलेले किंवा उगवणारे केस.

२ घडी घडी लांब दाढी करणें किंवा मांडणें—हरघडी रागावणें, चरफडणें. (रागावलेला मनुष्य मिशांना पीळ भरतो किंवा दाढी असल्यास ती गोंजारतो. ह्या लकबीवरून हा वाक्प्रचार उत्पन्न झाला आहे).

३ दाढी करविणें—तोंडावरील केस न्हाव्याकडून तासविणें.

४ एखाद्याची दाढीहोटी करणें किंवा दाढी धरणें—त्याची विनवणी करणें, काकुळतीनें त्याची प्रार्थना करणें.

५ एखाद्याची दाढी धरून टाचा किंवा पाय तुडविणें—त्याला खुशामतीने वश करणें, मुद्दामत करून त्याला फसविणें; मैत्रीचा आविर्भाव करून त्याचा घात करणें.

६ दाढी पाहून वाढणें—एखाद्याच्या बाह्य रूपाकडे किंवा पोषाखाकडे पाहून त्याचें मानपान किंवा आदरातिथ्य करणें.

५१. दांत

१. (क) चर्वणक्रियेच्या उपयोगी पडणारे जे तोंडांतील आस्थिविशेष ते प्रत्येक.

(ख) फणीचा, करवतीचा, चक्राचा, नागराचा, डगाचा, वगैरे दात ˜

२ त्याचा माझ्यावर दांत आहे—माझ्यावर त्याचा रोष आहे. तो माझा द्वेष करतो. मजविषयी त्याच्या मनांत वैरबुद्धि आहे.

३ दांत उठणें—दांतांनी धरलेल्या पदार्थावर दांतांचीं चिन्हें (म्ह० खळ्या) उठणें. उ० हे पाहा मांजराचे दात माझ्या पोटरीवर उठले आहेत!

४ दांत काढणें किंवा दाखविणें—आपले दात दुसऱ्यापुढे विचकणें उ० माकडानें दांत काढलेले पाहून मुलांना भीति वाटते. उ० त्या म्हाताऱ्याच्यापुढे हीं टारगीं पोरें दांत दाखवीत होतीं!

५ दांत खाऊन किंवा दांतओठ खाऊन—मोठ्या रागानें आणि अवसानानें.

६ दांत खाणें किंवा चावणें—दातावर दात घासणें (झोपेंत वगैरे) उ० गोविंदपंताला झोपेंत दात खाण्याची खोडी आहे.

७ एखाद्याचे दांत त्याच्याच घशांत घालणें किंवा ज्याचे दात त्याच्याच घशांत घालणें—त्याची लबाडी बाहेर काढून त्याच्या पदरांत माप घालून त्याची फजिती करणें.

८ दांत झिजणें—निष्फळ उपदेश करून तोंडाला मेहेनत होणें; केलेली विनती फुकट गेल्यामुळे तोंडाला व्यर्थ श्रम होणें; शिकविलेला विषय मूर्ख विद्यार्थ्यांना न समजल्यामुळे तोंडाचे श्रम फुकट जाणें.

९ एखाद्यावर दांत धरणें—त्याच्याविषयी मनांत शत्रुत्व बाळगणें. उ० मी त्या गार्डाविरुद्ध जनरल् ट्राफिक् म्यानेजरकडे तक्रार केल्या दिवसापासून त्या गार्डानें मजवर दात धरला आहे!

१० एखाद्याचे दांत पडणें—त्याची फजिती होणें.

११ एखाद्याचे दांत पाडणें—त्याची फजिती करणें.

१२ दांत पाजविणें—एखादी वस्तु, (विशेषत. खाण्याची) मिळण्याजोगी नसता तिच्याबद्दल उत्कंठित असणें. टीप—हत्यार पाजविणें म्ह० तें घासून

त्याची धार तीक्ष्ण करणें. [ डुक्कर आपले दांत रिकामपणीं झाडाच्या खोडावर घासून तें तीक्ष्ण करीत असतें; अशासाठी की खाद्य वस्तु मिळताच ती चावून तत्क्षणी खातां यावी. यावरून दांत पाजविणें म्ह० खाद्य पदार्थांसाठी आतुर होऊन राहणें. असा अर्थ झाला. ]

१३ 'एखाद्याचे दांत पाडून हातावर देईन,' असें म्हणणे—तुझी फजिती किंवा पारिपत्य करीन, अशी त्याला धमकी देणें.

१४ दात वठणे— उच्चारलेला शाप फलद्रूप होणें.

१५ दांत वासणे—केलेले श्रम फुकट गेल्यामुळे खिन्न होऊन बसणें.

१६. दांत वासून पडणे—

(क) मेहेनत फुकट गेल्यामुळे हिरमुष्टे होऊन बसणें.

(ख) आजाराने अशक्त होऊन अंथरुणास खिळून जाणें.

१७. एखाद्याच्या पुढे दांत विचकणे—

(क) त्याला वेडावणें.

(ख) नादान मनुष्याजवळ याचना करणें. उ० पूर्वी एकदा मीं रामरावाच्या जवळ पैसे उसने मागितले होते. त्याच्याजवळ तेव्हां पैसे असून, नाहीत असें त्याने मला खोटेंच सांगितलें. आता पुन्हा मी त्याच्या पुढे पैशासाठी दांत विचकणार नाहीं!

१८ दांतओठ खाणें किंवा चावणे—रागाने दांतावर दांत घासणें किंवा रागामुळे आपले ओठ दातानी चावणें.

१९ एखाद्याच्या दांताचें विष वाचणे—एखाद्याचे शापोद्गार फलद्रूप होणें.

२० दांताच्या कण्या करणे—एकसारखा उपदेश करीत राहणें. [ उपदेश फुकट गेला म्हणजे योजतात ].

२१. त्याच्या दांताच्या घुगऱ्या झाल्या आहेत—

(क) त्याचे दात हालूं लागले आहेत किंवा खिळखिळे झाले आहेत.

(ख) उपदेश, विनवणी वगैरे करून त्याने आपल्या दातांस पार शीण दिला आहे.

२२ त्याच्या दांतांवर मांस नाहीं—तो दरिद्री आहे, तो असमर्थ, दुर्बल आहे. उ० त्याच्या दांतांवर नाही मास आणि मोक्षार्थी घालीत असतो गाठ!

२३ दांतीं येणें किंवा दांतावर येणे—एखाद्या कामांत किंवा व्यापारांत अपयश किंवा नुकसानी येणें.

२४ दांतांस दांत लावून बसणें, निजणें किंवा असणें—उपाशी पोटीं बसणें, निजणें किंवा असणें.

२५ दांतांओठांवर जेवणें—चोखंदळेपणानें जेवणें.

२६ दांतीं तृण धरणें—नम्रपणा स्वीकारणें.

२७ दांतीं वळ धरणें—अतोनात मेहेनत करणें.

२८ दांतीं येणें—(क) रागावणें. (ख) अडचणींत, पेचांत सापडणें.

२९ सोन्यानें दांत किसणें—श्रीमंतीचा उपभोग घेणें, श्रीमंत असणें.

३० हसतां हसतां एखाद्याचे दांत पाडणें—राग न दाखवितां, न चरफडतां, त्याची फजिती उडविणें किंवा पराभव करणें.

## ५२. नख

१. नख—

(क) मानवी हाताच्या किंवा पायाच्या बोटाच्या टोकाना शिंगाच्या जातीचें जें पातळ चकचकीत कवच असतें तें.

(ख) पक्ष्याचा किंवा पशूचा पंजा.

(ग) खवल्या मांजराच्या अंगावरचा एक एक खवला.

(घ) नखानें येईल किंवा नखावर राहील इतकें. उ० औषधाचें नख; चुन्याचें नख; कुकवाचें नख.

२ जेथे नख नको तेथे कुन्हाड लावणें—नखानें होण्याजोग्या कामीं कुन्हाडीचा उपयोग करणें; थोडक्या श्रमानें किंवा मृदुपणानें, जें कार्य होण्याजोगें आहे, त्याच्यासाठीं पुष्कळ शक्ति खर्च करणें किंवा फार कठोरपणा करणें. याच अर्थाचा मोरोपंताचा पुढील आर्यार्ध पाहा :—

नखहि नको ज्या कार्या, त्या काढावा कशास करवाल ? ॥

३ नख दृष्टीस न पडणें—मुळींच न दिसणें, पडद्याच्या आंत राहणें; अतिमर्यादशीलपणानें राहणें. उ० ती मराठमोळ्यातली स्त्री आहे, तिचें नख तुझ्या दृष्टीस पडणार नाहीं !

४ नख नख बोलणें—ऐटीनें किंवा कुरेबाजीनें बोलणें.

५ नख शिरणें—थोडासा शिरकाव होणें.

६ नखाएवढा...अगदीं थोडा.

७ नखाबोटावर काम करणें—नाजुकपणाचा आविर्भाव किंवा दिमाख करून काम करणें.

८ एखाद्याला नखावर खेळविणें किंवा चाळविणें—त्याची करमणूक करावयास झटणें.

९ नखावर चालणें—नाजुकपणाची ऐट करून चालणें.

१० नखावर जेवणें—चोखंदळेपणानें जेवणें; आपणाला मलतें सलतें चालत नाहीं, अशी मिजास करून जेवणें.

११ नखावर दिवस मोजणें—उत्कंठेनें मार्गप्रतीक्षा करणें

१२ नखाला आग लागली—संकटास नुकती सुरुवात झाली, अजून पुष्कळ संकटें यावयाचीं आहेत.

१३ नखें चावीत, कुरतुडीत किंवा वाजवीत बसणें—(क) निरुद्योगी असणें, उद्योगधंदा न करतां राहणें (ख) हिरमुष्टें होऊन बसणें.

५२. नाक

१. नाक—

(क) घ्राणेंद्रिय; नासा किंवा नासिका.

(ख) बटाटा, आलें, धान्याचा दाणा, वगैरेंना ज्या ठिकाणीं मोड फुटतो, किंवा नवा अंकुर उत्पन्न होतो, तें ठिकाण.

(ग) सुईच्या मान्याजवळचें छिद्र, ज्यांत दोरा ओंवितात तें.

(घ) एखाद्या देशाचा, गावाचा किंवा संस्थेचा अग्रगण्य माणूस किंवा पुढारी. उ० रामपाटील आमच्या गावाचें नाक आहेत.

(ङ) एखाद्या देशाचा महत्त्वाचा किल्ला, शहर किंवा स्थळ उ० मुंबई शहर हें हिंदुस्थानचें नाक आहे.

(च) नथ नाकात घालण्यासाठी पाडलेलें छिद्र. उ० गोदीला इतकी जड नथ घालावयास देऊं नका तिचें नाक ओघळत चाललें आहे पाहा!

(छ) आबरू. उ० माझें नाक गेलें (किंवा गमावलें) खरें, हें माझें मीच कबूल करतों!

(ज) "नायक" शब्दाचा अपभ्रंश, महाराच्या नावापुढें बहुमानार्थी लावावयाचा शब्द उ० रामनाक, भागनाक इ०.

२ कोणत्या नाकानें ?—कोणत्या तोंडानें ? कसा ? उ० तें काम मीं करीन म्हणून प्रतिज्ञा भोगिली होती. पण तें काम दुर्दैवानें फिसकटलें, आता मी श्रीधरपंताकडे कोणत्या नाकानें जाऊं ?

३ आपलें नाक कापून दुसऱ्यास अवलक्षण करणें—आपलें नाक कापून काढून, त्याच्यापुढें जाऊन, त्याला अपशकुन करणें; दुसऱ्याचें नुकसान व्हावें म्हणून आपलें कांहीतरी नुकसान करून घेणें [निननाकाचा मनुष्य पुढें आला असता अपशकुन होतो, अशी आपली समजूत आहे].

४ उंच नाक करून—निर्लज्जपणानें, बेशरमपणानें.

५ एखाद्याचें नाक कापणें—त्याचा रेंच उतरणें, त्याचा गर्व हरण करणें, त्याचा नक्षा उतरणें

६ एखाद्याचें नाक खाली पडणें किंवा होणें—त्याचा गर्व नाहीसा होणें.

७ एखाद्याचें नाक खाली पाडणें किंवा करणें—त्याचा गर्व नाहीसा करणें.

८ एखाद्याच्या पुढे नाक घासणें—त्याच्या पायीं नम्र होणें; त्याची क्षमा मागणें; दासाला योग्य असा नम्रपणा त्याच्या पुढे स्वीकारणें.

९ नाक जळणें—नाकाला दुर्गंधी असह्य होणें.

१० नाक/तोंड मुरडणें किंवा नाकें तोंडें मुरडणें—नापसंती दर्शविणें.

११ एखाद्याचें नाक चेचणें किंवा ठेचणें—त्याची फजिती करणें, पारिपत्य करणें. [ येथें " नाक " ह्याबद्दल " नकटी " हा शब्दहि योजण्यांत येतो. ]

१२ नाक मुरडणें—नापसंती दाखविणें.

खुशामत करावया मजकडे न येती जन,
पथीं मजसि देखता न करिती मला वंदन ।
मला म्हणुनि मूर्ख ते मुरडितात नाकें अहा !
सरोनि अधिकार मी अहह ! तुच्छ झालों पहा ! ॥

वि० वा० भिडे.

१३ त्याने ( आपलें ) नाक तोडून कडोसरीस खोवलें आहे—तो भारी निर्लज्ज झाला आहे.

१४ एखाद्याचें नाक धरणें—त्याचा खोळंबा करणें.

१५ नाक किंवा नाकपुड्या फेंदारणें किंवा विंजारणें—नाक फुगवून राग दाखविणें.

१६ नाक मोडणें—नाक वाकडें तिकडें करून नापसंती दर्शविणें.

१७ एखाद्याचे नाक मोडणें—त्याची फजिती उडविणें; त्याचा रेच उतरणें.

१८. नाक वर करून—

( क ) ताठ्याने, गर्वाने, तिरस्काराने.

( ख ) निर्लज्जपणाने. उ० तुझ्या पदरांत मीं चुकी घातली, तरी पुन्हा नाक वर करून बोलतोस ? तुला म्हणावें तरी काय ?

१९ एखाद्याच्या नाकांत काड्या घालणें किंवा सारणें—त्याला खिजविणें; त्याची कुरापत काढणें; त्याला चेतविणें; त्याला राग आणणें. उ०

हरिच्या पुन्हा पुन्हा का काड्या नाकांत घालिशी शशका ! ।
यश काय पक्षिपतिचें येइल हे चार करुनि तुज मशका ! ॥ मोरोपंत.

२० एखाद्याच्या नाकांत काड्या जाणें—त्याला एखादी गोष्ट न आवडल्यामुळे तो रागावणें. उ० त्याने गोविंदरावाशीं स्नेह केला, तर तुझ्या नाकांत कां काड्या जाव्या !

२१ नाकांत बोलणें—गेंगाण्या स्वराने बोलणें.

२२ नाकाने कांदे किंवा वांगीं सोलणें—नसता शुचिर्भूतपणा, पवित्रपणा दाखविणें, नसता अभिमान दाखविणें, बढाया मारणें.

२३ एखाद्याच्या नाकावर पाय देणे—त्याची पर्वा न करणें.

टीप—" नाकावर वाट करणें, " याचाहि वरील अर्थानें उपयोग होतो.

२४ नाकावर माशी बसू न देणे—अपमान किंवा तिरस्कार अगदी सहन न करणें.

२५ त्याच्या नाकीं (किंवा नाकाशीं) सूत धरलें आहे—तो आता मरतो की घटकेने मरतो, अशी त्याची स्थिति झाली आहे.

टीप—मरणोन्मुख मनुष्याचा श्वासोच्छ्वास चालतो आहे किंवा नाही, हें पाहण्यासाठी त्याच्या नाकाशीं सूत धरतात, तें हललें नाही तर तो मेला असें समजण्यात येतें.

२६ एखाद्याच्या नाकास चुना लावणे—त्याची खजाळी काढणें; त्याच्या पुढे धमकीनें भाडावयास सिद्ध होणें.

२७ नाकासमोर जाणे—अगदी सरळ मार्गानें जाणें.

२८ नाकीं दुराही (किंवा नाकदुऱ्या) काढणे—अतिनम्रपणाने विनविणें; शरण जाणें.

२९ एखाद्याच्या नाकीं वेसण घालणे—त्याला आपल्या कबजांत आणणें किंवा कह्यात ठेवणें.

३० नकट्यापुढे नाक खाजविणे—त्याला खिजविणें.

३१ नाक मुठींत धरून—निरुपायास्तव, नाइलाजाने.

३२ नाक गेलें तरी भोकें राहिलीं आहेत असें म्हणणे—निर्लज्जपणाने बोलणें किंवा वागणें.

३३ एखाद्याचे नाक झाडणें—त्याचा रेच उतरणें; त्याची फजिती करणें; त्याचें पारिपत्य करणें.

३४ नाक वर असणे—वरचढ असणे.

३५ नाकाची घाण मरणें किंवा जाणें—वाईट वासाने त्रास होईनासा होणें (सवईमुळें, पडशामुळे किंवा अन्य कारणाने).

३६. नाकापेक्षा मोती जड होणें—

(क) यजमानापेक्षा नोकराची मिजास किंवा मानमान्यता अधिक होणें.

(ख) एखाद्याच्या अंगाचा खरा गुण लोकांच्या अपेक्षेहून कमी आहे, असें निदर्शनास येणें (मोट्स्वर्य).

३७ नाकाला जीभ लावणें—तिरस्कार दाखविणें; गर्व, ताठा किंवा दिमाख दाखविणें.

३८ नाकाला पदर लावणें—अपकीर्तीमुळे तोंड झाकणें; लज्जेने तोंड झाकणें.

३९ एखाद्याच्या नाकावर रुपये पैसे, वगैरे टिचणें—ते देण्याला आपण नाखूष असलों तरी ते त्याला देणें; नाइलाजास्तव ते त्याला देणें.

४० नाकावर बोट ठेवणें—एखाद्याला चूप राहा म्हणून आपल्या नाकावर आपलें बोट ठेवून खूण करणें. [ रागानें किंवा अन्य कांही कारणानें ].

४१ नाका-ओठावर जेवणें—चोखंदळेपणानें जेवणें.

४२ एखाद्याच्या नाकीं नऊ किंवा नव येणें—कांही काम करतांना त्याला अति त्रास, श्रम, उपद्रव, दुःख होणें.

४३ त्याच्या नाकावर राग आहे किंवा अगदी ठेवलेला—तो जरा कांही कारण झालें किंवा सापडलें की रागावत असतो.

४४ एखाद्याच्या नाकांतला बाल—त्याच्या आवडीचा किंवा प्रेमाचा माणूस. उ० अलीकडे नारोबा हा शिवरामपंताच्या नाकातला बाल झाला आहे.

४५ नाका-डोळ्यांचा किंवा नाका-कानांचा वैद्य—वैद्यविद्येंत वाकब-गार नसलेला व वृथा बडबड करणारा वैद्य.

४६ नाकाचा पडदा—दोन नाकपुड्यांच्या मधला पडदा.

## ५४. पाऊल

१. पाऊल

( क ) पायाच्या घोट्याखालचा भाग. उ० फार फार चालून माझीं पावलें लवकर पडू लागलीं.

( ख ) पायाच्या घोट्याखालच्या भागाची ठेवण, ढब किंवा आकारमान. उ० माझ्या पावलाला बरोबर असा जोडा बांधून आण.

( ग ) पायाचा तळवा. उ०

ऐशिया दुःखें चालतां पंथीं । सुकुमार पाउलें पोळतीं ॥
फोड उठोनि उले काती । नखें निघतीं बोटींचीं ॥

मुक्तेश्वर,—हरिश्चंद्र.

( घ ) पायाच्या तळव्याचा जमिनीवर उठलेला ठसा किंवा आकृति. उ० पावलें निरखून मीं चोर हुडकून काढले.

( ङ ) चालण्याचा वेग. उ० रामाचें पाऊल गोदीच्या पेक्षा सावकाश आहे.

( च ) पायाच्या लांबीइतकी लांबी. उ० सगळ्याचीं पावलें हत्तीच्या पावलात.

(छ) चालण्याची तऱ्हा किंवा ढब; विशिष्ट प्रकारची चाल. उ० आमच्या तट्टाला तुर्की पाऊल चागलें साधलें.

(ज) चालतांना जमिनीवरील दोन पावलामधील अंतर. उ० ह्या खोलीची लांबी १५ पावलें आणि रुंदी ११ पावलें आहे.

२ चांगल्या (किंवा वाईट) मार्गांत पाऊल ठेवणें—चांगल्या (किंवा वाईट प्रकारें) वागणें. उ०

भोगील दुःख भारी ठेवील असत्पथात पाऊल तो
अवलोकुनि त्याच्या त्या दुःखाची तीव्रता उपल उलतो ॥

३. पाऊल ओळखणे, जाणणें किंवा समजणे—एखाद्याचा कल किंवा स्वभाव जाणणें.

४. पाऊल जपून ठेवणें—काळजीने वागणें.

५. पाऊल पुढे ठेवणें—एखादें काम पतकरावयाला सिद्ध होणें.

६. पाऊल पुढें पडणें—एखाद्या कृत्यात गति होणें; पुढे जाणें. उ० सभा कोठें भरवावी ह्यासंबंधाने तुम्हीं तीन तास आतापर्यंत वाटाघाट केली; पण काल्च्यापेक्षा आज जागेच्या बाबतींत तुमचें पाऊल काहीतरी पुढे पडलें आहे काय?

७. पाऊल माघारें घेणें किंवा काढणें—माघार घेणें; मागे हटणें. उ० प्राण गेला तरी मी पाऊल माघारें घेणार नाही!

८. पावलें मोजीत चालणें—सावकाश चालणें. उ० असा काय पावलें मोजीत चालला आहेस? झपझप चाल!

९. पाऊल वाकडें पडणें, वाकड्या मार्गाने पाऊल पडणे—नीतिमार्ग सुटून असत्पथाने, अनीतिमार्गाने जाणें. उ० माझे कोठें वाकडें पाऊल पडलें तें दाखवून द्या आणि मग बेलाशक माझा कान उपटा!

१०. एखाद्याच्या पावलावर पाय ठेवून जाणें—त्याचें अनुकरण करणें.

११. त्याच पावलीं—दुसऱ्या कामाकडे न जातां; तावडतोब; व्यर्थ वेळ न दवडता. उ० मीं विठाईचा निरोप ऐकला आणि त्याच पावलीं मी इकडे आलों, सरकार! न० चिं० केळकर,—तोतयाचें बंड.

## ५५. पाठ

१. पाठ—

(क) छातीच्या आणि पोटाच्या मागचा शरिराचा भाग; मानेपासून तों कंबरेपर्यंत).

(ख) कोणत्याहि वस्तूची मागली बाजू. उ० आरशाची पाठ; पुस्तकाची पाठ; तसबिरीची पाठ.

(ग) आश्रय, टेका, मदत, साहाय्य (अनुरूप क्रियापद 'देणें').
(घ) पृष्ठभाग, पातळी. उ० पृथ्वीची पाठ; समुद्राची पाठ.
(ङ) बाहेरचें आच्छादन, साल, कवच.

२ पाठीवर मारावें, पण पोटावर मारूं नये—कोणी अपराध केला असतां त्याला बेलाशक शिक्षा करावी, परंतु त्याची कायमची नुकसानी होईल, असें कांही करूं नये; त्याचीं चरितार्थाचीं साधनें बुडवूं नयेत.

३ आपली पाठ आपणास दिसत नाही—एखादी गोष्ट अगदी आपल्या शेजारीं घडत असते, पण आपणास तिची गंधवार्ता नसते.

४ पाठचें भावंड—मागून झालेलें भावंड. उ० रामाच्या पाठचीं तिन्ही भावंडें मेलीं.

५ पोटचा द्यावा, पण पाठचा देऊं नये—प्रत्यक्ष आपलें मूलहि सोडावें, पण आश्रयास आलेल्या माणसास सोडूं नये. [ येथे "पाठचा" ह्याचा उपयोग "धाकटा भाऊ" ह्या अर्थानेंहि करतात ].

६ एखाद्याची पाठ उघडी पडणें—त्याच्या पाठचें भावंड मरणें.

७ पाठ उचलणें—सावरणें; पुन्हा वैभवास चढणें; गमावलेली शक्ति, सामर्थ्य, तेज पुन्हा मिळविणें.

८ पाठ भुईस लावणें—चीत होणें; एखाद्या संकटाखालीं दडपून जाणें; वैभव किंवा सामर्थ्य गमावणें.

९ पाठ कापणें—पाठ थरथर कापूं लागणें. उ० कुऱ्हाड हातीं घेऊन आलेल्या त्या भामट्यास पाहताच माझी पाठ कांपूं लागली !

१०. एखाद्याची पाठ घेणें किंवा पुरविणें—

(क) त्याचा पिच्छा पुरविणें; एखाद्या गोष्टीबद्दल एखाद्यावर ओझें घालून राहणें. अमुक एक वस्तु मला द्या म्हणून एखाद्यास सतावीत असणें. उ० माझ्या मुलीनें जिनगरी बाहुलीबद्दल आज आठ दिवस माझी पाठ घेतली आहे; (म्ह० बाहुली घेऊन द्या म्हणून ती मला तगादा लावीत आहे).

(ख) एखाद्याच्या पाठोपाठ जाणें किंवा त्याचा पाठलाग करणें. उ० त्या चोरांनी दोन कोस आमची पाठ घेतली (म्ह० ते आमच्या मागोमाग येत होते).

११. पाठ चोरणें—

(क) काही काम करतांना कुचरपणा करणें.

(ख) आपल्या पाठीवर फार सामान किंवा ओझें लादलें जाऊं नये, म्हणून तें चुकविण्याचा किंवा झुगारून देण्याचा प्रयत्न करणें; (बैल, घोडा, गाढव वगैरे-संबंधानें).

१२ त्याने अमक्याची पाठ झाकली—तो अमक्याच्या पाठीमागून झाला किंवा जन्मला.

१३ पाठ टाकणें—विश्रांतीसाठी अंग आडवें करणें (जमिनीवर किंवा बिछान्यावर). उ० मी अगदी दमून गेलों होतों, म्हणून जरा वेळ झोपाळ्यावर पाठ टाकली.

१४ पाठ थापटणें किंवा थोपटणें—उत्तेजनार्थ पाठीवर प्रेमाने हात मारणें; वाहवा करणें. उ० मी त्याच्या तर्फेने भांडलों, म्हणून त्याने माझी पाठ थोपटली.

१५ पाठ दाखविणें—पळून जाणें; कर्तबगारी न दाखवितां भित्रेपणानें निघून जाणें. उ० ह्या लढाईत आम्ही मारूं किंवा मरूं; शत्रूला पाठ म्हणून दाखविणार नाही!

१६. पाठ देणें

(क) एखाद्याला एखाद्या (चांगल्या किंवा वाईट) कामीं मदत करणें. उ० तूं मला पाठ दिलीस, तर हें काम तडीस जाईल!

(ख) एखाद्याची विनंती ऐकिली, न ऐकिली, अशा रीतीने वागणें. उ० त्याने माझ्या शब्दाला पाठ दिली.

(ग) एखाद्या वस्तूचा परित्याग करून जाणें.

(१७) पाठ धरणें—एखाद्याच्या मागून जाऊन त्याला पकडणें. उ० तो चोर निसटून जात होता, पण मीं त्याची पाठ धरली.

१८ पाठ, पोट सारखें होणें—उपासानें किंवा आजाराने अत्यंत रोड होणें. उ० पाहा त्याची पाठपोट हीं सारखीं झालीं आहेत!

१९ एखाद्याची पाठ फोडून निघणें—त्याच्या मागून त्याची बहीण किंवा भाऊ जन्मणें. उ० अंबी माझी पाठ फोडून निघाली (म्ह० माझी बहीण अंबी माझ्यानंतर जन्मास आली).

२० पाठ भुईस लागणें—द्रव्याकडून किंवा शक्तीकडून खालावणें. उ० माझी पाठ अगदी भुईस लागली आहे (म्ह० मजजवळ पैसा मुळींच राहिला नाही; किंवा मी आजाराने अशक्त होऊन गेलों आहे).

२१ एखाद्याची पाठ राखणें—त्याला मदत करणें. उ० ह्या विपत्तींत गंगाधरपंतांनी माझी पाठ राखली (म्ह० मला द्रव्यादिकाने मदत केली).

२२. पाठ सोडणें—

(क) एखादा व्यवसाय नेटाने चालविण्याचें सोडून देणें. उ० तुला पहिल्या पहिल्याने हिंदी भाषा कठीण वाटेल; पण तूं तिची पाठ सोडूं नको (म्ह० तुझी मेहनत चालू ठेव).

(ख) एखाद्याच्या मागोमाग जावयाचा क्रम सोडून देणें. उ० त्या मुलीने साऱ्या दिवसात माझी पाठ म्हणून अगदी सोडली नाही (म्ह० ती एकसारखी माझ्या पाठीशीं होती).

२३ एखाद्याच्या पाठीं—त्यावर अवलंबून; त्याच्या परिवारांत; त्याच्या आश्रितात; त्याच्या नंतर किंवा मागोमाग. उ० माझ्या पाठीं किंवा पाठीशीं चार पोरें आहेत (म्ह० त्याना पोसण्याची जबाबदारी मजवर आहे). उ० माझ्या पाठीं नेहमी चार पट्टेवाले असतात (म्ह० माझ्या खिजमतीला). उ० नानासाहेबांच्या पाठीं काही थोडींथोडकीं माणसें नाहीत. वेळेस पंक्तीला पंचवीस पान जेवतें आहे! (म्ह० त्यांचे आश्रित पंचवीस आहेत!) उ० चोरानो, मला मुकाट्याने जाऊं द्या. माझ्या पाठीं दोन मैलावर दहा वाटसरू आहेत (म्ह० ते माझ्या मागोमाग, माझ्याच मार्गाने येत आहेत) उ० माझ्या पाठीं हा सावकारीचा धंदा माझा मावसभाऊ पाहणार आहे (म्ह० मी मेल्यावर).

२४ एखाद्याच्या पाठीचे चकदे काढणें—त्याला खूप मार देणें.

२५ एखाद्याच्या पाठीचे चकदे निघणें—त्याला खूप मार बसणें.

२६ एखाद्याच्या पाठीची साल जाणें—त्याला नुकसानी सोसावी लागणें. उ० ह्या व्यापारांत माझ्या पाठीची साल जाण्याचा रंग दिसतो (म्ह० नुकसानी सोसावी लागेल).

२७ पाठीं ना पोटीं—त्याला धाकटें भावंडहि नाही आणि स्वताची संततिहि नाही. उ० दुष्काळ आला म्हणून त्याला कसली फिकीर! त्याच्या पाठीं ना पोटीं!

२८. पाठीमागे—

(क) समक्ष नव्हे अशा रीतीने. उ० ते माझ्या पाठीमागे माझी हवी तितकी निंदा करोत! माझ्या समक्ष बोलण्याची त्याची छाती नाही!

(ख) मेल्यानंतर.

२९ पाठीमागे ठेवणे—मेल्यावर मागे ठेवणें (पैसा किंवा माणसें). उ० त्या म्हाताऱ्याने पाठीमागे काहीसुद्धा ठेविलें नाही (म्ह० त्याच्या कुटुंबियाना काही देखील पैसा मिळाला नाही). उ० त्याने पाठीमागे लग्नाच्या पुष्कळ पोरी ठेविल्या आहेत (म्ह० तो मरून गेला, पण त्याच्या पोरींचीं लग्नें करण्याचें काम दुसऱ्याच्या अंगावर पडलें आहे).

३० पाठीमागे देणें—परत करणें; परत देणें.

३१. पाठीमागे पडणे—

(क) द्यावयाची रक्कम न दिल्या कारणाने तें कर्ज किंवा तो मार होऊन राहणें. उ० तुझे चार हप्ते पाठीमागे पडले आहेत (म्ह० चार हप्ते द्यावयाची मुदत टळून गेली आहे, हल्ली तितके हप्ते तुझ्या अंगावर आहेत).

(ख) जुनें पुराणें होणें; जुनें झाल्याकारणानें महत्त्व कमी होणें किंवा नाहींसें होणें. उ० अन्नपूर्णाबाईचा वीस वर्षांचा मुलगा मेला; तिला त्याचें अतोनात दुःख झालें; परंतु मुलाच्या मागून तिचा पतिहि निवर्तला तेव्हा पतिशोकानें पुत्रशोक पाठीमागे पडला (म्ह० कमी तीव्र झाला).

३२ पाठीवर—रक्षण करण्यासाठी, उपद्रव करण्यासाठी, उत्तेजन देण्यासाठी, मदत करण्यासाठी; शेजारी.

३३ पाठीवर टाकणें—लांबणीवर, दिरंगाईवर टाकणें. उ० तुम्ही आपल्या वरिष्ठाला एकदा भेटावयाला जा; हें काम महत्त्वाचें आहे, तें असें पाठीवर टाकूं नका.

३४ पाठीला तेल लावून ठेवणें—मार खावयाला सिद्ध होऊन राहणें. उ० पाठीला तेल लावून ठेव; मी जेवून उठल्यावर तुझा समाचार घेणार आहे!

३५ पाठीवरून हात फिरविणें—प्रेमानें कुरवाळणें.

३६ पाठीवर पाय देऊन येणें—मागून जन्मणें किंवा मागून येणें. उ० श्रीपति माझ्या पाठीवर पाय देऊन आला आहे (म्ह० माझा भाऊ श्रीपति हा माझ्या पाठचा).

३७ पाठीस काळीज असणें—धाडसी, साहसी असणें. उ० त्याला माडा-वर चढ म्हटलें की तो चढेल! त्याच्या पाठीस काळीज आहे!

३८ पाठीस पोट लागणें—

(क) अति रोड असणें. उ० तुझें मूल भारी वाळलें हो! पाहा याच्या पाठीस पोट लागलें आहे!

(ख) उपासामुळे पोट खपाटीस जाणें.

३९ पोट पाठीस लागणें—पोटाला मिळवून खाण्याची जबाबदारी अंगावर असणें. उ० वरिष्ठानें शिव्या दिल्या, तरी ऐकून घ्याव्या लागतात! पोट पाठीस लागलें आहे ना! नोकरी सोडता येत नाही!

४० एखाद्याच्या पाठीस लागणें—त्याचा पिच्छा पुरविणें. उ० बुटासाठी माझा मुलगा आज महिनाभर माझ्या पाठीस लागला आहे; पण मला बाजारांत जावयास एका मिनिटाची देखील फुरसत सापडत नाही. (म्ह० मला बूट घेऊन द्या म्हणून तो मला गळ घालीत आहे).

४१ पाठीशीं—अंगावर. उ० माझ्या पाठीशीं शंभर लचांडें आहेत! तुझें काम केव्हा करूं!

४२ एखाद्याला पाठीशीं घालणें—त्याला आश्रय देणें. उ० औरंगजेबानें संभाजीच्या मुलास पाठीशीं घातलें.

४३ पाठीशीं घेणें—अंगावर घेणें; पतकरणें.

४४ झाकल्या पाठीने—आबरू न गमावून घेता; प्रतिष्ठितपणाने.

४५ तापल्या पाठीने—अंगात उमेद, शक्ति, ताकद आहे तोंपर्यंत.

४६ पुरती पाठ घेणें किंवा पुरविणें—पिच्छेस लागणें; पत्करलेलें काम नेटाने चालविणें; इष्ट वस्तु मिळविण्यासाठी प्रयत्न सुरू ठेवणें. उ० मल्लखांबावर मला ताजवा करावयाला येत नसे, पण मीं त्या उडीची पुरती पाठ घेतली, तेव्हा आता ती मला चांगली येऊ लागली.

## ५६. पाय

१. पाय—

(क) घोट्याच्या खालचा तंगडीचा भाग. उ० नवऱ्या मुलाच्या पायावर कुंकवाचीं स्वस्तिकें काढतात. उ० चामाराला तुझ्या पायाचा मेज दिलास काय?

(ख) सबंध तंगडी (म्ह० कंबरेपासून तों पायाच्या बोटापर्यंत सर्व भाग). उ० तुझे पाय माझ्यापेक्षा लांब आहेत; पळताना तूं माझ्यापुढे गेलास त्यात नवल तें काय?

(ग) टेबल, खुर्ची, पलंग, चौरंग, पोळपाट, घडवंची वगैरेंचे खूर.

(घ) पायाच्या आकृतीची कोणतीहि वस्तु.

(ङ) (लाक्षणिक अर्थानें) लक्षण, चिन्ह, रंग. उ० मुलाचे पाय पाळण्यांत दिसतात (म्ह० मूल पुढे किंवा मोठें झाल्यावर, कोणत्या गुणांचें होईल ह्याची अटकळ अगोदरच करता येते).

(च) (लाक्षणिक अर्थानें) कारण. उ० भिकेचा पाय (म्ह० ज्या वर्तनामुळे पुढे भीक मागावी लागेल किंवा भीक मागण्याची पाळी येईल, असें वर्तन). उ० घोडजुगारीचा नाद तूं सोडून दे. तो खरोखरी दारिद्र्याचा पाय आहे!

२ आपले पाय माझ्या घरीं लागावे—आपण माझ्या घरीं भोजनादिकास येऊन मला धन्य करावें!

३ आपल्या पायांवर धोंडा पाडून किंवा ओढून घेणे—आपलें नुकसान आपणच करून घेणें; आपल्या नुकसानीस आपणच कारणीभूत होणें. उ. वरिष्ठांशीं ताठ्याने वागू नको, नाहीतर आपल्या पायावर धोंडा पाडून घेशील!

४ घोड्याच्या किंवा हत्तीच्या पायांनी येणें आणि मुंगीच्या पायांनी जाणे—जलदीने येणें आणि सावकाश, धिमेधिमे जाणें (आजार, संकट, अडचण वगैरेसंबंधाने योजतात).

५ मुंगीच्या पायानें येणें आणि हत्तीच्या किंवा घोड्याच्या पायांनी जाणे—सावकाश येणें आणि त्वरेने निघून जाणें. (संपत्ति, वैभव वगैरेसंबंधाने योजतात).

६ चहूं पायांनी (दोहों पायांनी) उतरणें—शिंगरूं, वासरूं, पाडा वगैरे चार पाय (किंवा दोनच पाय) पुढे करून जन्मणें.

७ जळता पाय जाळणे—एखाद्या कामात, व्यवहारांत किंवा व्यापारांत नुकसान होत असतांहि तो तसाच पुढे चालू ठेवणें.

*८ त्याच पायीं किंवा पावलीं—तावडतोब. उ० हें पत्र श्रीकृष्णरावाला* दिल्यावर त्याच पावलीं गणोबाच्या घरीं जा.

९ पाय किंवा पाऊल उचलणें—जलदीने चालणें; घाईनें चालणें. उ० अगे, मला येथे पाणी पाहिजे आहे, माझा खोळंबा झाला आहे; तू आपली धिमे-धिमे पाणी घेऊन येत आहेस! जरा पाऊल (किंवा पाय) उचल!

१० एखाद्याला पाय उताऱ्या किंवा पाय उतारा आणणें—त्याला नम्र करणें; त्याचा तोरा कमी करावयास लावणें. [ व्युत्पत्तिः—वरच्या पाहिरीवरील पाऊल खालच्या पाहिरीवर ठेवावयास भाग पाडणें, यावरून नम्र करणें असा अर्थ झाला ].

११ पाय उताऱ्या किंवा पाय उतारा येणें—नम्र होणें; गर्व सोडणें. [ व्युत्पत्तिः—वरच्या लेखांकातील व्युत्पत्तीप्रमाणेच ].

१२ पाय काढणें—एखाद्या कामातून बाहेर पडणें किंवा त्यांतून आपलें अंग काढून घेणें. एखादें ठिकाण सोडून जाणें किंवा काम टाकून देणें. उ० उदे-भानाच्या शस्त्राने तानाजी ठार मारला गेला, तेव्हा तानाजीचे शिपाई मावळे तेथून पाय काढण्याच्या बेतात होते. पण सूर्याजीच्या ताज्या दमाच्या मावळ्यांची त्यांना कुमक मिळताच ते पुन्हा उत्साहाने लढले, आणि शेवटी सिंहगड त्यांनी जिंकून घेतला!

१३ पाय घेणे—प्रवृत्ति होणें. उ० त्या कामाला माझा पाय घेत नाही; (म्ह० तें काम करण्याकडे मला प्रवृत्ति होत नाहीं; तें करावें असें मला वाटत नाहीं). [ येथे "घेणें" अकर्मक ]

१४ पाय देणें—

(क) पायाचा भार घालून चेपणें. उ० रामा, माझ्या पायांवर जरा पाय दे रे! उ० माझी पाठ दुखते आहे, पाठीवर पाय देतोस काय?

(ख) तुडविणें, उपद्रव देण्यासाठी, कुरापत काढण्यासाठी एखाद्याला पायाने ताडन करणें.

१५ एखाद्याचे पाय धरणें—त्याच्या पायांवर डोकी ठेवून त्याला विनंती करणें; त्याला शरण जाणें; त्याचा आश्रय मागणें. उ० तुझी नोकरी जाऊं नये अशी तुझी इच्छा असेल, तर जाऊन एकदम आपल्या वरिष्ठाचे पाय धर!

१६ त्याचे पाय धरले आहेत—थंडीनें किंवा दुसऱ्या कांही कारणानें त्याचे पाय दुखत, ठणकत आहेत. [ "धरणें" हें अकर्मक ].

१७ पाय पसरणें—पूर्णपणें उपभोगणें; उपभोगेच्छेला पुरी वाव देणें.

१८ पाय फासटणें—इच्छेविरुद्ध चालणें; एखादें काम करण्यासाठीं कोठेतरी पायानें चालत जाणें; तंगड्या तोडणें. उ० काडीचाहि लाभ होण्याची आशा नसतां इतक्या लांब मी नाहीं पाय फासटीत जाणार !

१९. एखाद्या पदार्थाला पाय फुटणें—

( क ) तो हळूच नाहीसा होणें; कोणाच्या नजरेस न पडता ठेवल्या ठिकाणाहून तो नाहीसा होणें. उ० मी येथे पांच पेढे ठेविले होते, आता चारच उरले आहेत; एका पेढ्याला पाय फुटले असें दिसतें ( म्हणजे तो कोणीतरी नकळत उचलला असला पाहिजे ! )

( ख ) तो वाढत जाणें किंवा विस्तार पावणें. उ० तूं पहिल्यानें मला फक्त पोस्टात पत्र टाकून ये म्हणून सांगितलेंस. आता म्हणतोस की चार आण्यांचीं तिकिटें आण. तुझ्या कामाला आणखी पाय फुटणार आहेत की काय ? ( म्ह० तूं मला आणखीहि काही कामें सांगणार आहेस की काय ! )

२० पाय फुटणें—थंडीच्या योगानें किंवा जाळवातानें पाय भेगाळणें. उ० मला पायमोजे घातल्याशिवाय अगदी चालवत नाही. माझे पाय भारी फुटले आहेत !

२१ पाय फोडणें—विस्तार करणें. उ० तुमचें बोलणें विषयाला धरून चालवा आणि थोडक्यात आटोपा; त्याला उगीच पाय फोडूं नका !

२२ पाय लागणें किंवा पाय भुईशीं लागणें—कायमपणा येणें. ,उ० त्या ऑफिसांत माझे एकदा पाय लागूं द्या, म्हणजे हळूहळू मी सारी आपली मंडळी तेथे आणून भरीन !

२३ एखाद्याचे पाय मोकळे करणें—त्याला अडचणींतून बाहेर काढणें. उ० ह्या चिंचेच्या व्यापारातून माझे पाय एकदा मोकळे करा, म्हणजे मग तुमचीं दुसरीं सतरा कामें असलीं, तरी तीं मी करीन.

२४ ( आपले ) पाय मोकळे करणें—फेरफटका करणें. उ० आज सकाळपासून तों आतापर्यंत मी एकसारखा लिहीत आहे; अगदी कंटाळा येऊन गेला आहे; आता पाय मोकळे करावयाला सोमेश्वराकडे घटकाभर फिरून येतों.

२५. पाय मोकळा होणें—

( क ) अडचणींतून बाहेर पडणें.

( ख ) पायांचा आखडलेपणा नाहीसा होणें.

२६ पाय मोडणें—

(क) पाय अशक्त होणें.

(ख) निराशेमुळे गलितधैर्य होणें उ० माझा जोडीदार मेल्यापासून माझे पाय मोडले, म्ह० काही करावयाला मला उत्साह वाटत नाही. [ ह्या दोन्ही अर्थांनी "मोडणें" हें अकर्मक आहे ]

२७ एखाद्याचे पाय मोडणें—त्याच्या कामांत हरकत आणणें, त्याला खचविणें, त्याला एखादें काम न करूं देणें उ० गोवर्धनपताला भेटल्याने माझें काम खचित होईल, असें मला वाटतें, मी त्याला भेटावयास जातोंच, तुम्ही उगीच माझे पाय मोडूं नका! (म्ह० मला खचवूं नका! जाण्यापासून मला पराङ्मुख करूं नका!)

२८ पाय वाहणें—एखाद्या स्थळीं जाण्याला मनाचा कल होणें उ० काल दारूच्या पायीं इतकी तुझी छी थू झाली आणि आज पुन्हा दारूच्या पिठ्याकडे जाण्याला तुझे पाय कसे वाहतात?

२९ एखाद्याचे पाय शिवणें—त्याच्या पायांना स्पर्श करणें [ शपथ घेतांना हे शब्द उच्चारतात ] उ० मी तुमचे पाय शिवून सांगतों की, तुमच्याविषयी माझ्या मनात कपट नाही

३० पायाची किंवा तळपायाची आग मस्तकास जाणें—संतापणें, रागाने जळणें उ० तुझें उर्मटपणाचें वर्तन पाहून माझ्या पायाची आग मस्तकास जाते!

३१ पायातील वहाण पायातच बरी किंवा पायातच ठेवावी—ही म्हण आहे हिचा अर्थ हलक्या मनुष्याला फाजील महत्त्व देऊ नये, असा आहे

३२ आपल्या पायाची धूळ माझ्या घरीं झाडावी—माझ्या घरीं आपण यावें (नम्रपणाचें आमंत्रण)

३३ आपल्या पायापाशी मी आलों आहे—मी आपल्याकडे आलों आहे [ नम्रपणा दाखविणारा प्रयोग ]

३४ एखाद्याच्या पाया पडणें—

(क) त्याच्या पायावर डोकें ठेवणें, (प्रार्थना किंवा विनंती करण्यासाठी)

(ख) नम्रपणाने विनंती करणें, याचना करणें

उत्तर म्हणे, "नको गे! पायां पडतों, वृद्धलंडे सोड।
जोड दिली, दुसरें नको, केवळ पितृकरतल्स्थ हा फोड॥
—मोरोपंत

३५ पायापाशी पाहणें—जवळ जें असेल त्याचाच विचार करणें, आपल्या परिस्थितीचा विचार करणें

३६ पायाला किंवा पायांत अढी पडणें—म्हातारपणामुळे एका पायाला दुसरा पाय चालतांना घासणें. उ० ह्या घोड्याच्या पायाला आढी पडूं लागली. आता तुम्ही दुसरा घोडा विकत घ्या.

३७ पायाला खुंट्या येणें—एके जागीं फार वेळ बसल्याकारणानें पाय ताठणें.

३८ एखाद्याच्या पायावर कुत्रीं मांजरें घालणें—फार फार प्रार्थना करून त्याला कांही काम करावयास उठविणें.

३९/पायांवर पाय टाकून निजणें—चैनींत निजून राहणें.

४० एखाद्याच्या पायांवर पाय देणें—त्याच्या पाठोपाठ जाणें, चालणें किंवा करणें.

४१ त्याच्या पायांवर भोवरा (किंवा भिंगरी) आहे किंवा भोवरा पडला आहे—तो सदासर्वदा भटकत असतो; तो घरांत मुळीच ठरत नाही.

४२ एखाद्याच्या पायांशीं पाय बांधून वसणें—त्याचा पिच्छा पुरवून कांहीं मागणी मागणें.

४३ त्याच्या पायांस वहाण बांधलेली आहे—तो सदा भटक्या मारीत असतो.

४४ पायीं—पायानें. उ० मी पायींच कुलर्यास गेलों.

४५ एखाद्याच्या पायीं—त्याच्यामुळें. उ० तुझ्या पायीं मला ही अद्दल घडली; तुमच्या पायीं मी सर्वस्वी बुडालों, किंवा मीं आपलें सर्वस्व बुडविलें; तुझ्या विद्येच्या पायीं माझे पाच हजार रुपये खर्च झाले.

४६ भरल्या पायांचा—मळलेले पाय ज्याचे आहेत असा. उ० तूं शेतातून आला आहेस, तर भरल्या पायाचा जाजमावर चालूं नको.

४७ भरल्या पायीं—बाहेरून चालून आल्यावर पाय न धुता. उ० भरल्या पायीं बाळंतिणीच्या खोलींत जाऊं नये. [ "भरल्या पायीं जाऊं नये" ह्याबद्दल "पायीं मरलें जाऊं नये," असेंहि म्हणतात. ]

४८ (एखाद्याचा) मागला पाय पुढें न ठेवूं किंवा घालूं देणें—त्यानें आपली मागणी पुरविल्याशिवाय त्याला पुढें पाऊल टाकूं न देणें. उ० संध्याकाळीं माझें मूल खळीस आलें. मी विहिरीचें पाणी भरीत होतें; त्यानें माझा मागला पाय पुढें घालूं दिला नाही. त्याला जेव्हा पाजलें, तेव्हा तें गप्प राहिलें!

४९ मागला पाय पुढे न ठेवणें—एखाद्याजवळ मागितलेली वस्तु त्यानें दिल्याशिवाय किंवा त्याला केलेली विनंती त्यानें मान्य केल्याशिवाय त्याला सोडावयाचें नाहीं–त्याच्यापासून दूर जावयाचें नाहीं–असा निश्चय करून असणें.

५० मागला पाय पुढे नाही आणि पुढला पाय मागे नाही, अशा नेटाने तो होता—तो एका जागीं करारीपणानें ठाव धरून राहिला होता, तो केसभरहि हालला नाही. उ० दहा चोरटे माझ्यावर तुटून पडले, पण मी मागला पाय पुढे नाही आणि पुढला पाय मागे नाही, अशा करारीपणानें उभा राहिलों होतों.

५१ मागल्या पायीं परत येणें—निरोप पोचविल्यानंतर किंवा एखाद्या ठिकाणीं काम करावयास जाऊन तें झाल्यानंतर, वेळ न गमावतां परत येणें. उ० हें पत्र तूं रामभाऊंना नेऊन दे आणि मागल्या पायीं परत ये.

५२ तूं आपल्या पायापाशीं किंवा पायाखालीं काय जळत आहे, तें पाहा—तूं आपल्या परिस्थितींतील जो दोष किंवा उणेपणा आहे, त्याच्याकडे दुर्लक्ष करून असूं नको. उ० अमक्याचा मुलगा ओंवळ्यानें जेवतो, आणि तमक्याच्या मुलानें केस राखिले आहेत, वगैरे निंदा कशाला करतां! तुमच्या पायापाशीं काय जळतें आहे तें अगोदर पाहा! (म्ह० खुद्द तुमच्या स्वतःच्या मुलाचे काय ढंग आहेत, ते पाहा!)

## ५७. पोट

१. पोट—

(क) अन्नपचनाचें स्थान; जठर.

(ख) बरगड्यांच्या खालचा व कंबरेच्या वरचा भाग.

(ग) गर्भाशय. उ० तुझें ओझें नऊ महिने मीं पोटांत वाहिलें आहे हो!

(घ) कोणत्याहि वस्तूचा फुगीर भाग. उ० गडव्याचें किंवा हव्याचें पोट.

(ङ) कोणत्याहि वस्तूचा आतला पोकळ भाग, पोकळी. उ०—

"ज्याच्या पोटीं खर विष, मुखीं आज्य हैय्यंगवीन,
त्या कुंभाचे परि खल, असें कोण बोले कवी न?।
वि० वा० भिडे,–पापात्मा.

(च) अवकाश किंवा आधार—ज्यांत लहान किरकोळ किंवा कमी महत्त्वाच्या वस्तूंचा समावेश करतां येतो. उ० तुम्ही आम्हांपैकी प्रत्येकाला वेगळें वेगळें आमंत्रण करीत बसूं नका; एक नारायणरावांना आमंत्रण केलें, म्हणजे पुरें आहे; त्यांच्या पोटांत आम्ही येतोंच. उ० वरप्रस्थान, वाङ्निश्चय इत्यादि हीं सर्व कर्में विवाहाच्या पोटांत येतात (म्ह० विवाहाच्या विधींत समाविष्ट होतात).

(छ) मन, अंतःकरण, आशय. उ० नीलकंठराव तुझ्याशीं गोड बोलला म्हणून भरूं नको; त्याच्या पोटांत कपट आहे.

(ज) पोटांतील (म्हणजे शब्दांनी बोलून न दाखविलेला हेतु.)

२ माझें पोट गळ्याशीं लागलें आहे आता मला लाडवांचा आग्रह करूं नका—मीं खाल्लेलें अन्न अगदी कंठापर्यंत येऊन पोचलें आहे, आता इ०

३ पोट जाणें—रेच होणें.

४. पोट जाळणें—

(क) पोट भरणें (निंदेत किंवा वैतागांत ह्याचा उपयोग होतो). उ० समर्थांची लाळ घोटूं नको तर काय करूं! हें पोट जाळावयाचें आहे ना!

(ख) दुसऱ्याचें नुकसान करून आपला फायदा करून घेणें. उ० ह्या वेळीं मला बढती मिळावयाची, पण त्या शंकररावाने आपलें पोट जाळलें ना! (म्ह० मला मिळावयाची जागा त्याने उपटली!)

५ पोट जिरणें—गर्भशमन होणें. उ० त्या सगुणाबाईचें पोट जिरलें आणि आज तीन वर्षें तिच्या पोटात सल राहिला आहे.

६ त्याचें पोट सकाळपासून ढाळत आहे—त्याला रेच होत आहेत.

७. पोट दुखणें—

(क) अजीर्ण वगैरेंच्या कारणाने पोटात वेदना होणें. (ह्याच अर्थानें "पोटांत दुखणें," ह्याचाहि उपयोग केला जातो).

(ख) मत्सर वाटणें; असह्य होणें; वाईट वाटणें. उ० म्हण—"खरचणाराचें खरचतें आणि कोठावळ्याचें पोट दुखतें!"

८ पोट पाताळास किंवा रसातळास जाणें—पोटांत फार वेळ अन्न न गेल्या कारणाने पोट खोल जाणें किंवा अगदी रिकामें असणें.

९ त्याच्या पोटाची पत्रावळ झाली आहे किंवा त्याचें पोट बखाटीस गेलें आहे—जेवणाची वेळ टळून गेल्यामुळे त्याचें पोट खोल गेलें आहे.

१० पोट फुगणें—

(क) अजीर्णादिकामुळें पोटात वायु सांठून पोट मोठें होणें.

(ख) एखादी गुप्त बातमी कोणाला तरी सांगण्याला संधि न मिळाल्या कारणाने अस्वस्थता वाटणें. उ० काय रे! ही बातमी कोणाला कळवूं नको, म्हणून तुला मीं बजाविलें होतें ना! मग का सांगितलीस? ती गुप्त ठेविली असतीस तर तुझें पोटबीट फुगलें असतें की काय?

११ पोटाला गांठी देणें—चिक्कूपणाने किंवा दारिद्र्यामुळे पोटाला पुरेसें अन्न न खाणें. पुढे "पोटाला पाटा बांधणें पाहा."

टीप—ज्याना दोन दोन, तीन तीन, दिवस खावयाला काही मिळालेलें नाही, असे गरीब लोक पोटाभोवती खरोखरीच दोरी घट्ट बांधून तिला दोन तीन गांठी मारतात;

अर्से केल्याने पोटाच्या रिकामेपणाच्या वेदना कमी होतात. सद्य प्रसूत स्त्रीच्या पोटाला अशाच हेतूने पट्टा घट्ट आवळून बांधतात.

१२ पोट बाहेर पडणें—भोजनाचा खर्च बाहेर पडणें उ० ह्या व्यापारांत माझें पोट बाहेर पडून दरमहा निदान दहा रुपये शिल्कीस पडतात.

१३ पोट फुटणें—खरोखरी पोट फुटल्याप्रमाणे पोटाला वेदना होणें उ० हसता हसता आमचीं पोटें फुटलीं !

१४ पोट बुडणें—चरितार्थाचें साधन नाहीसें होणें. उ० यदा पाऊस चांगला पडला नाही. माझें पोट बुडालें (म्ह० शेतें न पिकल्याकारणाने माझे चरितार्थाचें साधन नाहीसें झालें)!

१५. पोट भरणें—

(क) चरितार्थ चालविणें. उ० तो कारकुनी करून आपलें पोट भरतो (म्ह० आपली उपजीविका चालवितो)

(ख) जास्ती अन्न खाण्याला पोटांत जागा न उरणें. उ० माझें पोट भरलें; आतां जिल्ब्याचा आग्रह करूं नका !

१६ पोट सरणें—रेच होणें.

१७. पोट सुटणें—

(क) खावयाला, प्यावयाला, यथेच्छ मिळत असल्याने दोंद येणें.

(ख) उदरनिर्वाहाचा खर्च बाहेर पडणें (म्ह० आपल्या अंगावर न पडणें).

१८ पोटाचा डमामा किंवा नगारा होणें—पोटांत वायु धरल्यामुळे पोट फुगणें

१९ पोटाच्या पाठीस लागणें—चरितार्थाचीं साधनें मिळण्याकडे सर्व वेळ, शक्ति लावणें. उ० आम्ही पोटाच्या पाठीस लागलेलीं माणसें, आम्हाला कसलीं काव्यें आणि कसलीं नाटकें ?

२० पोटात कालवणें—

(क) दुःखामुळे अस्वस्थता वाटणें.

(ख) दयेने अस्वस्थता वाटणें.

(ग) मळमळण्यामुळे अस्वस्थता वाटणें.

२१ अपराध पोटात घालणें—अपराधाबद्दल क्षमा करणें. उ०—

अपराध सर्व माझे घालीं पोटात, जोड मज दे ही ।
पावे खरी सुरांशीं मर्यादि दावुनि दया सहज देही ॥

२२ एखाद्याला पोटीं घालणें—त्याला ममतेने आपल्या आश्रयाखाली घेणें. उ०—

प्रेरणा न करितां सर्वी । कृपेने अनाथ घाली पोटीं ।
केला उपकार न बोले ओठीं । तो एक धन्य पुरुष ॥ मुक्तेश्वर.

२३ पोटांत ठेवणें—गुप्त ठेवणें; कोणाला न कळूं देणें.

२४ पोटांत पोट चालणें—एकाच्या अन्नात दुसऱ्याचा समावेश होणें.

२५ पोटांत शूळ उठणें किंवा पोटांत सलणें—मत्सर वाटणें.

२६ एखाद्याच्या पोटांत शिरून एखादी गुप्त गोष्ट काढणें—गोड गोड बोलून किंवा आपल्याबद्दल दुसऱ्याच्या मनांत विश्वास उत्पन्न करून देऊन, त्याचा गुप्त बेत किंवा विचार समजून घेणें. उ० आत्मारामपंताला दुसऱ्याच्या पोटात शिरून त्याचे गुप्त विचार चांगले काढून घेता येतात !

२७ पोटावर मारणें, पोटावर पाय देणें, पोटाआड येणें—दुसऱ्याच्या उपजीविकेची साधनें नाहींशीं करणें उ० मी येथे एक चहाकाफीचें दुकान काढिलें आहे. तें चांगलें चालत आहे. आतां अगदी माझ्या दुकाना शेजारी तूंहि चहाकॉफीचें दुसरें दुकान काढणें, म्हणजे माझ्या पोटाआड येणें होईल. यासाठी तू पलीकडच्या आळीला दुकान काढ, म्हणजे तें दोघांनाहि बरें !

२८ एखाद्याच्या पाठीवर पाहिजे तर मारावें, पोटावर मारूं नये—त्याने काही अपराध केला असता त्याच्या चरितार्थाची साधनें बुडवू नयेत; त्याला देहदंड खुशाल करावा.

२९ पोटावारी नोकरी करणें—फक्त जेवण हा मोबदला घेऊन नोकरी करणें.

३० पोटाशीं, पोटशीं, पोटिशीं, पोटेशीं असणें—गरोदर असणें.

३१ एखाद्याला पोटाशीं धरणें—त्याच्यावर प्रेम करणें. उ० लक्ष्मणरावाला तू उगीच पोटाशीं धरिलें आहेस, तो केव्हा तुझ्यावर उलटेल ह्याचा नेम नाही!

३२ पोटाला तडस लागणें किंवा पोट तडीस लागणें—फार जेवल्यामुळे अस्वस्थता वाटणें.

३३ एखाद्याच्या पोटीं—जनक किंवा जननी ह्या नात्याने; पिता किंवा माता ह्या नात्याने त्याला किंवा तिला. पुढे लेखाक ४५ पाहा. उ० त्यांच्या ( किंवा तिच्या ) पोटीं संतान नव्हतें. उ० शिवाजीसारख्या महापुरुषाच्या पोटीं संभाजीसारखा दुर्वृत्त व कर्तव्यपराङ्मुख पुत्र निपजला, ही राष्ट्राच्या मोठ्या दुर्दैवाची गोष्ट असून ती मोठ्या आपत्तीस कारण झाली.

गो० स० सरदेसाई.

३४ गोवर वगैरे रोग पोटीं पडणें—तो लवकर बरा न होण्याच्या स्थितीला जाणें.

३५ पोट धरून किंवा धरधरून हसणें—मोठमोठ्याने हसणें.

[ टीप—फार फार किंवा मोठमोठ्याने हसलें असतां पोट दुखूं लागतें, यासाठी तें हाताने दाबून म्हणजे चेपून धरावें लागतें. ]

३६ पोट मोठें करणें—दया दाखविणें.

३७ पोटाचे दुःख सोसणे किंवा काढणें—भुकेची वेदना सोसणें.

३८ त्याच्या पोटांत कावळे कोकलूं, ओरडूं, तोडूं किंवा टोचूं लागले आहेत—त्याला अतिशय भूक लागली आहे.

३९ त्याच्या पोटांत कोंबडीं चरूं लागलीं आहेत—त्याला फार भूक लागली आहे.

४० पोटांत पाय शिरणें—खचून जाणें, भ्रांत होणें. उ० सदोबाच्या मरणाची खबर ऐकिल्यापासून माझे पायच जणो पोटांत शिरले आहेत! (म्ह० दुःखाने मी अगदी भांबावून गेलों आहे).

४१ त्याच्या पोटांत ब्रह्मराक्षस उठला आहे!—त्याला अतोनात खा खा सुटली आहे!

४२ पोटाला पाटा बांधणें—भुकेच्या वेदना बंद करण्यासाठी धोतराने पोट बांधणें.

४३ पोटाला चिमटे घालणें—उपास काढणें.

४४ ज्याचें पोट दुखेल तो ओवा मागेल—ज्याला एखाद्या गोष्टीमुळे त्रास होत असेल, तो तिच्याबद्दल कांही तजवीज किंवा उपाय करीलच.

४५ एखाद्याच्या पोटीं येणें—त्याच्यापासून मुलगा किंवा मुलगी ह्या नात्याने जन्मणें. मागे लेखांक ३३ पाहा. उ० असला द्वाड पोरगा माझ्या पोटीं नसता आला तर बरें होतें! उ०

ऐकुनि अमात्य बोले, "चंद्रासम पुत्र आपुल्या पोटीं।
येईल सत्य राया! माझी वाणी म्हणू नको खोटी ॥" ग० रा० मोगरे

## ५८. बगल

१. बगल—

(क) काख, खांद्याखालचा भाग.

(ख) अंगरखा, बंडी, वगैरेंच्या बाहीला जो चौकोनी तुकडा शिवलेला असतो तो. बायकांच्या चोळीला असाच तुकडा असतो, तो त्रिकोणाकृति असतो आणि त्याला कोर असें म्हणतात. (कोर स्त्रीलिंगी).

(ग) लंगड्या मनुष्याची कुबडी.

(घ) बाजू.

२ एखादी वस्तु बगलेत घालून चतुःसमुद्राचें स्नान करून येणें—ती वस्तु आपल्या खिजगणतीत नाही असें धरून वागणें.

३ एखादी वस्तु बगलेंत मारणें—छाती आणि बाहु यांच्यामध्ये ती दाबून धरणें; काखोटीला मारणें.

४ एखाद्याच्या बगलेंत असणें—त्याच्या संरक्षणाखाली असणें; त्याच्या वशिल्याचा असणें; त्याचा अंकित असणें. उ० जो कोणातरी थोर माणसाच्या बगलेंत असेल, त्याला सारे लोक नमून असतात.

५ तें काम त्याच्या बगलेंतलें आहे—तें त्याला सहज करतां येण्याजोगें आहे.

६ बगल किंवा बगला वर करणें—आपल्याजवळ कांही नाही किंवा कोणी शोधीत असलेली विशिष्ट वस्तु नाही, असें सिद्ध करण्यासाठी बाहु वर करून दाखविणें; आपणाजवळ कांही नाही, असें म्हणणें.

७ बगलेंतून एखादी गोष्ट काढणें—एखादी खोटी गोष्ट बनवून ती खरी म्हणून सांगणें; थाप झोकणें.

## ५९. बोट

१. बोट—

(क) हाताची किंवा पायाची अंगुलि.

(ख) बोटाच्या लांबीचें परिमाण किंवा बोटाच्या रुंदीचें प्रमाण.

(ग) बोटाला लागून येईल तितकें. उ० तुपाचें बोट, मधाचें बोट, गंधाचें बोट, कुंकवाचें बोट, इ०.

२ बोट करणें, बोट दाखविणें—बोटानें एखाद्या पदार्थाचा निर्देश करणें.

३. बोटें मोडणें—

(क) बोटाच्या पेराचे सांधे सैल करणें.

(ख) निर्भर्त्सना करणें; शापणें.

४ बोट शिरकणें—एखाद्या कामांत प्रवेश मिळणें.

५ बोटावर नाचविणें—आपल्या ताब्यांत ठेवणें; एखाद्या माणसावर ताबा चालविणें. उ० लक्ष्मणरावाला गोविंदराव बोटावर नाचवितो.

६ ज्याचीं बोटें त्याच्या डोळ्यांत घालणें—त्याच्याच युक्तीनें त्याला पकडणें; त्याची हिकमत त्याच्याच विरुद्ध योजणें किंवा लागू करणें.

७ एखाद्याला दीड बोट किंवा दोन बोटें स्वर्ग उरणें—तो गर्वानें फुगून जाणें. उ० अन्नपूर्णाबाईच्या नवऱ्याला मामलतदारी मिळाली, तेव्हापासून तिला दीड बोट स्वर्ग उरला आहे!

## ६०. मन

१. मन—

(क) सुखदुःखादिकांचें ज्ञान करून देणारें इंद्रिय.

(ख) सकल्पादिरूप मनाची वृत्ति.

(ग) सदसद्विवेकबुद्धि. उ. तुझ्या मनाला जर तें योग्य दिसत असलें तर कर.

२. ज्याचें मन त्याला ग्वाही देतें—आपण केलेलें कोणतेंहि कृत्य योग्य आहे की अयोग्य आहे, खरें आहे की खोटें आहे, चांगलें आहे की वाईट आहे ह्यासंबधाची खातरी प्रत्येक मनुष्याच्या अंतर्यामाला झालेली असते, मग तो मनुष्य बाह्यात्कारी काही का बोलेना, किंवा लोक त्याच्याबद्दल कांही का बोलेनात!

३. मनाएवढी ग्वाही त्रिभुवनांत नाही—आपल्यासबधाचें जें कांही खरें असेल, तें आपल्या मनास समजतच असतें!

४ मान सांगावा जना, अपमान सांगावा मना—आपणास मिळालेल्या सन्मानाबद्दल आपण लोकात बढाई मारावी, पण आपला अपमान मनांतच ठेवावा, त्याची वाच्यता करू नये.

५ मन घालणें, देणें किंवा लावणें—मन एकाग्र करून तें एखाद्या वस्तूवर किंवा कार्यावर आसक्त करणें किंवा व्यापृत करणें. उ० माझ्या कामात तू मन घालू नको. तें काम माझा मी पार पाडीन. उ० तू मन लावून अभ्यास केलास, तर यंदा तुझी परीक्षा खाचित उतरेल.

६ एखाद्या पदार्थावरून किंवा माणसावरून मन उडणें किंवा उतरणें—तो आवडेनासा होणें, त्याच्यापासून मन निवृत्त किंवा पराङ्मुख होणें; त्याचा मनाला वीट येणें. उ० ह्या सगळादी अंगरख्यावरून अलीकडे माझें मन उडालें आहे. नारायणरावावरून् माझें मन आता पुरतें उडालें.

७ मन तुटणें—मन पराङ्मुख होणें; मनात अप्रीति किंवा कटाळा उत्पन्न होणें. उ० 'फुटलें मोतीं, तुटलें मन, सांधू न शके विधाता.'

८ एखाद्याचें मन पाहणें—त्याचे विचार काय आहेत, हें अजमावणें, त्याच्या मनाचा कल कोणीकडे आहे, हें त्याच्या भाषणादिकावरून ठरविणें.

९ एखाद्या पदार्थावर किंवा इसमावर मन बसणें—तो आवडीचा किंवा प्रेमाचा होणें, त्याच्यावर मन आसक्त होणें. उ. माझें मन ह्या खणावर बसलें आहे. आई, असल्या खणाचा परकर मला शिवशील?

१० मन लागणें—मन आसक्त किंवा व्यापृत होणें. उ० गंगारामाचा मुलगा मेल्यापासून त्याचें मन दुकानाकडे लागेनासें झालें आहे.

११ एखाद्याचें मन मनावणें—त्याचें मन आपणाकडे ओढून घेणें; त्याला अनुकूल करून घेणें.

१२ मन मानेल तसें करणें—आपल्या इच्छेला येईल तसें करणें, स्वैर वर्तन करणें; स्वच्छंदानें, उच्छृंखलपणानें वागणें.

१३ मन मोठें करणें—उदारपणा दाखविणें.

१४ एखाद्याचें मन मोडणें—त्याच्या इच्छेच्या किंवा मर्जीच्या उलट वागें; त्याची आशा विफल करणें.

१५ मनांत गांठ ठेवणें—अंतर्यामीं वैरभाव, द्वेषबुद्धि, सूड घेण्याची इच्छा हीं जागृत ठेवणें.

१६ मनांत गांठ बांधणें, घालणें, बांधून किंवा घालून असणें—नीट ध्यानात धरून ठेवणें; पक्के ह्रदयांत बाळगून असणें.

१७. मनांत नव मण जळणें—मनात अतोनात क्रुद्ध, संतप्त असणें; मनात द्वेष, सूड घेण्याची इच्छा जागृत ठेवून असणें.

१८ मनांत मांडे खाणें—मनोराज्य करणें.

१९ मनांत म्हणणें—आपल्याशीं किंवा स्वगत म्हणणें.

२०. एखादें काम मनावर घेणें—

( क ) *त्याच्यासाठी कळकळीने झटणें;त्याच्या सिद्धीसाठी आस्थेने प्रयत्न करणें.*

( ख ) तें महत्त्वाचें समजणें; त्याला किंमत देणें; त्याचेकडे लक्ष्य देणें. उ० तो वेडा आहे, तूं त्याचें बोलणें मनावर घेऊं नको ! उ० मी रागाच्या झपाट्यांत तुम्हाला अपशब्द बोललों, ते मनावर घेऊं नका. (म्ह० ते विसरून जा ).

२१ मनास येणें—आवडणें. उ० हा खण तुझ्या मनास येतो काय ? उ० कोण तुझ्या मनासि येतो सांग वो ! सीते ! —आनंदतनय.

२२ मनांत कालवणें—अंतःकरणांत अतिकष्टी होणें; तीव्र दुःख पावणें. उ० दशरथाच्या आज्ञेने राम वनाला निघालेला पाहून सर्व अयोध्यावासी जन मनात कालवले.

२३ मनीं धरणे किंवा वागविणें—ह्रदयांत बाळगणें. उ० मनिं नित्य वागवावें की गुरुचा बोल मज न लागावा.

२४ एखादी गोष्ट मनीं मानसीं नसणें—ती अगदी मनात देखील किंवा स्वप्नांत देखील आलेली नसणें. उ० हीं मोत्यें तुला मिळूं नयेत, असें माझ्या मनीं मानसीं देखील नव्हतें !

२५ मनाने घेणें—मनाचा ग्रह होणें; मत ठरणें. उ० चाकवताची भाजी खाल्ल्याने ओकावयास होतें, असें त्याच्या मनाने घेतलें आहे.

६१. मनगट

१. *मनगट—*

( क ) हाताच्या पंजाचा बाहूशीं जो सांधा तो.

( ख ) घोडा, गाढव वगैरे जनावराची मूठ ( म्ह० खुराजवळचा सांधा ).

(ग) (शक्ति, सामर्थ्य वगैरेंचें अधिष्ठान, ह्या दृष्टीनें) अंग. उ० तुझ्या मनगटांत जोर असला तर घे हें काम अंगावर स्वतः! (म्ह० तुझ्या ठायीं किंवा अंगीं).

२ एखाद्याचें मनगट धरणें—एखाद्या अपराधांत त्याला पकडणें, त्याच्यावर गुन्हा शाबीत करणें, तो एखादें वाईट कृत्य करीत असतां त्याला ऐन समयीं पकडणें

३ एखाद्याच्या मनगटावर गोणी पडणे किंवा येणे—एखाद्या कामाची जबाबदारी त्याच्यावर पडणें, त्या कामाचें ओझें त्याच्यावर येऊन पडणें

४ तुझ्या मनगटावर कोणीं गोणी दिली आहे?—तू ह्या कामाचा भार आपल्या शिरावर आहे, असें कां समजतोस?

५ मनगटावर केस येणें—एखादें काम करावयाला असमर्थ असणें

६ त्याच्या मनगटावर तेल घातलें पाहिजे—त्याच्या आळशाबद्दल त्याला रागें भरलें पाहिजे

७ मनगटासारखें मनगट पाहून कन्या द्यावी—कन्येला अगापिंडानें अनुरूप वर पाहून त्याच्याशीं तिचें लग्न जुळवून द्यावें.

८ एखाद्याच्या मनगटाशीं मनगट घासणे—त्याच्याशीं बरोबरीच्या नात्यानें वागणें

## ६२. मान

१. मान—

(क) गळ्याच्या मागची बाजू

(ख) गळ्याचा एक रोग

२ खालच्या मानेनें चालणें किंवा पाहणें—नम्रपणानें किंवा मर्यादशीलपणानें चालणें किंवा वागणें, लाजेनें खालीं मान घालून चालणें

३ एखाद्याची मान काख्यावर नसणे—तो अतिगर्विष्ठ, उद्दाम किंवा मगरूर असणें

४ एखाद्याची मान कापणें—त्याचा विश्वासघात करणें, त्याला फसविणें

५ मान हालविणें, डोलविणें किंवा तुकविणे—आनंदानें किंवा कौतुकानें, मान हालविणें, प्रशंसापूर्वक मान हालविणें. उ० फलटणकर बोवांचें कीर्तन ऐकून सर्व लोक माना डोलवीत असत.

६ माझी मान धरली आहे—माझ्या मानेला कांहीं विकृति होऊन ती मला इकडे तिकडे वळवितां येत नाहीं ["धरणें" अकर्मक]

७ त्यानें माझी मान धरली—ऐन वेळेला त्यानें माझ्या कामांत हरकत आणिली किंवा माझें काम बंद पाडलें [येथे "मान" ह्याबद्दल "मानगुटी" असेंहि म्हणतात "धरणें" सकर्मक]

८ एखाद्याची मान किंवा मुंडी मुरगाळणें—त्याचा नाश किंवा नुकसान करणें

९ एखाद्या रकमेची मान मोडणें—

(क) नाइलाजास्तव, किंवा नाखुशीनें, ती रकम खर्च करणें. उ० बाळोबानें ५०० रुपयांची मान मोडली, तेव्हां एकदाचें त्याचें लग्न झालें!

(ख) थोडक्या खर्चासाठी मोठ्या नाण्याला हात लावणें. उ० चार पैशासाठीं मला रुपयाची मान मोडावी लागली!

१०. मान वर करणें—

(क) हीन स्थितींतून वैभवास चढणें.

(ख) आजारांतून उठणें.

(ग) दिमाखानें वागणें.

११ मान खालीं करणें किंवा वर न करणें—लज्जेनें किंवा नम्रपणानें मान लववून दृष्टि भूमीकडे लावणें. उ० त्याच्या मुलाचे ढंग वर्णिले, तेव्हां त्यानें मान खाली घातली. उ० आताच्याप्रमाणे तेव्हांच्याहि वधू, वरासमोर मान खाली घालीत असत.

चिं० वि० वैद्य,—मध्ययुगीन भारत.

१२ मान वाकडी करणें—संमति किंवा पसंती दाखविण्यासाठीं एका खांद्यावर मान वळविणें. नापसंती दाखविण्यासाठींहि मान वाकडी केली जाते, पण वेगळ्या रीतीनें.

१३ एखाद्याची मान सोडविणें—त्याला अडचणींतून मुक्त करणें [ जुवाला बैलाची मान जखडलेली असते. त्याच्या मानेवर ठेवलेलें जूं उतरलें म्हणजे तो मोकळा होतो; ह्यावरून वरील वाक्प्रचार रूढ झाला आहे ].

१४ एखाद्याची मान अडकणें—तो पेचांत पडणें; संकटांत सापडणें. [ व्युत्पत्ति वरच्याप्रमाणेंच ].

१५ एखाद्याच्या मानेवर सुरी ठेवणें—त्याला धमकी देणें; त्याचा नाश करावयास सिद्ध होणें. [ खाद्य मांसासाठीं जनावराला कापताना खाटीक प्रथम सुरीनें त्याची मान कापून डोकें आणि धड विलग करतो. ह्यावरून हा वाक्प्रचार रूढ झाला आहे ].

१६. एखाद्याच्या मानेस किंवा मानगुटीस बसणें—

(क) त्याला आग्रह करणें; त्याला अति गळ घालणें; त्याला सक्तीनें एखादें काम करावयास लावणें.

(क) त्याला पछाडणें (भूत, पिशाच्च वगैरेंनी).

(ग) केलेंच पाहिजे असें होणें; केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें होणें. उ० तें पत्र टपालांत टाकणें माझ्या मानेस बसलें (म्हणजे मला तें काम टाळता येईना).

## ६३. मिशा

१. मिशा—

(क) पुरुषाच्या वरच्या ओठावरील केसाची पंक्ति

(ख) मांजराच्या, झुरळाच्या तोंडावरचे लांब लांब केस.

२ एखाद्याच्या मिशा खालावणें—त्याची फजिती होणें, त्याचा नक्षा, तोरा उतरणें [ येथे "खालावणें" हें अकर्मक क्रियापद ]

३ एखाद्याच्या मिशा खालाविणे—त्याची फजिती करणें, त्याचा तोरा कमी करणें

४ एखाद्याच्या मिशा भादरणे, मिशी भादरणे किंवा उतरणे—त्याची बेअब्रू किंवा फजिती करणें

५ मिशांवर किंवा मिशीवर ताव देणें, मिशा पाजविणें, मिशाना किंवा मिशीला पीळ भरणे—तिरस्काराने, सूड घेण्याच्या इराद्याने किंवा रागाने मिशा वळविणें.

६ मिशांना तूप लावणें—डामडौल करणें, नसत्या श्रीमतीचा आविर्भाव करणें उ० त्याला वेळेला खावयाच्या अन्नाची मुष्कील आहे, पण मिशाना तूप लावून हिंडतो !

७ मिशी उतरून देईन !—एखादी गोष्ट ठासून सांगावयाची असतां म्हणतात उ० मी म्हणतों तें खोटें ठरलें, तर मिशी उतरून देईन !

## ६४. मूठ

१. मूठ—

(क) हाताचीं बोटें तळहातावर वळवून टेकिलीं असतां हाताच्या पंजाचा जो आकार होतो तो.

(ख) वरच्याप्रमाणे मूठ मिटली असतां तिच्यात ज्या परिमाणाचा पदार्थ राहूं शकेल तें परिमाण किंवा मुठींत जितका पदार्थ राहू शकेल तितका पदार्थ ( धान्य वगैरे ). उ० भाताच्या रोपांची मूठ, कोथिंबिरीची मूठ, इ०.

(ग) मंत्राने भारून शत्रूवर फेकण्यासाठी हाताच्या मुठींत घेतलेले उडीद वगैरे पदार्थ.

(घ) हत्ती, घोडा वगैरे जनावराच्या रोजच्या अन्नातून त्याच्या रखवालदारास द्यावयाचा जो मुठीच्या परिमाणाचा भाग तो.

(ङ) मुठीने पेरलेलें भात. उ० यदाची मूठ चांगली लागली.

(च) घोड्याच्या पायाच्या खुराला लागून जो सांधा असतो तो. [ ह्या सांध्याशीं घोड्याचा पाय लहान घेराचा असल्यामुळे येथे बांधलेली दोरी खालीं किंवा वर सरकत नाही ]

२. एका मुठीचीं माणसें—एकाच कायद्याखाली किंवा हुकमतीखाली येणारी माणसें.

३ एका मुठीनें—एकदम किंवा एकाच हप्त्यानें. उ० उसनें घेतलेले माझे पंचवीस रुपये मला देशील ते एका मुठीने परत दे. (म्ह० आज आठ आणे, उद्या एक रुपया, आणखी चार दिवसांनी बारा आणे, असे चिन्धीचिन्धी देऊं नको; एकदम सबंध पंचवीस रुपये दे). उ० त्याने शंभर रुपये एका मुठीने उधळले (म्ह० एकाच वेळीं, एकाच खेपेला).

४ झाकल्या मुठीनें—गुप्तपणें; आपल्याविषयी कोणास काही मागमूस न लागूं देतां.

५ मूठ आवळणें—चिक्कूपणा करणें किंवा करूं लागणें.

६ मूठ दाबणें, चेपणें किंवा गार करणें—लांचाची रक्कम मुठींत किंवा हातांत देणें; लांच देणें. उ० त्याने पन्नास रुपयांनी फौजदाराची मूठ दाबिली, तेव्हा तो सुटला.

७ मुठींत असणें—पूर्ण कह्यांत, ताब्यांत असणें. उ० नारायणराव पूर्णपणें त्या सावकाराच्या मुठींत आहे. म्हणून तुम्ही नारायणरावांस वळविण्यासाठी त्या सावकाराशीं संधान बाधा.

८ मृत मनुष्याला मूठमाती देणें—त्याला पुरणें.

## ६५. मुंडी

१. मुंडी—

(क) डोकें—(तिरस्कारव्यंजक). उ०

"हा उडवितों तुझी मी बकऱ्याची जेवि शीघ्रतर मुंडी"।
ऐसें बोलुनि देता झाला गुरुपुत्र शीघ्र तरमुंडी ॥ ६७ ॥
मोरो०—द्रो० प० अ० १७.

(ख) संन्यासी. (संन्याशाचे सर्व डोक्यावरचे केस भादरलेले असतात यावरून हा तिरस्कारव्यंजक शब्द प्रचारांत आलेला आहे).

२ एखाद्याची मुंडी मुरगाळणें, पिळणें, पिरगाळणें—त्याचा सर्वतोपरी नाश करणें. उ० त्याने माझ्याविरुद्ध चहाड्या सांगून माझें नुकसान केलें आहे. आता तो जर माझ्या तावडींत सापडला, तर त्याची मुंडीच मुरगळून सोडतों!

३ मुंडी हालविणें किंवा डोलविणें—डोकें हालविणें. [वरिष्ठाच्या म्हणण्यास सुद्धामत्याने संमति देण्यासाठी डोकें हालविलें किंवा एखाद्या शिष्याने गुरूचें म्हणणें न समजतां, समजलें आहे, असें डोकें हालवून दर्शविलें, म्हणजे "त्याने मुंडी हालविली किंवा डोलविली," असें म्हणतात].

४ मुंडी फिरविणें—डोकें वळवून नापसंती किंवा नावड दाखविणें.

## ६६. शिर

१. शिर—

(क) डोकें

(ख) कोणत्याहि वस्तूचा माथा. उ० झाडाचें, डोंगराचें, घराचें वगैरे शिर.

(ग) सैन्याची आघाडी

(घ) (घोड्याची गणति करताना) व्यक्ति. उ० घोडा शिर चार (म्ह० चार घोडे).

२ शिर, सुरी तुझ्या हातीं—माझें डोकें तुझ्या ताब्यांत आहे आणि सुरीहि तुझ्याजवळ आहे, आता मला मारणें किंवा न मारणें, हें तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे, मी सर्वैथैव तुझ्या तावडींत सापडलों आहे, मला तारणें किंवा मारणें हें तुझ्यावर आहे, मीं अपराध केला आहे खरा, आता क्षमा करणें किंवा पारिपत्य करणें तुझ्याकडे आहे

३ शिर हातावर घेणें—धाडसाचें काम करावयास सिद्ध होणें, भीति सोडून देणें उ० बाजीरावाबरोबर पांचशे घोडेस्वार शिर हातावर घेऊन पुढे सरसावले! शिवाजीला स्वराज्यस्थापनेच्या कार्यांत साहाय्य करावयाला तानाजी, एसाजी, बाजी वगैरे शेकडो मराठे वीर हातावर शिर घेऊन सदा सिद्ध असत

४ शिरातोरा असणें, शिरातुरा असणें—एखाद्यापेक्षा अधिक समर्थ, चतुर किंवा कर्तबगार असणें उ० रामू चित्रकलेमध्ये माझा शिरातोरा आहे

५ शिरातोरा किंवा शिरातुरा लावणें, दाखविणें किंवा मिरविणें—आपलें वर्चस्व दाखविणें किंवा गाजविणें. उ० राममाऊला पाटिल्की मिळाल्यापासून तो भारी शिरातोरा दाखवू लागला आहे!

६ एखाद्याच्या शिरीं किंवा शिरावर असणें—त्याचा रक्षक किंवा त्राता ह्या नात्याने त्याच्याजवळ असणें. उ० आपण शिरीं असता आम्हांला कोणाची भीति?

७ शिरावर जागें राहणें किंवा असणें—एखाद्याच्या संरक्षणासाठीं किंवा कल्याणासाठीं तत्पर असणें. उ०

श्रीरामा! तूं स्वामी असशी माझ्या शिरावरी जागा।
आम्हांसि तुझ्या पायावाचुनि निर्भय नसे दुजी जागा॥

मोरोपंत,—आर्या-केकावलि

## ६७. शेंडी

१. शेंडी—

(क) डोक्याची हजामत करवून किंवा जावळ करवून, मध्ये जो केसांचा झुबका राखून ठेवलेला असतो तो, हिंदुत्वाची खूण.

हलु हलु झडो अहंता, सत्नमनीं वार्द्धकीं जशी शेंडी ।
केंहूं विवेक विषया, निःस्पृह जन वस्तुतें जसा केंडी ॥ —मोरोपंत.

(ख) मोर, कोंबडा वगैरेंच्या माथ्यावरील मासल तुरा.

(ग) शेंडें-नक्षत्राचें शेपूट.

(घ) घोड्याच्या दोन कानांच्या दरम्यान कपाळावर लोंबणारे केस.

(ङ) तेल्याचा घाणा, उसाचा चरक वगैरेंच्या लाटावरील पळी किंवा तक्ता.

२ शेंडी फुटणें—[क] एखाद्या कामातून दुसरें एखादें बारीकसें नवीन काम निघणें. [ख] एखाद्या मोठ्या खर्चाबरोबर दुसरा एखादा लहानसा खर्च करण्याची जरुरी येणें.

३ एखाद्याची शेंडी सापडणें किंवा हातांत येणें—त्याला आपल्या कह्यात आणण्याचें साधन आपणाला मिळणें. उ० तुझी शेंडी माझ्या हातात सापडली आहे; आता कोठे जातोस पळून तें पाहतों!

४ एखाद्याची शेंडी गुंतणें—तो अडकलेल्या स्थितींत असणें. उ० त्याचें हें काम मीं अंगाबाहेर टाकलें असतें, पण सध्या माझी शेंडी गुंतलेली आहे, म्हणून माझा इलाज नाही!

५ एखाद्याच्या शेंडीस फुलें बांधणें—त्याला नटवून, सजवून त्याची खुशामत करून त्याचें मन आपल्याला अनुकूल करून घेणें.

## ६८. हात

१. हात—

(क) मनगटाच्या पुढचा जो बाहूचा भाग तो.

(ख) सबंध बाहु, म्हणून खांद्यापासून तों बोटाच्या टोकापर्यंतचा शरीराचा अवयव.

(ग) कोपरापासून मधल्या बोटाच्या टोकापर्यंत जी लांबी ती. उ० हा पंचा साडेचार हात भरला.

(घ) बाजू; तरफ. उ० आमचें घर मारुतीच्या देवळाच्या उजव्या हातास आहे.

(ङ) अधिकाराचा किंवा सामर्थ्याचा टप्पा किंवा पोंच. उ० तुला बढती देणें माझ्या हातीं नाही. उ० दाक्षिणेतील मुसलमानी राज्यें मराठ्यांना फारशीं जाचक वाटलीं नाहीत. याचें कारण राजा मुसलमान असला तरीं बहुतेक सर्व मुलकी व लष्करी कारभार हिंदूंच्या हातीं असे. न० चिं० केळकर,—मराठे व इंग्रज.

(च) स्वामित्व, कबजा, मालकी. उ० रामभाऊंचीं सारीं शेतें माझ्या हातांत आहेत. उ० हल्ली माझ्या हातांत मुळीच पैसा नसतो.

(छ) डाव, खेळ. उ० मीं तुझ्यावर पाच हात लाविले.

(ज) खेळण्याची पाळी. उ० आता माझा हात आला आहे.

(झ) कोणतेंहि हत्यार, शस्त्र, वाद्य, इत्यादि वापरण्याच्या कामीं कौशल्य किंवा सफाई. उ० पाडोबा सारंगीवाल्याचा हात चांगला आहे. उ० ह्या न्हाव्याचा हात हलका आहे, त्याला चित्र काढण्याचा हात चांगला आहे.

(ञ) एका पक्षांतील खेळणारे गडी. उ० अजून आमच्याकडचा एक हात खेळावयाचा आहे.

(ट) (कुलुपाचा) हात म्हणजे किल्ली.

(ठ) मदतनीस; साहाय्य करणारा; कामकरी.

(ड) तालमींत जोर काढतांना ज्या चिऱ्यावर किंवा ओंड्यावर हात टेकतात तो. (ह्या अर्थी हत्ता, हत्ते अशींहि रूपें आहेत).

(ढ) हाताने केलेले थर, दिलेले लेप इ०. उ० चुन्याचा पहिला आडवा हात झाला, त्यावर दुसरा उभा हात दिला, म्हणजे चुना चांगला उठून दिसेल.

(ण) *हाताने मारलेला तडाका. उ० मला उगीच चिडवूं नको! माझा हात* तुला ठाऊक आहे. मीं एकदा मारावयाला सुरुवात केली की, तुझ्या पाठीचीं सालडीं लोंबविल्याशिवाय राहणार नाहीं!

(त) तेलाच्या घाण्याचा एक वाकदार तुकडा, जो कातरीला लाविलेला असतो तो.

(थ) हात टेकावयासाठीं किंवा हाताने धरावयाचे, जे कोणत्याहि पदार्थाचे भाग ते; हाताच्या आकाराची कोणतीहि वस्तु. उ० खुर्चीचे हात, रहाटाचे हात इ०.

२ हात आटोपणें—मारणें वगैरे हाताने करावयाची कोणतीहि क्रिया बंद करणें.

३ हात ओवाळणें—तुच्छता दर्शविणें.

४ हात करणें—मारणें किंवा हाताने त्रास देणें. उ० स्त्रीच्या अंगावर हात करणें बरोबर नाहीं.

५. हात घालणें—

(क) पतकरणें; करावयाला घेणें. उ० जें काम आपल्याला होण्याजोगें नसेल, त्याला कधी हात घालूं नये.

(ख) एखादी वस्तु घ्यावयासाठीं, धरावयासाठीं किंवा शोधावयासाठीं हात पुढे करणें.

मग विभु वसनासी त्याचिया हात घाली!
उकलुनि श्रव पाहे मुष्टि पोहे निघाली॥ —आनंदतनय.

(ग) दवळादवळ करणें; दुसऱ्याच्या कामात, व्यवस्थेंत, कारभारांत लुडबूड करणें. उ० एखादा देश जिंकणारा राजा जित देशावर आपले अधिकारी कायमचे नेमीत नसे व असे अधिकारी नेमले गेलेच, तरी ते जित देशाच्या अंतर्व्यवस्थेंत बिल्कूल हात घालीत नसत

न० चिं० केळकर, –मराठे व इंग्रज.

६ हात चालणें—एखादी गोष्ट सफाईने करतां येणें. उ० कशिद्यावर माझा हात चालत नाही; सतारीवर रामरावाचा हात चांगला चालतो.

७ हात चेपणें—लाचाचे पैसे मुकाट्याने एखाद्याला हातांत देणें.

८. हात जोडणें—

(क) नमस्कार करणें; प्रार्थना करणें; विनविणें; शरण जाणें किंवा येणें. उ०

अपराध फार केले, परि आता हात जोडिले स्वामी ! ।
करुनि दया तारावें, आवडि वाढो सदा तुझ्या नामीं ॥

मोरोपत,–आर्या केकावलि.

(ख) नको असलेला पदार्थ हात जोडून आर्जवाने दूर सारणें किंवा अव्हेरणें उ०

दानश्री त्याहुनि बहु, दुग्धासहि हात जोडितो मीन।

मोरो०,–बृहद्० अ० ८.

९ एखाद्यापुढे हात जोडून उभे असणें किंवा राहणें—त्याची आज्ञा स्वीकारावयास, त्याची सेवा-चाकरी करावयास सिद्ध असणें. आमचा स्वीकार करा, आमच्याकडून सेवा करून घ्या अशी त्याची प्रार्थना करणें. उ० मोरोपंतांची विद्वत्ता मोठी असून संस्कृत भाषेचे छप्पन्न कोश जसे काय त्यांच्यापुढे हात जोडून उभे होते व सरस्वतीचा त्यास वरप्रसाद होता, अशा मताचे कांही लोक आहेत.

विष्णुशास्त्री,—निबंधमाला.

१०. हात झाडणें—

(क) अगदी नापसंत ठरविणें; झिडकारणें.

(ख) निराशेने सोडून देणें.

११. हात टाकणें—

(क) पोहोताना पाण्यावर हात मारणें.

(ख) प्रहार करणें; मारणें. उ० बायकोमाणसाच्या अंगावर हात टाकणें तुम्हाला शोभत नाही.

१२. हात टेकणें—

(क) म्हातारपणानें अशक्त होणें; थकणें.

(ख) एखादें काम आपणास करतां येत नाही असें म्हणणें किंवा कबूल करणें.

उ. कित्येक शिक्षक इंग्रजीतील अर्थ मराठीत समजून देतांना निरुपाय होऊन हात टेकतात. वि० कृ० चि०—निबंधमाला.

१३. आपला हात तोडून देणें, आपला हात कापून देणें, आपला हात गुंतवून घेणें—लेखानें आपणास बांधून घेणें. उ० पुढच्या अमावास्येपर्यंत मारवाड्याच्या कर्जाची फेड करणें जरूर आहे, कारण मीं त्याच्याजवळ हात तोडून दिला आहे!

१४. हात दाखविणें—

(क) आपली शक्ति, सामर्थ्य दाखविणें.

(ख) नाडीपरीक्षा करावयासाठीं वैद्यापुढे हात करणें.

(ग) तळहातावरच्या रेपा पाहून भविष्य वरण्यासाठीं कुडमुड्या जोशापुढे हात करणें.

(घ) हाताने एखाद्या पदार्थाचा निर्देश करणें.

(ङ) बडवून काढणें, पारिपत्य करणें, सूड घेणें, उट्टें काढणें. उ० काही धाडसी लोक अमेरिकेला गेले व स्पानियर्ड लोकांना त्यांनी वेळोवेळीं चांगला हात दाखविला. प्रो० वै० का० राजवाडे, —आंग्लसाहित्य.

(च) अहितकारक परिणाम करणें.

१५ हात देणें—मदत करणें; तारणें. उ०

बाजी तया त्वरित धावुनि देइ हात !·

जेव्हा पडे चतुरसाध्वहि संकटात ! —मोरो गणेश लोंढे.

१६ हातावर धरणें—(मुलासंबधानें) एकासारखें रडत राहून आपणास ध्यानगास लावणें. उ० आज ह्या मुलानें मला सकाळपासून हातावर धरिलें आहे !

१७ हात धुऊन एखाद्याच्या पाठीस लागणें—त्याचा पिच्छा पुरविणें; त्याला सतावून सोडणें.

१८ हात धुणें—एखाद्या कामांतून आपलें अंग काढून घेणें.

१९ हात नाचविणें—चेष्टा करण्याच्या उद्देशानें दुसऱ्याच्या तोंडापुढे हातवारे करणें.

२० कपाळावर हात मारणें—नशिबास दोष देणें.

२१ ही म्हैस आता हातावर आली किंवा ही म्हैस आता हातावर दूध देऊं लागली—ह्या म्हशीला पान्हा फुटण्यास रेडकाची जरूरी उरली नाही; तिच्या कासेला हात घातला की ती दूध देऊं लागली आहे.

२२ हातावर शिर घेऊन असणें—कोणतेंहि धाडसाचें कृत्य करावयास सदा सिद्ध असणें. उ० हातावर शिर घेऊन आम्हीं आपली नोकरी केली आहे !

२३ हातावर पोट भरणें किंवा हातावर संसार करणें—अंगमेहनतीने पैसे मिळवून उपजीविका करणें.

२४ हातावर हात देऊन किंवा हातावर हात मारून पळून जाणें—डोळ्यादेखत निसटून किंवा पळून जाणें. उ० तो भामटा माझ्या हातावर हात मारून पळून गेला !

२५. हाताला हात लावणें—

[ क ] पति कांही धर्मकृत्य करीत असतां त्या धर्मकृत्यांची सांगता व सफलता होण्यासाठी स्त्रीने त्याच्या हाताला आपला हात लावणें.

[ ख ] एखाद्या माणसाला खूष करण्यासाठी त्याच्या मूर्ख विधानांना संमति दर्शविणें, त्याची री ओढणें किंवा त्याच्या बरोबर पापकर्म करावयाला सिद्ध होणें.

२६. हातीं धरणें—

( क ) आपल्या देखरेखीखाली घेणें. उ० माझ्या मुलाला तुम्हीं हातीं धरल्यास तो पास होईल.

( ख ) ०कडे वळणें, पतकरणें. ०कडे लक्ष्य वळविणें. उ० अशासारखे विषय आम्हीं अद्याप कसे हातीं धरले नाहीत, ह्याबद्दल पुष्कळांस आजपर्यंत नवल वाटलें असेल. विष्णुशास्त्री चिपळूणकर,–निबंधमाला.

२७. हात-गहाण ठेवणें—उजवा हात देवाला वाहून कोणत्याहि कामीं त्याचा उपयोग करावयाचा नाही, असा नवस करणें.

२८ तळहाताचा मळ—अल्प श्रमाने होणारें कोणतेंहि काम. उ० चित्रें काढणें हें त्याला तळहाताच्या मळाप्रमाणे आहे.

टीप—ह्या अर्थाने 'हाताचा मळ' असाहि प्रचार आहे.

२९ हाताच्या धारणेने घेणें—मारणें, बुकलणें.

३० हातावर घेणें किंवा आणणें—तारण किंवा गहाण न ठेविता पैसे उसने घेणें, आणणें किंवा काढणें. उ० त्या मारवाड्याची आणि माझी नुसती तोंडओळख होती. तथापि त्याच्यापासून हे दहा रुपये मीं केवळ हातावर आणिले.

३१ हातावर दिवस काढणें किंवा लोटणें—मोठ्या कष्टाने दिवस घालविणें.

३२ हातावर मिळविणें—मिळवावें आणि खावें अशा स्थितींत असणें.

३३ हातावर हात मारणें किंवा देणें—एखादा सट्टा, विचार किंवा कल्पना आपणास पटली किंवा आवडली, म्हणून दुसऱ्याच्या हातावर आपला हात मारणें.

३४ हातास, हातां किंवा हातीं चढणें—प्राप्त होणें. उ० कोरलईचा किल्ला इ० स० १७३९ त बाजीरावाच्या हातास चढला. उ० अदत्तापासून पैसा हातीं चढत नाही.

३५ जीभ किंवा तोंड हातीं धरणें—मन मानेल तसें बोलणें किंवा खाणें. उ० त्याने जीभ किंवा तोंड हातीं धरलें आहे ( म्ह० तो वाटेल तें बोलतो किंवा खातो ).

३६ हातीं भोपळा घेणें—भिक्षा मागणें [ भोपळ्याच्या शकलात भिक्षेकरी भिक्षा घेतात, त्यावरून हा वाक्प्रचार रूढ झाला आहे ]

३७ आपला हात आणि जगन्नाथ—एखादी वस्तु आपल्या हाताने घ्यावयाची आपणास संधि मिळाली असतां कोण कमी करणार ? हवें तितकें घेणारच !

३८ दोन हाताचे चार हात करणें—लग्न करणें उ० "त्याचे दोन हाताचे चार हात झाले," म्ह० त्याचें लग्न झालें

टीप—एखाद्या पुरुषाचें लग्न झालें, म्हणजे त्याच्या घरांत एक नवीन माणूस ( म्ह० त्याची बायको ) येते आणि कामधाम वगैरे करावयास पूर्वी जेथे दोनच हात असत, तेथे चार हात होतात

३९ एखाद्याचा हात धरणें—( क ) त्याला अडाविणें, हरकत करणें ( ख ) त्याच्याशीं प्रतिस्पर्धा करणें, त्याची बरोबरी करणें उ० चित्रें काढण्यात त्याचा हात कोणाच्याने धरवेल ? ( ग ) त्याला लाच देणें उ० मीं शिरस्तेदाराचा हात धरला तेव्हा त्याने मला ती जागा देवविली ( घ ) त्याच्या आश्रयास जाणें, त्याच्यावर अवलंबून राहणें, त्याच्यावर भिस्त ठेवणें

४० ह्या हाताचें त्या हातास कळू न देणें—गुप्तपणें करणें

४१ ह्या हाताचें त्या हातावर—जेव्हाच्या तेव्हाच, तात्बडतोब, सबुरी न करता

४२ एखाद्या मनुष्यास हातीं धरणें—त्याला मदत करण्यास तत्पर असणें उ० समर्थाने ज्याला हातीं धरिलें असेल तोच वैभवास चढतो !

४३ हात मारणें—( क ) बळकाविणें ( ख ) अधाशीपणें खाणें उ० सदोबाच्या ताब्यांत असलेल्या पैशावर त्याने चांगला हात मारला उ० रामूने आज रसावर खूप हात मारला !

४४ हात राखणें—कुचराई करणें उ० असे हात राखून जेवू नका !

४५ हात लावणें—मदत करणें उ० हें जातें भारी जड ओढतें, वहिनी, जरा हात लावतस का ?

४६ हातजोट लावणें किंवा हातभार लावणें—मदत करणें

४७ हात वळणें—सरावामुळे किंवा परिपाठामुळे हाताला सफाई येणें

४८ हाताचें पायावर लोटणें—आजची अडचण उद्यावर ढकलणें, हल्लीचें संकट लांबणीवर टाकणें

४९ हातातोंडास येणें किंवा हातातोंडीं येणें—उपयोगी पडण्याच्या स्थितीस येणें, लोकांना मदत करावयाला लायक होणें उपभोगण्यास योग्य होणें

५० हातावर असणे—पूर्णपणें साध्य असणें.

५१ हातावर तुरी देणें किंवा हातावर तुरी देऊन पळून जाणें—फसविणें किंवा फसवून पळून जाणें.

५२ हातावर येणें किंवा हाताबोटांवर येणें—अगदी जवळ येऊन ठेपणें; हस्तगत होण्याच्या, कबज्यांत येण्याच्या किंवा साध्य होण्याच्या अगदी बेतांत असणें. उ० मुक्कामाचा गाव आता अगदी हातावर आला आहे!

५३ एखाद्याचा हात मोडणें—तो अनाथ होणें (मोडणें अकर्मक).

५४ हात वाहणें—प्रवृत्त होणें. उ० मुलांनी कितीहि दांडगाई केली तरी त्यांना मारावयाला सहसा माझा हात वाहत नाही.

५५. हात सोडणें—

(क) सगति सोडणें.

(ख) पूर्वीप्रमाणे कृपा, लोभ न करणें.

५६ हाताखाली घालणें—देखरेखीखाली घेणें. कबज्यांत किंवा ताब्यांत घेणें.

५७ हाताचे लाडू होणें—खरजेनें हात सुजून ते साफ उघडता न आल्या-कारणानें मिटलेल्या स्थितींत राहणें. उ० खरजेनें साळूताईच्या मुलाच्या हाताचे लाडू झाले आहेत.

५८ हातांत कंकण बांधणें—एखादें काम करण्याबद्दल प्रतिज्ञा करणें; एखादें काम पतकरणें किंवा अंगावर घेणें. उ० कोतवालानें चोर पकडण्याविषयीं हातांत कंकण बांधिलें आहे.

५९. हातांत हात घालणें—

(क) लाच देणें.

(ख) मैत्रीच्या भावानें वागणें; प्रेम करणें. उ० ह्यं(?)काळीं प्राचीन हिंदुधर्म आणि त्याचे जोडीदार बौद्ध व जैन हे नवे धर्म जणों काय हातांत हात घालून चालत होते. चिं० वि० वैद्य,—मध्ययुगीन भारत.

६०. हातातोंडाशीं गांठ पडणें—

(क) चोंब मारणें.

(ख) घास तोंडांत पडणें; खावयाला सुरुवात होणें. उ० दोन दिवसांच्या उपासा-नंतर एकदाची माझ्या हातातोंडाशीं गांठ पडली!

६१ हाताला येईल तें—जें काही हातांत सापडेल तें; ज्याच्यावर हात पडेल तें. उ० घराला आग लागली, तेव्हा आम्ही सारीं माणसें घरांतले पदार्थ बाहेर काढू लागलों; ज्याच्या हाताला जें येईल, तें तो उचलून आणून अंगणांत ठेवीत होता.

६२. हाताला लागणें—

(क) गमावलेल्या, फुकट गेलेल्या, नासलेल्या किंवा बिघडलेल्या वस्तूंतून अल्प अंश मिळणें. उ० तुम्ही सोन्याच्या दागिन्यांत बेलाशक पैसा घाला; मोत्यांत किंवा कापडांत घालू नका. कारण, शेवटी मोत्यांतून किंवा कापडांतून हाताला काही-सुद्धा लागत नाही.

(ख) दुसऱ्याच्या पैशाची किंवा सामानसुमानाची व्यवस्था करीत असतां आपल्या उपभोगाकडे त्याचा कांही अंश येणें.

६३ हाताला एखाद्या वस्तूचा विटाळ—हाताला अपवित्र पदार्थाचा स्पर्श. उ० ज्यांच्या हातास मराठी पुस्तकाचा विटाळ कधी सोसावयाचा नाही व मराठी कवींचें तर ज्यांनी कधी मुखावलोकनहि करावयाचें नाही, असे बडे बडे किताबधारी तुकारामा-पुढे लीन झाले......निबंधमाला,—विष्णुशास्त्री चिपळूणकर.

६९. हातपाय

१. हातपाय गळणें—

(क) खचून जाणें; नाउमेद होणें, धीर सोडणें. उ० अरे, तू एकदाच नापास झालास आणि तुझे हातपाय गळाले! आश्चर्य आहे! उमेद बाळग. यंदा नाहीतर पुढच्या वर्षी पास होशील!

(ख) अशक्त होणें. आज पांच सहा महिने पांडोबा मलेरियानें आजारी आहे. त्याचे हातपाय अगदी गळून गेले आहेत.

२ एखाद्यावर हातपाय चोळणें—त्याच्यावर रागानें चरफडणें.

३. हातपाय पसरणें—

(क) एखाद्या कामांत आळस करणें.

(ख) एखादें काम आपल्या हातून होत नाही, असें म्हणणें; सबबी सांगणें.

(ग) ठरलेल्या मर्यादेच्या किंवा पल्ल्याच्या बाहेर जाणें; विस्तार पावणें.

(घ) मरणाच्या वेळीं हातपाय ताणणें.

४ हातपाय पांघरून किंवा पोटाळून बसणें—आळशासारखें नसणें.

५ हातींपायीं अन्न येणें—खाल्लेलें अन्न जडसें वाटणें. उ० आजचें जिलबीचें जेवण माझ्या हातीं पायीं आलें आहे! –

६. हातपाय फुटणें—

(क) थंडीमुळे हातापायांना भेगा, चिरा पडणें.

(ख) लबाड्यांत, कुचेष्टांत तरबेज होणें. उ० अलीकडे आमच्या नोकराला हातपाय फुटले आहेत!

(ग) खर्चलें जाणें; उधळपट्टी सुरू होणें. उ० त्या दौलतीला अलीकडे हातपाय फुटूं लागले आहेत!

७ हातपाय मोकळे करणें (किंवा होणें)—चालून किंवा फेरफटका करून हातपाय सैल, साफ किंवा हलके करणें (किंवा होणें). उ० दुपारचें जेवण झाल्यापासून तों आतापर्यंत मी मांडी घालून जमाखर्च लिहितों आहे. आता देवदर्शनास जातों, म्हणजे जरासे हातपाय मोकळे होतील.

८. एखाद्याचे हातपाय मोडणें—

(क) त्याला बलहीन किंवा सामर्थ्यहीन करून टाकणें; निःसत्त्व करणें; त्याला हरकत करणें.

(ख) ताप यावयाच्या अगोदरचा अशक्तपणा (किंवा निरंगळी) येणें. याच अर्थानें "हातपाय मोडून येणें" किंवा "अंग मोडून येणें," याचाहि उपयोग होतो.

९ हातपाय सोडणें—मरणकाळच्या यातनांमुळे हातपाय ताणणें किंवा ताठ करणें.'

१०. हातपाय गाळणें—

(क) निराश, नाउमेद होणें.

(ख) अशक्त होणें; रोड होणें.

११. हातपाय गुंडाळणें—

(क) अंतकाळच्या वेदनेमुळे हातपाय आखडणें. उ० त्यानें आपले हातपाय गुंडाळले. उ० त्याचे हातपाय गुंडाळतच आले आहेत.

(ख) हरकत करणें; अडथळा करणें. उ० मीं त्याचे हातपाय अगदी गुंडाळून टाकिले आहेत; त्याला आता काही देखील उपद्रव करतां येणार नाही!

१२ हातपाय चोळणें—सूड घेण्याची प्रतिज्ञा करणें. उ० रामभाऊंच्यावर हातपाय चोळून तो म्हणाला, इ०

१३. हातपाय झाडणें—

(क) अंतकाळच्या वेदनांमुळे हातपाय इतस्ततः हासडणें.

(ख) बचावासाठी, सुटकेसाठी हातापायांचा उपयोग करणें.

१४ हातपाय ताणणें—आरामानें, सुखानें किंवा कांही काळजी नसल्यामुळे हातपाय पसरून पडणें.

१५ हातपाय आपटणें—अंतकाळच्या वेदनांमुळे किंवा संतापानें हातपाय इतस्ततः हासडणें.

१६ हातपाय हालविणें—उद्योग, प्रयत्न, परिश्रम, मेहनत, खटपट करणें. उ० लोक तुझ्याबद्दल किती भाष सोसतील? तूं स्वतः कांहीतरी हातपाय हालविशील की नाही?

१७ हातांपायांचा चौरंग होणें—पेटके वगैरेंच्या योगानें हातपाय आखडणें.

१८ हातांपायांच्या फुंकण्या होणें—आजार वगैरेंच्यामुळे अत्यंत रोड होणें.

१९ हातांपायां पडणें किंवा हातींपायीं पडणें—गयावया करणें; नम्रपणें प्रार्थना करणें; नम्र होणें; शरण येणें; दया भाकणें; काकुळतीनें विनविणें. उ० तो मारवाडी माझ्यावर फिर्याद करावयाला तयार झाला होता; पण मी त्याच्या हातीं-पायीं पडलों, तेव्हां त्यानें मला आणखी एका महिन्याची मुदत दिली.

२० हातींपायीं उतरणें, सुटणे किंवा मोकळी होणें—प्रसूतीच्या धोक्यातून निभावणें उ० गोपिकाबाई हातींपायीं सुटली (म्ह० कांही त्रास न होता प्रसूत झाली). (घोडी, म्हैस किंवा गाय इ० संबधानेंहि हा वाक्प्रचार योजला जातो).



७० नामाच्या अंतर्भावानें जे वाक्प्रचार सिद्ध झालेले आहेत, त्याचे आम्हीं दोन विभाग केले आहेत. शरिराचे अवयव व इंद्रियें, ह्यांचीं द्योतक अशीं जीं नामें त्याच्या अंतर्भावानें बनलेले जे वाक्प्रचार, ते आम्हीं येथपर्यंत दिले. आता इतर नामें अंतर्भूत होऊन जे वाक्प्रचार सिद्ध झाले आहेत, ते वर्णानुक्रमानें देतों. दोन्हीहि विभागांत नामें प्रायः क्रियापदाच्या साहचर्यानें आलेलीं आहेत, हें विद्यार्थ्यांच्या सहज लक्षांत येण्याजोगें आहे.

७१ अंगाई करणें—मुलाला निजवितांना आया जें गाणें म्हणतात, त्याच्या आरंभीं 'अंगाई' हा शब्द आहे; यावरून 'अंगाई करणें' म्हणजे निजणें किंवा निजविणें. मोठ्या माणसांच्या संबंधानें हा वाक्प्रचार विनोदानें योजण्यांत येतो.

७२ अग्निकाष्ठ भक्षण करणें—अग्नींत प्रवेश करणें; स्वतःस जाळून घेणें. उ० छत्रपति शिवाजी महाराजांची एक बायको मोहित्याची कन्या पुतळाबाई, हिनें पतिदहनसमयीं अग्निकाष्ठ भक्षण केलीं. उ० जयद्रथ आटळतें नव्हता आणि सूर्यंतर मावळला, तेव्हां अर्जुन अग्निकाष्ठ भक्षण करण्यास सिद्ध झाला.

७३ अटकेस झेंडा मिरविणें किंवा लावणें—सिंधु नदीच्या एका फाट्याचें नाव अटक असें आहे. ही नदी हिंदुस्तान आणि अफगाणिस्तान यांच्या सरहद्दीवर आहे. मऱ्हाठे वीरांची महत्त्वाकांक्षा अटकेपर्यंत राज्य काबीज करून तेथें आपले झेंडे (म्ह० स्वामित्वाचीं निशाणें) उभारण्याची होती. यावरून "अटकेस झेंडा लावणें" वगैरे शब्दसंहतींचा उपयोग शतकृत्य करणें, लोकोत्तर असें कांहीं तरी कृत्य करणें ह्या अर्थानें होतो. [ह्या उपयोगांत निंदा गर्भित असते].

७४ एखाद्याचीं अंडींपिल्लीं बाहेर काढणें—काळजीपूर्वक लपवून ठेवलेलीं त्याचीं रहस्यें किंवा लाजिरवाण्या गुप्त गोष्टी उघडकीस आणणें. [पक्षी आपलीं अंडीं आणि पिलें आपल्या घरट्यांत खोल लपवून ठेवतात].

७५. अंत

१. अंत—

(क) शेवट; मृत्यु; समाप्ति. उ० इ० सन १६८० च्या एप्रिल महिन्याच्या ५ व्या तारखेस, रविवारीं श्रीशिवाजी महाराजांचा अंत झाला (म्ह० ते मरण पावले). उ० माझा ग्रंथ अद्यापि अंतास गेला नाहीं.

(ख) (व्याकरणांत) शेवटचा स्वर. उ० 'घोडा' हा शब्द आकारान्त आहे. उ० येणी हा शब्द ईकारान्त आहे.

(ग) काम करण्याची, उपयोगी पडण्याची ताकद. उ० ह्या धोतरांत आता कांहीं अंत राहिला नाहीं! तें टाकून देऊन दुसरें घ्या.

२. एखाद्याचा अंत पाहणें—त्याला पुरतेपणीं कसास लावणें; त्याजपासून निघेल तितकें काम काढणें. एखाद्या जनावराचा, माणसाचा किंवा पदार्थाचा होईल तितका उपयोग निर्दयपणें किंवा निःशंकपणें करून घेणें; त्याची ताकद, जोर, सहन-शक्ति किंवा कर्तृत्वशक्ति जितकी असेल, तितकीचा पूर्णपणें उपयोग करारीपणानें करून घेत राहणें; त्याला छळणें किंवा गांजणें. उ० देवा, आता माझा अंत पाहूं नको! सोडीव मला ह्या जाचातून!

३ अंत लागणें—शेवट दिसणें; खोली समजणें किंवा सापडणें. उ० लोह-गडच्या किल्ल्यात एक गुहा आहे. तींत मलकाप्पा एक मैल खोल गेला, तरी तिचा त्याला अंत लागला नाही! उ० ह्या विहिरींतील पाण्याचा अंत अद्यापि कोणासहि लागलेला नाही.

४ अंताला लागणें—व्यवस्थित स्वरूप पावणें; शेवटास जाणें. उ० हें कार्य एकदाचें अंताला लागलें!

### ७६. अंतर

१ दोन वस्तूंतील किंवा स्थितींतील तफावत; दूरपणाचें माप.

२ एखाद्याला अंतर देणें—प्रेम कमी करून त्याचा परित्याग करणें. उ० माझ्या जिवात जीव आहे तोपर्यंत मी ह्या धाकट्या भावाला अंतर देणार नाही, अशी मीं बाबांच्या मरणसमयीं त्यांच्या पायांवर हात ठेवून शपथ घेतली होती.

३ अंतर पडणें—मित्रत्वात, प्रेमभावात, न्यूनता उत्पन्न होणें. उ०

प्रभु त्यासि पुसे, "भ्रात्यासी हें अतिवैर कसें घडलें।
साग साविस्तर कोणापासुनि कैसें अंतर पडलें" ॥ मोरोपंत.

७७ अत्तराचे दिवे जाळणें—जेथे साध्या तिळाच्या तेलानें काम व्हावयाचें तेथे तितक्याच प्रकाशासाठी अत्तरें समयांत घालणें, ही मूर्खपणाची उधळपट्टी होय. यावरून अत्तराचे दिवे जाळणें म्ह० पैशाची उधळपट्टी करणें.

७८ अद्दल घडणें—ठोकर बसणें; मोठें नुकसान होऊन धडा मिळणें. [अद्ल् हा शब्द अरबी असून, त्याचा त्या भाषेंत इनसाफ, न्याय असा अर्थ आहे; परंतु जे कोणी आपला तंटा तोडून घेण्यासाठी कोर्टांत जातात, त्यांच्या इच्छेविरुद्ध, (निदान त्यांपैकी एकाच्या तरी इच्छेविरुद्ध) निकाल लागावयाचाच. त्यामुळें हा असंतुष्ट मनुष्य निकालास शिव्या देऊन म्हणतो, "मला मोठी अद्दल घडली!" अशा रीतीनें "अद्दल" ह्याचा अर्थ मराठींत "ठोकर" असा झाला. पुढे "तुल्यकल्प" प्रकरणांत पाहा. तसेंच आमचें "मराठी शब्दांचें उद्घाटन," पान ५१ पाहा].

### ७९. अन्न

१ अन्न—खाद्य पदार्थ; चारितार्थाचीं साधनें.

२ अन्न अन्न करणें—खावयाला अन्न द्यां, खावयाला अन्न द्या, अशी काकुळतीने याचना करणें; अन्नाच्या अभावीं हैराण होणें.

३ एखाद्याला अन्नाला लावणें—त्याला चारितार्थाचें साधन मिळवून देणें; त्याला नोकरी वगैरे लावून देणें.

४ एखाद्याच्या अन्नांत माती कालविणें—त्याच्या चारितार्थाचीं साधनें नाहीशीं करणें.

८० (एखाद्याच्या) अर्ध्या वचनांत असणें—त्याची आज्ञा पाळण्याला, तो सांगेल तें तत्परतेने करावयाला सिद्ध असणें. उ० शिवरामपंत माझ्या अर्ध्या वचनांत आहेत. त्याना मीं ही मुलगी सून करून घ्या, असें सांगितल्यास ते तें मान्य करतील. [ आज्ञेचें वाक्य मुखांतून अर्धे बाहेर पडतें न पडतें तोंच ह्या आज्ञेप्रमाणे काम करावयाला सुरुवात करणें असा " अर्ध्या वचनात असणें " ह्याचा अर्थ आहे ].

८१ अर्ध्या हळकुंडाने पिवळें होणें—थोड्याशा लाभाने अति आनंदित होणें किंवा फुगून जाणें; थोडक्याने संतुष्ट होणें; अल्पसंतोषी असणें; थोडक्यांत समाधान पावणें. [ चांगल्या किंवा वाईट अर्थाने ह्याचा उपयोग होतो. ]

८२. अवदसा

१. अवदसा—[ सं० अवदशा ].

( क ) निकृष्ट, कष्टमय स्थिति; दुर्दैव.

( ख ) ( लाक्षणिक अर्थाने ) द्वाड, भांडखोर, कजाग स्त्री.

२ अवदसा आठवणें—निकृष्ट स्थिति, दारिद्य, अवनति किंवा दुःख प्राप्त होईल, असें वर्तन करण्याची प्रवृत्ति किंवा इच्छा होणें. उ० तू मुळी देतील अभ्यास करीत नाहीस ! तुला अवदसा आठवली आहे !

८३ अवाक्षर न बोलणें किंवा काढणें—अक्षरसुद्धा तोंडावाटे न काढणें. उ० तुला मी चतुःशृंगीला नेईन, म्हणून एकदा सांगितलें; आता त्यासंबंधाने अवाक्षर बोलूं नको !

८४ अव्यापारेषु व्यापार करणें—नसता उद्योग करणें; ज्या उद्योगापासून स्वतःस फायदा होण्यासारखा नाही, वेळेनुसार नुकसान होण्याचा संभव आहे, असा उद्योग करणें.

८५ अळंटळं करणें—आपणास जें करावयाचें काम असेल, त्यांत सुस्वाचुकव किंवा आळस करणें; तें लांबणीवर टाकण्याचा प्रयत्न करणें; तें मन लावून न करणें.

८६. अक्षता

१ अक्षता—कुंकवाने तांबडे केलेले तांदूळ.

२ अक्षत देणें—लग्न, मुंज वगैरेंच्या समारंभास ज्यांना बोलवावयाचें असेल,

त्यांच्या घरीं जाऊन त्यांना कुंकवाने तांबडे केलेले तांदूळ देऊन आमंत्रण करतात. ह्या तांदुळांना अक्षता म्हणतात व ह्या प्रकाराला " अक्षत देणें, " असें म्हणतात. " अक्षत " हें " अक्षता " ह्याचें मराठी रूप.

३ अक्षता पडणें—विवाहाच्या वेळीं वधू व वर ह्यांच्या मस्तकांवर " शुभमंगल सावधान ! " असे शब्द उपाध्यायांनी उच्चारले, म्हणजे अक्षता टाकतात. ह्यावरून " *त्याच्या किंवा तिच्या डोक्यावर अक्षता पडल्या,* म्हणजे " *त्याचें किंवा तिचें लग्न झालें* " असा अर्थ.

८७. आ करणें—( क ) तोंड उघडणें; तोंड वासणें. उ०

तूं जेवि देवकीला भेटसि तैसाच भेट आतेला ।
आम्हाहुनि तूंचि अधिक, घृत सोडुनि कोण करिल आ तेला ! ॥
मोरो०,—कृष्णशिष्टाई.

( ख ) एखाद्या वस्तूचा स्वीकार करावयाला तत्पर असणें.

## ८८. आकाश

१ त्याला आकाशपाताळ एक झालें आहे—तो गर्वानें अतिशय फुगून गेला आहे.

२ आकाशपाताळ एक होणें—अतिजोराचा पाऊस पडत असणें. [ पाऊस जोराने पडत असला म्हणजे पृथ्वीचा पृष्ठभाग व त्याच्यावरील घरें, झाडें वगैरे दिसत नाहींतशीं होऊन जिकडे तिकडे आभाळच असल्याप्रमाणें देखावा दिसतो ].

३ आकाशपाताळ एक करणें—( क ) क्षोभ किंवा कल्लोळ करणें; खूप जोराने आणि मोटमोठ्यानें ओरडून एखाद्याला रागें भरणें. [ ख ] भुकेमुळें अतोनात रडणें ( मुलासंबंधानें ).

४ आकाशाला घेरा घालणें—प्रचंड पराक्रम किंवा अवाढव्य काम करणें; अशक्य म्हणून समजलेलें काम करणें. उ० हें काम तूं पार पाडलेंस, तर तूं आकाशाला घेरा घातलास, असें आम्ही समजूं !

५ आभाळाला किंवा आकाशाला गवसणी घालणें—अशक्य गोष्ट किंवा आपल्या शक्तीच्या बाहेरची गोष्ट करावयाला उद्युक्त होणें.

६ आकाशाची चौघडी करणें—" आकाशाला घेरा घालणें " ह्याच्याप्रमाणेच अर्थ.

आकाशाची करूंवेल चौघडी ।
महामेरूची बांधवेल पुडी ।
शून्याची मुरडवेल नरडी ।
परी मनाच्या ओढी अनिवार ॥ —ज्ञानेश्वरी.

७ अस्मान किंवा आकाश ठेंगणें होणें—गर्वानें फार फुगून जाणें; गर्वानें आकाशापेक्षाहि आपण जास्त उंच होणें.

८९ आखाड्यांत उतरणें—पहिलवान लोकांची कुस्ती खेळावयाची जी जागा, तिला "आखाडा" असें म्हणतात. यावरून "आखाड्यांत उतरणें" म्हणजे कुस्ती खेळावयास, दोन हात करावयास किंवा वादविवाद करावयास सिद्ध होणें, असा अर्थ होतो.

९०. आग

१ आग—अग्नि; विस्तव.

२. आग लावणें किंवा आग लावून देणें—

(क) पेटविणें. उ० चोरट्यांनी तो गाव लुटला आणि मग त्याला आग लावून दिली.

(ख) दोन माणसांत कलह उपस्थित करणें; त्यांच्यांत कलागत लावणें.

३ आगींत तेल ओतणें—भांडण किंवा राग जास्ती विकोपास जाईल असें करणें.

४ एखाद्यावर आग पाखडणें—त्याच्यावर शिव्यांचा वर्षाव करणें.

९१ आघाडी साधणें—इतरांच्या पुढे जाणें; इतरांच्या अगोदर इष्ट वस्तु मिळविणें.

९२ आडकित्त्यांत धरणें—पेंचांत धरणें; अडचणींत घालणें. [आडकित्त्यांत सुपारी चांगली धरल्याशिवाय तिची चांगली शकलें करिता येत नाहीत].

९३ आडवें होणें—झोप घेण्याच्या उद्देशानें आथरुणावर पडणें. उ० दुपारचें जेवण झाल्यावर मी जरा आडवा होईन आणि नंतर तुझें काम हातीं घेईन.

९४ आडून गोळी मारणें—लढाईच्या वेळीं शिपाई लोक झाडें, टेकड्या, धोंडे, मातीचीं ढिखळें वगैरेंच्या आड लपून शत्रूच्या सैन्यावर बंदुका झाडतात; त्याप्रमाणें समाजांत काही दुष्ट लोक स्वता पुढाकार न घेतां, दुसऱ्याला पुढे करून एखाद्याचें नुकसान करतात. त्यांच्या ह्या करणीला "आडून गोळी मारणें" असें म्हणतात.

९५ आपण मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाही—आपण अंगानें कष्ट सोसल्याशिवाय सुखस्थिति प्राप्त होत नाही. आपण स्वता अंगमेहनत केल्याशिवाय काम मनाप्रमाणें होत नाही. दुसऱ्यावर विश्वास टाकल्यास काम होतेंच, असें नाही.

९६. आभाळ

१ आभाळ—आकाश. उ० ह्या वेळीं आभाळांत ढग आले आहेत.

२ एखाद्यावर आभाळ कोसळणें—त्याला पराकाष्ठेची विपत्ति प्राप्त होणें; त्याच्यावर फार मोठा अनर्थ गुदरणें.

३ आभाळ फाटणें किंवा कोसळणें—फार मोठा अनर्थ ओढवणें. उ० बाई, रडूं नका! झाल्या गोष्टीला इलाज नाही! आभाळ फाटलें त्याला ठिगळ कोण देणार! [फार पाऊस पडूं लागल्यास 'आज काय आभाळच फाटलें आहे की काय कोण जाणें,' असेंहि म्हणतात].

९७ आयत्या पिठावर रेघा ओढणे—श्रमावांचून मिळालेल्या संपत्तीवर चैन करणें. ह्याच अर्थाची म्हण, "आयत्या बिळावर नागोबा बळी."

## ९८. आव

१ आव—अवसान; उत्साह; धैर्य. उ०

गुरुहि म्हणे, "कर्णा, हा तक्षकचि गरल करूनि आ वमला।
आहे संकोचें परि सोडुनि गेला मघाचि आव मला॥"—मोरोपंत.

२ आव घालणे—अवसान दाखविणें; अमुक गोष्ट करावयला आपण समर्थ आहों, असा डौल मिरविणें; धमकदारीचा देखावा करून एखाद्या गोष्टीला उपक्रम करणें.

९९ आढी किंवा अढी धरणें—मनात वैरभाव जागृत ठेवणें; रुसवा किंवा प्रतिकूल ग्रह मनात धुमसत राहू देणें.

१०० आवळा देऊन कोहळा काढणें—एखाद्याला लहान वस्तु देऊन त्याच्यापासून मोठी वस्तु मिळविणें (त्याला गोड गोड भाषणाने फसवून किंवा खूष करून). आवळा हें लहान फळ आहे आणि कोहळा हें मोठें फळ आहे, यावरून हा वाक्प्रचार निघाला आहे. ["कोहळा" शब्दाबद्दल "बेल" हा शब्दहि योजण्यांत येतो].

१०१ आहारीं असणें—आटोक्यात असणें. जिवाविशेष नसणें. [जेवढें अन्न कोणा एखाद्या मनुष्याने खाहें असता सुखाने पचतें, तेवढ्या अन्नाला त्याचा "आहार" म्हणतात; यावरून जें काम श्रम वाटल्याशिवाय करता येण्यासारखें असतें, तें "आहारीं आहे," असें म्हणतात].

१०२ आळा घालणें—मर्यादा किंवा नियंत्रणा घालून देणें.

१०३ आळशावर गंगा येणें—गंगेच्या उदकाचा कोणत्याहि माणसाला स्पर्श झाला असतां त्या माणसाचा उद्धार होतो. यासाठी गंगेचें स्नान घडावें म्हणून सर्व लोक लांबलांबचे प्रवास करावयास सिद्ध होतात. आळशाला देखील आपला उद्धार व्हावा, अशी इच्छा असते; परंतु अंगात अति आळस असल्यामुळे तो गंगास्नानासाठी गंगेकडे जात नाही. परंतु त्याच्यावर प्रसाद करण्यासाठी गंगाच जर त्याच्याकडे वाहत

आली, तर त्याचें मोठें भाग्यच समजलें पाहिजे ! "आळशावर गंगा येणें" म्हणजे आपल्या कल्याणासाठी मुळीच खटपट न करणाऱ्या माणसानें सुदैवानें कल्याण होणें. उ० मल्हाररावांनी नोकरीसाठी अर्जविनंत्या करावयाचे ते काहीच केले नाहीत. तथापि त्यांच्या गुणावरून रावसाहेबांनी त्यांची एका जागीं नेमणूक केली; आळशावर गंगा आली ती.!

१०४ इकडचा डोंगर तिकडे करणें—प्रचंड किंवा फार मोठें काम करणें.

१०५ इंगा फिरणें—इंगा म्हणून चांभाराचें एक हत्यार असतें. तें कातड्यावर जोराने ठोकून फिरवून तें कातडें मऊ आणि गुळगुळीत करतात. कातड्यावर इंगा फिरला म्हणजे तें टणक, खरखरीत किंवा राठ असलें, तरी मऊ, गुळगुळीत व लुसलुशीत होतें. त्याप्रमाणे "एखाद्या माणसावर इंगा फिरणें," म्ह० तो दुर्दैवाच्या किंवा समर्थाच्या अवकृपेच्या तडाख्यात सापडून त्याचा ताठा जाऊन तो नरम होणें.

१०६ इतिश्री होणे (किंवा करणें)—समाप्त होणें (किंवा करणें). संस्कृत पुस्तकाच्या शेवटी किंवा त्यांतील अध्यायांच्या शेवटीं, जे समाप्तिसूचक वाक्य असतें, त्याचे पहिले शब्द "इति श्री" असे असतात. यावरून इतिश्री म्ह० समाप्ति किंवा शेवट असा अर्थ झाला, आणि "इतिश्री करणें (किंवा होणें)" ह्याचा अर्थ नाश करणें, संपविणें (किंवा नष्ट होणें, संपणें) असा झाला.

१०७. इमानास जागणें—

(क) इमान नष्ट न होऊं देणें; इमान शाबूत ठेवणें.

(ख) पूर्वीचे उपकार कृतज्ञतापूर्वक स्मरून वागणें.

१०८. ईर

१ ईर [सं० वीर्य]. ईर—शक्ति; जोर; गुण; उत्कर्ष. "ईर" ह्या शब्दाचें "इरेस" हें एकच विभक्तिरूप योजण्यांत येतें.

२ इरेस घालणें—आपला बचाव करून घेण्यासाठी दुसऱ्या कोणास तरी आपल्यापुढे घालणें किंवा ठेवणें. [बुद्धिबळाच्या डावांत राजाला प्रतिपक्ष्याने शह दिला, म्हणजे आपलें काहीतरी मोहरें राजाच्या बचावासाठी पुढे सारतात, त्याला "इरेस घालणें" म्हणतात]. उ० एके प्रसंगीं नाना फडणविसांनी निजामास इरेस घातलें होतें.

३. इरेस चढणें—

(क) चुरस लागून आपलें वर्चस्व स्थापित करण्यासाठी पुढे सरसावणें.

(ख) आपला पराक्रम, हिंमत वगैरे दाखविण्यासाठी कंबर बांधून सिद्ध होणें. ["इरेस किंवा इरईस पडणें" ह्याचाहि वरीलप्रमाणेच अर्थ. "इरई" हा "वीरश्री" चा अपभ्रंश].

१०९ उकळी फुटणें—मनोविकाराचा जोर किंवा क्षोभ अंतःकरणांत एकाएकी होणें. उ० जय मिळवून आलेल्या भाऊसाहेबास पाहतांच लोकांना आनंदाची उकळी

फुटला. [ आणि अग्निसंयोगाने पाण्याला, दुधाला उकळी वगैरे फुटते, तें रूपक येथें आधारभूत आहे. ]

११० उकिरडा फुंकणे—गुरेंढोरें, गाढवें उकिरड्यावर उष्ट्या पत्रावळी वगैरे चाटीत असतात आणि त्या वेळीं त्यांच्या नाकपुड्यांतून बाहेर पडणाऱ्या उच्छ्वासाचा पत्रावळींवर जोराचा आघात होऊन फुंकणीच्या वाऱ्याप्रमाणे मोठा आवाज होत असतो. ह्या सादृश्यावरून "उकिरडा फुंकणें" म्ह० दारिद्र्यामुळे यःकश्चित् लाभासाठी भटकणें. उ० तू आता विद्या करीत नाहीस! मोठेपणीं उकिरडे फुंकणार की काय?

१११ (एखाद्याचें) उखळ पांढरें होणें—त्याला वैभव प्राप्त होणें.

११२ उखाळ्या पाखाळ्या काढणें—वर्मेकर्मे काढणें. एखाद्याच्या हृदयाला बोचण्यासाठी त्याच्या लाजिरवाण्या गोष्टी काढून त्या बोलून दाखविणें. उ० श्रीनिवासराव आणि पितांबरराव हे एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढून एकसारखे दोन तास भांडत होते!

११३. उच्छाद

१ उच्छाद—उपद्रव; सतावणूक; गांजणूक. [ क्रियापदें आणण, देणें, येणें ].—

२ एखाद्याला उच्छाद देणें—त्याला सतावणें.

३ उच्छाद येणें—त्रास, उपद्रव होणें. उ० मुलाच्या धिंगामस्तीने मला उच्छाद आला आहे.

४ उच्छाद काढणें—गांजणूक सोसणें. उ० ह्या मुलाचा उच्छाद मी काढूं तरी किती?

११४ उजेड पाडणें—प्रकाश पाडणें; मोठें कृत्य करणें. [ याची नेहेमी उपहासाने योजना होते ]. उ० आम्हीं तर हात टेकले! आता तुम्ही काय उजेड पाडतां पाहूं!

११५ उठतां लाथ बसतां बुक्की—सदासर्वदा मार. उ० तुला उठता लाथ आणि बसतां बुक्की असें पाहिजे. एऱ्हवी तूं ताळ्यावर येणार नाहीस!

११६ उडत्या पांखरांचीं पिसें मोजणारा—पाखरूं उडत असतां त्याचीं पिसें मोजणें हें काम अशक्य किंवा दुर्घट आहे. तें जो कोणी करूं शकेल, तो हुशारच असला पाहिजे. यावरून "उडत्या पाखरांचीं पिसें मोजणारा," ह्याचा हुशार, कावेबाज, पाताळयंत्री माणूस असा अर्थ होतो. [ ही शब्दसंहति ने मी वाईट अर्थाने योजण्यांत येते ].

११७ उदक किंवा पाणी सोडणें—ब्राह्मणाला दान करतेवेळीं दावयाच्या

वस्तूवर यजमान उदक म्हणजे पाणी सोडतो. यावरून "एखाद्या वस्तूवर उदक सोडणें," ह्याचे पुढील दोन अर्थ झाले.

(क) ती देऊन टाकणें; तिच्यावर आपली मालकी नाही, असें म्हणणें.

(ख) तिच्याबद्दल हळहळ वाटून न घेणें.

११८ उधे उधे करणें—"उधे, उधे" हे शब्द "उदय, उदय" ह्याचे अपभ्रंश आहेत. उदय! उदय!! म्हणजे उदय होवो जयजयकार असो! वैभव दिसो! भरभराट होवो! "उदय" ह्या शब्दाचें अपभ्रष्ट रूप उदे किंवा उधे असें आहे. देवीचे भक्त तिच्यापुढे दंडवत घालताना किंवा भिक्षा मागताना, "उदे उदे" किंवा "उधे उधे" हें शब्द उच्चारतात. ह्या चालीवरून उधे उधे करणें म्ह० फार फार स्तुति करणें असा अर्थ पुढे रूढ झाला. एखाद्या पदार्थाची किंवा माणसाची, उधे उधे करणें म्ह० त्याचे फाजील गोडवे गाणें किंवा त्याला नसतें महत्त्व देणें. उधे उधे ह्याचा पुल्लिंगी आणि स्त्रीलिंगीहि प्रयोग होतो.

११९ उंबरें फोडून कैंबरें काढणें—उंबराच्या फळांत जे क्षुद्र जंतु असतात, त्याना "कैंबरें" म्हणतात. मोठया कामाची नासाडी करून जेव्हा कोणी लहान काम करतो, तेव्हा "त्याने उंबरें फोडून कैंबरें काढलीं," असें म्हणतात

१२० उंबरघाट—उंबरा हाच कोणी घाट. पर्वताचा घाट ओलांडणे हें फार कठीण असतें. त्याप्रमाणे घराचा उंबरा ओलांडून बाहेर निघणें हें महा कर्म कठीण असतें कारण, घरातून विद्या, नोकरी, धंदा वगैरेंसाठी बाहेरगावीं पडणें प्रत्येकाच्या जिवावर येतें. तेव्हा तो म्हणतो, "हा उंबरघाट ओलांडणें म्हणजे महा कर्म कठीण आहे!"

१२१ ऊत येणें—कढी, दूध, खीर वगैरे पदार्थ चुलीवर ठेविले, म्हणजे ते उतू जातात, म्हणजे त्यातील पाण्याचा अंश फेस आणि वाफ ह्यांच्या रूपाने बाहेर पडतो. हा अंश भांड्यांत राहू शकत नाही. यावरून "ऊत येणें" म्हणजे आंत न राहण्याइतकें पुष्कळ होणें किंवा संख्या अथवा परिमाण वाढून अतिरेक होणें. उ० हल्ली व्याख्यानांना, प्रहसनांना, मारामाऱ्याना ऊत आला आहे. यदा आव्यांना ऊत आला आहे.

१२२ ऊहापोह करणें—चर्चा करणें. ऊह = तर्क; अपोह = उलटा तर्क. "एखाद्या विषयाचा ऊहापोह करणे," म्ह० त्याच्यासंबंधी सर्व बाजूनी तर्कवितर्क करणें किंवा त्याची पुरती शहानिशा करणे.

१२३ एक नाही की दोन नाही—मुळीच कांही उत्तर नाही. उ० "तुला कोणी मारलें?" म्हणून मीं त्याला दहा वेळा विचारिलें, पण तो आपला स्वस्थ उभा! एक नाही की दोन नाही!

१२४ एका नावेंत असणें—एकाच परिस्थितींत असणें. हें एका इंग्रजी संप्रदायाचें मराठी भाषांतर आहे, असें कोणी समजतात. परंतु आमच्या मतें "एकाच

गावेंत असणें," हा अस्सल मराठी संप्रदाय आहे. तो मोल्स्वर्थच्या कोशात दिला आहे. त्याची पहिली आवृत्ति १८३१ सालीं आणि दुसरी १८५७ सालीं छापली गेली होती.

१२५ एका पायावर तयार असणें—एखादी गोष्ट करावयाला अत्यंत उत्सुक असणें. उ० माझी मुलगी फिरायाला जावयाला एका पायावर तयार असते. मारामारी करावयाला सटवाजी सदा एका पायावर तयार असतो!

१२६ एकूण क्षेत्रफळ सारखेंच—एखाद्या खोलीची लांबी ६ फूट आणि रुंदी ४ फूट असली, तर तिचें क्षेत्रफळ २४ चौरस फूट होतें. तिची लांबी वाढवून ८ केली आणि रुंदी कमी करून ३ केली, तरी तिचें क्षेत्रफळ चोवीस चौरस फूट होतें. यावरून एकूण क्षेत्रफळ एकच किंवा सारखेंच किंवा तेंच; ह्याचा अर्थ परिणाम किंवा फळ एकच. दोन्ही गोष्टी सारख्याच किंवा एकूण एकच असा झाला. उ० जिलबीच्याबद्दल तुम्ही पुरणपोळी केली, तरी क्षेत्रफळ तेंच. कारण, जिलबी तळावयाला जितकें तूप खर्च होणार, तितकेंच पुरणपोळीला वरून वाढावयाला लागणार!

१२७ ओचा ठो करतां न येणें—मुळीच कांही न येणें. मुलाच्या विद्येला सुरुवात करतांना त्याला "ओनामासिधं" ("ओम् नमः सिद्धम्" याचा अपभ्रंश) शिकवितात. "ओनामासिधं" याचें पहिलें अक्षर "ओ" हें आहे. तेंहि ज्याला येत नाही, तो ठोंब्याच असावयाचा. "ठो" हें अक्षर "ओ" शीं यमक साधण्यासाठीच केवळ योजलेलें आहे.

१२८ ओमफस् होणें—निष्फळ होणें; लयास जाणें. उ० आम्ही आदित्यवारीं अंबरनाथास वनभोजनासाठी जाणार होतों; परंतु आदित्यवार उजाडतो, तों अशी खबर आली की, त्या गावीं पटकीचा उपद्रव आहे. तेव्हा आमचें जाणें रहित होऊन सारेंच ओमफस् झालें!

१२९ ओ म्हणतां ठो येईना—अगदी काही येईना! अगदीच मतिमंद!

१३० औषधाला नसणें—औषधाला पदार्थ घ्यावयाचा, तो अगदी अल्प प्रमाणांत घ्यावयाचा असतो. तेवढाहि पदार्थ नसणें म्हणजे मुळीच नसणें.

१३१ कच्छपीं लागणें—आपलें कार्य साधण्यासाठी दुसऱ्याच्या कासोट्याप्रमाणे त्याच्या मागोमाग जाणें; स्वकार्यास्तव एखाद्याच्या मागे लागणें; त्याची पाठ पुरविणें. उ० रामराव कापडवाला अलीकडे गोवर्धनपंताच्या कच्छपीं लागला आहे! आपल्या दुकानांतील कापड त्यानी खरेदी करीत जावें, हाच त्याचा उद्देश दिसतो. [कच्छ म्ह० कासोटा, त्याचें "कच्छप" हें विनोदी किंवा आडमुठें रूप].

१३२ कडी करणें—चढाओढ करून श्रेष्ठत्व मिळविणें; सरशी करणें; वरताण करणें. उ० हर्षकाळीं हिंदु व बौद्ध असे दोन्ही धर्माचे लोक आपआपल्या मंदिरांतील

मूर्तींच्या विलक्षण सामर्थ्याबद्दल नाना प्रकारच्या भोळ्या कल्पना करण्यांत एकमेकांवर कडी करीत होते.
चिं० वि० वैद्य,—मध्ययुगीन भारत.

१३३ कडेलोट—पूर्वीच्या काळीं कोणाला अतिमोठा किंवा परमावधीचा देहदंड करावयाचा असता त्याला कड्यावरून खाली लोटीत असत. ह्याला "कडेलोट करणें" असें म्हणत. यावरून एखाद्या गोष्टीचा कडेलोट होणें, म्हणजे तिचा परमावधि होणें. उ० आम्ही मुलीच्या लग्नासाठी कडेलोट म्हणजे पांचशे रुपये खर्च करूं! उ० प्रथम गोपिकाबाईचा नवरा मेला. त्याच्या पाठोपाठ तिचा एकुलता एक मुलगा मेला! तिच्या दुःखाचा कडेलोट झाला!

१३४ (एखाद्याची) कणीक तिंबणें—त्याला झोडपणें किंवा खूप मार देणें. [पोळ्या करावयाच्या अगोदर कणीक खूप मळावी आणि तिंबावी लागते, तसें एखाद्याचें अंग खूप मळणें].

१३५ कढी पातळ होणें—आजारानें किंवा भीतीनें जर्जर होणें. [कढींत पाणी फार झाल्यास ती बेचव होते, हें रूपक येथे आधारभूत आहे].

१३६ कण्या टाकून कोंबड्यां झुंजविणें—आपला पैसा वगैरे खर्चून दोघात कलागत उत्पन्न करून देऊन ते भांडूं लागले असतां त्यांची गंमत पाहणें. [कण्या" बद्दल "दाणे," असाहि शब्द योजतात].

१३७ (एखाद्याचा) कपाळमोक्ष करणें—त्याला खूप झोडपणें. त्याचा नाश करणें. [चितेवर प्रेत ठेविलें म्हणजे दगडानें त्याच्या कपाळावर आघात करतात. ह्या चालीवरून वरील वाक्प्रचाराची उत्पत्ति आहे].

१३८ कलम करणें—छाटून टाकणें. उ० माझ्या हिशेबात एक चुकी निघाली, तर मी आपला हात कलम करून देईन! उ०चोरी करील त्याचा हात कलम करावयाची कित्येक देशात चाल आहे.

१३९ कल्पान्त करणें—ब्रह्मदेवाच्या एका दिवसास "कल्प" असें म्हणतात. ह्या दिवसाचा जो अंत म्हणजे शेवट, तो कल्पान्त. कल्पान्ताच्या समयीं पृथ्वी, आप, तेज वगैरे पंच महाभूतांचा भयंकर क्षोभ होऊन जगाचा नाश होतो. ह्यावरून "कल्पान्त करणें," ह्याचा उपयोग मोठा क्षोभ करणें, भयंकर आकान्त किंवा कल्लोळ करणें ह्या अर्थानें केला जातो. उ० आमच्या मुलांना रोज दहा वाजतां जेवणाची सवय आहे. काल आमच्या येथे श्राद्धविधि व्हावयाचा होता, म्हणून जेवणाला बारा वाजले; तेव्हा मुलांनीं जो कल्पान्त केला, तो सांगतां सोय नाहीं!

## १४०. कस

१ [सं० कषाय] सार; पौष्टिक अंश; सत्व; सामर्थ्य; शक्ति; जोर. उ० नदीकांठची जमीन कसाला चांगली असते. उ० अंबाबाई गवळणीचें दूध कसाला चांगलें असतें.

२ [ स० कृष्,, कर्ष्—रेषा काढणें ] कसोटीवर घासून सोनें, रुपें वगैरेंची ठरविलेली शुद्धता किंवा शुद्धतेचें प्रमाण किंवा शुद्धता ठरविण्यासाठी कसोटीवर काढलेली रेषा. उ० हें सोनें कसाला जास्ती मेरेल. ह्या सोन्याला कस लावून पाहा.

३ मनुष्याच्या अंगच्या गुणांची योग्यता किंवा त्या योग्यतेची परीक्षा उ०
नरहरिनामा पावे सत न सोनार दासमान कसा ? ।
तरला करुनि भवाचा अंत, नसो नारदासमान कसा ? ।। मोरोपंत

४ कसाला लागणें, टिकणें किंवा उतरणें— कस लाविला असता उत्तम ठरणें, परीक्षा केली असता उत्कृष्ट असा आढळून येणें उ०

कसास लागे भट आह्वात, नीति प्रतिज्ञापरिपालनात ।
सभेंत विद्वान्, विपदेंत मित्र, दारिद्य्र आल्यासमयीं चरित्र ।।

वि० वा० भिडे,—सूक्तिसुधा

१४१ कसपटाप्रमाणें मानणें—कसपट म्हणजे लाकूड, गवत वगैरेंचें कुसळ त्याच्याप्रमाणें मानणें म्हणजे क्षुल्लक, कुचकिमतीचा, भिकार मानणें

१४२ कसूर करणें—टगळमगळ करणें, दुर्लक्ष्य करणें उ० [ आपले दोन पुत्र संभाजी व राजाराम ] ह्यांस त्या वेळच्या समजुतीप्रमाणे योग्य शिक्षण देण्यात शिवाजीनें कसूर केली नाही गो० स० सरदेसाई

१४३ कळ लावणें—दोघात भांडण उपस्थित व्हावें म्हणून एकापाशी दुसऱ्याची काहीतरी चहाडी करणें [ कळ = कलि = भांडण ]

१४४ कळस होणें—देऊळ वगैरे इमारतीवर कळस ठेविला, म्हणजे बांध-कामाची पूर्णता झाली किंवा तें बांधकाम व्हावयाचें तितकें उच्च झालें, असें होतें. त्याप्रमाणें " एखाद्या गोष्टीचा कळस होणें, " म्हणजे ती पूर्ण वैभवास चढणें किंवा तिचा जोर, तीव्रता, विस्तार वगैरेंची पूर्ण वाढ होणें. [ ही शब्दसंहति चांगल्या व वाईट अर्थानें योजण्यात येते ] उ० महाराष्ट्राच्या राज्याचा कळस, चावटपणाचा कळस इ०.

१४५ कळी उमलणें—फुलाची कळी उमलली, म्हणजे तें फूल विकास पावून सुंदर दिसू लागतें " एखाद्या माणसाची कळी उमलणें, " म्ह० त्याचें औदासीन्य किंवा रुसवा जाऊन याच चेहेरा प्रफुल्लित होणें आणि रंगेलपणानें संभाषण करण्याकडे त्याची प्रवृत्ति होणें

१४६. काकुळती

१. काकुळती

( क ) हीनदीनपणाची याचना. उ० मीं इतका वेळ तुझी काकुळती केली, तरी तुझ्या मनाला द्रव येत नाही काय ?

( ख ) दया, अनुकंपा. उ० देवा, तुला माझी काकुळती येत नाही काय ?

२ काकुळतीस येणें—आपण हीन, दीन, अनाथ आहों या भावनेने नम्रपणा स्वीकारणें. उ० मीं इतका वेळ काकुळतीस येऊन तुजजवळ दहा रुपये उसने मागितले. ते द्यावयाची तुला बुद्धि होत नाही काय?

१४७ कांकूं करणें—अनमान करणें; मागे मागे घेणें; कचरणें.

१४८ कांगाव करणें—आपणाला वाईट रीतीने, अन्यायाने किंवा क्रूरपणाने वागविण्यात आलें, असें भासविणें. उ० तुला मुळीच लागलें नाही! तूं उगीच *कांगाव करीत आहेस!* (*कांगावा, कागावा, अशींहि रूपें प्रचारांत आहेत*).

## १४९. कांटा

१. कांटा—

(क) वृक्षादिकांचे बुंध, फांद्या, पानें, फळें वगैरेंवर जे ताठ, अणकुचीदार अवयव असतात, ते. उ० बाभळीचा, बोरीचा कांटा.

(ख) हर्ष, भयकर देखावा वगैरेंनीं अंगावर येणारा रोमांच.

(ग) ताजवा, तराजू याच्या दांडीस मध्याला जो दांडीची स्थिति दर्शविणारा अवयव असतो, तो.

(घ) तराजू.

(ङ) ज्वरादिकामुळे अंगावर पुरळ उठतो, तो.

(च) ज्वर; हींव.

(छ) कोयंडा बंद करणारा जो कुलपाचा अवयव, तो.

(ज) विंचवाच्या नांगीचें अग्र.

(झ) वेळू, चिंचा वगैरेंचा तुरा.

(ञ) घड्याळाच्या तबकडीवरील तासांचे अंक किंवा मिनिटें दाखविणारे जे अवयव, ते प्रत्येक.

(ट) कांट्याच्या आकाराचा कोणताहि पदार्थ.

(ठ) कंबर, मान, पाठ, यांच्या आंत आधारभूत जो अस्थिविशेष तो.

(ड) गुणाकार व भागाकार यांचा ताळा पाहतांना जी फुली [ X ] करतात ती.

(ढ) राघू, मैना इत्यादिकांच्या गळ्यांत एक रोग होतो, तो.

(ण) शत्रु (लाक्षणिक अर्थाने).

२ पाण्याचा कांटा मोडणे—अग्निसंयोगानें पाण्याच्या अंगीं थोडीशी उष्णता येणें (मोडणें अकर्मक).

३ कांट्याने कांटा काढणें—एका दुष्टाच्या हातून दुसऱ्या दुष्टाचें शासन होईल. असें करणें. कांटा काढावयाला सुई नसतां दुसऱ्या एका कांट्याने अंगांत रुतलेला कांटा काढतात, ह्यावरून हा वाक्प्रचार उत्पन्न झाला आहे.

४ कांटा काढणें—आपल्या मार्गांत असलेल्या किंवा आपणास पदोपदीं नडविणाऱ्या शत्रूस दूर करणें किंवा त्याचा विध्वंस करणें.

५. अंगावर कांटा उभा राहणें—

(क) अंगावर रोमांच येणें. अत्यंत भयंकर, क्रूर किंवा धाडसी कृत्य पाहून, वाचून किंवा ऐकून अंगावरचे केस ताठ उभे राहतात. असें झालें म्हणजे "अंगावर कांटा उभा राहिला," असें म्हणतात. उ० चोरांनी मुलाचे वाळे काढून घेण्यासाठी त्याचे पाय कुऱ्हाडीनें तोडले आणि मग त्याचें प्रेत निवडुंगाच्या बनांत टाकिलें, ही बातमी ऐकून माझ्या अंगावर कांटा उभा राहिला! औरंगजेबानें संभाजीचे कसे कसे हाल केले, ही हकीगत वाचून अंगावर कांटा उभा राहतो!

(ख) थंडीमुळे अंगाच्या त्वचेवर केस ताठ होऊन उभे राहणें.

६ कांट्याचा नायटा होणें—यःकश्चित् कांटा अंगांत बोचून देखील त्याची दुखापत विकोपास जाऊन त्याला नायट्याचें स्वरूप प्राप्त होणें. क्षुल्लक गोष्टीचा परिणाम भयंकर होणें.

७ काळजी कांटा—चिंता किंवा विवंचना.

१५० काडीनें औषध लावणें—दुसऱ्याच्या गळवाला, फोडाला किंवा जखमेला दुरून औषध लावणें (बोटानें औषध लावल्यास त्याच्या दर्दाचें विष आपल्या अंगीं भिनेल ह्या भीतीनें). उठवळपणानें दुसऱ्याच्या अडचणीस उपयोगी पडणें.

१५१. काडी मोडून देणें—हलक्या जातींत विवाहसंबंध तोडावयाचा असतां, नवरा आणि बायको चार मडळींसमक्ष गवताची काडी मोडून एकमेकांच्या हातीं देतात. "काडी मोडून देणें" म्ह० वैवाहिक संबंध जाहीर रीतीनें मोडून टाकणें.

१५२ कात होणें किंवा लागणें—साध्या विड्याला पान, चुना, सुपारी आणि कात हीं चार द्रव्यें लागतात. ह्या चार द्रव्यांत कात इतर द्रव्यांच्या मानानें अगदी थोडा असतो. यावरून एखाद्या कार्याला लागणाऱ्या सामग्रीचा किंवा द्रव्याचा अल्पसा अंश किंवा भाग, असा रूपकावर आधारलेला "कात" याचा अर्थ झाला. *उ० प्रश्न— हा पूल बांधावयाला किती हजार रुपये लागले असतील बरें? उत्तर—* किती हजार! हजारांनी काय कात होणार (किंवा लागणार)? 'किती कोटी' असें विचारा!

१५३ काथ्याकूट करणें—नारळाच्या कवचांतील जे तंतु त्यांना "काथ्या" म्हणतात. ते तंतु कुटून, धुऊन, नंतर त्याच्या दोऱ्या वगैरे करतात. हें काथ्या कुटण्याचें काम श्रमाचें असून नीरस व कंटाळवाणें असतें. यावरून "एखाद्या गोष्टीची काथ्याकूट करणें" म्हणजे त्या गोष्टीसंबंधानें निष्फळ व कंटाळवाणी चर्चा पुन्हा पुन्हा करणें.

१५४ कापूस महाग करणें—कृश होणें. [उपपत्ति पुढे १५५ त पाहा].

१५५ कापूस सवंग करणें—कापूस थोडा असूनहि पिंजारलेल्या स्थितींत तो पुष्कळ दिसतो. फोपश्या मनुष्यासंबंधानें विनोदानें ह्या संहतीचा उपयोग करतात. उ० कसें काय नारायणराव, अलीकडे कापूस भारी सवंग केला आहेत! किंवा कापूस फार सवंग झाला आहे वाटतें! [ म्ह० तुम्ही अतोनात लठ्ठ झालां आहां ].

१५६. काम

१. काम—

(क) कर्म; कृत्य.

(ख) उद्योग; धंदा. तो कोणत्या कामावर आहे? उ० तुमच्या मुलाला काय काम आहे? (म्ह० कोणती नोकरी आहे? त्याचा धंदा काय आहे?)

(ग) प्रकरण; हातीं घेतलेला किंवा पतकरलेला व्यवसायविशेष. उ० हल्ली मला फार कामें आहेत. तुझी कादंबरी वाचावयाला मला कशी फुरसत मिळणार?

(घ) साध्य वस्तु.

(ङ) उपयोग; जरुरी. उ० मला सध्या तुझ्या कोशाचें काम नाही.

(च) उपयोगी पडण्याचा गुण किंवा काम करण्याची ताकद, हातोटी इ०. उ० आमच्या सुनेच्या अंगीं कांहीदेखील काम नाही!

२ काम चोरणें—कुचरपणानें काम करणें; आळसानें, रेंगाळत काम करणें. उ० तुकोबा गवंडी काम चोरणारा आहे!

३ कामांत काम करून घेणें—मोठें काम चाललेलें असता त्याच्या साधनांनी त्याच्याच जातीचें एखादें लहानसें काम साधून घेणें. उ० आमच्या घराचा कारखाना चाललेला होता, तेव्हा मीं तीन घडवंच्या करविल्या! कामांत काम करून घेतलें!

४. एखाद्याचें काम काढणें—

(क) त्याला जेरीस आणणें किंवा सतावणें.

(ख) त्याचा नक्षा उतरणें; त्याच्या गर्वाचा परिहार करणें.

(ग) त्याला ठार मारणें.

५ कामांतून जाणें—निरुपयोगी होणें. उ० हें उपरणें आता कामांतून गेलें! (म्ह० अंगावर घेण्याच्या लायकीचें नाही!)

६ एखाद्या वस्तूचें किंवा माणसाचें काम करणें—तत्संबंधानें बंदोबस्त करणें; ती वस्तु किंवा तें माणूस आपल्या बेताआड न यईल, असें करणें.

७ कामा नये—योग्य नाही. उ० धर्मांत कोणता धर्म श्रेष्ठ, हें ठरवितांना त्या धर्मांचीं मूलतत्त्वें विचारांत घेता कामा नयेत; कारण, सर्व धर्मांचीं मूलतत्त्वें सारखींच उदात्त आणि वंद्य असावयाचीं. तर, त्या त्या धर्माच्या अनुयायांपैकी बहुसंख्याक भाग कितपत वचनपालनतत्पर, सत्यनिष्ठ, पापभीरु आणि माणुसकीच्या गुणांनी समृद्ध आहे, हेंच मुख्यतः पाहिलें पाहिजे.

८. कामाला येणें—

(क) उपयोगी पडणें. उ० "कठिण समय येतां कोण कामास येतो?"

—रघुनाथ पंडित.

(ख) लढाईत मारला जाणें [कामीं येणें किंवा पडणें, असाहि प्रयोग होतो].

(ग) पतकरलें जाणें; सहन केलें जाणे, पसंत पडणें. उ० तू अशा रीतीने वागलास, तर तें माझ्या कामास येणार नाही!

९ काय कामाचा?—कोणत्या उपयोगाचा? निरुपयोगी; त्याज्य, टाकाऊ. उ० ज्या शिक्षणाने धर्मबंधनें, नीतिबंधनें, पूर्वसंस्कृतिबंधनें, ग्रामबंधनें आणि देशबंधनें तुटतात, तें शिक्षण काय कामाचें?

१५७ (मनांत किंवा पोटांत) कालवाकालव होणें—

(क) कोणताहि मनोविकार प्रबल झाल्याने मनामध्ये अतिशय अस्वस्थता उत्पन्न होणें. उ० रोम शहर जुलमी पोपच्या व फ्रेंच राजांच्या ताब्यांत गेलेलें पाहून, जोसेफ ग्यारिबाल्डीचे मनात कालवाकालव होऊन जात असे.

न० चिं० केळकर,—ग्यारिबाल्डीचें चरित्र.

(ख) पोटात भुकेमुळे अस्वस्थता उत्पन्न होणें.

१५८ काशीस भागीरथी नेणें—जेथे जी वस्तु विपुल आहे तेथे ती नेणें; विनाकारण श्रम करणें.

१५९ काळावर किंवा काळाकडे दृष्टि देणें, काळाकडे पाहाणें—हल्लीची आणि पुढची स्थिति आणि परिस्थिति लक्ष्यात घेणें.

१६० काळाचें तोंड किंवा काळाची दाढ—नाश; विध्वंस; मृत्यु. उ० वैद्याने त्या रोग्याला काळाच्या दाढेंतून ओढून काढलें (म्ह० बरें केलें).

१६१ काळ आला होता पण वेळ आली नव्हती—नाश होण्याची, मरण येण्याची वेळ बहुतेक आलीच होती, पण थोडक्याने बचावलें आणि घात व्हावयाचा टळला!

१६२ किल्ली फिरविणें—गुप्तपणें बंदोबस्त करून ठेवणें. उ० हल्ली आमच्या कचेरींत कामें फार आलीं आहेत. नारायणरावानी एक महिन्याची रजा घेऊन काम चुकविण्याचा विचार केला आहे. ते गेले तर सारें काम मजवर पडेल म्हणून मीं वरिष्ठाजवळ किल्ली फिरवून ठेविली आहे! आता नारायणरावास रजा कशी मिळते पाहू!

१६३ कीस काढणे—बारकाईने चर्चा करणें; फार फार चिकित्सा करणें.

१६४ किंतु येणें—संशय येणें. उ० मजविषयी तुझ्या मनात कांही किंतु आला आहे, असें मला वाटतें! (संस्कृत किंतु = परंतु).

१६५ कुत्र्याचे पाय मांजरावर आणि मांजराचे पाय कुत्र्यावर घालणें—लटपटी करणें; भलभलत्या खटपटी करणें (आपलें कार्य साधण्यासाठीं किंवा केवळ गमतीखातर आडमार्गाची हौस असल्यामुळे).

१६६ (एखाद्यावर) कुभांड रचणें—त्याच्यावर खोटा आरोप करणें;त्याच्यावर तोहमत घेणें.

१६७ कुरघोडी करणें—"कुरघोडी" म्हणून मुलांचा एक खेळ आहे. ज्याच्यावर डाव लागतो, त्याच्या पाठीवर खेळगडी स्वार होऊन बसतो. यावरून "एखाद्यावर कुरघोडी करणें" म्हणजे त्याच्यावर आपलें स्वामित्व गाजविणें. दुसऱ्याचा पक्ष हाणून पाडण्यासाठीं युक्तीवर प्रयुक्ति योजणें.

१६८ कुरवंडी करण—ओवाळणें. उ० तुझ्यावरून हा जीव कुरवंडी करून टाकावयाला मी सिद्ध आहें!

१६९ (एखाद्याचें) कोड पुरविणें—त्याने आतुरतेनें मागितलेली वस्तु देऊन त्याला आनंदित करणें.

१७० कोलीत लावणें—"कोलीत" म्ह० ज्याचें एक टोक पेटलेलें आहे, असें लाकूड किंवा अशी घलपी. एखाद्या पदार्थाला कोलीत लाविली असतां तें जळूं लागतें. ह्यावरून "कोलीत लावणें" ह्याचा "कलागत लावणें," "दोघांत भांडण होईल असें करणें" असा लक्षणेने अर्थ झाला.

१७१ क्रिया करणें—मृत मनुष्यासंबंधाचा जो धार्मिक किंवा लौकिक विधि, तो करणें. उ०

करुनि क्रिया पित्याची गेला तो श्रितभवाब्धिसेतुकडे।
पौर, सचिवहि, अयाचे तच्चुंबकमणिकडे जसे तुकडे॥
मोरोपंत,—वन०—अ० १०, आ० ८३.

१७२. खडा

१. खडा—

(क) दगडाचा अगदी लहान खंड.

(ख) हिरा, माणिक, पाच वगैरे कोंदणांत बसविलेलें किंवा बसवावयाचें मूल्यवान् रत्न.

२ खडा टाकून ठाव पाहणें—पाण्याची खोली ठोकळ मानाने ठरवावयाची असता पाण्यांत खडा टाकतात; म्हणजे आवाज, बुडबुडे, पाण्याच्या पृष्ठभागावरचीं वर्तुळें वगैरेंवरून पाण्याची खोली समजते. त्याप्रमाणे एखाद्या माणसाला एखादा साधासा दिसणारा परंतु खुबीदार प्रश्न विचारावयाचा किंवा सहजपणाच्या आविर्भावाने त्याच्यापुढे एखादें विधान करावयाचें आणि त्यावर त्याचे जे उद्गार निघतात, त्यांवरून त्याच्या मनाचा कल जाणावयाचा, ह्याला "खडा टाकून ठाव

पाहणें " असें म्हणतात. [ वरील वाक्यांत " ठाव " हा शब्द न घातला तरी तोच अर्थ होतो ].

३ एखाद्याला खडे, धूळ किंवा माती चारणें किंवा खावयास लावणें— त्याची धूळधाण करणें, त्याला हालअपेष्टा भोगावयाला लावणें, त्याचा सत्यानाश करणें.

४. एखाद्याच्या नांवानें खडे फोडणें—

( क ) त्याला व्यर्थ दोष देणें, त्याच्यावर उगाच ठपका ठेवणें.

( ख ) त्याला शिव्याशाप देणें.

५ खड्यासारखा बाहेर पडणें—निरुपयोगी ठरून वगळला जाणें, खपण्याजोगा नाही, असें स्पष्टपणें ठरणें. उ० लांचखाऊ मंडळींतून तो खड्यासारखा बाहेर पडला. [ " खड्यासारखा निवडून पडणें " ह्याचाहि वरील अर्थानें उपयोग होतो ].

१७३ (एखाद्या माणसाची किंवा वस्तूची) खत घेणें—

( क ) त्याच्यासाठीं जिवाला तळमळ लावून घेणें. उ० आई मेल्यापासून त्या लेकरानें भारी खत घेतली आहे.

( ख ) ती आवडेनाशी होणें. उ० माझ्या मनानें मेतकुटाची खत घेतली आहे ( म्ह० मला मेतकुटाची किळस आली आहे )

१७४ (एखाद्याची) खरड किंवा खरडपट्टी काढणें—त्याची तासडपट्टी काढणें, त्याचा दोष किंवा अपराध दाखवून त्याची निर्भर्त्सना करणें, त्याच्यावर ताशेरा झाडणें.

१७५ खरपूस ताकीद करणे—न विसरली जाईल अशी ताकीद देणें; निक्षून बजावणें किंवा सांगणें.

१७६ खरपूस समाचार घेणे—यथायोग्य पारिपत्य करणें.

१७७ खसखस पिकणे—खस् खस् असा आवाज करून एका किंवा अनेक माणसांनी रंगेलपणानें हसत सुटणें.

१७८ खळखळ करणें—एखाद्या गोष्टीविषयी नाखुषी दाखवून ती न करण्याचा हट्ट घेणें; एखादी गोष्ट करावयाला भारी आढेवेढे घेणें उ० सदू एरंडेल घ्यावयाला भारी खळखळ करतो.

१७९ खाऊन ढेकर देणे—दुसऱ्याच्या वस्तूचा अपहार करून ती आपलीशी करून टाकणें.

१८० खाखा सुटणे—एकसारखें खात असावें, अशी प्रवृत्ति होणें, क्षुधा अतोनात प्रदीप्त होणें; हाव सुटणें.

१८१ खाजवून खरूज काढणे—चव्हेंच कुरापत काढून भांडण उपस्थित करणें.

१८२ खातेपोतें बरोबर असणें—आदा आणि खर्च ही सारखीच असणें; जितका आदा तितकाच खर्च अशी स्थिति असणें; जितकें आपणास लोकाकडून येणें, तितकेंच आपणांस लोकाचें देणें असणें.

१८३ (एखाद्याच्या डोक्यावर किंवा माथ्यावर) खापर फोडणें—त्याच्या माथीं उगीच दोष लादणें; त्याच्यावर विनाकारण ठपका ठेवणें. "एखाद्याच्या डोक्यावर खापर फुटणें," म्ह० त्याच्याकडे निष्कारण दोष येणें. उ० विजापूर व गोवळकोंडा येथील दिल्लीरखानाचीं कारस्थानें फसलीं व दक्षिणेंत मोगलांचें प्राबल्य उत्तरोत्तर कमी झालें, ह्या सर्व नुकसानींचें खापर बादशहानें दिल्लीरखानाच्या डोक्यावर फोडलें.

—गो० स० सरदेसाई.

१८४ खाल्ल्या घरचे वांसे मोजणें—कृतघ्नपणा करणें; आपल्या आश्रयदात्याचें नुकसान झालें किंवा त्याला दारिद्र्य आलें, तर आपला काय फायदा होईल, हा विचार करीत असणें.

१८५ (एखाद्याच्या पदरास) खार लावणें—त्याला नुकसान सोसावें लागेल किंवा झीज सोसावी लागेल, असें करणें.

१८६ खुंटी पिरगाळणें—दुसऱ्या कोणीं आपल्या योजनेच्या किंवा आरंभिलेल्या कार्याच्या विरुद्ध काही खटपट केली असता, ती सफल होऊं नये, म्हणून अगोदरच आपण सावधगिरीनें तजवीज करून ठेवणें. [ विणेच्या तारा सुस्वर वाजावयासाठी त्या तारा बेतानें ताणाव्या लागतात. हें ताणण्याचें काम खुंट्यांनी केलें जातें; यावरून ही शब्दसंहति उत्पन्न झाली आहे ].

१८७ खो देणें किंवा घालणें—"खोखो" हा मुलांचा खेळ आहे. त्यांत एक धावणारा मुलगा असतो. त्याच्या मनांत ज्याला उठवावयाचें असेल, त्याला तो "खों" असा शब्द उच्चारून उठवितो आणि आपण त्याच्या जागीं बसतो. मग हा उठविलेला गडी धावावयास लागतो. यावरून "एखाद्याला खो देणें" म्ह० अधिकारापासून त्याला भ्रष्ट करण्याची खटपट करणें. खो घालणें म्ह० एखाद्याच्या सुरळीतपणें चाललेल्या कामात विघ्न आणणें. खो येणें, खो मिळणें इ० क्रियापदांनी अकर्मक अर्थ होतो.

१८८ खोड ठेवणें—बारीक नजरेनें पाहून दोष काढणें. उ० त्या मुलीमध्ये खोड ठेवावयाला काही जागा नाही. तिला तुम्ही बेलाशक सून करून घ्या.

१८९ (एखाद्याची) खोड मोडणें किंवा जिरविणें—

(क) त्याच्या अपराधाबद्दल इतकी कडक शिक्षा करणें, की पुन्हा तसला अपराध तो करणार नाही.

(ख) त्याची वाईट सवय घालविणें.

१९० खोदून खोदून विचारणें—एखाद्याकडून कांही वृत्तान्त किंवा गुप्त गोष्ट काढण्यासाठीं अनेक तऱ्हांनी त्याला बारकाईनें आग्रहाचे किंवा डावपेचाचे प्रश्न विचारणें उ० तरी पण झोप लागण्याच्या पूर्वी राहवेना, म्हणून मला पुन्हा पुन्हा खोदून खोदून विचारलें, की तू काय बोल्लीस तें नीट सांग. —श्री० रमाबाई रानडे.

१९१ गंगेंत घोडे न्हाणें—मोठें किंवा कठीण कृत्य तडीस लागणें. उ० माझ्या मुलाची परीक्षा उतरून त्याला नोकरी लागली! एकदाचे गंगेंत घोडे न्हाले! [ "गंगेंत घोडे न्हाणें," असाहि प्रयोग आहे ].

१९२ गचांडी देणें—अर्धचन्द्र देणें. उ० गलेलठ्ठ भिकारी नागोबाच्या दाराशीं गेल्यास तो त्यांना नेलाशक गचांडी देऊन हाकलून काढतो!

१९३. गच्छंती

१ गच्छंती—नाश; पराभव; सामर्थ्यभंग. [ संस्कृत—गम् (गच्छ्) म्ह० जाणें ].

२ गच्छंती होणें—कोणतेंहि विशिष्ट काम पुढे चालू ठेवण्याची शक्ति न उरणें. उ० ह्या बुद्धीच्या लाडवात माझी गच्छंती झाली; आता जिलब्या काय खाऊं?

३ एखाद्याची गच्छंती करणें—त्याचा नाश करणें.

४ गच्छंती करणें—सुळ्कदिशी निघून जाणें, नजर चुकवून पळून जाणें.

१९४ गट किंवा गट्ट करणें—खाऊन टाकणें; गिळून टाकणें. उ० त्या माकडानें हा हा म्हणतां अच्छेर दाणे गट्ट केले! [ गिळतांना जो आवाज होतो, त्याचा अनुकरणवाचक शब्द 'गट्ट' हा आहे ].

१९५ गडप करणें—नाहींसा करणें; लपविणें; खाऊन टाकणें.

१९६. गंडा

१. गंडा—गायनादि कला शिकविणारे लोक शिकणाऱ्याच्या मनगटाला दोरा बांधतात, आणि मग शिकविण्याला आरंभ करतात. त्या दोऱ्याला "गंडा" म्हणतात.

२ एखाद्याला गंडा बांधणें—त्याला शिष्य करणें; त्याला आपल्या मंडळींत अंतर्भूत करून घेणें.

३ एखाद्याला गंडा घालणें—त्याला फसविणें. उ० ह्या दुकानदारानें मला तीन आण्याला गंडा घातला!

१९७ (एखाद्याची) गडी फू करणें—त्याची मैत्री किंवा सहवास सोडून देणें. [ एका मुलाचें दुसऱ्याशीं भांडण झालें, म्हणजे तो त्याला "तुझी गडी फू!" असें म्हणून त्याच्याशीं तिऱ्हाईतपणाच्या नात्यानें किंवा शत्रुत्वानें वागू लागतो. मोठ्या माणसाच्या संबंधानें ही शब्दसंहति विनोदानें योजण्यांत येते. "गडी" याचेबद्दल "गट्टी" असाहि शब्द योजला जातो ]

१९८ गणेशटोपी घालणें—मुलें खेळतांना एकाच्या डोक्यावर चिरगूट टाकून त्याला कांही दिसणार नाही, असें करतात आणि मग धोतराचा तोबा त्याच्या पाठीवर मारतात. तोबा कोणी मारला, हें त्या अंध केलेल्या मुलाने ओळखलें, म्हणजे त्याच्यावरचें चोरपण जातें. चिरगूट बांधून एखाद्याला अंध करणें, याला "गणेशटोपी घालणें" म्हणतात. ह्यावरून "एखाद्याला गणेशटोपी घालणें," म्हणजे त्याला फसविणें. [ "एखाद्याला टोपी घालणें" असाहि वरील अर्थाने प्रयोग होतो ].

१९९ गंध नसणें—अल्प प्रमाणांत देखील नसणें. उ० वासुदेवाला ज्योतिषाचा गंधहि नाही. उ० माझ्या मनांत लबाडीचा गंधहि नाही. [ गंध म्ह० वास ].

२०० गप्पा किंवा गप्फा छाटणें, मारणें, ठोकणें, तासणें किंवा झोकणें—इकडच्या तिकडच्या गोष्टी करीत बसणें. उ० तूं आणि रामा असे दोघेजण अभ्यासाला म्हणून बसतां, पण तुम्ही खरोखरी अभ्यास करतां, की गप्पा छाटीत बसतां ?

## २०१. गम

१. गम—( आरबी ) दुःख; सहनशीलता; सोशीकपणा.

( क ) धीर; स्वस्थता. उ० अरे, पेढ्यासाठी इतका कां तरफडतोस ? जरासा गम खा ! इतरांबरोबर तुलाहि पेढा मिळेल ! [ "गम खा" म्ह० धीर धर; उतावळा होऊं नको ].

( ख ) क्षमा. उ० मीं अंगभर लुगडें नेसलें होतें आणि तूं मला ओवळ्याने शिवलीस. मला तुझा इतका राग आला होता, की मी तुझ्या कानशिलांत दोन मडकावणार होतें. पण मीं तुझी गम केली. [ "मीं गम खाल्ली," "मला तुझी गम आली," ह्यांचाहि अर्थ तोच होतो ].

२. गम—( संस्कृत गम्य ) ज्ञान माहिती.

( क ) धोरण; पोंच. उ० तुझ्या बोलण्याचा गम माझ्या लक्ष्यांत आला नाही.

( ख ) अंतस्थ हेतु. उ० तुकोबाच्या बोलण्यावरून तुम्हांला त्याचा गम कळावयाचा नाही.

## २६२. गमजा

१ गमजा—( फारशी गम्‌ज़ह् = नखरेबाजी; छाक्टेगिरी ). खोड्या; चेष्टा; वेडे वेडे चाळे; चोचले.

२ गमजा करणें—वेडे वेडे चाळे करणें; उच्छृंखलपणाने वागणें. उ०.

गमजा करितां, मनिं उमजाना, हें सुख न पुढें पडेल वजा ! —रामजोशी.

३ एखाद्याच्या गमजा न चालूं देणें—त्याच्या चेष्टांना, वात्रटपणाला किंवा त्रासदायक कृत्यांना मोकळीक किंवा अवसर न देणें; त्याच्या उद्दामपणाला प्रतिबंध करणें.

२०३ गयावया करणें—दीनपणानें क्षमा मागणें. उ० त्या गड्याला गूळ चोरतांना मीं प्रत्यक्ष पाहिलें मी त्याला पोलिसाच्या हवालीं करणार होतों. पण तो फारच गयावया करूं लागला, म्हणून त्याला मीं सोडून दिलें.

२०४ गर्भगळित होणें—अत्यंत भीतिग्रस्त होणें. [ भयानें गर्भिणी स्त्रियांचा गर्भ गळून पडतो, यावरून हा अर्थ झाला. हा शब्द "गलितगर्भ" ह्या संस्कृत शुद्ध बहुव्रीहि समासाचें परिवृत्त अपभ्रष्ट रूप नव्हे. तें मराठीच गर्भ गळीत होणें, ह्याचें रूप असून गळित हा शब्द गर्भ ह्याला चिकटून लिहिण्याचा परिपाठ रूढ झाला आहे. उ० रानांत वाघ पाहताच मी गर्भगळित झालों !

२०५ ( एखाद्याच्या ) गोवऱ्या मसणांत जाणे—त्याच्या आयुष्याची मर्यादा अगदी थोडी राहिलेली असणें; त्याचा मृत्युकाळ अगदी जवळ येऊन ठेपलेला असणें. उ० तुझ्या गोवऱ्या मसणात गेल्या आहेत. आता तूं मोठमोठे बेत कशाला करतोस ?

२०६. गळ

१ गळ—विहिरींत पडलेलें भांडें वर काढण्यासाठीं लोखंडाच्या आकड्यांचे जुडगे दोरीच्या टोकाला बांधून तें पाण्यांत टाकून दोरीचें दुसरें टोक हालवितात. तेणेंकरून तें भांडें ह्या आकड्यांना अडकतें आणि दोरी वर खेचली, म्हणजे तें वर येतें. ह्या साधनाला "गळ" असें म्हणतात. मासे धरावयासाठीं जो केसासारखा बारीक पोलादी आकडा असतो, त्यालाहि गळ म्हणतात. अनुरूप क्रियापद घालणें, टाकणें इ०. ह्यापासून पुढील वाक्प्रचार उत्पन्न झालेले आहेत.

२ गळ टाकून पाहणें—अजमास काढण्यासाठी काही खुबीदार प्रश्न विचारणें, मोहजाळ पसरणें, सभाषणाचा ओघ विशिष्ट दिशेने वळविणें, इत्यादि.

३ गळ घालणें—आग्रह करणें. उ० "माझी मुलगी तुम्ही आपल्या रामाला करून घ्या, म्हणून गोपिकाबाईनी मला भारी गळ घातली; पण ती मुलगी दमेकरीण म्हणून मीं ती पतकरली नाही. उ० तुम्ही आपलें मत मलाच द्या, अशी नरसिंगरावांनी मला भारी गळ घातली.

*टीप—मुलगी गळीं लागली आहे, तुम्ही आपलें मत मला द्या म्हणून नरसिंगराव माझ्या गळीं पडले.* हे वाक्प्रचार गळा ( म्ह० कंठ ) ह्यापासून झालेले आहेत; हें विद्यार्थ्यांनी लक्ष्यात बाळगावें.

२०७ गांठ पडणें—भेट होणें.

२०८ गाडी सुटणें—पाठ म्हणण्याची किंवा बोलण्याची क्रिया वेगाने होऊ लागणें. ( आगगाडीचें रूपक येथे गर्भित आहे ).

२०९ गाढवाचा नांगर फिरविणें—जमीनदोस्त करणें. [ पूर्वीच्या काळीं गुन्हेगाराला शिक्षा करण्याचा एक प्रकार असा असे, की त्याला त्याच्या घरातून

हाकलून काढून, तें घर पाडून आणि खणून टाकून, त्या जमिनीवरून गाढव जुंपलेला नांगर फिरवून शेतजमिनीसारखी ती जमीन करीत, अशी शिक्षा फार मोठ्या गुन्ह्याला दिली जात असे ].

२१० (एखाद्याच्या) गादीला पाय लावणें—त्याचा अपमान करणें. [ गुरूची गादी आपल्यांत पूज्य मानिली जाते. तिला पाय लावणें किंवा तिच्यावर बसणें हें पातक होय ].

२११. गाव

१ गाव—

(क) शहर. उ० त्या गावाची वस्ती पांच हजारांवर आहे.

(ख) सुमारें ५ मैलांची लांबी किंवा अंतर; सुमारें पाच मैलाचें परिमाण. उ०

त्या प्रभुतें चिंतुनि कपि झाला गावें हा पन्नास ।

मोरोपंत,—पंचशती रा०, साकी २३६.

[ पन्नास गावें झाला, म्ह० सुमारें अडीचशें मैल लांब झाला ].

२ गावाला जाणें—नबळ नसणें; दूर गेलेला असणें; ह्यावरून "माझे हात कांही गावाला गेले नाहीत !" म्ह० रट्टा चढविण्याची वेळ आली, तर माझे हात रट्टा चढविल्याशिवाय स्वस्थ राहणार नाहीत, रट्टा चढवितीलच ! उ० काय म्हणे, थोबाडींत मारीन ! मार पाहूं कशी थोबाडींत मारतोस ती ! माझे हात कांही गावाला गेले नाहीत ! अशाच अर्थानें "तरवार गावाला जाणें," ह्याचा पुढील आर्येंत उपयोग केला आहे.

लचशील ! कौरवा तूं, की बहु चढला तुझा मद सिगेला ।
लंघावया पहाशी; या गला काय रे मदसि गेला ! ॥ मोरो०,-उ०, अ० १३.

[ "माझे हात कांही केर्ली खावयाला गेले नाहीत !" ह्याचाहि अर्थ "हात गावाला गेले नाहीत," ह्याप्रमाणेच समजावा ].

३. त्या गावचा नसणें—ह्या कामाशीं आपला कांही संबंध नाही, असें दाखविणें. उ० गोंद्या मोठा विलंदर आहे. तो कांही तरी खोड्या करतो आणि मग साळसूदपणा दाखवितो. जसा कांही तो त्या गावचाच नव्हे !

४ एखाद्याच्या गावीं नसणें—(क) त्याच्या खिजगणतींत नसणें. (ख) त्याच्या ध्यानीं मनींहि नसणें. उ० मी त्याला इतका वेळ बोध केला, पण तो त्याच्या गावींहि नाही ! (म्ह० त्यानें तिकडे अगदी दुर्लक्ष्य केलें. तो त्या बोधाच्या उलट वर्तन करीत आहे).

२१२ गाशा गुंडाळणें—एखाद्या ठिकाणाहून निघून जाण्याच्या उद्देशानें आपल्या जिनसापानसाची आवराआवर करणें किंवा ती करून निघून जाणें. उ० भटजीबोवानी आमच्यापुढें बरेच लाडलचक रडगाणें चालविलें होतें; पण आमच्या येथे त्याना थारा मिळणार नाही, असा त्याना रंग दिसताच त्यानी गाशा गुंडाळला!

२१३ गाळण उडणे किंवा होणें—धाबरगुंडी वळणें. धैर्य गळून जाणें. उ० हातात कुऱ्हाडी घेतलेले तीन चोर पाहताच सकवारबाईची गाळण उडाली! उ० एकामागून एक अशा अनेक अडचणी आल्या, तेव्हा माझी गाळण उडाली (म्ह० माझा सारा धीर गळून गेला).

२१४ (एखाद्याला) गुंगारा देणें—फसवून किंवा त्याची नजर चुकवून पळून जाणें. उ० मी घनश्यामाला हें पत्र टपालात टाकावयाला देणार आहे म्हणून त्याला जरा वेळ थांबावयाला सांगितलें होतें. पण तो मला गुंगारा देऊन गेला! (म्ह० माझी नजर चुकवून निघून गेला!

२१५ गुण उधळणें किंवा पाघळणें—दुर्गुण प्रकट करणें. उ० केशव आता सुधारला असेल, अशा समजुतीवर मीं त्याला मामलतदार कचेरींत नोकरी लावून दिली. पण एका महिन्याच्या आंत त्याने गुण उधळले! तेव्हा त्याला शिरस्तेदारानी राजीनामा देऊन निघून जावयास लाविलें!

२१६ (एखादी वस्तु) गुलदस्तात ठेवणें—ती अगदी लपवून ठेवणें; तिचा सुगावा किंवा मागमूस, कोणाला लागू न देणें.

वाटोळ्या गंजिफांचा डाव खेळतांना तिघा खेळणारापैकी ज्याला मागल्या डावात काही पानें देणें झालें असेल, तो पुढच्या डावाच्या वाटणीच्या वेळीं तितकीं पानें न बघता आणि येतील त्या क्रमाने जशींच्या तशींच दस्ताच्या रूपानें जमिनीवर पालथीं ठेवीत जातो. ह्या पालथ्या ठेवलेल्या पानाना "गुल्दस्त" असें म्हणतात. गुलदस्तात काही विशेष उपयोगाचीं पानें आपणाला मिळतील असा त्याचा समज असतो. गुल म्ह० फूल, उत्कृष्ट वस्तु. दस्त म्ह० हात. गुल्दस्त म्ह० मूल्यवान् आणि गुप्त वस्तूंचा हाताने केलेला संचय. एखादी वस्तु गुलदस्तात ठेवणें म्ह० ती मूल्यवान् म्हणून योग्य समय येईपर्यंत गुप्त ठेवून आयऱ्या वेळीं बाहेर काढणें

२१७ गुळखोबरें देणें—लहान मुलाना गुळखोबऱ्याची लालूच दाखविली म्हणजे तीं आपल्याला वळतात किंवा आपलें काम करावयाला सिद्ध होतात. यावरून "एखाद्याला गुळखोबरें देणें," म्ह० त्याला आपल्या कामासाठी लाच देणें, फसविणें, असे अर्थ झाले. गुळखोबऱ्यावरील मुलाची भक्ति पुढील आर्येत वर्णिली आहे.

गुळखोबरें विलोकुनि मल्ल्याहि जनास बालक वळता।
सत्य प्रेमचि दाउनि सुजें तो विश्वपाळ कळवळा॥

मोरोपत,—भारत, उद्योगपर्व.

२१८ (एखाद्याचे पुढे) गोंडा घोळणें—त्याची खुशामत करणें; त्याची थुंकी झेलावयाला तत्पर राहणें.

## २१९. गोता

गोता—(अरबी गोतह् = बुडी).

१ संकट; अडचण; नुकसान.

२ एखाद्याला गोत्यांत आणणें, घालणें किंवा टाकणें—त्याला संकटात, पेचांत घालणें किंवा लोटणें.

३ एखाद्याला दहा रुपयांच्या गोत्यांत आणणें—दहा रुपये खर्चावयाची त्याच्यावर पाळी आणणें; त्याची दहा रुपयांची नुकसानी करणें.

२२०. गोंधळ घालणें—

१ गोंधळ म्हणजे एक प्रकारचें कीर्तन. लग्न, मुंज वगैरे कांही मंगल कार्य समाप्त झाल्यावर गोंधळ्यांकडून देवीच्या नांवाने गोंधळ घालविण्याचा कित्येक कुटुंबात रिवाज आहे. हा गोंधळ हरदासांच्या कीर्तनाप्रमाणे असतो. हरदास जसें कीर्तनात एखादे आख्यान लावून त्याचें स्पष्टीकरण करतात, त्याप्रमाणे गोंधळांत गोंधळी एखादें आख्यान सांगतात [अनुरूप क्रियापद "घालणें"]. ह्या कीर्तनाच्या प्रसंगी फारशी टापटीप आणि व्यवस्था नसते. ह्यावरून "गोंधळ" ह्या शब्दाचे पुढे दिलेले आणखी अर्थ निघून रूढ झाले.

२. अव्यवस्था; घोटाळा; गडबड, अंदाधुंदी. [ह्या अर्थाचीं अनुरूप क्रियापदें माडणें, करणें, माजविणें, उडविणें इ०; होणें, माजणें, उडणें, इ० ].

३ मनाचा संभ्रांतपणा; काय करावें हें न सुचणें; भ्रांतिष्टपणा. [अनुरूप क्रियापद होणें, उडणें, इ० ].

२२१ गोळा होणें—(क) एकत्र जुळणें; गर्दी करणें. उ०

चिंताज्वरांत माझा रात्रीं नाहींच लागला डोळा ।
जायासाठी कंठीं शतवार प्राण जाहले गोळा ॥—मोरोपंत.

(ख) गात्रें शक्तिहीन, निरुत्साह होऊन चलनवलनादि व्यापारास असमर्थ होणें. उ० झोपेने ह्या मुलाचा गोळा होऊन गेला आहे!

## २२२. घटका

१ घटका—

(क) विशिष्टकालपरिमाण; अडीच तास.

(ख) घटकेच्या अवधीने पाण्यांत बुडणारें तांब्याचें पात्र. [घटका मोजण्यासाठी ज्योतिषी ह्याचा उपयोग करतात].

२ एखाद्याची घटका घातलेली असणें—तो आताच मरतो, की घटकेने मरतो, अशा स्थितींत तो असणें.

३ एखाद्याची घटका भरणें—त्याचा विनाशकाल जवळ येऊन ठेपणें.

२२३ घडा भरणें—एखाद्याच्या पापकृत्याचा परमावधि होणें. उ० हल्ली गोविंदराव राजरोस आणि निर्लज्जपणानें लाच खाऊं लागला आहे; पण त्याचा घडा भरला, म्हणजे त्याला शासन होईलच होईल! [ माणसानें कांही पापकृत्य केलें म्हणजे त्याच्या मोजदादीचा एक खडा चित्रगुप्त एका घड्यांत टाकतो. अशा प्रकारें खडे टाकून तो घडा पुरता भरला म्हणजे त्याला जें शासन योग्य असेल तें मिळतें; अशा कल्पनेवरून ही शब्दसंहति उत्पन्न झाली आहे. "पापाचा घडा भरणें" असेंहि म्हणण्याचा परिपाठ आहे ].

२२४ घबाड साधणें—आकस्मिक, अकल्पित नफा होणें.

टीप—घबाड ह्याचा अर्थ शुभ समय असा असून नतर अकल्पित किंवा मोठा लाभ असा झाला. त्याचा "मोठा" अशा अर्थानेंहि उपयोग होतो.

२२५. घर

१. घर

( क ) राहावयासाठी बांधलेली जागा, वाडा वगैरे.

( ख ) घरात राहणारीं किंवा एका कुटुंबांतील माणसें.

( ग ) संसार; प्रपंच. उ० त्याला नोकरी लागतांच त्याने स्वतंत्र घर थाटलें.

( घ ) एखाद्या व्यवसायात जुटीने काम करणारीं माणसें किंवा मंडळी.

( ङ ) बीळ ( चिचुंदरी, वगैरेंचें ); घरटें ( पक्ष्यादिकांचें )

( च ) वसतीचें ठिकाण ( मालकाच्या इच्छेविरुद्ध मिळविलेलें ). बळकाविलेलें ठिकाण. उ० कोळ्याने माझ्या टाचेंत घर केलें. उ० ढेकणानी ह्या कोपऱ्यात घरें केलीं.

( छ ) एखादा पदार्थ शिरकावण्यासाठी केलेला दरा किंवा केलेलें भोक.

उ० ह्या खांबासाठी जाडी घर कर. उ० भिंतीला अगोदर घर करून मग खुंटी ठोक.

( ज ) एखादी वस्तु सुरक्षितपणें ठेवावयासाठी केलेली जागा. उ० माझ्या चष्म्याचें घर चामड्याचें आहे आणि गिरिधररावांच्या चष्म्याचें घर लाकडाचें आहे.

( झ ) पेटींतील कप्पा; खण.

( ञ ) सोंगट्याच्या किंवा बुद्धिबळांच्या पटावरील एक एक चौक. उ० घोडा अडीच घरें चालतो.

( ट ) ( ज्योतिषांत ) कुंडलीच्या कोष्टकांत सूर्य, चंद्र वगैरे ग्रहांचीं स्थानें.

(ठ) घराणें किंवा वश. उ० त्याचें घर कुलिनांचें आहे. आमच्या घरांत आजपर्यंत कोणाहि स्त्रीस वैधव्य आलें नाही; सार्‍या स्त्रिया सुवासिनी मेल्या. त्यांच्या घराला पदर आहे (म्ह० त्याच्या वशात परजातीची मेसळ झाली आहे).

(ड) उत्पत्तीचें स्थान. उ० शरिरात पित्ताचें घर कोठेसें असतें?

(ढ) उत्पत्तीचें कारण. उ० बांगें हें लरजेचें घर आहे. आळस हें दारिद्र्याचें घर होय!

(ण) वादाचें कारण.

(त) ऐपत, एखादें काम करण्याचे सामर्थ्य किंवा ताक्द. उ० जें कांही करणें तें आपलें घर पाहून करावें.

(थ) सतारीच्या दोन पडद्यामधील अंतर.

(द) शास्त्र, कला वगैरेंचें मर्म, खुबी, इत्यादि. उ० तुम्ही गातां खरें, पण तुमच्या हातीं गाण्याचें घर लागलें नाही.

(ध) अडचणीच्या, पराभवाच्या वेळीं निसटून जाण्यासाठी करून ठेविलेली पूर्व योजना. उ० ह्याच्या बोलण्यात घर आहे किंवा हा घर ठेवून बोलतो (म्ह० ह्याच्या बोलण्यात आडपडदा आहे).

(न) आपण, स्वता. उ० इच्छी परा, तें येई घरा (म्ह० जो दुसर्‍याचें अनिष्ट चिंतितो, त्याच्या स्वताच्याच भोगाला तें अनिष्ट येतें).

२. घर उघडणें—

(क) लग्न करून ससार थाटणें. उ० नारोपंतानी आतां घर उघाडिलें आहे; ते पूर्वीचे नारोपत नव्हत, बरें का?

(ख) एखाद्याचें लग्न करून देऊन त्याचा ससार मांडून देणें. उ० नदूभाऊंनी आपली मुलगी त्या गोकर्णभटाच्या मुलास देऊन त्याचें घर उघाडिलें

३. घर करणे—

(क) बिऱ्हाड करणें. राहावयाला जागा घेऊन तींत जेवणखाण वगैरे करू लागणें. उ० चार महिने मी खाणावळींत जेवीत असें; आता घर केलें आहे.

(ख) एखाद्याला त्रास होईल, अशा ठिकाणीं वास्तव्य करून राहणें उ० कास्याने माझ्या टाचेत आज सहा महिने घर कलें आहे.

४ एखाद्याचे घर घेणे किंवा घालणे—त्याच्या घराचा नाश करून सोडणें.

५ घर चालविणें—प्रपचाची किंवा ससाराची जबाबदारी शिरावर घेऊन त्याची व्यवस्था पाहणें उ० घर चालवी, तो घराचा वैरी.

६ घर जोडणें—एखाद्या घराण्याशीं मैत्रीचा किंवा विवाहाचा सबध करणें.

७ घर डोईवर घेणें—घरात कल्कलाट करणें. उ० चार पोरें एका ठिकाणीं गोळा झालीं, म्हणजे तीं घर जसें डोईवर घेतात! मास्तर लोक आदित्यवारीं मुलांना सुट्टी कां देतात कोणास ठाऊक वाई!

८. घर तुटणें—एखाद्या कुटुंबाशीं असलेला मैत्रीचा, नात्याचा वगैरे संबंध नाहीसा होणें.

९ दुसऱ्याचें घर दाखविणे—अमक्याच्या घरीं जा, असें सांगून एखाद्यास हाकून देणें किंवा दूर करणें. उ० तो टांगेवाला माझ्या घराशीं कटकट करीत बसला होता त्याला मीं गोवर्धनपताचें घर दाखविलें.

१०. घर धरणे—

(क) घरातच बसून राहणें, घराच्या बाहेर न पडणें. उ० तुम्ही आठ आठ दिवस घर धरून काय बसता? रोज संध्याकाळीं देवदर्शनाच्या निमित्ताने तरी घराच्या बाहेर पडत जा!

(ख) एखादा आजार पक्का जडणें उ० दम्याने माझ्या शरिरात घर धरिलें आहे

(ग) चचलपणा न करतां एकाच ठिकाणावर भिस्त ठेवून राहणें उ०कमला-बाई ही एक घर धरून राहणारी बाई आहे आज साठ्यांच्या घरीं, उद्या रानड्यांच्या घरीं, परवा लिमयांच्या घरीं अशी नाचानाची करणारी ती बाई नाही स्वयपाकाच्या कामाला तिला तुम्ही नि शकपणें ठेवून घ्या.

११ एखाद्याचे घर धुणें किंवा धुऊन नेणें—दुसऱ्याचें जें असेल नसेल तें सर्व लबाडीने हिरावून घेणें आणि त्याला बुडविणें. उ० तुम्ही कारकुनावर फार भरवसा टाकून राहूं नका, तो संधि सापडल्यास तुमचें घर धुऊन न्यावयास कमी करणार नाही!

१२ घर नेसविणे—घरावर गवत घालून तें शाकारणें. [कोकणात "घर शिवणें" म्हणतात].

१३ लोकाचीं घरें पुजणें—

(क) आपलें कर्तव्य न करतां लोकाच्या घरीं त्याना भेटावयासाठी जाणें.

(ख) आपलें काम करून घेण्यासाठी लोकांच्या घरीं वारवार जाणें

१४ घर फोडणें—

(क) ससार आटोपणें

(ख) कुटुंबातील माणसात फूट पाडणें

१५ घर वसणें—घरातील कर्ता किंवा मिळविता पुरुष नाहीसा झाल्यामुळे कुटुंबाला विपन्न दशा प्राप्त होणें.

१६ घर पाहणें—घराकडे वक्रदृष्टि करणें. उ० कालाने एखाद्याचें घर पाहिलें, की तें बुडालेंच म्हणून समजावें !

१७ एखाद्याचें घर बुडविणें—त्याच्या घराचा म्ह० कुटुंबाचा विध्वंस करणें.

१८ घर फिरलें म्हणजे घराचे वांसे फिरतात—एखाद्या माणसावर यजमानाची वक्रदृष्टि झाली म्हणजे त्याचे नोकरचाकरदेखील त्या माणसाचा तिरस्कार करूं लागतात.

१९. घर बुडणें—

( क ) कुटुंबाची नासाडी, दुर्दशा होणें.

( ख ) संतति नसल्याकारणानें कुटुंबाचा लोप होणें.

२० घर भंगणें—घराचा नाश होणें; घराचें वैभव किंवा महत्त्व नाहींसें होणें. उ० आपलेंकांत तंटे लागल्यामुळे भाटवल्याचें घर भंगलें.

२१ आपलें घर भरणें—दुसऱ्याच्या पैशाचा हळूहळू गुप्त रीतीनें अपहार करून तो आपल्या घरात आणणें. उ० मेहुण्याला बुडवून गोवर्धनपंतानें आपलें घर भरलें.

२२ घर भलें की आपण भला—जो लोकांच्या उचापतींत न पडता मुकाट्यानें आपलें काम करीत असतो असा, जो लोकांकडे उगीचच्या उगीच न जातां आपल्याच घरीं असतो तो.

२३ घर मांडणें किंवा थाटणें—घरामध्ये संसारोपयोगी जिन्नस किंवा वस्तु आणून तें नीटनेटकें किंवा सोयीचें करणें.

२४ घर म्हणून ठेवणें—नादत्या घरामध्ये ह्या जिन्नसेचा उपयोग केव्हाना केव्हा तरी होईल असें म्हणून ती जिन्नस संग्रहास ठेवणें.

२५ घर वसविणें—मुलाबाळांनीं घर भरून घराचा मयाणपणा नाहींसा करणें. उ० माझी बायको मेली म्हणून मीं मुलाचें लग्न करून दिलें. म्हटलें की, सून तरी घर वसवील.

२६ घर सांकड आणि बाईल माकड—घर भिकार आणि बायको कुरूप ( असें असलें म्हणजे मीति नाही ).

२७ घराचा पायगुण तसा—घरांतील माणसांची चालचलणूक असेल त्याप्रमाणें.

२८ घराचा वांसा ओढणें—एखाद्या मोठ्या कामातून जरुरीचें साधन नाहींसें करणें. उ० आमच्या मंडळींतून पाटीलबोवांनी रामभाऊस फितविलें, आता आम्ही काय करूं शकूं ? त्यांनीं घराचा वासाच ओढला !

२९ घरांत विचारा किंवा दाखवा इ०—माझ्या पत्नीला विचारा, दाखवा इ०. "घरात" ह्याच्या उलट "बाहेर" "बाहेर" म्ह०पतीला किंवा यजमानाला. (पुढे क्रियाविशेषणें ह्या प्रकरणात "तिकडे," हा शब्द पाहा).

३० घरांत समजणें—घरातल्या घरात समजूत पाडून घेणें; आपला तंटा चवाठ्यावर न आणणें.

३१ घरावर काठ्या घालणें, गोवरी ठेवणें किंवा निखारा ठेवणें—एखाद्या कुटुंबाची बदनामी किंवा नाश करणें.

३२ घरावर कुत्रे चढाविणें—घरामध्ये कलागती लावून देणें किंवा तंटे उत्पन्न करणें.

३३ घरावर गवत रुजणें—घर ओसाड होणें.

३४ घरास कांटी लावणें—घर ओसाड, उध्वस्त करणें. घरास कांटी लागणें म्ह० घर ओसाड होणें.

३५ एखाद्याच्या घरास हाड बांधणें किंवा घरावर टहाळा टाकणें—त्याला जातीच्या बाहेर टाकणें; त्याला वाळींत टाकणें.

३६ मळा, शेत वगैरे घरीं करणें—घरांतील सर्व माणसानी स्वकष्टाने त्याची लागवड किंवा मशागत करणें; खंडाने किंवा अर्धेलीने न देणें.

३७ घरीं बसणें—उद्योगधंदा नसल्यामुळे किंवा सोडून दिल्यामुळे रिकामें असणें.

३८ आपघर की बापघर—नवऱ्याचें घर किंवा बापाचें घर स्त्रीला योग्य, दुसऱ्याच्या घरीं तिने राहणें योग्य नाही.

३९ दिलें घर की उपजलें घर—ज्या घरीं स्त्री दिली असेल तें (म्हणजे स्त्रीच्या नवऱ्याचें घर), किंवा ती ज्या घरीं जन्मली असेल तें (म्हणजे तिच्या बापाचें घर), हीं दोनच घरें काय तीं स्त्रीला राहावयास योग्य होत.

४० खाल्ल्या घरचे वांसे मोजणें—कृतघ्न होणें.

४१ वडा घर पोकळ वांसा—दिसावयाला भपकेदार पण असावयाला नादान.

४२ घर ना दार आणि देवळीं बिऱ्हाड—जो एकटा आहे, त्याला बायको, मुलें वगैरे नाहीत, अशा मनुष्यासंबंधाने हे शब्द योजतात.

४३ घरासारखा पाहुणा होतो, पाहुण्यासारखें घर होत नाही—एखादा नवीन माणूस समाजांत आला म्हणजे तो समाजाची चालरीत उचलतो समाज त्याची चालरीत उचलीत नाही.

४४ घरीं दारीं सारखाच—सर्व ठिकाणीं सारखाच वाईट. जसा स्वताच्या घरीं उपद्रवकारक, तसाच लोकाच्याहि घरीं उपद्रवकारक.

४५ घरोघरीं एकच परी किंवा घरोघरीं मातीच्या चुली—जिकडे-तिकडे एकच प्रकार !

४६ आपलें घर बारा कोसांवरून दिसते—आपलीं कामेंधामें वगैरे आपणास कळतात किंवा उत्तम प्रकारें ठाऊक असतात.

२२६ घाला घालणें—हल्ला करणें; प्रहार करणें, उ०—

धर्मद्वेष करी सदा दुर्योधन । घाडिला छळानें वनवासा ॥ १ ॥

तरी दुष्टबुद्धि न राहे उगला । नानापरी घाला घालीतसे ॥ २ ॥ —तुकाराम.

## २२७. घोडा

१. घोडा—

(क) प्राणिविशेष; अश्व. उ० घोडा आपला दाणा वाढवून खातो. (म्ह० घोड्यानें चागलें काम केलें तर यजमान आपण होऊन त्याला जास्ती दाणा खाऊं घालतो. नोकराचें काम पसत पडलें, तर यजमान आपण होऊन त्याचा पगार वाढवितो).

(ख) बुद्धिबळाच्या खेळांतील एक मोहरें. उ० घोडा अडीच घरें चालतो.

(ग) बंदुकींत ठिणगी पाडण्याचें एक साधन.

(घ) दोन पायांत काठी घालून मुलें खेळतांना धावतात, तेव्हा त्या काठीला "घोडा" म्हणतात.

(ङ) मूर्ख, अज्ञान, बिनअकली मुलगा.

(च) वस्त्रें वगैरे ठेवण्यासाठी जी काठी बांधलेली किंवा टांगलेली असते ती.

(छ) नदीवर किंवा समुद्रावर मनुष्य स्नानासाठी गेला असता वस्त्रें ठेवण्यासाठी जी काठी वाळवटांत उभी रोवतात ती.

(ज) दोन पायाचा घोडा, म्ह० (विनोदी भाषणांत) चालावयाच्या उपयोगाच्या दोन तंगड्या. उ० आम्हाला घोडाबिडा कांही नको. आमचा दोन पायाचा घोडा आम्हांला हवें तेथे वाहून नेईल!

(झ) पाळणा टांगावयाची जी चौकट किंवा रचनाविशेष ती. घोडी—पाळण्याचा आधार.

(ञ) जिच्या टोकाला दुबेळकें आहे, अशी काठी (पालखी, मेणा वगैरे ठेवण्याच्या उपयोगाची).

(ट) मूल रांगतांना दोन हात व दोन गुडघे जमिनीवर टेकून जी शरिराची मांडणी करतें ती. (अनुरूप क्रियापद, "करणें").

(ठ) हरदासाचा मृदंग ठेवण्याची घडवंची.

(ड) नारळाची साल काढण्यासाठी जो उभा खांब पुरलेला असतो आणि ज्याच्या टोकाला सुरी बसविलेली असते तो.

(ढ) लाटेचा उच्च भाग.

(ण) घोडेस्वार (लाक्षणिक अर्थाने). उ० दौलतरावाजवळ ह्या वेळीं पांचशे घोडा होता (म्ह० घोडेस्वार होते).

२ घोडा उभा करणें किंवा थांबविणें—घाई न करणें.

३ घोडा काढणें—घरांत बांधून ठेविलेला घोडा फिरावयासाठी किंवा फिरवावयासाठी बाहेर नेणें.

४ घोडा हाकणें—पळून जाणें, निघून जाणें. उ० तू येथुन घोडा हाक (म्ह० निघून जा). उ० पतोजीस पाहतांच त्या पोरानें घोडा हाकला!

५ कागदी घोडे नाचविणें—प्रत्यक्ष व्यवहारात फायदा, लाभ किंवा सोय, हीं काही नसून नुसत्या कागदोपत्रीं मात्र डौलाच्या आणि वैभवाच्या गोष्टी लिहिणें, [घोड्याच्या आकाराचे कागदाचे तुकडे कातरून ते दिव्यापुढे धरले म्हणजे भिंतीवर त्याच्या सावल्या घोड्याच्या आकाराच्या पडतात हा मुलाचा खेळ आहे. हे कागदी घोडे कितीहि नाचविले, तरी त्यापासून फल काही नाही. यावरून "कागदी घोडे नाचविणें," ह्याचा वरीलप्रमाणें अर्थ होतो]

६ एखाद्याच्या घोड्यापुढे धावणें—त्याची कष्टाची सेवाचाकरी करणें, त्याची ओंगळ खुशामत करणें.

७ घोड्यावर बसणें—दारू पिऊन झिंगणें.

८ घोड्यावर बसून येणें—घाईनें येणें, आवेशाने येणें, आपली आज्ञा लोकानी तावडतोब पाळावी किंवा आपली इच्छा लोकानी तत्काळ पुरवावी, अशा मूर्ख इराद्याने येणें.

९ घोडा मैदान जवळच आहे!—ज्याची परीक्षा करावयाची तो पदार्थ आणि परीक्षा करावयास लागणारी सामुग्री, हीं दोन्ही येथे आहेत! कोरडी बढाई कशाला पाहिजे? किंवा उगीच तर्क कशाला पाहिजेत? [पुढे साम्प्रदायिक वाक्यें ह्या प्रकरणात पाहा].

१० सर घोड्या पाणी खोल! किंवा मर घोड्या पाणी पी!—अरे घोड्या, मागे हट, कारण येथे पाणी खोल आहे अरे घोड्या, मागे सरक आणि जेथे आहेस, तेथलेंच पाणी पी. (धोक्यांत शिरण्यापूर्वी नीट विचार करा, असा कोणास उपदेश करावयाचा असतां ह्या वाक्याचा उपयोग करतात).

## २२८. घोडें

१. घोडे—

(क) घोडा (सामान्य जाति, प्रेम किंवा तिरस्कार दाखविण्यास "घोडें" शब्द योजला जातो). उ० कृष्णकाठचीं घोडीं सडपातळ, पण चपळ असतात.

(ख) खटारा गाडीचीं दोन लाब लाकडें (ज्यांच्या टोकाला आडवें जूं बांधलेलें असतें).

(ग) चार भोपळ्यावर रचलेला पाण्यावर तरंगणारा तराफा.

२ आपले घोडे पुढे ढकलणे—दुसऱ्याच्या सोयीकडे दुर्लक्ष करून आपली सोय करून घ्यावयाला सरसावणें. आपली हौस किंवा इच्छा, तृप्त करून घेण्यासाठी दुसऱ्याच्या हौसेकडे किंवा इच्छेकडे काणा डोळा करणें; मंडळीचें संभाषण चाललें असता दुसऱ्याचीं बोलणीं बंद पाडून आपलेच विचार त्याच्यावर लादणें.

३ आपले घोडें पुढे दामटणे—आपला कार्यभाग इतराच्या अगोदर साधण्याच्या खटाटोपास लागणें.

४ येथेच घोडें पेंड खाते!—

(क) मर्मस्थान तें हेंच! छिद्र, कमीपणा, लबाडी जी आहे ती येथेच आहे! दुर्निवार जी अडचण ती येथेच आहे.

५ एखाद्याचे घोडें मारणें—त्याची कांही हानि करून त्याला रुसण्याला निमित्त करून ठेवणें; त्याच्या इच्छेच्या आड येणें. उ० मीं काय तुझें घोडें मारलें आहे, म्हणून तूं माझा वैरी होतोस? (म्ह० मीं काय तुझें नुकसान केलें आहे?)

६ घोडें थकणें—शक्ति क्षीण होणें. उ० रामभाऊ, तुमचें घोडें थकलें की काय? आणखी एक लाडू घ्या!

७ माझेंच घोडें आणि म्हणे, जाऊं द्या पुढे—माझें काम अगोदर झालें पाहिजे (मग त्यामुळे बाकीच्याची किती कां गैरसोय होईना!). आपलपोट्याचा तिरस्कार करावयाचा असता त्याच्या संबधानें हें सांप्रदायिक वाक्य योजतात.

## २२९. घोरपड

१ घोरपड—"घोरपड" हा आश्रयस्थानाला घट्ट धरून बसणारा असा एक प्राणी आहे. घोरपड ज्या पदार्थावर टाकावी, त्याला ती घट्ट बिलगून राहते. मराठे वीर शत्रूच्या किल्ल्यात प्रवेश करण्यासाठी ह्या प्राण्याच्या कंबरेला दोरी बांधून त्याला तटाच्या भिंतीवर फेंकीत असत. लाक्षणिक अर्थानें "घोरपड" म्हणजे कांही लचाड, अरिष्ट किंवा एखादा त्रासदायक माणूस.

२ एखाद्यावर घोरपड आणणें—त्याला संकटात, पेंचात लोटणें. उ० विसाजीपंत साधा आणि सरळ माणूस होता, पण त्या बिचाऱ्यावर इतर कारकुनांनी घोरपड आणून त्याला राजीनामा द्यावयाला भाग पाडलें!

३ एखाद्यावर घोरपड येणें—तो संकटांत किंवा अडचणींत पडणें; त्याच्यावर कांहीं अरिष्ट गुदरणें; त्याच्यावर कांहीतरी हकनाहक तोहमती किंवा आरोप येणें. उ० यशवंतराव जर असा अव्यवस्थितपणें वागूं लागला, तर त्याच्यावर खचित कांहीतरी घोरपड येईल! उ० त्या लेखकानें आपलें वचन पुरें केलें असतें तर आमच्या, बिचाऱ्या कवीवर आणखी काय घोरपडी आल्या असत्या, न कळे!

विष्णुशास्त्री चिपळूणकर,—निबंधमाला.

## २३०. चक्री

१ चक्री—पागोटयाचा किंवा पगडीचा केळ्याच्या वरचा आणि कोकीच्या खालचा जो वर्तुळाकार भाग तो. उ० महाराष्ट्रातील पागोटयाची चक्री रुंद असते; ग्वालेर, इंदूर वगैरे ठिकाणच्या पागोटयाची चक्री अगदी अरुंद असते.

२ पागोटयात खोवावयाचा लहानसा तुरा.

३ एखाद्याची चक्री उडविणें—त्याची फजिती करणें.

४ एखाद्याची चक्री गुंग करणें, गुंगविणें किंवा उतरणें—त्याला घोटाळयात घालणें किंवा संभ्रान्त करणें; त्याला पेचांत किंवा अडचणींत पाडणें.

५ त्याची चक्री गुंग झाली—त्याला कांहीं सुचेनासें झालें; अडचणींतून कसें बाहेर पडावें, हें त्याला समजेना.

२३१ चंग बांधणें—मी अमुक एका कलेंत किंवा विद्येंत पटाईत आहें; मी अमुक कार्य करावयाला समर्थ आहें; अमुक कार्य करावयाचा मीं निर्धार केला आहे, असें धमकदारीनें म्हणणें.

२३२ एखाद्याला चतुर्भुज करणें—त्याच्या मुसक्या बांधणें. "मुलाचें लग्न करून देणें," असा ह्या शब्दसहतीचा विनोदार्थीहि उपयोग होतो. उ० आम्ही आपल्या मुलाला चतुर्भुज केलें! त्याचप्रमाणे "मी चतुर्भुज झालों" म्हणजे माझें लग्न झालें!

२३३ चंदन करणें—नाश करणें. [चंदनाचें खोड उगाळून उगाळून संपून जातें, ह्यावरून वरील वाक्प्रचार उत्पन्न झाला आहे].

२३४ चंबूगवाळें आटोपणें—"चंबू" म्हणजे लहानसा गडवा आणि "गवाळें" म्हणजे मुकटा वगैरे ठेवण्याची पिशवी.

(क) "एखाद्या ठिकाणचें आपलें चंबुगवाळें आटोपणें," म्ह० दुसऱ्या ठिकाणीं जाण्याच्या उद्देशानें आपली माडीकुडीं, कपडे वगैरे सामानाची आवराआवर करणें.

(ख) एखाद्या ठिकाणीं राहिल्यास आपणास त्रास होईल, आपली फजिती उडेल किंवा आपणावर कांहीतरी संकट येईल, अशा भीतीनें तेथून गुपचिप निघून जाणें.

२३५ चव्हाट वळणें किंवा लावणें—लांबलचक किंवा कटाळवाणी हकीकत सांगत बसणें.

२३६ चवाठ्यावर आणणें—उघडकीस आणणें; गुप्त गोष्ट जाहीर करणें. उ० घरगुती भांडणें चवाठ्यावर आणणें बरें नाही.

२३७ चांदरात झडणें—ज्या रात्रीं प्रथम चंद्रदर्शन होतें, तिला "चांदरात" म्हणतात. ह्या दिवशीं नोकरलोकांस पगार देण्याची चाल आहे. पगाराचे पैसे ज्याच्या त्याच्या हातात खळखळत असतात आणि जो तो आनंदित असतो. "चांदरात झडणें" म्हणजे आनंदाचा, चैनीचा दिवस प्राप्त होणें.

२३८ चांदी उडणें—नाश होणें; अतोनात त्रास होणें. [ "चंदी उडणें," असाहि प्रयोग आहे ].

## २३९. चाळा

१ एखादी गोष्ट करण्याकडे मनाची विशेष प्रवृत्ति.

२ चाळा लागणें—नाद किंवा छंद लागणें.

३ चाळा लावणें—नाद किंवा छंद लावणें.

## २४०. चीत करणें

१ पराजित करणें.

२ एखाद्याला चारी मुंढे चीत करणें—त्याचा पूर्णपणें पराभव करणें. संशयाला जागा न राहील अशा रीतीनें त्याच्यावर जय मिळविणें.

टीप—कुस्तीमध्ये एका गड्याने दुसऱ्या गड्याच्या पाठीचे चारी कोपरे जमिनीला लागतील अशा रीतीने त्याला उताणें पाडलें, म्हणजे तो पडलेला गडी चारी मुंढे चीत झाला, असें म्हणतात. खाद्याजवळचे पाठीचे दोन कोपरे आणि माकड-हाडाच्या दोन बाजूचे दोन कोपरे मिळून पाठीचे जे एकंदर चार कोपरे, ते चार मुंढे. एखाद्याला चारी मुंढे चीत करणें म्ह० अर्थात् त्याचा पूर्ण पराभव करणें.

२४१ चुकल्याचुकल्यासारखें होणें—आपल्या सवयीचें माणूस किंवा वस्तु जवळ नसल्यामुळे किंवा आपण परक्या ठिकाणीं गेल्यामुळें गैरसोय किंवा अस्वस्थता वाटणें.

२४२ चुटपुट लागणें—हळहळ; हुरहुर लागणें; अस्वस्थता वाटणें. उ० मी रागाच्या सपाट्यात वडील भावाला थोडेसें लावून बोललों, त्याची मला चुटपुट लागली आहे.

२४३ चुडेदान देणें—"चुडा" म्हणजे बांगड्या; स्त्रीचा पति मेला, म्हणजे तिच्या हातांतील बांगड्या पिचवून टाकतात. यावरून "एखाद्या स्त्रीस चुडेदान करणें," म्हणजे तिला बांगड्या देणें; तिच्या हातातील बांगड्या राखून ठेवणें म्हणजे तिच्या पतीचे प्राण न घेणें. उ०

रखमादेवी म्हणे देई चुडेदान। संरक्षीं रे प्राण भ्रताराचा ॥

तुकाराम,—हरिपाळचरित्र.

२४४ चुरमुरे खात बसणे—इच्छिलेली वस्तु न मिळाल्याकारणाने खजील होऊन बसणें; आशाभंग झाल्यामुळे दुःखी होणें. [ या शब्दसंहतींत विनोदाचा बराच भाग आहे ].

२४५ चुलींतून निघून वैलांत पडणें—एका संकटातून निघून दुसऱ्या संकटात पडणें; एक संकट टाळावयाचा कोणी माणूस प्रयत्न करीत असतां तो त्याच जातीच्या दुसऱ्या काहीतरी संकटात पडणें.

२४६ चुलीला अक्षत देणें—लग्न, मुंज वगैरे मंगलकार्य ज्याच्या घरीं व्हावयाचें असेल, तो आतेष्टांच्या घरीं जाऊन त्याना भोजनार्थ आमंत्रण करतो. ह्या प्रसंगीं तो कुंकू लावून तांबडे केलेले तांदूळ आमंत्रितांना देतो, त्या विधीला "अक्षत देणें" असें म्हणतात. जेव्हा हें आमंत्रण घरातील सर्व माणसाना, म्हणजे नोकर-चाकराना व पाहुण्यांनासुद्धा दिलेलें असतें, तेव्हा अक्षत देणारा मनुष्य म्हणतो, "मी ही चुलीला अक्षत देतों," म्हणजे तुमच्या चुलीने आमच्या घरीं जेवावयास यावें. म्हणजे तुम्ही आपली चूल मुळीच पेटवू नका.

२४७ चूर होणें—निमग्न होणें; आसक्त होणें; आवडीने स्वीकारणें. उ० कवितेच्या अंतरंगावर जें धोरण ठेवावयाचें, तें टाकून 'केवळ बाह्यागावरच जो अगदी चूर होऊन गेला, तो कवि कसला? अशी नवीन विद्वान् मंडळीची आज पुष्कळ दिवस समजूत होऊन राहिली आहे. विष्णुशास्त्री,—निबंधमाला.

२४८ चोराला सोडून संन्याशाला सुळी देणे—खऱ्या अपराध्याला सोडून देऊन निरपराध्याला शिक्षा देणें. [ संन्यासी हे ईश्वरचिंतनात काळ घालवीत असतात; त्यांच्या हातून अपराध होणें संभवनीय नाही. त्याच्यावर तोहमत घेणारा मनुष्य मूर्ख असावयाचाच ].

२४९ चोरी असणे किंवा होणें—एखादी गोष्ट उघडपणें आणि उजळ माथ्याने करण्याचा हक्क असता ती लपूनछपून करण्याचा किंवा मुळीच न करण्याचा प्रसंग येणें. उ० आमच्याजवळ दागिने असून ते ह्या खेडेगावच्या राहणीमुळे अंगावर घालण्याचीसुद्धा चोरी झाली आहे (म्ह० अंगावर घालणें धोक्याचें म्हणून सोडून द्यावें लागत आहे). उ० त्या दुष्टाने माझें भारी नुकसान केलें; पण त्याच्याविरुद्ध चकार शब्द काढण्याची मला चोरी झाली आहे!

२५० चोहोंचा आंकडा घालून बसणें—आसनमांडी घालून सुखाने बसणें. [ आसनमांडी घातली असतां बैठक ४ ह्या आकड्याप्रमाणेच होते. ]

२५१ चौपदरी घेणें—चौपदरी = चार पदर म्ह० टोकें किंवा कोपरे जिला आहेत अशी वस्तु' अर्थात् झोळी. "चौपदरी घेणें," झोळी हातीं घेऊन भिक्षा

मागणें. उ० अलीकडे तूं मुळीच अभ्यास करीत नाहीस. पुढे चौपदरी हातीं घेणार आहेस की काय ?

२५२ छक्केपंजे—लबाड्या; डावपेच. छक्के आणि पंजे म्हणजे पत्त्यांच्या डावांतील ६ ठिपक्यांचीं आणि ५ ठिपक्यांचीं पानें; एका जातीचें पान नाहींसें करून त्याच्या जागीं दुसऱ्या जातीचें पान उत्पन्न करणें, हा एक हातचलाखीचा खेळ आहे. त्याला "छक्केपंजे" म्हणतात. पुढे "छक्केपंजे" याचा अर्थ ओघानेंच हातचलाखी, नजरबंदी, फसवणूक, लबाडी असा झाला. छक्केपंजे करणें, ओळखणें, जाणणें, चालू न देणें वगैरे शब्दसंहतींचा अर्थ सहज समजण्याजोगा आहे.

२५३ जगांतून उठणें—लोकाचाराविरुद्ध वागणें; लोकाची लाज सोडून देऊन उच्छृंखलपणें वागणें.

२५४ एखाद्याला जंगजंग पछाडणें—त्याच्यापासून एखादी वस्तु प्राप्त करून घेण्यासाठी अतोनात प्रयत्न करणें किंवा शिकस्तीची खटपट करणें. उ० सटवाजीला नारूवरचें एक औषध ठाऊक होतें; तें त्यानें मला सांगावें, म्हणून मीं त्याला जंगजंग पछाडलें. परंतु त्यानें मला तें सांगितलें नाही ! आणि शेवटीं तो मरून देखील गेला ! एखाद्याशीं एखाद्याबरोबर किंवा, पुढे जंगजंग पछाडणें असेंहि म्हणतात. व्युत्पत्ति—फारसी "जंग" म्ह० युद्ध, लढाई. जंगजंग पछाडणें म्ह० लढाई जणो काय करावयाची आहे, अशा बुद्धीनें एखाद्याशीं वागणें. "जंग" हा शब्द मराठींत प्रविष्ट झाला नाही, तरी जंगी म्ह० फार मोठा, ( लढाईंत उपयोगी पडूं शकेल इतका मोटा ), हें विशेषण, आणि जंगी मोवरा हा समस्तरूप शब्द, असे दोन शब्द मराठींत रूढ झाले आहेत.

२५५ जपमाळ घेणें—देवाचें नाव जपतांना जप करणारा हातात एक माळ घेतो, तिला "जपमाळ" म्हणतात. देवाचें नांव एक वेळा उच्चारलें म्हणजे जप करणारा मनुष्य माळेचा एक मणि बोटांनी सरकावतो; माळेंतील मण्यांची संख्या ठरलेली असते, तीवरून जप किती झाला हें समजतें. जपमाळ घेऊन बसलेला मनुष्य देवाचें ध्यान करीत असतो. यावरून "एखाद्या गोष्टीची जपमाळ घेऊन बसणें," म्ह० त्या गोष्टीचा निदिध्यास ( जसा कांही देवाचा ) घेणें; तिच्याकडे सर्व चित्त लावणें; ती मनांत घोळत ठेवणें ( ह्या शब्दसंहतींत निंदेचा भाग असतो ).

२५६ जळत घर भाड्यानें घेणें—एखादें काम ( किंवा व्यवहार ) हानिकारक आहे, असें उघड दिसत असतांहि त्यांत पडणें किंवा तें पतकरणें.

२५७ जातीवर जाणें—मूळ स्वभावाला अनुसरून वागणें. एखाद्यानें अंगीं आणलेले आगंतुक गुण एकाएकी लोपून त्याचें मूळच्या गुणाप्रमाणे वर्तन घडणें.

२५८ जानवें तोडण्यास उठणें—जानवें ही ब्राह्मणाच्या अंगावरची पवित्र वस्तु. तिचें रक्षण करणें हें ब्राह्मणाचें आद्य कर्तव्य. मनुष्य अति रागावला म्हणजे

त्याला योग्यायोग्याचा विचार राहत नाही, आणि तो हवें तें करावयास (जानवें-देखील तोडावयास) प्रवृत्त होतो. यावरून "जानवें तोडावयास उठणें" म्ह० अति रागावणें किंवा चिडणें.

२५९. जिभेवर असणें—

(क) अगदी उच्चारले जाण्याच्या बेतांत असणें.

(ख) हवें तेव्हा सांगावयाला, म्हणावयाला, बोलावयाला, स्मरणात असणें; न विसरलेल्या स्थितींत असणें.

## २६०. जीव

१. जीव—

(क) प्राण. उ० जीव आहे तोंपर्यंत औषधोपचार चालविलेच पाहिजेत!

(ख) प्राणी. उ० ईश्वर सर्व जीव उत्पन्न करतो.

(ग) कीड, मुंगी, अळी वगैरे बारीक कृमि किंवा कीटक. उ० ह्या दोणांत जीव झाले आहेत.

(घ) शक्ति, सामर्थ्य, तेज, कर्तबगारी, तडफ, ताकद वगैरे अंगचे गुण. त्यांच्या योगाने कोणतेंहि काम चांगलें होतें. उ० आम्हांस कित्येकांच्या तोंडून ऐकलेलें आठवतें की, मनातील अभिप्राय खुबीदार रीतीने स्पष्ट करण्यास मराठी अगदी अप्रयोजक आहे; तींत काही जीव नाही. वि० कृ० चिपळूणकर,—निबंधमाला.

(ङ) पदार्थांतील उपयुक्त भाग, खरेपणा; लाभप्रदता; विश्वसनीयताः इ०. उ० तांदुळाच्या व्यापारात आता जीव राहिला नाही (म्ह० तो फायदेशीर होण्याचा संभव नाही); ह्या बातमींत कांही जीव दिसत नाही (ती खरी असणें संभवत नाही); छत्रीचा जीव हलका म्हणून ती येवढ्याशा वाऱ्याने फाटली, ह्या चद्रकळेंत आता जीव राहिला नाही (म्ह० वापर सोसण्याची तिच्यांत ताकद उरली नाही); त्याने प्रतिपक्ष्याच्या मताचें ह्या पुस्तकांत खडण करण्याचा यत्न केला आहे, पण त्याने आणलेल्या प्रमाणात कांही जीव नाही (म्ह० तीं प्रमाणें पुळपुळीत आहेत).

(च) मनाची प्रवृत्ति किंवा कल. उ० एक जीव म्हणतो जावें, एक जीव म्हणतो न जावें.

(छ) आत्मा; अतरात्मा. उ० त्याच्यासाठी माझा जीव भारी तडफडतो.

(ज) प्रेम; माया. उ० जिजाबाईचा सर्व जीव शिवाजीवर होता.

२ एखाद्याचा अर्धा जीव करणें—त्याला त्रास देणें किंवा संतावणें. उ० छत्रीसाठी माझ्या मुलाने माझा अर्धा जीव केला.

३ अर्धा जीव होणें—त्रास, कष्ट, काळजी, भीति वगैरेंनी बेजेर होणें

४ आपल्या जिवाला खाणें—चरफडणें; झुरणें.

५ एक जीव येणें, एक जीव जाणें—आता मरतो की अर्ध्या घटकेने मरतो, अशा अवस्थेप्रत पोचणें.

६ एक जीव होणें—अगदी मिळून जाणें. उ० नारळाचा चटू उकळत्या दुधात घातला म्हणजे त्या दोहोंचा एक जीव होऊन जातो.

७ जीव आटणे—दमणें, मागणें; थकून जाणें.

८ जीव आटविणें—दमविणें; सतावणें; त्रासविणें.

९ जीव टांगणीला लागणे—चिंताग्रस्त होणें. उ० मुलाला संध्याकाळीं घरीं यावयाला उशीर झाला, की माझा जीव टांगणीला लागतो (म्ह० मला भारी काळजी लागते; चैन पडेनासें होतें).

१० जीव अधांतरीं उडणे—सभ्रांत होणें; चिंताग्रस्त होणें.

११ जीव अर्धा करणें—फार कष्ट सोसणें; फार मेहनत करणें.

१२ जीव अर्धा होणे—अगदी थकून जाणें.

१३ जीव कालवणें—कासावीस होणें.

१४ जीव कोरडा होणें किंवा पडणे—दमणें, अशक्त होणें, कमजोर होणें, झिजणीस लागणें, व्याकूळ होणें (आजाराने, भुकेने, श्रमाने, इ०).

१५ जीव सुकणे—म्लान, अशक्त, व्याकूळ होणें.

१६ जीव खरडून—जोराने; सर्व शक्ति खर्चून. उ० मुलाला भूक लागली आहे, त्याला दूध पाज; मघापासून तें जीव खरडून रडत आहे.

१७ जीव खाऊन काम करणें—सर्व शक्ति खर्चून काम करणें.

१८ एखाद्याचा जीव घेणें किंवा खाणें—त्याला सतावणें किंवा त्रास देणें.

१९ जीव खाली पडणे—स्वस्थता येणें, चिंता दूर होणें; इच्छिलेली वस्तु प्राप्त झाल्यामुळे समाधान वाटणें.

२० जीव गोळा होणें—भीति वाटणें; कासावीस होणें; अस्वस्थ होणें; श्रमामुळे जीव जातो की राहतो असें होणें, मरणोन्मुख होणें. उ०

जों जों देखे देव कार्लत चोळा।
तों तों त्यांचा होतसे जीव गोळा॥—आनंदतनय.

२१ जीव घेऊन पळणे—प्राण वांचविण्यासाठी पळत सुटणें.

२२ जीव जाळणें किंवा मारणें—इच्छा किंवा मनोविकार नियमित करणें.

२३ जीव टाकणें—

(क) प्राण सोडणें; मरणें.

(ख) निराश होणें; खचणें.

(ग) एखादा पदार्थ अति उत्कटतेने इच्छिणें; एखादा पदार्थ मिळण्यासाठी भारी धडपड करणें. उ० पेढ्यासाठी असा जीव टाकूं नको!

(घ) जीव टाकून म्ह० अति जोराने, कष्टानें किंवा श्रमानें.

२४ जीव ठिकाणीं नसणे—चिंताग्रस्त असणें. उ० गर्दीत हरवलेलें माझें मूल सापडे तोपर्यंत माझा जीव ठिकाणीं नव्हता!

२५ जीव तोडून एखादें काम करणे—मेहनतीने, काळजीने, कुचराई न करता, तें करणें. उ० चितोपतांने पत्राच्या तीन प्रती जीव तोडून केल्या, पण त्या त्याच्या वरिष्ठास आवडल्या नाहीत!

२६ जीव थाऱ्यावर नसणे—चिंताग्रस्त, अस्वस्थ असणें.

२७ जीव थोडथोडा होणे—जिवाला काळजी, भीति, अस्वस्थता वाटणें. उ० तुझ्या वाट्याचे चुरमुरे बाजूला काढून ठेवले आहेत. तुझा जीव थोडथोडा होऊं देऊ नको.

२८. जीव देणे—आत्महत्या करणें. उ० सासऱ्याच्या जाचामुळे त्या पोरीने विहिरींत जीव दिला!

२९ जीव धरणे—न कोमेजणें; वाढीस लागणें. उ० मृगाच्या सुमारास हें झाड लावलें, तर तें जीव धरील

३० जीव धरून—उत्साहाने; मेहनतीने.

३१ जीव पाखडणें—रागाने तडफडणें.

३२. ज्याचा त्याला जीव प्यारा—प्रत्येकाला आपले प्राण आवडतात.

३३. एखाद्या वस्तूवर जीव बसणें—ती फार आवडणें; तिच्यावर प्रेम जडणें उ० ह्या अंगठीवर माझा जीव बसला आहे.

३४. एखाद्याचा जीव भांड्यात पडणें—तो स्वस्थ, शांत होणें; त्याची काळजी दूर होऊन होणें. [बाजारातून विकत आणलेले जिन्नस घरात मोकळे किंवा उघडे पडलेले असतात, तोपर्यंत मुलेंबिलें ते उडविण्याचा किंवा विसकटण्याचा संभव असतो. ते जिन्नस भांड्यांत म्ह० योग्य बारदानांत ठेवण्यात आले म्हणजे त्याच्या सबधाने काळजी करण्याचें कारण राहत नाही. ह्या साम्यावरून हा वाक्प्रचार उत्पन्न झालेला आहे].

३५ जीव मुठींत धरून—गत्यंतर नाही म्हणून नावडती गोष्ट करावयास सिद्ध होऊन, मनाचा धडा करून किंवा मन घट्ट करून.

३६. जीव मोठा करणे—

(क) धैर्य करणें; हिम्मत बाळगणें.

(ख) औदार्य करावयाचा निश्चय करणें. उ० मांडवासाठी तो दहा रुपयाहून जास्ती खर्च करावयाला अगदी नाखूष होता. पण लोकांनी त्याची यट्टा माडली; तेव्हा त्याने जीव मोठा केला, आणि तेरा रुपये खर्च करावयाची परवानगी दिली.

३७ जीव राखणें—कुचरपणा करणें. उ० तो मजूर जीव राखून काम करतो.

३८ जीव वर धरणें—उत्कंठेने इच्छिणें. उ० थालीपिठासाठी त्या पोरीने जीव वर धरला होता!

३९ एखाद्याच्या जिवाचा घोट घेणें—त्याला सतावणें.

४० जिवाची ग्वाही किंवा पाखी देणें—खात्रीपूर्वक सांगणें.

४१ जिवाची हुल्लड करणें—नेटाचा प्रयत्न करणें.

४२ जिवाचें चार चार करणें—चैन, विलास वगैरेंनी स्वताला सुखी करण्याची खटपट करणें.

४३ जिवांत जीव आहे तोपर्यंत—सबंध आयुष्यभर, मरण येईतोपर्यंत; जन्मभर; सदासर्वदा; आमरण. उ० त्याने जिवात जीव आहे तोपर्यंत भावजयीला पोसण्याचा पतकर घेतला आहे.

४४ जिवाचा कलीजा किंवा ताईत—प्रिय किंवा आवडती वस्तु.

४५ जिवाचा धडा करणें—साहसाचा प्रयत्न करावयाला किंवा निरुपाय म्हणून एखादी दुःखाची स्थिति भोगावयाला तयार होणें.

४६ जिवाच्या गांठीं बांधणें—मनांत नीट ठसवून किंवा बिंबवून घेणें.

४७ जिवाला खाणें—मनाला लागणें किंवा लागून राहणें. पश्चात्तापजनक होणें. उ० काल मीं बाबाना तिरसटपणानें उत्तरें दिलीं, ही गोष्ट माझ्या जिवाला खात आहे.

४८ जीव पापी!—हाय हाय! अंतर्यामीं कितीतरी हें पाप!

४९ जीव की प्राण असणें किंवा होणें—अति मूल्यवान् वाटणें. उ०

ती बालमित्र मम; मज मीहि तिला होय जीव की प्राण।
संगीत शास्त्र सारें दोघी शिकलों बरोबरचि जाण॥ —गं० रा० मोगरे.

५० एखाद्याला जीव की प्राण करणें—त्याला फार फार जपणें; त्याची अतिशय काळजी घेणें.

५१ एखाद्याच्या जिवांत जीव घालणें—त्याला उत्तेजन देणें; त्याचें सांत्वन करणें.

५२ जिवाचें रान करणें—फार कष्ट सोसणें. उ० माझ्या औषधपाण्याकरिता मुद्दाम मागे राहून मला आपल्याबरोबर बंदोबस्ताने घोड्यावर घालून घेऊन जिवाचें रान करून लष्कर गाठायाचे श्रम, सायास कोणीं केले?

न० चिं० केळकर,—तोतयाचें बंड.

५३ जिवांत जाव येणें—पुन्हा धैर्य येणें; काळजी, भीति दूर होणें; समाधान होणें. उ० दादा गर्दीत चुकले, तेव्हा मी फार घाबरून गेलें; ते पुन्हा दिसले, तेव्हा

माझ्या जिवांत जीव आला, मला भारी श्रम झाले आहेत; चहा प्याल्याशिवाय माझ्या जिवांत जीव येणार नाही.

५४ जिवानिशीं—जिवासकट. उ० चोरांनी दागिन्यासाठी त्या पोरीला जिवानिशीं ठार मारलें, वाघाच्या तावडींतून मी जिवानिशी पळून आलों.

५५ जिवानिशीं जाणे—मरणें. उ० शेळी जाते जिवानिशीं आणि खाणार म्हणतो वातट !

•५६. जिवापरता—

(क) सोसण्याच्या शक्तीच्या पलीकडचा; असह्य. उ० रामचंद्रपंतांना जिवापरता ताप आला आहे, मला आज जिवापरते श्रम झाले आहेत.

(ख) प्राणाहून प्रिय. उ० हा म्हातारपणचा मुलगा गोवर्धनपंतांना प्राणापरता वाटतो, ह्यात नवल काय ?

५७. जिवापलीकडे—प्राणाहून प्रिय.

५८. जिवावर—स्वताच्या धमकीवर किंवा बुद्धिसामर्थ्यावर; दुसऱ्याच्या मदतीवर अवलंबून न राहता.

५९ एखाद्याच्या जिवावर उठणें—त्याचा जीव घ्यावयाला सिद्ध होणें.

६० एखाद्याच्या जिवावर पोट भरणें—त्याच्या पदरचें खाऊन राहणें. उ० ल्हानपणाने लहानपणीं विद्याविद्या काही केली नाही. आता म्हातारपणीं तो अण्णासाहेबांच्या जिवावर पोट भरीत पडला आहे !

६१ एखाद्याच्या जिवावर उड्या मारणे—त्याचा आश्रय, त्याची मदत किंवा त्याचा पैसा मिळाला आहे, किंवा मिळणार आहे ह्या भरवशावर आनंद मानणें किंवा बढाई मारणें किंवा चैन करणें. उ० तुला स्वताला एक कवडी मिळविण्याची देखील अक्कल नाही. बापाच्या जिवावर तू उड्या मारीत आहेस !

६२ जिवावर उदार—जीव जाण्याचा प्रसंग आला, तरी न कचरणारा; जिवाची पर्वा न करणारा.

६३ जिवावरचा—ज्यांत जिवाला धोका आहे असा. उ० माझ्या मुलाला जिवावरचीं तीन दुखणीं गेलीं. [ "जिवावरचा," ह्या विशेषणाचीं विशेष्यें "प्रसंग," "पाळी," "गोष्ट," "दुखणें" ह्या अर्थाचे शब्द असतात ].

६४ जिवावरचें आवण उतरणें—एखाद्या कठीण प्रसंगातून बचावणें.

६५ जिवावर येणें—अप्रिय, दुष्कर वाटणें. उ० मुलीला सासरीं पाठविणें माझ्या जिवावर आलें होतें, पण इलाज काय ?

६६ एखाद्याच्या जिवावर बेतणें—जीव जाण्याच्या प्रसंगात तो सापडणें. उ० मी खेडच्या वाटेने येत असता तीन चोरट्यांनी मला गराडलें. माझ्या जिवावर

घेतली होती, पण माझ्या सुदैवाने तेथे पांच सहा मुशाफर अकल्पित आले, तेव्हा ते चोरटे पळून गेले !

६७ जिवाला करवत लागणें—अतिशय चिंता लागणें. उ० मारवाड्याचें कर्ज फिटेतोपर्यंत माझ्या जिवाला जशी करवत लागली होती !

६८ जिवास जीव देणें—मित्राचा जीव जात असला तर आपला जीव देणें; अति काळजीपूर्वक एखाद्याला जपणें. उ० जिवास जीव देणारे हजारो शूर मराठे गडी शिवाजीला साहाय्यकारी होते, म्हणूनच त्याला स्वराज्य स्थापिता आलें !

६९ जिवास मुकणें—मरणें; मृत्यु पावणें. उ० मीं चोरट्याला म्हटलें, "मला मुकाट्याने जाऊं दे. मला उपद्रव देशील, तर जिवास मुकशील !"

७० जिवाशीं किंवा जीवीं धरणें किंवा बांधणें—प्रिय मानणें; मन अर्पिणें; चहाणें. उ० त्या दत्तक पोराला म्हातारीने दहा वर्षे जिवाशीं धरिलें होतें. पण अखेरीस तो तिच्या डोळ्यावर हात मारून जो पळून गेला, त्याचा आज सहा महिने झाले, तरी पत्ता नाही. उ०.

काय इणें न धरावें अधनत्वें भूपजनवरा जीवीं ? ।
का न प्राशावें मधु मधुपानें कूपज-नव-राजीवी ? ।। मोरोपंत,-वनपर्व.

७१. जीवीं लागणें—

( क ) आवडीचा असणें; प्रिय वाटणें.

( ख ) मर्मभेदक वाटणें. उ० जगन्नाथरावांचे शब्द माझ्या जीवीं लागले, पण मीं त्या वेळीं उत्तर दिलें नाही.

७२ जिवें वांचणें—एखादें संकट टळून जिवंत राहणें; जीव जाण्याचा प्रसंग असतां जीव न जातां वचावणें.

२६१ जो जो करणें—मुलाला निजवितांना आया एक गाणें म्हणतात, त्यांत "जो जो" हा शब्द आहे. त्यावरून "जो जो करणें," म्हणजे निजणें किंवा निजविणें. उ०

शिशु पाळण्यांत घालुनि हालवितां निजवितां मुलें जो जो ।
धात्री म्हणति सखीला अमृतसरचि तो निघे मुलें जो जो ।।—मोरोपंत.

२६२ जोडे फाडणें—आपल्या कार्यासाठी दुसऱ्याच्या घरीं गेटे घालणें. [ खेटे घालतांना चालावें लागतें आणि चालून चालून जोडे झिजतात आणि झिजून फाटतात ]. उ० सहा महिने जोडे फाडले, तेव्हा हें स्थळ मुलीला मिळालें !

२६३ झक मारणें—चुकी करणें, न करावी ती गोष्ट केली असें कबूल करणें किंवा कबूल करून तिच्याबद्दलचा दोष आपल्या पदरांत घेणें. उ० मी तुझ्या बारमारांत पडलों; झक मारली.

२६४ झक मारीत—नाइलाज म्हणून; गत्यन्तर नसल्याकारणानें. या शब्द-सहतीपुढे सावधिक क्रियापद यावें लागतें. उ० तो जात नाही म्हणजे काय! झक मारीत जाईल!

२६५ झुरणीस लागणें—शरिराच्या किंवा मनाच्या व्यथेनें झिजणें किंवा झिजून कृश होत जाणें. उ० अन्नपूर्णाबाईचा मुलगा बेपत्ता झाल्यामुळें ती झुरणीस लागली आहे.

२६६ झेंडा नाचविणें—आपण केलेला पराक्रम लोकांमध्ये बढाईखोरपणानें जाहीर करणें.

२६७ टकमक पाहणें—कौतुकानें, आश्चर्यानें, विस्मयानें पाहणें. उ०

टकमक पहात होते प्रभुमुखचंद्राकडेच चातकसे। —मोरोपन्त.

२६८ टकळी चालणें, सुरू असणें (किंवा चालविणें)—बोलण्याचा घरबंध सोडून बोलण्याची क्रिया चालणें; सुरू असणें (किंवा चालविणें). उ० तुम्ही बायका बायकाच असला म्हणजे कितीतरी टकळी सुरू असते. —श्री० रमाबाई रानडे.

२६९ टक्केटोणपे खाणें—जगातील किंवा व्यवहारातील संताप आणणाऱ्या किंवा त्रासदायक गोष्टींचा अनुभव घेणें. उ० तो टक्केटोणपे खाऊनच हुषार झालेला आहे! टक्केटोणपे खाल्याशिवाय कोणाला शहाणपणा येत नसतो!

२७० टंगळमंगळ करणें—चुकारतट्टूपणा करणें; इयगय करणें, बेपरवाई करणें. उ० तुमचा नारायण अलीकडे अभ्यासांत टंगळमंगळ करू लागला आहे; त्याला तुम्ही सडकून रागें भरा.

२७१ ट, फ करणें—थोडेसें किंवा अडखळत वाचावयाला मात्र समर्थ होणें किंवा असणें. उ० आमची मुलगी कधी शाळेंत गेली नाही, ती घरींच बसून ट, फ करावयाला शिकली आहे.

२७२ टला ट जुळविणें—अक्षराशीं अक्षर जुळवून मोठ्या कष्टानें कशीबशी कविता करणें. उ० टला ट जुळवून कोणी मोरोपंताची बरोबरी करू शकेल काय?

२७३ टाकणें टाकणें—केवळ उपचार म्हणून करणें, एखादी गोष्ट औपचारिक म्हणून करणें; एखादी गोष्ट न केली तर चार लोकांत बरें दिसणार नाही, एवढ्याच भावनेनें ती करणें (म्ह० मनापासून नव्हे). उ० विश्वंभर शास्त्री मुळीदेखील आपल्या ओळखीचे नाहीत, ह्या प्रसंगीं त्यांना जेवावयाला बोलावण्याचें काही कारण नाही, परंतु ते ह्याच वाड्यांत बिऱ्हाडानें राहतात, म्हणून टाकणें टाकलें पाहिजे इतकेंच!

२७४ टाकभाडें—एखादी वस्तु एका ठिकाणाहून वाहून नेऊन दुसरीकडे टाकण्याबद्दलचें भाडें. भाडोत्री कामाबद्दलची बक्षिसी. उ० आपला पोगिंदा जो बाबूजी

नाईक, त्यावर मोरोपंत कवीने तीनचार साधारण आर्या केवळ टाकभाड्याप्रमाणे रचल्या, असें एक पंडित म्हणतो

२७५ टाकी

१ टाकी—पाथरवटाचें एक हत्यार

२ टाकी चालविणें—तीच तीच गोष्ट एकसारखी करीत राहणें.

३ टाकी चालणे—

(क) इलाज चालणें.

(ख) एखाद्याचा तीच तीच गोष्ट पुन्हा पुन्हा करण्याचा एकसारखा क्रम चालू असणें

४ टाकी लागणे—प्रवेश किंवा थारा मिळणें, केलेला इलाज लागू पडणें

५ त्याच्या तोंडाला टाकी दिली आहे—त्याच्या तोंडावर देवीच्या व्रणाच्या खळग्या आहेत

६ जात्याला टाकी देणें—दाणे चिरडणारे जे जात्याच्या दोन तळ्याचे पृष्ठभाग, ते झिजून झिजून गुळगुळीत झाले असल्यास ते एका पोलादी हत्याराने खरखरीत करणें उ० कमळाबाईच्या जात्याला बरेच दिवसात टाकी दिली नाही

२७६ टाके ढिले होणें—शिवलेल्या कपड्याचे टाके तुटले म्हणजे तो जसा निकामी होतो, तसा माणूस अतिश्रमाने निकामी होतो, त्यावरून एखाद्याचे "टाके ढिले होणें" म्हणजे त्याला अतोनात श्रम किंवा कष्ट झाल्यामुळे कोणतेंहि काम करण्याची त्याच्या अंगीं ताकद न राहणें उ० मुलीला स्थळ पाहता पाहता पुरुषोत्तम पंताचे टाके ढिले झाले!

२७७ टिवल्याबावल्या करणें—नटणें, थाटमाट करणें, डौल करून टवाळकी करीत हिंडणें

२७८ टिवल्याबावल्या दाखविणें—लोकांच्या पुढे तोंडें वेडींवाकडीं करून त्याना वेडावणें

२७९. टुरटूर लावणें—

(क) थोडासा वेळ आपल्या कर्तबगारीचा डौल दाखविणें

(ख) एखाद्यापाशी काहीं वस्तु मागून मागून त्याला सतावणें उ० बाहुलीसाठी बाळभटांच्या मुलीने त्याच्यामागे सकाळपासून सारखी टुरटूर लावली आहे!

२८० टेकीस येणे—असमर्थ होणें, दमून जाणें

२८१ टेंभा

१ टेंभा—मशाल

२ टेंभा पाजळणे—प्रकाश पाडणें, कर्तृत्व दाखविणें यांत निंदा गर्भित

असते. उ० आमचे पुतणे ह्या परीक्षेस बसले आहेत. आता काय टेंभा पाजळतात तें पाहावयाचें !

३ टेंभा मिरविणें—ऐट दाखविणें.

२८२ ठाव घेणें—खोली पाहणें; मनाची परीक्षा करणें.

२८३ डबघाईला येणें—उतरत्या कळेला आरंभ होणें; वैभव, सामर्थ्य, वगैरेंचा अंत व्हावयाची वेळ येऊन ठेपणें. [ डफावर म्हटलें जात असलेलें गाणें समाप्त व्हावयाच्या वेळीं म्हणणारा फार घाईघाईनें डफ वाजवितो. घाईनें डफावर थापा पडूं लागल्या म्हणजे गाणें संपत आलें आहे, असें समजतें. यावरून डफघाई म्ह० समाप्तीचा समय ]. उ० बाळूकाकाची प्रकृति अलीकडे डबघाईला आली आहे ( म्ह० फार बिघडली आहे ); हें घर डबघाईला आलें आहे; केव्हां कोसळेल ह्याचा नेम नाही.

२८४ डल्ला मारणें—एखाद्याच्या पैशाचा मोठ्या शिताफीनें अपहार करणें. उ० सच्चिदानंदरावानें अज्ञान मावसभावाच्या पैशावर चांगला डल्ला मारला ! ( डल्ला म्ह० १ गोळा, गठ्ठा. २ द्रव्याचा निधि, डबोलें ).

२८५ डांगोरा किंवा धांडोरा पिटणें—जाहीर करणें. [ चांगल्या किंवा वाईट अर्थानें ह्याचा उपयोग होतो ]. उ० रात्रीं नवाच्या नंतर कोणीं घराच्या बाहेर पडूं नये, असा डांगोरा पिटण्यांत आला आहे. शंकररावाच्या मुलाची नोकरी गेली म्हणून चंद्रभागाबाईनें साऱ्या गावांत डांगोरा पिटला !

२८६ डाव साधणें—योजलेल्या युक्तीनें इष्ट वस्तु मिळविणें; सूड उगविणें; एखाद्याविषयी मनांत जी द्वेषबुद्धि असेल, तिनें प्रेरित होऊन त्याचें नुकसान करणें.

२८७ डावें उजवें—

१ सरस नीरस. थोडयाशा अंशानें बरें वाईट किंवा कमी जास्ती.

२ डावें उजवें कळणें—वाकडें कोणतें आणि सरळ कोणतें हें समजणें.

२८८. डाळ

१ डाळ—धान्यविशेष. [ तुरीची डाळ शिजावयाची पंचाईत असते. अमुक प्रकारचें पाणी, अमुक आकाराचें भांडें वगैरे अनुकूल गोष्टी असल्या, तरच ती चांगली शिजते. यावरून पुढील दोन वाक्प्रचार रूढ झाले आहेत ].

२ एखाद्याची डाळ शिजणें—त्याला थारा मिळणें; त्याची सोय जुळणें; त्याची दाद लागणें; योग्य मानमान्यता किंवा संभावना होणें. उ० जेथे संस्कृत कवितेचीहि डाळ शिजत नाही, तेथे मराठी कवितेची गोष्ट बोलावयासच नको !

निबंधमाला,—विष्णुशास्त्री चिपळूणकर.

३ डाळ शिजूं देणें—थारा देणें; सोय जुळूं देणें; दाद घेणें. उ० येथे कोणी तुझी डाळ शिजूं देईल, असें वाटत नाही.

२८९. डोंगर पोखरून उंदीर काढणें—मोठ्या प्रमाणावर आरंभ करून शेवटीं अत्यल्पच पराक्रम करणें किंवा अत्यल्प फल मिळविणें.

२९०. डोळ्यांतील काजळ चोरणें—चोर आला असता त्याला पाहण्याचें इंद्रिय डोळा. त्या डोळ्यातीलच काजळ चोरणें म्ह० अतिशय कौशल्याने चोरी करणें किंवा पाहतां पाहतां चोरी करणें.

२९१ (एखादें काम किंवा हेतु) तडीस नेणें किंवा पोचविणें—फलद्रूप करणें; शेवटास नेणें; सफळ करून दाखविणें. उ० शिवाजीच्या मरणसमयीं प्रल्हाद निराजी आणि रामचंद्र नीळकंठ अमात्य, हे दोघे त्याचे जवळ होते. बाकी दुसरीं साधारण लहान माणसें पुष्कळ होतीं. परंतु शिवाजीचे हेतु तडीस नेणारे ह्या दोघांशिवाय कोणी नव्हतें. —गो० स० सरदेसाई.

## २९२. तत्त्वमसि

१ तत्त्वमसि—(तत् + त्वम्+असि) म्हणजे तें तूं आहेस. तूं ब्रह्मच आहेस. सर्व वेदान्ताचें सार ह्या चार अक्षरांच्या एका वाक्यांत आहे. ह्यावरून पुढे "तत्त्वमसि" ह्याचा अर्थ सार; मूल्यवान् वस्तु, महत्त्वाची वस्तु, असा झाला. जगात सर्व व्यवहाराचें आदिकारण किंवा मुख्य साधन पैसा असल्याकारणाने "तत्त्वमसि" किंवा "तत्त्वमशी," हा शब्द पैशाचा वाचक झाला.

२ तत्त्वमसीशीं गांठ घालणें—पैशावर धोरण ठेवणें; एखाद्या कामीं द्रव्यप्राप्ति किती होण्याजोगी आहे, इकडे लक्ष्य देणें.

२९३ (एखाद्याला) तंबी देणें किंवा भरणें—त्याच्यावरून त्याच्या इच्छेविरुद्ध काही गोष्ट करविण्यासाठी किंवा योग्य मार्गानें चालावयासाठी त्याला धमकी देणें किंवा भीति घालणें; त्याला खरपूस ताकीद देणें.

२९४ (एखाद्याला) तरमुंडी देणें—तरमुंडी म्ह० गर्दीमध्ये एखाद्याला डोक्याने धक्का देणें. उ०

> "हा उडवितों तुशी मी कन्ठ्याची जेवि शीघ्रतर मुंडी"
>
> ऐसें बोलुनि देता झाला गुरुपुत्र शीघ्र तरमुंडी" ॥६७॥
>
> मोरोपंत,–द्रोणपर्व, अ० १७.

२९५ तळपट होणें किंवा वाजणें—नाश होणें. उ०

म्हणति अदित्यादि सत्या, "त्या मेल्याचें समूळ तळपट हो!"—मोरोपंत.

२९६ तळ भरणें—खंडोबाचे भक्त एका ताटात पानें, सुपाऱ्या वगैरे भरतात, त्याला "तळी भरणें" असा त्या लोकांचा शब्द आहे. यावरून "एखाद्या कार्याची तळी भरणें" म्हणजे तें कार्य करावयाला सर्व सामग्री जुळून सर्वांनी सिद्ध होणें. "तळी उचलणें" म्हणजे तें कार्य सर्वांनी एकदिलाने पतकरून पार पाडणें.

२९७ तळीराम गार करणें—उपभोग्य वस्तूचा उपभोग घेऊन किंवा इष्ट ती वस्तु मिळवून, शांत होऊन बसणें. [ चांगल्या व वाईट अर्थानें ह्याचा उपयोग केला जातो ]. उ० भाच्याच्या पैशावर हात मारून गुडोपतानें आपला तळीराम गार करून घेतला आहे.

२९८ ताकापुरतें रामायण—जितकें किंवा ज्या किंमतीचें ताक, तितकें किंवा त्या किंमतीचें रामायण; ताक थोडें तसें रामायण थोडें म्हणजे संक्षिप्त. ताक जसें अल्प मोलाचें, तसें रामायणहि तोकडें. आपलें कार्य साधण्यापुरतें आर्जव किंवा खुशामत.

२९९ तापल्या तव्यावर भाजून घेणें—एखाद्या कार्यांत दुसरें कार्य सहजा-सहजी होण्यासारखें असल्यास तें अवश्य करून घेणें.

३०० तांबडें फुटणें—सूर्योदयाची वेळ प्राप्त होणें.

३०१ ता म्हणतां ताकभात समजावा—" ताकभात " हा शब्द उच्चारतांना प्रथम " ता " हें अक्षर उच्चारावें लागतें, नंतर " क " नंतर " भा " नंतर " त. " ऐकणारानें " ता " हें अक्षर ऐकल्याबरोबर पुढें यावयाचीं अक्षरें क, भा आणि त हीं तर्कानें ओळखावीं. स्थल, काल, वृत्त, वर्तमान वगैरेंकडे लक्ष ठेवून कोणतीहि गोष्ट झटकन तर्कानें जाणावी.

३०२ तारे तोडणें—ताळमेळ न बाळगता हवीं तीं विधानें करीत सुटणें.

३०३ ताल सोडणें—धरबंध, मर्यादा, आपला दर्जा वगैरेंकडे दुर्लक्ष्य करणें.

३०४ तिखट मीठ लावून सांगणें—खाद्य पदार्थाला तिखटमीठ लावल्यानें तो रुचकर होतो. ह्यावरून जी हकीकत सांगावयाची असेल, ती ऐकणाराला मनोरंजक व्हावी, म्हणून तींत अतिशयोक्तीचा भाग घुसडून देणें; किंवा आपलें निवेदन चटकदार व्हावें, म्हणून त्यात पदरच्या गोष्टी घुसडून देणें, असा वरील शब्द-संहतीचा अर्थ होतो. उ० *विश्वनाथ नारायण मंडलीक यानी आपल्या कोचमनास सांगून त्या लबाड फाटकवाल्याच्या अंगावर सुमारें पंचवीस कोरडे ओढविले आणि बरोबर असलेल्या शिपायाकडून त्याला गचांड्या देऊन रस्त्यातून एकीकडे करविलें, आणि गाडी कांपाउंडांत आणून ते पुढील उद्योगास लागले. इकडे त्या मारखाऊ फाटकवाल्यानें स्टेशनमास्तरापाशीं झालेल्या आगळिकीची रडकथा बरीच तिखटमीठ लावून सांगितली.* —गो० ग० आगरकर.

३०५ तिरपीट उडणें—भेधा उडणें; गोंधळ होऊन जाणें. [ त्रिपथ = तीन वाटा. एखाद्या अजाण माणसाच्या डोळ्यांपुढें तीन वाटा आल्या असतां कोणत्या वाटेनें जावें, *ह्याविषयी त्याच्या मनांत गोंधळ होतो; यावरून " तिरपीट* उडणें " ही शब्दसंहति उत्पन्न झालेली आहे. " तिरपीट घांदल " असाहि वाक्प्रचार आहे. तिरपीट घांदल म्हणजे त्रिपथावर घांदल होते, तशी घादल ].

३०६ तिलांजलि द्यावयाला उठणे किंवा सिद्ध होणें—मृत मनुष्याला तिलांजलि म्ह० तीळ घातलेलें पाणी द्यावें, अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. "एखाद्याच्या नावाने तिलांजलि द्यावयास उठणें" किंवा "तिलांजलि घेऊन उभें राहणें," म्हणजे त्याच्या मरणाची वाट पाहत बसणें किंवा त्याच्या नाशासाठी टपून बसणें.

३०७ अंगाचा तिळपापड होणें—अतिशय संताप येणें. उ० अन्याय आणि पक्षपात पाहून दत्तोपंताच्या अंगाचा तिळपापड होतो!

३०८ तीर्थी गेल्यावांचून मुंडण होत नाहीं—तीर्थाच्या ठिकाणीं गेलें असता मुंडण केलें पाहिजे, अशी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. जो कोणी तीर्थाच्या ठिकाणीं जातो, त्याचें मुंडण तेथें होतें. कोणाचेंहि मुंडन चुकत नाही. यावरून वरील वाक्याचे पुढे दिल्याप्रमाणे अर्थ निघाले.

(क) दपटशा दिल्यावाचून कोणी नरम पडत नाही.

(ख) श्रमाशिवाय कष्टाशिवाय, मूल्यवान् वस्तु प्राप्त होत नाही.

३०९ तीळ खाऊन व्रत मोडणें—अगदी क्षुल्लक लाभासाठी आपली अब्रू गमावून घेणें किंवा कोणत्या तरी प्रकाराने हानि करून घेणें.

३१० तुकडा मोडणें; तुकडा मोडीत असणें, पडणें किंवा राहणे—स्वताचें चरितार्थाचें काही साधन नसल्याकारणाने किंवा आळसामुळे काही उद्योगधंदा करण्याची इच्छा नसल्यामुळे, दुसऱ्याच्या घरीं निर्लज्जपणाने महिनेचे महिने आणि वर्षेंच्या वर्षे जेवीत राहणें. उ० अण्णासाहेब लुकतुकयाच्या घरीं लखोबा सारा जन्म तुकडा मोडीत पडला होता!

३११ तुणतुणें वाजविणे—ऐकणाराना कंटाळा आला, तरी पुन्हा पुन्हा आपली आवडती हकीकत किंवा गोष्ट सांगत सुटणें किंवा आपला आवडता विषय कुटीत बसणें.

३१२ आपली तुंबडी भरणे—स्वताला पाहिजे असेल, तितकें पदरात पाडून घेणें.

३१३ तुरत दान महापुण्य—जें काही द्यावयाचें आपल्या मनात असेल, तें जेव्हाच्या तेव्हा किंवा वेळेवर दिलें असता त्याचा उपयोग होतो, आणि घेणारावर आपले उपकार होतात. पण वेळेवर न दिल्यास आपलें जावयाचें तें जाऊन घेणाराला काही उपयोग होत नाही. [ "तुरत" हें "त्वरित" ह्याचें अपभ्रष्ट रूप आहे ].

३१४ तूट पडणे—आवश्यक असेल त्यापेक्षा कमी असल्यामुळे उणीव भासणें.

३१५ तेरा, बारा चालणें—तेरा बारा म्ह० तेरा की बारा, अशाबद्दल वादाविवाद; सामान्यत. कोणत्याहि गोष्टीसंबधाने वादविवाद; विशेषत: शुष्क वादविवाद. तेरा, बारा चालणें म्ह० वादविवाद चालणें, तेरा, बारा करणें, चालविणें म्ह० वादविवाद करणें, चालविणें.

३१६ (एखाद्याला) तोफेच्या तोंडीं देणें—एखाद्याला तोफेच्या तोंडापुढे उभें करून त्याच्यावर तोफेंतून गोळा सोडणें, तोफ उडवावयाची असता तिच्या तोंडापुढे एखाद्याला उभें करणें लाक्षणिक अर्थ असा की, एखाद्या कामाचे दुष्परिणाम सोसण्यास एखाद्या माणसास पुढे करणें उ० तुम्ही सर्वजण मागे राहता आणि दर खेपेस मलाच तोफेच्या तोंडीं देता ! ह्या खेपेला रजा मागण्यासाठी अप्पारावांना साहेबांकडे जाऊ द्या ! मी नाहीं जात !

३१७ तोरा मिरविणें—ऐट दाखविणें उ० गुरुनाथपंताला येत नाहीं कांहीं देखील, पण तोरा मोठा मिरवितो !

३१८ तोलास तोल देणें—बरोबरी करणें, बरोबरीच्या नात्याने वागणें, आपली बाजू दुसऱ्याच्या बाजूहून कमी दिसणार नाही, असें करणें

३१९ त्राही भगवान करणें—त्राहि भगवन् = हे देवा, माझें रक्षण कर एखाद्याला " त्राही भगवान होणें " म्हणजे त्याला " देवा, सोडीव ह्या दु खांतून " असें म्हणण्याची पाळी येणें म्हणजे त्याला अतोनात त्रास, उपद्रव वगैरे होणें तसेंच " *एखाद्याला त्राही भगवान करणें* " *म्हणजे त्याला* " *देवा, सोडीव मला ह्या संकटां* तून " असें म्हणण्याइतका उपद्रव देणें

३२० त्रेधा उडणे किंवा होणें—धादल उडणें, काय करावें हें सुचेनासें होऊन गोंधळ होणें उ० पोळ्या करावयाला मी लागणार, इतक्यात पुरुष येऊन पानावर बसले एकीकडे त्याना वाढावयाचें आणि एकीकडे पोळ्या लाटावयाच्या असें झालें, तेव्हा माझी त्रेधा उडाली ! [ " त्रेधा " हा शब्द मूळचा क्रियाविशेषण आहे. त्याचा अर्थ " तीन ठिकाणीं " मराठींत तो नामाच्या कोटींत गेला आहे ]

३२१ थुकी झेलणे—श्रीमत किंवा समर्थ अशा लोकाच्या भोवती कार्यसाधु माणसें असतात, तीं आपल्या यजमानाच्या तोंडात थुकी आली असता आणि पिकदाणी किंवा तस्त वगैरे जवळ नसता आपली ओंजळ त्याच्या पुढ करून तींत ती *थुकी घ्यावयास सिद्ध असतात यावरून " एखाद्याची थुकी झेलणें " म्हणजे त्याची* आतिनिंद्य प्रकारें खुशामत करणें, असा अर्थ होतो उ० काशीनाथपंत हा प्रेमचंदची थुकी झेलण्याला सदा तत्पर असे, म्हणून इतक्या वैभवाला चढला !

३२२ थेर करणें किंवा थेर थेर करणें—अंगीं नसलेल्या नाजुकपणाचा किंवा मोठेपणाचा देखावा करणें उ० एवढीशी कोठे शिंक आली, की कमळोपंत आयरूण घालून त्यावर आजाऱ्यासारखा पडून राहतो, ओंवळ्याने जेवावयाला नसतो, असे थेर थेर करतो !

३२३ थैक (हैक) म्हणता ब्रह्महत्या होणें—क्षुल्लक गोष्टीचा फार भयकर परिणाम होणें

३२४. दगड

१ दगड—पत्तर, शिला, दगड, धोंडा, माती, धूळ इत्यादि शब्द अत्यंत अभाव दाखवितांना योजतात. उ० त्याला दगड समजतें! गोविंदपंताला 'पारसी' भाषा काय कळते आहे दगड!

२ दगड चोहोंकडे टाकून पाहणें—सर्व दिशांनी उपाय किंवा खटपटी करणें. उ० एकाच पोस्टखात्यात नोकरीसाठी अर्ज करून स्वस्थ बसूं नको! चोहोंकडे दगड टाकून पाहा (म्ह० इतर खात्यातहि अर्ज करून ठेव) म्हणजे कोणत्यातरी खात्यात तुला नोकरी मिळेल!

३. दगड टाकून ठाव पाहणें—

(क) पाण्यात दगड टाकून पाण्याच्या खोलीचा अजमास पाहणें.

(ख) एखाद्याला खुबीदार प्रश्न करून त्याच्या मनातील विचारांची अटकळ करणें.

टीपः—मागे लेखांक १७२, उपांक २ पाहा.

४ दगडाखाली हात सापडणें—दगडाखाली हात सापडला असता तो युक्तीने काढून घ्यावा लागतो, दांडगाईने काढल्यास तो चरचटून दुखापत होईल; मनुष्य अडचणीत सापडलेला असता व हिकमत करून त्याची सुटका होण्याजोगी असता, म्हणतात, "तुझा हात दगडाखाली सापडला आहे खरा. तो सोयीसोयीनेच काढून घेतला पाहिजे. घाई करता कामा नये!"

५ दगडाशीं भांडणे-(क) समर्थाशीं असमर्थाने झगडा करावयास प्रवृत्त होणें.

(ख) आपणाला न होण्याजोगें जोखमीचें काम करावयास प्रवृत्त होणें.

६ दगडाला पाझर किंवा पान्हा आणणें—निर्दय मनुष्याच्या पोटात दया उत्पन्न करणें, अगदीच असंभवनीय गोष्ट करणें. उ० माफी करावयाला विश्वनाथपंताना वळविणें म्हणजे दगडाला पाझर आणणें होय!

७ दगडाला पाझर किंवा पान्हा फुटणें—निर्दय मनुष्याच्या अंतःकरणात दया उत्पन्न होणें; अशक्य गोष्ट होणें. उ० शाळोने सदोनाला पुन्हा नोकरीस ठेवून घेतलें, म्हणजे दगडाला पान्हा फुटला, असेंच म्हटलें पाहिजे!

८. दगडाची साल काढणें किंवा दगडाचा दोर काढणें—दुष्कर, अद्भुत किंवा अशक्य गोष्ट करणें. उ०

स्वल्पें काळें पुत्रें पाण्डव मथिले असेंच परिसाल।
काढिन दगडाचीही मी, कोणाहि न निघेल परि, साल॥

मोरो०,–उद्यो०–अ० ५.

३२५ दडी मारणें—लपून बसणें. (व्युत्पत्ति—दडणें म्ह० लपून बसणें).

३२६. दम

१. दम—

(क) श्वास.

(ख) एक श्वास घेण्यास लागणारा काळ.

(ग) प्राण.

(घ) जोराचा श्वासोच्छ्वास. उ० पर्वतीच्या पायऱ्या चढून हरिभाऊंना फार दम लागतो.

(ङ) स्वताच्या कर्तृत्वाविषयी अभिमान (खरा असो किंवा खोटा असो); बढाईखोरपणा; महत्त्वाकांक्षा. उ० कशाला अक्कल नाही कवडीची, आणि दम मात्र मोठा!

(च) धमकदारी; कर्तृत्वशक्ति; ताकद; गुणावहता; अवसान. उ० हा काढा फार शिळा झाला. आता त्यात कांही दम उरला नाही.

(छ) श्वास निरोधन ठेवण्याचें सामर्थ्य. उ० तुझा दम मोठा, म्हणून तूं इतका वेळ पाण्यांत बुडून राहतोस!

(ज) ओलावा. उ० ह्या जमिनीला अजून थोडा दम मारीत आहे.

२. दम मारणें—

(क) चिलीम वगैरेंना एक ज्वालक झुरका घेणें.

(ख) आपल्या करामतीचा परमावधि करणें. उ० पुन्हा एकदा दम मार, म्हणजे तो घोडा सरकेल!

३ दम भरणें—तंबी देणें; भेडसावणें; दहशत घालणें; सक्त ताकीद देणें.

३२७ दस गेले पांच उरले—आयुष्याचा बराचसा मोठा भाग गेला, आता अगदी थोडा भाग अवशिष्ट राहिला आहे. दस आणि पांच म्हणजे कोणत्याहि परिमाणापैकी दोन तृतीयांश आणि एक तृतीयांश ह्या लाक्षणिक अर्थानें हे शब्द येथे घ्यावयाचे आहेत.

३२८ *दही खाऊं की मही खाऊं असें व्हावयाला होणें*—हें करूं की तें करूं, अशाविषयी तो शंकित होणें; कचरणें. (क) "मही" हा शब्द "दही" याच्याशीं केवळ यमकासाठी केलेला आहे, असें कित्येकांचें मत आहे. (ख) "मही" हा शब्द गुजराथी भाषेंत एक प्रकारचें दही या अर्थानें योजला जातो, असें एका गृहस्थानें आम्हास सांगितलेलें आठवतें. (ग) वामन अवतारांतील एका प्रसंगाला *अनुलक्षून हा वाक्प्रचार रूढ झाला असावा, असें आणखी एका गृहस्थानें सांगितलें.* आम्हांला निश्चयात्मक व्युत्पत्ति आज काही सांगतां येत नाही.

३२९ दादावावा करणें—सौम्य भाषणानें एखाद्याचा राग घालविण्याचा किंवा मन वळविण्याचा प्रयत्न करणें.

## ३३०. दिवस

१. दिवस—

चोवीस तासांचा अवधि किंवा सूर्य क्षितिजावर असेपर्यंतचा बारा तासांचा अवधि.

२ दिवस करणें—मृत मनुष्याचे दिवस करणें म्ह० मृत मनुष्यासंबंधानें जे मरणानंतर दुसऱ्या, तिसऱ्या वगैरे दिवशीं विधि करावयाचे, ते करणें.

टीप:—अशिक्षित लोकांत हा वाक्प्रचार रूढ आहे.

३ रात्रीचा दिवस करणें—दिवसाचीं कामें दिवसास न आटोपल्या कारणानें तीं रात्रीसहि करीत राहणें म्ह० सर्व वेळ एखाद्या विशिष्ट कार्याकडे योजणें.

४ दिवसाची रात्र करणें—रात्रीं कांहीं कारणानें जागरण झाल्यामुळे जर कोणी मनुष्य दिवसास निजला, तर त्यानें दिवसाची रात्र केली, असें म्हणतात. उ० काल मी शारदा नाटकाला गेलों होतों. मला जागरण झालें होतें. म्हणून आज दिवसाची रात्र केली आणि हुशार झालों !

५ अजून पहिला दिवस आहे—अद्यापि पहिल्याच दिवसाची स्थिति आहे, कांहींच फरक पडला नाहीं.

६ दिवसां मशाल लावणें—

(क) दिवसा सूर्याचा प्रकाश असल्याकारणानें दिवा लावण्याचें कारण नसतें. कोणी मनुष्यानें दिवसास मशाली लाविल्या, तर त्यानें तितकें तेल फुकट घालविलें असें होईल. यावरून "दिवसां मशाली लावणें," म्हणजे पैशाची उधळपट्टी करणें.

(ख) कांहीं पराक्रम करून तो जाहीर करण्यासाठीं दिवसास मशाली लावणें.

टीपः—श्रीमत् शंकराचार्य ह्यांची स्वारी दिवसास चालली असतां सुद्धां मशाली लावण्याची चाल आहे.

७ दिवस घेऊन—सूर्य मावळावयाचे अगोदर.

८ दिवस जातो, पण बोल राहतो—तो दिवस तर जातोच जातो, पण त्या दिवशीं दिलेल्या शिव्या किंवा बोललेले अपशब्द ह्यांची स्मृति लोपत नाहीं !

९ दिवस फिरणें—प्रतिकूल काळ येणें; वैभवाचे दिवस संपून जाणें.

१० चार दिवस सासूचे, चार दिवस सुनेचे—पुढें "म्हणी" ह्या प्रकरणांत पाहा.

११ दिवसासकट, दिवसाउजेडीं, दिवसापूर्वी—दिवस मावळला नाहीं तों-
(वर "दिवस घेऊन" पाहा.)

## ३३१. दिवा

१ दिवा—उजेडासाठीं केलेला पदार्थविशेष. उ० अंधेर पडत चालला, आतां ह्या खोलींत दिवा लाव.

२ दिवे ओवाळणे—देवाची आरती करतांना देवापुढे दिवा ओवाळून त्याच्या माहिम्यांची स्तोत्रें गातात, ह्यावरून "एखाद्या वस्तूवर दिवे ओवाळणें" म्हणजे ती मूल्यवान् समजून तिचें वैभव गाणें, तिचा गडेजाव करणें, कौतुक करणें, एखाद्या भिकार वस्तुविषयी उपरोधिक भाषण करावयाचें असतां, ह्या शब्दसहतीचा उपयोग करतात उ० राम्या, तू बाजारांत जाऊन एक रुपयाला शेरभर कांदे आणलेस ना? अहाहा! काय तुझी अक्कल? तिच्यावरून दिवे ओवाळावे!

३. दिवे लावणे—

(क) प्रकाश पाडणें! पराक्रम करून, कर्तबगारी दाखवून, कीर्ति मिळवून लोकांचे डोळे दिपविणें किंवा त्यांना थक्क करून सोडणें उ० इतका वेळ हें कुलूप उघडण्याचे आम्हीं प्रयत्न केले, ते फुकट गेले आता तूं येऊन काय दिवे लावतोस, ते पाहू!

(ख) दुर्लौकिक करून घेणें उ० आमच्या मुलाने काय दिवे लावले ते तुम्हाला कोठे माहीत आहेत! त्याच्या आईची मोहोरेंची अगठी पडताळात ठेविलेली होती, ती त्याने चोरली ती एका सराफाला १३ रुपयाना विकली मग आपल्या दोस्तासह तो नागपुरास गेला आणि तेथे एका नाटकमडळींत नोकरीस राहिला!

४ दिव्याने रात्र उजाडणें—सगळ्या रात्रभर दिवा तेवत ठेवून न निजता काहीतरी काम करून (आजाऱ्याजवळ बसून, पत्ते खेळून इ०) रात्र घालविणें [बहुतेक लोक निजताना दिवा मालवून निजतात आणि कांही कामशीम करावयाचें असतां मात्र दिवा तेवत ठेवतात ह्या चालीवरून ही शब्दसहति उत्पन्न झाली आहे]

### ३३७ दुःख

१ दुःख—कष्ट पीडा, त्रास.

२ दुःख वेशीस टांगणें किंवा बांधणें—

(क) वेस म्ह० गावाचा दरवाजा वेशीस बांधलेली वस्तु सर्वांस दिसत असते यावरून "दुःख वेशीस टांगणें किंवा बांधणें," म्हणजे ज्याच्या त्याच्याजवळ आपल्या विपत्तीची कहाणी सांगत सुटणें.

(ख) आपली जी काही अडचण असेल ती लपवून ठेवू नय लोकांमध्ये ती जाहीर करावी, म्हणजे कोणाला काही तोड किंवा इलाज ठाऊक असल्यास तो आपणास सांगतो आणि अनायासें आपली अडचण दूर होते

३ दुःखावर डाग किंवा डागण्या देणें—अगोदरच जो दुःखी, त्याला मर्म भेदक भाषणाने ज्यास्ती दुःख देणें किंवा त्याच्या उलट बोलून त्याला गांजणें उ० राजपुत्र स्वभावानें दयाळू होता त्याने विचार केला की, या वेळेस त्याच्या मनातले विरोध गाडून त्याच्या दुःखांवर डाग देणें आपणास उचित नाही

कृष्णशास्त्री चिपळूणकर,—रासेलस

उ० तो परीक्षेत नापास झाला आणि त्याचें वर्ष फुकट गेलें. आता "तूं खेळलास म्हणून नापास झालास" वगैरे बोलून काय उपयोग? तेणेंकरून त्याच्या दुःखावर डागण्या दिल्याप्रमाणे होईल.

### ३३३. देव

१ देव—जगाचा नियंता; ईश्वर; परमेश्वर.

२ लाकूड, दगड, धातु, वगैरेंची मूर्ति, जींत विधिपूर्वक देवत्वाची प्रतिष्ठापना केलेली असते, ती. उ० आज एकादशी आहे. देव चिंचेनें घास बरें का द्वारके!

३ देव देव्हाऱ्यांत नसणें—(क) जो मालक तो स्थानावर नसणें; देखरेख करणारा ठिकाणीं नसणें. (ख) मन (म्ह० शरिराचा मालक किंवा प्रेरक) स्वस्थ नसणें; चिंकिरीत असणें.

४ देव पावला—देव प्रसन्न झाला; देवाने मनोरथ पुरविला; जें पाहिजे होतें, तें मिळालें किंवा घडून आलें; मनाजोगी गोष्ट घडली. उ० घोतरें आणावयाला पंढरिनाथ का जावयाला निघाला आहे? देव पावला म्हणावयाचा! [कारण पंढरिनाथ कोणाचें कांही काम ऐकत नाही].

५ देवाज्ञा होणें—मरण येणें. [शब्दशः अर्थः—देवाकडून "ये" किंवा "स्वर्गास ये," अशा अर्थाची आज्ञा होणें].

३३४ (एखाद्याचे) दोन हाताचें चार हात होणें—त्याचें लग्न होणें.

टीपः—एखाद्याचे दोन हात असून काम करावयाला त्याला बायकोचे आणखी दोन हात मिळाल्याने एकंदर चार हातानीं काम होतें.

३३५ धडकी भरणें—भीतीच्या अतिरेकामुळे ऊर धडधडूं लागणें. उ० काल रात्रीं मी निजावयाला घरीं नव्हतों, ही गोष्ट बाबाना कळली आहे, असें सरूने मला सांगतांच माझ्या पोटांत धडकी भरली!

३३६ धरसधक्का बसणें किंवा मिळणें—कार्य सफल न होतां व्यर्थ हेलपाटे मात्र खावे लागणें.

### ३३७. धर्म

१ धर्म—परमेश्वरावर निष्ठा असून तिला अनुसरून वागण्याच्या प्रवृत्तीने जीं कर्में, जे विधि, जो वर्तनक्रम, त्या सर्वांचा समुच्चय.

२ परोपकारबुद्धि. उ० महाराष्ट्रीयापेक्षा गुजराथ्यात धर्म अधिक.

३ परोपकारबुद्धीने कोणास काही फुकट देणें किंवा जें कांही दिलें जातें तें. उ० अंधळ्यापांगळ्यास धर्म करावा.

४ धर्म करतां कर्म उभें राहणें किंवा पाठीस लागणें—एखाद्याचें बरें करावयास आपण इमानाने झटत असतां आपणावर कांहीतरी संकट ओढवणें किंवा आपण कांहीतरी पंचाइतींत पडणें.

५ धर्मावर सोमवार सोडणें—सोमवार करणें म्ह० सोमवारीं दिवसास यथाविधि उपवास करून रात्रीं भोजन करणें. अशा प्रकारें उपवास केला असता, एका वेळेचें (म्हणजे दुपारच्या जेवणाचें) अन्न वाचतें. मग रात्रीचें जेवण जर लोकांच्या घरीं मिळालें, तर तेंहि आपलें अन्न वाचतें. यावरून "धर्मावर सोमवार सोडणें" म्ह० पदरचें कांहीं एक खर्च न करता पुण्य जोडणें अथवा मोठेपणा मिळविण्याची युक्ति करणें.

६ धर्मास येणें—योग्य वाटणें; मर्जीस येणें. [ह्या अर्थात वैतागाची छटा मागते]. उ० तुला जो उपदेश करावासा वाटला, तो मीं केला; आता तुझ्या धर्मास येईल तसें कर!

७ धर्मास नको—धर्मार्थ दिलेली वस्तु ज्याला दिली जाते, त्याला ती फुकट मिळते. परतु देणारा मनुष्य बहुतकरून टाकाऊ वस्तूच धर्मार्थ देतो आणि गरजू लोक ती निरुपाय म्हणून पतकरतात. यावरून "धर्मास नको," म्हणजे तुम्हीं ही वस्तु फुकट दिली, तरी मला ती नको; ती मी अगदी घेणार नाही (कारण ती टाकाऊ, भिकार, कुचकामाची असावयाची किंवा आहे). "धर्मास नको," ह्याच्यांतील मूळचा निंदेचा भाग लुप्त होऊन नतर कालेंकरून त्याचा अर्थ, "अगदी नको," "कृपा करा आणि तसें करू नका," "तें देऊ नका" असा झाला. उ० नानासाहेब, आणखी एक जिलबी आणू काय?" यावर उत्तर, "धर्मास नको." "तुला सौम्यपणाने वागविण्याबद्दल तुझ्या शेटना विनती करू काय?" यावर उत्तर, "धर्मास नको" (कारण, तुमच्याकडून मी त्यास सागविलें म्हणून ते मजवर दात धरतील!)

३३८ धाड—हल्ला. क्रियापद घालणें, येणें, पडणें इ०. उ० ह्या आक्षेपानीं तर कवित्वाचें सर्वस्वभूत जें रसिकत्व, त्यावरहि धाड पडली.

निबंधमाला,—विष्णुशास्त्री चिपळूणकर.

३३९ धार काढणे—गाईम्हशींचें दूध काढणें. [दूध काढतेवेळीं जनावरांच्या आंचळातून दुधाची धार पडते ह्यावरून ही शब्दसहति उत्पन्न झाली].

३४० धुमश्चक्री चालविणे—गोंधळ, चैनबाजी, अव्यवस्थित कारभार इ० करणें दुसरीं अनुरूप क्रियापदें घालणें, माजणें, माजविणें इ०. उ० मी मावशीच्या घरीं चार दिवस राहावयास गेलें ही संधि साधून सासूबाईंनी घरात जी काही धुमश्चक्री माजविली, ती कांहि सांगता पुरवत नाहीं!

३४१ (एखाद्याला) धूळ चारणें—त्याचा पराभव किंवा मानभग करणें. [कुस्तींत किंवा मारामारींत एक मनुष्य दुसऱ्यास जिंकतो, तेव्हा तो दुसऱ्यास जमिनीवर पाडतो किंवा लोळवितो; तेणेंकरून चीत झालेल्या माणसाच्या तोंडात धूळ म्ह० माती जाते].

३४२ घोंडभट्टी करणें—अंघोळ न करतां कपाळावर भस्माचे पट्टे ओढून अंघोळ केल्याचा आविर्भाव करणें; कपाळावर भस्माचे पट्टे ओढणें.

३४३ नव्याचे नऊ दिवस—कोणतीहि वस्तु नवीन नवीन आहे, तोंपर्यंत तिचें कौतुक केलें जातें; तीच जुनी झाली म्हणजे कौतुक केलें जात नाही. येथे 'नऊ' हा शब्द अल्प संख्या दाखवितो.

३४४ नक्षत्र पडणें—एखाद्या अवयवावर नक्षत्र पडणें म्ह० त्या अवयवाच्या ठायीं विशेष किंवा चमत्कारिक असा काही गुण येणें. याचा उपयोग नेहेमी निंदेंत केला जातो. उ० गोविंदाच्या हातावर नक्षत्र पडलें आहे, असें वाटतें; कारण तो आल्यापासून माझ्या टेबलावरचे पैसे दोन तीन वेळा नाहींसे झाले. [ हातावर नक्षत्र पडणें म्ह० चोरी करण्याचा गुण हातात येणें; पायावर नक्षत्र पडणें म्ह० सर्वदा पायांनी भटकत असणें; जिभेवर नक्षत्र पडणें म्ह० एकसारखी वटवट करण्याचा दुर्गुण अंगीं असणें ].

३४५ (एखादाच्या) नाकाला चुना लावणें—त्याला धिक्कारणें, उणें बोलणें किंवा चेतविणें; नाकास चुना लागला असता तो असह्य होतो व मनुष्य रागावतो, ह्याचा उल्लेख पुढील आर्यांत आहे. उ०

सोसे कुलजा मृत्यु, न अयशाचा सोसवे चुना नाकीं ।
मोरो०—द्रोण—अ० २१, आर्या ५८.

३४६ नाकावर माशी बसूं न देणें—नाकावर माशी बसली असता ती त्रासदायक वाटते, आणि ती उठविण्याचा मनुष्य प्रयत्न करीत असतो व ती पुन्हा पुन्हा नाकावर बसत असली, तर तो चिडतो; ह्यावरून "नाकावर माशी बसूं न देणें," ह्याचा अर्थ दुसऱ्याकडून उपद्रव किंवा अपमान बिलकूल न व्हावा, अशाविषयी जागरूक असणें व तो झालाच तर संतापणें. पुढील आर्या पाहा.

ती धर्ममर्यादा सोसावी सर्वथा न रामाशीं
आमदवस्थेंत जशी नासाग्रीं बैसली नरा माशी ॥
मोरो०,—गदा०, अ० ५, आर्या २

३४७ नांगी टाकणें किंवा पाडणें—हतवीर्य होणें; हातपाय गाळणें; शत्रूवर हल्ला करण्यापासून निवृत्त होणें. [ शत्रुपुढे विंचवाचें काही चालेनासें झालें, म्हणजे तो आपली नांगी खाली वळवितो. यावरून ही शब्दसंहति उत्पन्न झालेली आहे ].

३४८ नायनाट होणें—विध्वंस होणें; साफ नाहींसें होणें. उ० नार्मन लोकांनी जेव्हा आंग्ल लोकांचें स्वातंत्र्य हरण केलें, तेव्हा आंग्ल लोक, त्यांची भाषा व त्यांचे लेख, यांचा नायनाट होतो की काय, अशी भीति पडली; पण ही भीतिहि निराधार ठरली.

प्रोफेसर वै० का० राजवाडे—आंग्लसाहित्य.

## ३४९. नांव

१. नांव—

(क) कोणत्याहि वस्तूचा वाचक जो शब्द तो. उ० माझ्या वडील मुलाचें नाव "कृष्णा" असें आहे. यमकादि शब्दालंकार हे महाराष्ट्र कवितेंत वामनाने प्रथमत: आणले व त्यावरून त्यास "यमक्या वामन" असें नांव प्राप्त झालें होतें. विष्णुशास्त्री चिपळूणकर, निबंधमाला. उ० 'दगडाचें नाव धोंडा, आणि धोंड्याचें नाव दगड (म्ह० दोन्हीहि भिकारच).

(ख) अत्यल्प परिमाण. उ० ह्या वरणांत मघाचें नाव नाही. महिना सरत आला आहे. आता मजजवळ पैशाचें नाव नाही.

[टीप—हा प्रचार नेहमी अकरणरूपीच होतो].

(ग) चागलें नाव म्हणजे कीर्ति, लौकिक [खाली २ पाहा].

(घ) वाईट नाव म्ह० दोष, अपकीर्ति किंवा ठपका (खाली ३ पाहा].

२ नांव मिळविणें—कीर्ति, लौकिक वगैरे संपादन करणें. उ० तुमच्या मुलाने वकिलींत नाव मिळविलें.

३. नांव ठेवणें—एखाद्या वस्तूचा कमीपणा किंवा तिच्यातील दोष दाखवून तिची निंदा करणें. उ० रामभाऊचा स्वभाव भारी कुचका आहे. तो नेहमी ज्याला त्याला नावें ठेवीत असतो.

[टीपः—ह्याच अर्थाने "नावें ठेवणें किंवा खोड्या ठेवणें" ह्याचा उपयोग होतो].

४ एखाद्याच्या नावावर पाणी घालणें—त्याचा दुर्लौकिक करणें; त्याच्या लौकिकाला बट्टा लावणें.

५ एखाद्याच्या नांवावर किंवा नावानें विकणें—त्याच्या संबंधाचा किंवा त्याचा आश्रित म्हणून आदरास पात्र होणें (लायकी नसतां).

६ त्याचे नांव जळो! त्याचे नांव भाजो किंवा त्याच्या नांवास हळद लागो!—तिरस्कार, द्वेष, वैर वगैरे व्यक्त करताना हे उद्गार काढतात. त्यांचा अर्थ "त्याचें निसतान होवो!" त्याला आग लागो!" असा होतो.

७. त्याचे नांव नको!—

(क) त्याची गोष्ट माझ्यापुढे काढू नको!

(ख) ती अल्प प्रमाणात देखील नाही! उ० प्रश्न—त्या काव्यात काही प्रसादगुण आहे काय? उत्तर —छे:! त्याचें नाव नको!

८ एखाद्या माणसाचे किंवा पदार्थाचें नाव न घेणे!—त्याच्या वाटेस न जाणें, त्याच्याशीं बिलकूल संबंध न ठेवणें.

९ एखाद्या मनुष्याचें किंवा पदार्थाचें नांव टाकणें किंवा सोडणें—

(क) त्याच्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध न ठेवणें; त्याच्याशीं बोलणें, चालणें किंवा कोणत्याहि प्रकारचा व्यवहार न करणें; त्याच्याशीं संबंध अजीबात वर्ज्य करणें. उ० कासोबानें माझी उगाच निंदा केली, अशी माझी खात्री होतांच मीं त्याचें नाव टाकलें. माझें तोंड आल्यापासून मी मेतकुटाचें नाव सोडलें.

१० एखाद्याच्या नांवानें बोंब मारणें किंवा शंख करणें—त्याला उघड-पणें दोष देणें (मग तसें करणें सकारण असो वा नसो).

११ एखाद्या वस्तूचें नांव देखील न राहणें किंवा न उरणें—ती अल्प प्रमाणात देखील शिल्लक नसणें. उ०.

द्विजाचें तें इज्याध्ययन तप सर्वस्व सुटलें, ।
क्षमेचें सत्याचें किमपि धृतिचें नाव नुरलें ।। —गणेश जनार्दन आगाशे.

१२ एखाद्याच्या नावानें किंवा नांवें जळणें—त्याच्यावर रागावणें; चरफडणें. उ० ते धनगर आपल्या स्थितीस त्रासले होते व आपण हाडें झिजवून कष्ट करतों आणि श्रीमान् लोक उगीच स्वस्थ बसून त्या कष्टाचीं फळें अनुभवितात, असें मनांत आणून रात्रंदिवस ते त्याच्या नांवें जळत व त्याचा नाश इच्छीत.,

कृष्णशास्त्री चिपळूणकर,—रासेलस.

१३ नांवास चढणें—लौकिक, कीर्ति संपादणें.

१४ नांवाला नसणें किंवा नांवाला देखील नसणें—अगदी मुळा नसणें. अगदी अल्प स्वल्प प्रमाणांतहि नसणें. उ० ह्या पंचपाळ्यांत नावाला देखील हळद नाही.

१५ ज्याचें नांव तें—अगदी देखील; मुळीच. उ० तुमचा सटवाजी ज्याचें नांव तें ऐकत नाही; त्याला कांही काम सांगितलें, तरी तो ऐकलें न ऐकलें करतो.

१६. नांव धुळींत (किंवा मातींत) घालणें—अब्रू गमावून घेणें. दुर्लौकिक करून घेणें.

१७ एखाद्याच्या नांवानें पाणी तावणें—त्याचें मरण, नुकसान चिंतीत किंवा इच्छीत असणें.

१८ नांवानें शंख, पूज्य किंवा आवळ्याएवढें—अत्यंत अभाव. उ० त्या निबंधांत नव्या माहितीच्या नावानें शंख आहे (म्ह० नवी माहिती मुळीच कांही नाही!).

१९. नांवारूपाला—वैभवाला; मानमान्यतेला; प्रतिष्ठेला. उ० आल्फ्रेड जसा रणशूर, एकनिश्चयी व कष्टाला हार न खाणारा होता, तसाच मुत्सद्दीहि होता. आपलें राष्ट्र वाय केव्हें असतां नांवारूपास येईल, ह्या विचारांत तो रात्रंदिवस गुंतलेला असे. प्रोफेसर वै० का० राजवाडे,—आंग्लसाहित्य.

२० नांवगाव—ठावठिकाण. उ० तुम्ही त्या माणसाला आठ रुपये उसने दिले. त्याचें नाव गाव तरी तुम्हीं विचारून घेतलें आहे काय ?

२१ नावानिराळा—अगदी अलिप्त. उ० ही गिरिजाबाई शेजारणींत कलागति लावून देऊन पुन्हा आपली नांवानिराळी !

२२ नावाचा—नुसता; नावापुरता, वास्तविक रीत्या नव्हे तो. उ० तो नावाचा बादशहा होता. खरी सत्ता वजिराच्या हातीं होती.

३५० निमित्तावर टेकणें—निमित्त सापडेल केव्हा, म्हणून टपून नसणें.

३५१ नीळ नासणें—निळीचा रग बिघडला असतां कांहीतरी खोटी बातमी उठविल्याने तो बिघडलेला रग सुधारतो, असा लोकभ्रम आहे. यावरून "नीळ नासणें" म्हणजे खोटी बातमी उठविणें, कोणीं सांगितलेली बातमी आपणास खोटी वाटत असल्यास आपण म्हणतों, "नीळ नासली आहे, असें वाटतें !"

टीप—ह्याच अर्थाने "नीळ रापणें" किंवा "निळीचा रग नासणें" असेंहि म्हणतात

३५२ पगडा बसविणें—वर्चस्व स्थापित करणें, अधिक जोरदार किंवा वरचढ होणें. [ सोंगट्यांच्या डावांत विवक्षित दान पडून एक पगडें पटात बसलें म्हणजे खेळणाराला विरुद्ध पक्षावर काही जास्तीं हक्क प्राप्त होतात ]. उ० दोन अडीचशें वर्षांच्या अवधींत आग्ल व नॉर्मन हा जातिभेद नव्याच अर्थी मोडला गेला आणि आग्ल भाषा व आग्ल स्वभाव, यानी आपला पगडा पुन्हा आंग्लभूमीवर बसविला.

प्रोफेसर वै० का० राजवाडे,—आग्लसाहित्य

३५३ पगडी फिरविणें—ठराव मोडून विरोधी वृत्तीनें वागणें. पूर्वी स्वीकारलेला पक्ष स्वार्थासाठी निर्लज्जपणाने सोडून देऊन उलट पक्ष अगीकारणें उ० गोविंदराव इतके दिवस राममाऊच्या मताचा प्रसार करीत होता परतु राममाऊच्या पक्षाला धरून राहिल्यापासून व्यवहारात कांहीं लभ्याश नाही, असें त्याला आढळून येताच त्याने एकदम पगडी फिरविली आणि आता तो विनायकरावाचा पक्षच बरोबर आहे, राममाऊचा पक्ष खोटा आहे, अशा मजकुराचीं व्याख्यानें देऊं लागला आहे.

३५४ पचप्राणाची आरती ओवाळणें—प्राण, अपान वगैरे पाच प्राण शरिरात असतात हे आहेत, तोपर्यंत मनुष्य जिवत असतो हे प्राण शरिराचे चालक होत. "पच प्राणाची आरती ओवाळणें." ह्या पांचहि प्राणासहित आरती ओवाळणें म्ह० सर्वभावेंकरून आरती ओवाळणें, खरी आणि उत्कट भक्ति किंवा प्रेम दाखविणें.

३५५ पड घेणें किंवा खाणे—माघार घेणें, आपली बाजू खरी आहे, अशी आपली खात्री असूनहि, प्रतिपक्षी चिरडीस जाईल, या भयाने आपलें बोलणें आवरतें घेणें. उ० दोघेहि जहाबाज. कोणीच पड घ्यावयास एकहि तयार नाही. मग सारी रात्र भांडण चाललें ह्यात नवल काय ? उ०

कलहात पक्ष बळकट असुनी घेऊनि पड तया मिटवा !
पुनरपि तेंच वदुनि न श्रोत्याचे कान लोकहो ! किटवा ॥ —विनोदी.

३५६ पथ्यावर पडणे—आपण खटपट न करतां एखादी वस्तु आपल्या सोयीप्रमाणे घडून येणें किंवा आपल्याला अनुकूल अशी होणें उ० मीं तुला आज सन्ध्याकाळीं ये, असें काल सांगून ठेविलेलें होतें आणि मीं सांगितलेली वेळ तुझ्या लक्ष्यांत न राहून तू आज सकाळीं आलास पण आता आलास, तें माझ्या पथ्यावरच पडलें. कारण, कांहीं निकडीच्या कामासाठीं मीं आज दुपारच्या गाडीनें मुंबईस जावयाचें ठरविलें आहे.

३५७. पदर

१. पदर—

(क) धोतराचें, लुगड्याचें किंवा पागोट्याचें टोक. उ० वाङ्निश्चयाच्या वेळीं कन्येचें दान करणारा व दान घेणारा असे दोघेहि इसम पागोट्याचे पदर सोडून बसतात.

(ख) नक्षी, वेलबुट्टी वगैरेंनी सुशोभित केलेली लुगड्याची, शालजोडीची वगैरे शेवटें उ० ह्या लुगड्याचा आतला पदर अगदींच मरड आहे !

(ग) सर. उ० सदोगान्या कठीला किती पदर आहेत ?

(घ) वाईट जातकुळीचा संबंध. उ० गोविंदरावांची मुलगी तुम्ही करूं नका, त्याच्या घराला पदर लागला आहे.

(ङ) लुगडें नेसून लुगड्याचा बहुतेक भाग कंबरेभोंवतीं गुंडाळल्यावर त्याचा जो थोडासा भाग ऊर किंवा डोकें झाकण्यासाठीं उरविलेला असतो, तो. उ० वाढावयाच्या वेळीं नायका खांद्याखालून पदर घेतात. रस्त्यातून चालतांना डोक्यावरून पदर घेतात.

ओढू नको फरफरा, घेऊं दे सावरोनि हा पदर। —मोरोपंत

(च) ताबा; कबजा; देखरेख; स्वामित्व, अधिकार. उ० हें सोत तुम्ही आपल्या पदरात घ्या. उ० ही कामगिरी मीं गुरुनाथाच्या पदरांत घातली. (म्हणजे त्याच्यावर सोपविली). तुकारामाची चूक मीं त्याच्या पदरांत घातली. मी तुमच्या पदरात पडलों आहें, मला सभाळून घ्या. माझ्या पदरीं मुलेंबाळें आहेत, उधळेपणा करून कसें चालेल ?

(छ) साल, पान; त्वचा. उ० ह्या कागदावरचे पदर जाडी जाडी आहेत

(ज) डोळ्याच्या बुबुळावर किंचित् अपारदर्शक असा पातळ थर येतो तो.

२ एकपदरीवर येणे—एखाद्याशीं बोलतांना बहुवचनाचा उपयोग न करतां एकवचनाचा उपयोग करूं लागणें (रागानें किंवा असभ्यपणानें).

३ पदर खर्चणे किंवा खाणें किंवा मोडणें—जवळ असलेला किंवा शिलकीचा पैसा खर्चणें.

४ दिव्याला पदर देणें किंवा घालणें—लुगड्याच्या किंवा धोतराच्या पदराचा वारा घालून दिवा मालविणें.

५ पदरचा—स्वतांचा; खुद्द आपला; आपल्या कल्पनेनें योजिलेला किंवा ठरविलेला. ज्याला आधार किंवा प्रमाण नाही, असें विधान किंवा वाक्य. उ० विश्वंभररावांनी मजजवळ दिलेल्या पैशात आला तसला मीं माल आणिला. मी पदरचे पैसे 'घालायाला थोडाच बसलों आहे' हा माझ्या पदरचा आश्रित. मीं जी बाळशेटच्या तोंडून बातमी ऐकली, ती तुला सांगितली; मीं काही आपल्या पदरची सांगितली नाही. मुळाला धरून भाषांतर करावें; त्यांत पदरचें काही घालू नये. एखाद्या वाक्याचा अनुवाद करतांना विद्यार्थ्यांनें त्यात पदरचा काही मजकूर घुसडून देऊ नये.

६. पदरचें घालणें—

(क) काही पदार्थ विकत आणावयासाठी दुसऱ्याने दिलेली रक्कम कमी पडली असता, आपल्याजवळचा पैसा घालून तितक्या रकमेची भरती करणें. उ० प्रेमजीनें कासोनाला हापूसचे आंबे विकत आणावयासाठी एक रुपया दिला. बाजारात सव्वा आण्याला एक असे आंबे होते तेव्हा प्रेमजीची शाबासकी मिळविण्यासाठी कासोनाने पदरचे चार आणे घालून १६ आंबे विकत घेतले आणि "रुपयाचे मीं १६ आंबे विकत आणले," असें प्रेमजीस खोटेंच सांगून त्याची शाबासकी मिळविली!

(ख) मुळात नसता कल्पनेने एखादें वाक्य एखाद्या ग्रंथात वगैरे घुसडून देणें.

७ तो पदरचें पापाहि देणार नाही!—पापासारखी टाकाऊ वस्तुदेखील तो देणार नाही, मग उपयुक्त वस्तु कोठून देणार? (म्ह० तो अत्यंत चिक्कू आहे).

८ एखाद्यापुढें पदर पसरणें—त्याला नम्रपणें विनविणें किंवा प्रार्थिणें; त्याची काकुळतीनें प्रार्थना करणें; त्याला शरण जाणें; त्याची क्षमा मागणें. उ० आता तू माझा अंत पाहूं नको! मी तुझ्यापुढे पदर पसरतों!

चापशरधरा! धीरा! आपद्ग्रस्तासि मज नको विसरूं।
या परम संकटीं मी बा! पदर तुझ्यापुढे किती पसरूं॥

मोरोपत,–आर्याकेकावलि.

९. पदरीं पडणें किंवा पदरांत पडणें—

(क) उपयुक्त होणें; फायदेशीर होणें; लागू होणें; पार पडणें. उ० आजचा दिवस तर पदरांत पडला! आतां उद्याची काळजी उद्या!

(ख) कबज्यांत येणें; ताब्यांत येणें; आश्रयाला किंवा संरक्षणाकरितां येणे.

१० पदरांत पाडून घेणें—पूर्णपणें संपादन करणें किंवा मिळविणें. उ० मेलों तरी बेहेत्तर, पण कायद्याने दिलेल्या सवलतीने पुरें माप आम्ही आपल्या पदरांत पाडून घेऊं, असा लोकानी निश्चय केला पाहिजे. —बा० ग० टिळक.

११ पदराला गांठ बांधणें किंवा मारणे—एखाद्या कामीं मिळालेला अनुभव नीट लक्ष्यांत ठेवणें.

१२ एखाद्याच्या पदराला खोच पडणें—त्याला नुकसान लागणें.

१३ एखाद्याच्या पदराला खार लागणे—त्याला नुकसान लागणें. याच धोरणाने "पदाराला खार लावणें" किंवा "लावून घेणें" ह्याचे अर्थ समजावे.

१४. एखाद्याच्या पदरीं असणें—

(क) त्याच्या आश्रयाला किंवा त्याच्यावर अवलंबून असणें. उ० भोजराजाच्या पदरीं पुष्कळ कवि होते.

(ख) त्याच्या मालकीचा किंवा सत्तेचा असणें; प्रारब्धाप्रमाणे मिळावयाचा असा असणें. उ० अंगीं असेल तें काम आणि पदरीं असेल तो दाम.

(ग) संग्रहाला किंवा जवळ असणें; हवा तेव्हा उपयोग करता येईल असा असणें. उ० शिरके, जाधव, निंबाळकर, घाटगे, मोरे, महाडीक, गुजर हे सरदार बलाढ्य असून त्यांच्या पदरीं दहादहा, वीसवीस हजार फौज असे.

१५. एखाद्याच्या पदरीं किंवा पदरांत घालणें—त्याच्या स्वाधीन करणें. उ० ही मुलगी मीं तुमच्या पदरात घातली आहे; तिचा सांभाळ करणें तुमच्याकडे आहे.

(क) त्याची चुकी, अपराध, लबाडी वगैरे त्याला पूर्णपणें दाखवून देणें; चुकी, लबाडी किंवा अपराध त्याचा आहे, अशी त्याची खातरी करून देणें. उ० दुष्ट लोकांच्या लबाड्यांचें माप त्याच्या पदरात घातलें, तरी त्याना शरम वाटत नाही; हाः हाः हाः करून हसतात आणि दांत विचकतात मात्र!

(ख) एखाद्याला जितकें कांही द्यावयाचें असेल किंवा ठरलेलें असेल तितकें पूर्णपणें देणें.

१६ पदरांत घेणें—पतकरणें; स्वीकारणें; स्वाधीन करून घेणें; कबूल करणें. उ० हा साखळ्याचा जोड मी तुमचा तुम्हाला परत आणून दिला, तो पदरांत घ्या. हे रुपये पदरांत घ्या. तुमची मुलगी आम्हीं पदरांत घेतली, आता तिची काळजी तुम्हांला नको. उ० माझी चुकी मीं पदरांत घेतली.

१७ पदरीं धरणें—चोर वगैरेस चोरी करीत असतांना पकडणें.

१८ पदरीं पडलें पवित्र झालें—तें चांगलें असो किंवा वाईट असो, तें माझ्या वाट्याला आलें आहे; तें मला पतकरिलें पाहिजे; रागावून किंवा चरफडून

उपयोग नाही. तें चांगलें असो किंवा वाईट असो, तें माझ्याकडे आलें आहे, तेव्हा तें पवित्रच आहे, असें मीं म्हटलें पाहिजे किंवा गृहीत धरलें पाहिजे.

१९ पदरमोड करणें—शिल्कीतील पैसा खर्च करणें. उ० स्नेह्यासाठी पदरमोड कर, परंतु जामिन होऊं नको !—अनंतफंदी.

३५८ परे—मृतकर्मांतील मंत्र. (क्रियापद गाणें किंवा म्हणणें). उ०

कुशदर्भपाणि भगवान् धौम्य परे गात गात गेला हो ।

मोरोपंत,—सभापर्व, अ० ७, आ० ६५.

३५९ पळ काढणें—भीतीमुळें किंवा संकट टाळण्यासाठी, एखाद्या ठिकाणापासून पळून जाणें. उ०

पळ काढिलाचि तुमच्या पाहुनि तें कर्म तडक लेकाहीं ।

गमला रुद्र वृकोदर धाकें काळीज तडकलें काही ॥ मोरो०,—द्रो० अ० १६.

### ३६०. पांग

१. पांग—

(क) कोणत्याहि गोष्टीसंबंधाची उत्कट इच्छा.

(ख) उणीव, कमीपणा. उ० मोठ्याच्या आश्रयाला राहिलें, म्हणजे पांग फिटतात. म्हातान्या आईबापाचे पांग मुपुत्रच फेडतो. येतील वाग तर फिटतील पांग. [ह्या अर्थी "पांग" शब्द अनेकवचनी योजिला जातो].

(ग) ओझें (कर्ज, वगैरेंचें). आपणांवर कोणीं उपकार केलेले असल्यास त्यासंबंधानें मनाला वाटणारा संकोच, दाब किंवा अस्वस्थता. उ० त्या गिडुमल मारवाड्याच्या कर्जाचा मला मोठा पांग वाटतो !

(घ) ताबेदारी. उ० चुलत्याच्या पांगात माझ्यानें राहवत नाही.

२ पांग फिटणें—मनोरथ सफल होणें; काळजी दूर होणें.

३ पांग फेडणें—मनोरथ सफल करणें; चिंता दूर करणें.

४ जिवाचे पांग फेडणें—आपली हौस भागविणें किंवा इच्छा तृप्त करून घेणें.

### ३६१. पागोटें

१ पागोटें—डोक्याचें आच्छादन करणारा पोषाखाचा भाग. [अनुरूप क्रियापद "बांधणें," "घालणें" किंवा "ठेवणें"].

२ आपलें पागोटें बगलेंत मारणें—मारामारीस तयार होऊन राहणें.

३ आधीं आपल्या पागोट्याशीं भांडावें, मग दुसऱ्याच्या पागोट्याशीं भांडावें—अगोदर आपल्या घरची व्यवस्था नीटनेटकी करावी आणि मग दुसऱ्याच्या घरच्या व्यवस्थेंत दोष काढावे.

४ एखाद्याचें पागोटें खाली करणें—त्याचा दुर्लौकिक करणें. उ० गोविंदपंताचा मुलगा वाईट निघाला; त्यानें त्याचें पागोटें खाली केलें.

५ पागोटें गमावणें—फसविला जाणें; ठोकर खाणें; नुकसानी सोसावी लागणें; अपमानास किंवा बदलौकिकास पात्र होणें. उ० मी एकनाथपंताच्या संगतीस लागलों, म्हणून पागोटें गमावून घेण्याचा प्रसंग मजवर आला!

६ दुसऱ्याचें पागोटें गुंडाळणें—त्याला फसविणें.

७ एखाद्याचें पागोटें घेणें—त्याला फसविणें; त्याच्याशीं व्यवहार करताना आपण न फसतां त्याला फसवून आपला फायदा करून घेणें.

८ एखाद्याचें पागोटें पडणें किंवा वाकडें होणें—त्याची फजिती होणें.

९ एखाद्याला पागोटें बांधणें किंवा बांधून देणें—त्याला सन्मानपूर्वक पागोटें बक्षीस किंवा आहेर म्हणून नजर करणें. उ० गोविंदरावाच्या सुनेला मुलगा झाला; म्हणून परवा तिच्या बापाला त्यानी बारा रुपयांचें चंदेरी पागोटें बांधलें.

१० पागोटें चाळगणें किंवा पागोट्याची लाज धरणें—आपला लौकिक कमी न होईल, अशाविषयी जपणें.

११ पागोटें सांभाळणें, पागोट्याचे पेच सांभाळणें किंवा पागोटें वागविणें—एखाद्या व्यापारात, व्यवहारांत, बूड न लागेल किंवा तो अंगावर न येईल, अशी खबरदारी बाळगणें.

१२ पागोट्याचे पेच गळ्यांत येणें—

(क) स्वताच्या दुर्वर्तनाचे परिणाम भोगण्याचा प्रसंग येणें.

(ख) मसलत फसणें.

(ग) दुसऱ्याच्या नाशासाठी रचिलेल्या व्यूहात आपण स्वतःच अडकणें.

१३ एखाद्याच्या पागोट्याला फुलें बांधणें—त्याची खुशामत करणें; त्याला आपल्या कार्यासाठी खूप करणें.

३६२ पांघरूण घालणें—झाकणें; उघडकीस न येऊं देणें. उ० मेनकाबाई आपल्या मुलाच्या दुर्वर्तनावर सदा पांघरूण घालीत असतें!

३६३ पांचजन्य करणें—चोंबलणें. [पांचजन्य हें विष्णूच्या शंखाचें नाव. पांचजन्य करणें म्हणजे शंख वाजविणें, शंख करणें].

३६४ पांचावर धारण बसणें—अत्यंत विस्मित आणि भयभीत होणें. पंचप्राण निघून जातात कीं काय अशा फिकिरीत पडणें.

३६५ पाट लावणें—विधवेनें दुसरें लग्न करणें. (हलक्या लोकांच्या भाषांतील हा प्रयोग आहे).

३६६ पाड नसणें, पाड न लागणे किंवा पाड न पावणे—योग्यी किंवा वरचढपणा नसणें, टिकाव न धरवणें ("पाड" म्ह० बरोबरी, सर) उ०

तू हरिसा हरि साचा, हरिणी सुरसिंधु, मीहि पाडससा ।
, पाट, ससाध्वस हो अरि, हरिशीं पावेल काय पाड ससा ? ॥

मोरोपंत,—भीष्मपर्व

उ० मोगल लोकाच्या स्वाऱ्या दक्षिणेंत झाल्या, त्या प्रथम मुख्यत मराठ्यावर नसून बडखोर मुसल्मानी राज्यावर होत्या त्यामुळे मुसल्मान व मराठे या दोघानी मिळून त्याच्याशीं टक्कर दिली पण मुसलमानी राज्यांचा पाड मोगलांविरुद्ध लागत नाही, असें जेव्हा मराठ्यांनी पाहिलें, तेव्हा त्यांनी आत्मसरंक्षणाची तयारी स्वतन्त्र रीतीने सुरू केली — न० चिं० केळकर,–मराठे व इग्रज

३६७ पाढा वाचणें—सविस्तर हकीकत सागणें, साद्यत निवेदन करणें

## ३६८ पाणी

१ पाणी—

(क) उदक सलिल

(ख) पाऊस, पर्जन्य उ० आज फार पाणी पडलें (अशिक्षित लोकात हा प्रयोग आहे)

(ग) हत्यारें भट्टींत तापवून नतर तीं पाण्यात बुडवून त्याच्या अगीं जी दृढता आणतात, ती उ० पटाशीला फार कडक पाणी देता कामा नय (क्रियापद "देणें," "चढविणें" किंवा "उतरणें")

(घ) धमक, अवसान, वीर्य, शक्ति, उत्साह उ० तुझ्या अगात काय पाणी असेल तें दाखीव आता !

(ङ) तेज, काति, चकाकी उ मोत्याची किंमत त्याच्या आकारावरून आणि पाण्यावरून करावयाची असते. उ० गुरुनाथाच्या डोळ्याचें पाणी पाहण्याजोगें आहे

(च) चेहेऱ्यावरील टवटवी किंवा तजेला उ० गजाननपतांच्या चेहेऱ्याचें पाणी अप्रतिम आह

(छ) सोन्याचा किंवा रुप्याचा मुलामा उ० ह्या वाटीला मी सोन्याचें पाणी देऊन ती देवाच्या नैवेद्याला रोज घेणार आहें

(ज) हत्यार सहाणेवर घासून त्याच्या अंगीं आणलेली तीक्ष्णता उ० तुकाराम गवळ्याने आपऱ्या कुऱ्हाडीला फार दिवसात पाणी दिलें नाही असें वाटतें

(झ) समान, अब्रू लौकिक, कीर्ति (क्रियापद "जाणें," "चढणें," "उतरणें")

२ अंगाचें किंवा रक्ताचें पाणी होणे (किंवा करणे)—अतिश्रमाने, त्रासाने किंवा दुःखाने जर्जर होणें (किंवा करणें).

३ रक्ताचे पाणी आणि हाडाचा मणि करणें—इमानाने आणि मेहेनतीने कर्तव्य किंवा कामगिरी करणें.

४ एखाद्या कामांत किंवा व्यवहारांत पाणी शिरणें—तें काम किंवा तो व्यवहार बिनकिफायतीचा, धोक्याचा किंवा त्रासाचा होणें.

५ खोल पाण्यांत शिरणें—एखाद्या कामीं किंवा एखाद्या व्यवहारात फार मन घालणें; एखाद्या विषयाच्या गूढ, कठीण किंवा दुर्बोध भागाचें ज्ञान करून घेण्याचा प्रयत्न करणें; आपल्या आवाक्याच्या पलीकडे जाणें.

६ तापल्या पाण्याला चव नसते—ही म्हण आहे. एकदा मैत्रीचा भंग झाल्यावर पुन्हा ती मैत्री जुळून आली, तरी ती पूर्वीप्रमाणें सुखकर होत नाही !

७ पाणी होणें किंवा करणें—एखाद्या वस्तूचा नाश होणें किंवा करणें; नासाडी होणें किंवा करणें. उ० मी तिसऱ्या प्रहरीं थोडेसें थालीपीठ खाल्लें, त्यामुळे माझ्या संध्याकाळच्या जेवणाचें पाणी झालें.

८ केस तोडण्याइतका पाण्याला जोर आहे—पाण्याच्या प्रवाहाला इतका जोर आहे, की त्यात केस धरला तर तो तुटेल. [ पावसाळ्यातील ओढ्याच्या पाण्याच्या जोराचें वर्णन करावयाचें असतां ही अतिशयोक्ति करतात ].

९. पाणी घालणें—

(क) शब्दशः—वृक्षादिकाच्या वाढीला जरूर तें पाणी त्याच्या बुडाशीं ओतणें. उ० ह्या तोंडलीच्या वेलाला आठ दिवस नियमाने पाणी घाला म्हणजे तुम्हाला तोंडलींच तोंडलीं मिळतील !

(ख) लक्षणेनें—एखाद्या गोष्टीच्या अभिवृद्ध्यर्थ प्रयत्न करणें; एखाद्या वस्तूच्या जोपासनेबद्दल उपाय करणें.

(ग) लक्षणेनें:—एखाद्या वस्तूवर पाणी घालणें म्ह० तिचा नाश करणें; ती गमावून घेणें. उ० गिरिधरपंत अतिशय अव्यवस्थित मनुष्य त्याने आपल्या हाताने आपल्या नोकरीवर पाणी घातलें ! ( विस्तवावर पाणी घातल्याने तो विझतो, ही लक्षणा ह्या प्रयोगाच्या मुळाशीं आहे ).

१० पाणी सोडणें—ब्राह्मणाला जें काही दान केलेलें असतें, त्याच्यावर पाणी सोडणें; म्हणजे त्याच्यावरचें आपलें स्वामित्व नाहीसें होऊन तें त्या ब्राह्मणाकडे गेलें. यावरून 'एखाद्या वस्तूवर पाणी सोडणें' ह्या वाक्प्रचाराचे पुढे दिल्याप्रमाणे अर्थ झाले:—

(क) ती स्वेच्छेने कायमची देऊन टाकणें.

(ख) तिची आशा सोडून देणें; ती गेली असें समजून स्वस्थ बसणें. उ० तूं गोपाळरावाला दहा रुपये उसनें दिलेस, ते तो परत देईल, असें दिसत नाही. त्या रुपयांवर तूं पाणी सोड कसा!

(ग) नाइलाजास्तव ती सोडावयास, तिच्याकडे दुर्लक्ष करावयास ती विसरून जावयास किंवा तिचा नाश करावयास तयार होणें किंवा सिद्ध असणें. उ० अलीकडे जानराव पाटलाचा मुलगा खंडूजी फार बिघडला आहे. पाटीलबोवानी आता पुत्रप्रेमावर पाणी सोडलें पाहिजे. कडक उपाय योजल्याशिवाय खंडूजी सुधारण्याची आशा नाही!

११ पाणी छाटणें, तोडणें किंवा कापणें—पोहोणाराने आपल्या अंगाच्या जोराने पाणी दुभागून पुढे सरणें. उ० अलीकडे मी अशक्त झालों आहें. ह्या खडकापासून तों त्या देवळाच्या पायऱ्यांपर्यंत देखील मला पाणी छाटावयाला (किंवा कापावयाला) भारी श्रम पडले. [ "छाटणें" "कापणें" हीं सकर्मक क्रियापदें होत. त्याचा "छाटलें जाणें" किंवा "कापलें जाणें" असा अकर्मक प्रयोगहि होतो. "तोडणें" ह्याचें "तुटणें" असें अकर्मक रूप होतें. उ० ह्या पाण्याला भारी जोर आहे, तें मला छाटत, तुटत किंवा कापत नाही ].

१२ पाणी जाळणें—करडा अंमल चालविणें; क्रूरपणाने वागविणें.

१३ एखाद्याचें पाणी जोखणें किंवा ओळखणें—त्याची धमक, विद्वत्ता, पराक्रम किंवा कर्तृत्वशक्ति अजमावणें किंवा पारखणें; त्याची लायकी पाहणें.

१४ एखाद्याच्या नांवाने (किंवा नांवावर) पाणी तावणें—त्याचा सर्वस्वीं घात करावयास उद्युक्त होणें. [ प्रेत घरातून बाहेर काढावयाच्या पूर्वी त्यावर ऊन्ह पाणी ओतीत असतात. ह्या प्रघातावरून ह्या वाक्प्रचाराची उत्पत्ति आहे ].

१५ हत्याराला पाणी देणें—मागे उपाक १ (ग) पाहा. [ "कडक", "नरम", "मध्यम" हीं "पाणी" याचीं विशेषणें होतात ].

१६ पाणी देणें—श्राद्धविधि करून मृताला तिलांजलि देणें. उ० मी दत्तक मुलगा घेणार! मी मेल्यावर मला पाणी द्यावयाला कोणी तरी पाहिजे ना? [ "एखाद्याच्या नावाने पाणी देणें किंवा सोडणें" ह्याचाहि वरील अर्थानें उपयोग होतो ].

१७ एखाद्या वस्तूवर पाणी पडणें—ती फुकट जाणें; ती निरुपयोगी होणें; तिचा नाश होणें; तिचा सुखकरपणा नाहीसा होणें. उ० तू कौमुदीची उजळणी करीत जा, नाहीतर तिच्यावर पाणी पडेल; चिंतामणरावाची बायको मेल्यामुळे त्यांच्या संसारावर पाणी पडलें. [ डफ, ढोलकें वगैरेंवर पाणी पडल्याने त्यांचा आवाज बदबदीत होतो. ह्या सादृश्यावरून वरील वाक्प्रचाराची उत्पत्ति आहे ].

१८. एखाद्याला पाणी पाजणें—
(क) तो मेल्यावर त्याला तिलांजलि देणें.
(ख) त्याला खूप झोडपणें.
(ग) *त्याला फसविणें किंवा पराजित करणें.*

१९ पाणी पाणी करणें—"पाणी द्या!" "पाणी द्या!" असें म्हणणें; एकसारखें पाणी मागत राहणें. उ० मुलें मघाशसून पाणी पाणी करीत आहेत. गोंदे, विहिरीच्या पाण्याची एक घागर भरून आण पाहूं!

२० एखाद्याचें पाणी पाणी करणें—त्याच्याकडून अतोनात काम करून घेऊन त्याला दमाविणें.

२१ पाणी पाणी होणें—एकसारखें किंवा पुन्हा पुन्हा पाणी पिण्याची प्रवृत्ति होणें. उ० उन्हाळ्याच्या दिवसांत जिलबी, साखरभात वगैरे पक्वान्नें खाल्लीं असतां पाणी पाणी होतें.

२२ पाणी पी पिऊन भांडणें किंवा वाद करणें—नेटानें, हट्टानें, निर्लज्ज-पणानें भांडत राहणें.

२३ एखाद्याच्या घरीं पाणी भरणें—त्याच्या सेवेंत तत्पर असणें; त्याला पूर्णपणें वश किंवा अनुकूल असणें. उ०

उद्योग्याच्या घरीं। ऋद्धि सिद्धि पाणी भरी॥

[येथें "पाणी वाहणें" किंवा "पाणी घालणें" याचाहि उपयोग होतो].

२४ पाणी मरणें—पाणी बेचव होणें; पिण्याचें पाणी निर्दोष करण्यासाठी त्याला उकळी आणतात, तेणेंकरून तें निर्दोष झालें, तरी बेचव होतें. ह्या पाण्याला "मेलेलें पाणी" म्हणतात.

२५ पाणी मागूं न देणें—एकदम, तडाक्यासरशीं ठार मारणें; बेदम मारणें. उ० तूं बळवंतरावाच्या वाटेस जाऊं नको; तुला त्यांनी चडविलें, तर पाणी मागूं देणार नाहींत!

२६ पाणी मारणें—पोहोतांना पाणी दुभागणें.

२७ पाणी मुरणें—कमीपणा, वैगुण्य, मर्मस्थान, दोषाला जागा वगैरे असणें. उ० जनोबाला हा कागद दाखवितों, असें मी म्हणतांच बाबुलनाथ कसा घाबरला, तें तुम्हीं पाहिलें ना? तेथें कांहींतरी पाणी मुरतें आहे, असा मला बळकट संशय आलेला आहे!

२८. पाणी लागणें—
(क) वाईट पाणी पिण्यांत आल्यामुळे आजार येणें. उ० तुम्हाला पुण्याचें पाणी लागलें खास! *एऱ्हवीं तुम्हांला हा मलेरियाचा ताप कशानें जडला?*

(ख) त्याची संगति धरली असेल, त्याचे गुण किंवा जेथे वसति केली असेल, तेथल्या लोकाचे गुण अंगीं जडणें.

२९ पाण्याचा कांटा मोडणे—पाणी थोडेंसें तापणें. उ० मला अंघोळीला फार ऊन पाणी लागत नाही. पाण्याचा जरासा कांटा मोडलेला असला, म्हणजे झालें.

टीपः—१. थंड पाणी असलें, तर तें अंगाला कांट्याप्रमाणें बोचतें.

टीपः—२. "मोडणें" हें ह्या अर्थानें सकर्मक किंवा अकर्मक, योजता येतें.

३० पाण्यांत घाम येणे—अतोनात संतप्त होणें; रागानें अंगाचा भडका होऊन जाणें.

३१. एखादी वस्तु पाण्यांत घालणे—

(क) ती बुडवून टाकणें.

(ख) तिचा नाश करणें.

(ग) तिजकडे दुर्लक्ष्य करणें.

३२ एखाद्याला पाण्यांत पाहणे—त्याचा अति द्वेष करणें. त्याच्याशीं वैरभावाने वागणें. उ० स्पानियर्ड लोक, जुन्या धर्मांचे, मदोन्मत्त व परस्वातंत्र्य हरण करणारे अशी त्यांची ख्याति असल्याकारणानें इंग्रज लोक त्यांना पाण्यामध्ये पाहत.

प्रो० वै० का० राजवाडे,—आंग्लसाहित्य.

उ० माझी दौलत मोठी असल्यामुळे व सर्व लोक मला चाहतात, यामुळें, नरहरपंत मला नेहमी पाण्यांत पाहतो.

३३ पाण्यांत दिसणे—द्वेषपात्र असणें किंवा होणें; भीतीचें कारण असणें. उ० मोगलाना शिवाजी पाण्यात दिसत असे (म्ह० मोगल लोक शिवाजीला फार भीत असत).

३४ एखाद्याला पाण्यापेक्षा पातळ करणे—त्याची फजिती किंवा पाण-उतारा करणें; त्याला लाजविणें; त्याचा तेजोभंग करणें. पाण्यापेक्षा पातळ होणें म्ह० फजिती पावणें; शरमिंदा होणें. उ० प्रभाकरपंत आपल्या प्रामाणिकपणाचा भारी डौल मिरवीत असे. पण त्याने आपल्या विधवा बहिणीचे पैसे कसे लुबाडले, हें मीं पुराव्यानिशीं चार-चौघात सिद्ध करून दाखविलें, तेव्हा तो पाण्यापेक्षा पातळ झाला!

३५ ऊन्ह पाण्याने घरें जळत नसतात—निराधार निंदेनें कोणाचा बद-लौकिक होत नाहीं. एखाद्यावर वृथारोप केल्याने त्याची अपकीर्ति होत नाही.

३६ त्याला पाणीदेखील घोटत नाहीं—तो अगदी मरणोन्मुख झाला आहे.

३६९ पात्रें पुजणे—पानावर थोडेंसें वाढणें, वाढलेंसें करणें.

पुरेसा नसणें, " म्ह० अगदी थोडा किंवा कमी योग्यतेचा असणें. उ० सदानंदाचा निबंध गोविंदाच्या निबंधाच्या पासंगासहि लागणार नाही !

३७५ (एखाद्याच्या) पाळतीवर असणें—त्याला न कळूं देतां त्याच्या हालचालीवर नजर ठेवणें. उ० तुमच्या मुलाला बाहेरख्यालीपणाची सवय लागेल, असा मला रंग दिसतो. तुम्ही त्याच्या पाळतीवर असा ! बदमाष लोकांच्या पाळतीवर राहून गुन्हा न होऊं देणें, हें पोलिसाचें खरें कर्तव्य ! रामा गडी पैसे चोरतो, असा मला बरेच दिवस संशय होता. एक दिवस मी त्याच्या पाळतीवर राहिलों आणि माझ्या कोटाच्या खिशांत हात घालतांना त्याला मीं पकडिलें !

३७६ पिकलें पान—अतिशय म्हातारा माणूस, जो केव्हा मरेल ह्याचा नेम नाही असा.

३७७ पिंगा घालणें—जागच्या जागींच घोटाळत राहणें. [ मुलींचा " पिंगा " म्हणून एक खेळ आहे. यात जागच्या जागींच आपल्या भोवती फिरावयाचें असतें. त्याला " पिंगा घालणें, " असें म्हणतात ].

३७८ (एखाद्याचें) पितर उद्धारणें—त्याला आईबापांवरून शिव्या देणें. [ " उद्धरणें " असेंहि क्रियापद योजिलें जातें ].

३७९ (एखाद्याचे) पित्त उसळणें किंवा खवळणें—तो रागावणें किंवा संतापणें. उ० कोणी खोटें बोललें, म्हणजे बाळकू अण्णाचें पित्त खवळतें, बाटून खिस्ती झालेल्या हिंदु लोकांस परत स्वधर्मांत घेण्याचे अनेक प्रयत्न तत्कालीन ब्राह्मणांनी केलेले आहेत. अशा लोकांस आपल्या पिढीजाद धर्मांत परत येण्याबद्दल ते उपदेश करीत; इतकेंच नाहीतर गोकुळ-अष्टमी वगैरेंसारख्या मोठ्या मेळ्यांच्या दिवशीं बाटलेल्या लोकांस समुद्रस्नान अगर गंगास्नान घालून शुद्ध करून घेत ही ब्राह्मणाची युक्ति पाहून पाद्र्याचें पित्त खवळून जाई ! —गो० स० सरदेसाई.

३८० पुख्खा झोडणें—लोकांच्या घरीं किंवा फुकट मिळालेल्या अन्नावर चैन मारणें. उ० ह्या खुशालचंदाला यजमानाच्या घरीं पुख्खा झोडणें आणि झोप ताणणें, ह्याशिवाय कांहीच धंदा नाही.

३८१ पुंगी बंद करणें—स्तब्ध बसावयास लावणें; गप्प बसविणें; बोलूं न देणें. उ० विसाजीपंताचीं वर्मेकर्मे मला ठाऊक आहेत. त्याची पुंगी बंद करावयाला मला कांहीं उशीर नाही ! [ गारोडी सापापुढें पुंगी वाजवून त्याला आपल्या सांगण्याप्रमाणे फणा करावयास किंवा डोलावयास लावतो. पुंगी वाजविणें बंद झाल्याबरोबर साप स्तब्ध किंवा निश्चल होतो ].

३८२ पुढीस जाणें—संन्यासी कोठें जेवावयास गेला, म्हणजे "पुढीस गेला" असें म्हणतात. याचप्रमाणें " पुढीस बोलावणें ". " पुढीस येणें " ह्यांचे अर्थ समजावे. उ० अर्जुन संन्याशाला बलरामाने पुढीस बोलाविलें.

## ३८३. पेच

१ पेच—कुस्तीच्या खेळात प्रतिपक्षाला पाडण्याच्या ज्या युक्त्या त्यांना "पेच" असें म्हणतात.

२ एखाद्याला पेचांत धरणें—त्याला सुटून किंवा निसटून जाता येणार नाही, अशा रीतीने त्याला धरणें, पकडणें किंवा अडकविणें.

३ एखाद्याला पेचांत घालणें—त्याला संकटांत किंवा अडचणींत लोटणें.

३८४ पेढे चारणें—फसविणें.

३८५ पैजेचा विडा उचलणें—मी अमुक अमुक कृत्य करीन, अशी प्रतिज्ञा करून चार मंडळींच्या समक्ष विडा उचलणें. उ०

विडा पैजेचा उचलु नको। उणी तराजू तोलु नको ! ॥ —अनतफंदी.

३८६ पैठणी आदर (किंवा प्रेम, आग्रह)—वरपागीचा किंवा बाह्यात्कारी आदर (प्रेम किंवा आग्रह).

३८७ (एखाद्याच्या) घरांत पैशाचा धूर निघत असणें—तो अतिश्रीमंत असणें.

३८८ पोपटपंची करणें—बडबडणें, अर्थ न समजतां पाठ केलेलें असेल, तें म्हणून दाखविणें.

३८९ पोवाडे गाणे—स्तुति करणें (विशेषतः नालायक मनुष्याची किंवा स्वत्या योग्यतेला न शोभेशी). उ० रंगाचार्य हा शिवरामपंताचे उगीच नाही पोवाडे गात ! रंगाचार्याला शिवरामपंतापासून बढती मिळवावयाची आहे, समजलास !

## ३९०. पोळी

१ खाद्यविशेष—

२ एखाद्याची पोळी पिकणें—त्याची चैन होणें.

३ आपल्या पोळीवर तूप ओढणें—दुसऱ्याच्या फायद्याकडे लक्ष्य न देता आपला फायदा करून घेणें; आपलपोटेपणा करणें.

३९१ पोबारा किंवा पावबारा करणें—पळून जाणें, एखाद्याची नजर चुकवून निसटून जाणें [तिफाशी सोंगट्याच्या खेळातील हा पारिभाषिक शब्द आहे].

३९२ प्रताप किंवा गुण उधळणें—वाईट स्वभाव, दुर्गुण वगैरे प्रकट करणें. उ० गोविंदरावांच्या पोरानी भिवंडीस खूपच गुण उधळले !

३९३ (एखाद्याचें) प्रस्थ करून ठेवणें किंवा माजविणें—त्याची अतोनात तारीफ करणें; त्याचें महत्त्व अतिरेकाला नेऊन पोंचविणें उ० त्या फकिरानें ह्या शिरडी गावच्या लोकानी फारच प्रस्थ माजविलें आहे !

३९४. प्रस्थान

१ प्रस्थान—एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणाकडे जावयाला निघणें.

२ प्रस्थान ठेवणें—कोणा माणसाला कांही कार्यासाठी परगावाला शुभसमयीं निघावयाचें असलें आणि काही अडचणीमुळे त्याला त्या शुभसमयीं प्रवासाला निघणें शक्य नसलें, तर तो त्या शुभसमयीं तादूळ, सुपारी, हळकुड, सोनें वगैरे पदार्थांची पुर्चुंडी एखाद्या ठिकाणीं नेऊन ठेवितो आणि मग तो प्रत्यक्ष प्रवासाला निघाला म्हणजे ती पुर्चुंडी बरोबर घेऊन जातो. ही पुर्चुंडी शुभसमयीं (निघण्यापूर्वी) नेऊन ठेवणें ह्या विधीला "प्रस्थान ठेवणें" असें म्हणतात. साध्या व्यवहारात "प्रस्थान ठेवणें" म्हणजे निघून जाण्याची तयारी करणें.

३ प्रस्थान करणें—निघून जाणें.

३९५ प्राणप्रतिष्ठा करणें—

१ धातु, काष्ठ इत्यादिकांच्या मूर्तींच्या ठायीं मन्त्रादिकांच्या संस्काराने देवत्व आणणें देवळामध्ये एखाद्या मूर्तीची स्थापना करतेवेळीं हा संस्कार करावयाचा असतो.

२ स्थापना करणें. उ० दक्षिणेंत शिवाजीने मराठी राज्याची प्राणप्रतिष्ठा केली; शिवाजीचा मुलगा संभाजी हा फितूर होऊन दिल्लीरखानास जाऊन मिळाला. मराठेशाहीच्या प्राणप्रतिष्ठेच्या समयीं असला आपात झाला, ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट होय!! —गो० स० सरदेसाई.

३९६ फट् म्हणणें—तिरस्काराचा किंवा निंदेचा शब्द उच्चारणें. उ० सखारामपंत कोणाचें फट् म्हणून घेणारा माणूस नाही (म्ह० कोणीं त्याचा तिरस्कार केलेला तो ऐकून घेणार नाही).

३९७ फडशा उडविणें—संपवून टाकणें, संहार करणें. उ० आम्हीं चवघा जणानी पाऊणशें केळ्यांचा फडशा उडविला!

३९८ फत्ते होणें—फताह-जय. "फत्ते होणें" म्ह० जिंकणें. "फत्ते मिळविणें" म्ह० जय मिळविणें, कार्य सिद्धीला नेणें.

३९९ फरारी होणें—पळून जाणें.

४०० फशीं पाडणें—फसवून संकटांत पाडणें "फशीं पडणें" म्ह० फसून अडचणींत पडणें,

४०१ फळास येणें—फलद्रूप होणें उ०

महत्पुण्य तें पूर्ण फळासि आलें। बा रे! तुझें दर्शन आजि झालें।
स्मरूनिया तूं मज भेटलासी। सुधानिधीसंनिभ वाटलासी।—आनंदतनय.

४०२. फाटा

१. फाटा—

(क) नदी, झाड, डोंगर वगैरेंची शाखा; भाग किंवा अवयव.

( ख ) लिहिलेला मजकूर खोडावयाचा असतां जी रेघ मजकुरांतून ओढतात ती.

२ फाटा देणें--कमी करणें; नाहीसा करणें. उ० मोरोपताला पोटदुखी जडल्यापासून त्यानी वरणाला फाटा दिला आहे; रामभाऊ आपल्या नोकरीच्या गावावर गेले, तेव्हांपासून मीं घरातील एका नोकरास फाटा दिला (म्ह० तो काढून टाकला ); काल दुपारीं जेवण फार झालें, म्हणून बाळभटाने सध्याकाळच्या जेवणास फाटा दिला, गोष्टींत छाटाछाट करणें, असबद्ध विचाराना फाटा देणें, योग्य शब्दाची व अलकाराची जोड करणें, गोष्ट सुसबद्ध दिसावी म्हणून तिच्यात भर घालणें व सर्वांचें मोहक तऱ्हेने वर्णन करणें, ही त्याची शैली. ---प्रोफेसर वै० का० राजवाडे.

३ फाटा फुटणें--एका कामातून दुसरें काम निघालें, म्हणजे "त्याला फाटा फुटला" असें म्हणतात.

४ फाटा फोडणे--नसत्या अडचणी उपस्थित करणें; एखादें काम टाळावयासाठी त्यात हरकती काढणें.

४०३ फारकत होणे---संबंध सुटणें; ताटातूट होणें. उ० शहाणपणाची आणि गोविंदरावाची फारकत झाली आहे. (म्ह० गोविंदराव मूर्खासारखा वागत असतो ).

४०४ फावड्याने किंवा खोऱ्याने पैसे ओढणें---अतोनात पैसे मिळविणें. उ० सुमारें ४० वर्षामागे ज्यानी वऱ्हाडात वकिली केली, त्यानी खोऱ्याने पैसे ओढिले!

## ४०५. फासा

१. ( क ) ( स० पाश ) आकडा. उ० नथेचा, सरीचा, हसळीचा, निंदलीचा फासा.

( ख ) पक्षी वगैरे धरावयाचें जाळें.

( ग ) एखाद्या माणसास फसविण्यासाठी केलेली युक्ति.

( घ ) ( सं० पाशक ) सोंगट्याच्या खेळांत जे लाकडी किंवा हस्तिदती तुकडे घेण्यांत येतात ते.

२ फाशी देणे--गळ्याला दोरीचा फास लावून प्राण घेणें. उ० मारुत्यावर खुनाचा आरोप शाबीत होऊन त्याला काल फाशी देण्यांत आलें. [ याचप्रमाणे "फाशी जाणें" ह्याचा अर्थ समजावा ].

३ फासा टाकून पाहणें--एखादी वस्तु प्राप्त करून घेण्यासाठी एखादी धाडसी युक्ति करणें, नशिबावर हवाला टाकून एखादें जोखमीचें काम पतकरणें.

४ एखाद्याचा फासा जाणणे, समजणें किंवा उमगणे--त्याची गुप्त योजना किंवा ममलत ओळखणें.

५ फासा सोयीचा पडणें---अनुकूल गोष्ट घडून येणें, योजलेल्या कृत्याला सुरळीतपणें चालण्याचें स्वरूप येणें.

६ फासा टाकणे—आपलें म्हणणें कळविणें किंवा एखादी गोष्ट करणें (आणि परिणाम काय होतो, याची वाट पाहत बसणें किंवा फलाविषयी तर्क करीत बसणें ).

४०६ फुटाण्यासारखा उडणे—ऐटीने, रागाने किंवा गर्वाने, जोरदार रीतीचे अगविक्षेप करणें. उ० मालतीबाई भरपंक्तींत येऊन फुटाण्यासारखी उडत होती !

४०७ फुली घालणे—अडथळा करणें शरिराचा एखादा भाग दुखत असला म्हणजे तेथे बिब्याची फुली घालतात, म्हणजे रोगाच्या जोराला प्रतिबंध होतो. यावरून "एखाद्या कामांत फुली घालणें" म्हणजे त्यात विघ्न आणणें असा अर्थ झाला.

४०८ फुलें विकलीं तेथ गोवऱ्या विकणें—जेथे पूर्वी वैभवाने दिवस घालविले, तेथे दरिद्री स्थितीत राहणें.

४०९ फुसकुली सोडणें—कुचकें, मर्मभेदक किंवा एखाद्याची हानि होईल अशा प्रकारचें भाषण गुप्तपणें किंवा हळूच करणें

४१० फू करून टाकणें—उधळेपणाने खर्चून टाकणें.

४११ बजबजपुरी करणे, माडणे किंवा माजविणे—अव्यवस्था किंवा गोंधळ करणें.

४१२ बडीजाव करणें—गौरव करणें.

४१३. बत्तीशी

१ बत्तीशी—बत्तीस दांताचा समुदाय.

२ बत्तीशी रंगाविणें—दांतातून रक्त निघेल आणि त्या रक्ताने बत्तीसचे बत्तीस दात रगतील इतक्या जोराने थोबाडींत मारणें.

३ बत्तीशी पाडणें—थोबाडींत मारून बत्तीसचे बत्तीस दात पाडून टाकणें; सारे दात पडतील इतक्या जोराने थोबाडींत मारणें.

४ बत्तीशी दाखविणें—हसणें [ हसताना दात दिसतात आणि दात बत्तीस असतात, यावरून ही शब्दसहति उत्पन्न झाली आहे. हींत अतिशयोक्ति आहे. कारण हसतांना सारे म्हणजे बत्तीस दात कधीच दिसत नाहीत ].

४१४ बंब वाजणें—फजिती होणें; अखेरीस काही नाही, असें होणें. उ० नान्या, तू पत्ते खेळून काळ घालवीत आहेस ! हें काही चागलें नाही ! अशाने परीक्षेत बब वाजेल बरें !

४१५ बभ्रा करणें—बोभाटा करणें.

४१६. बलबलपुरी

१ बलबलपुरी ( बजबजपुरी )—घोटाळा; अव्यवस्था.

२ बलबलपुरी होणें—घोटाळा किंवा गोंधळ होणें.

४१७ बस्तान बिघडणें—बिघाड होणें, अव्यवस्थित होणें [ व्युत्पत्तिः— स्वस्थान म्ह० आपली जागा ].

४१८ बळी पडणें—मृत्युस्थानीं पडणें; नाश करणाऱ्याच्या तावडींत सापडणें; विध्वस्त होणें; नाश पावणें; मरणें. उ० गिरिधररावाच्या कारस्थानाला सदोबा बळी पडला.

४१९ बळी ओवाळून टाकणें—पुढे क्रियापदें ह्या प्रकरणांत "ओवाळणें," हें क्रियापद पाहा.

४२०. (एखाद्या गोष्टीचा) बाऊ करून ठेवणें—भीति वाटण्याइतकें तिला महत्त्व देणें. ती अतिबिकट, धोक्याची किंवा दुर्घट आहे, असा विनाकारण आपला ग्रह करून घेणें किंवा दुसऱ्याचा ग्रह करणें.

४२१ बाऊ वाटणें—भीति वाटणें.

४२२. बांगडी

१ बांगडी—कंकण; काकण. उ० अलीकडे काचेच्या काळ्या बांगड्या चांगल्या होत नाहींत.

२. बांगड्या फुटणें—

(क) स्त्रीचा पति मृत झाला असतां तिच्या बांगड्या फोडितात. यावरून "बांगड्या फुटणें" म्ह० वैधव्य येणें किंवा पुरुष मरून तितक्याच्या स्त्रिया विधवा होणें. पानिपतच्या लढाईमुळे महाराष्ट्रांतील एक लाख बांगडी फुटली ( म्ह० एक लाख मराठे वीर मेले आणि तितक्याच्या स्त्रिया विधवा झाल्या ).

(ख) पजिती होणें; नक्षा उतरणें. उ० नरसिंगरावाच्या अंगचे गुण जग-जाहीर आहेत. कासोबासारख्या हलकटानें त्याची निंदा केली, तर त्याच्या काय बांगड्या फुटणार आहेत?

३ बांगड्या वाढणें—स्त्रीच्या हातांतील बांगड्या पिचल्या किंवा फुटल्या म्हणजे त्या "फुटल्या" किंवा "पिचल्या" असा अशुभ शब्द न योजतां "बांगड्या वाढल्या" "किंवा बांगड्या वाढवल्या" असें म्हणतात. लाक्षणिक योजनेंत "बांगड्या वाढणें, वाढवणें, पिचणें, फुटणें" वगैरेंचा अर्थ पजिती होणें, नक्षा उतरणें किंवा हानि होणें असा होतो. उ० एकनाथपंताने मला न कळविता मुकाट्यानें तो कारभार केला; करू दे बापडा! त्यांत माझ्या काय बांगड्या पिचल्या?

४ बांगड्या भरणें—नामर्द होणें, पराक्रमशून्य होणें किंवा असणें. उ० तो शिवराम माझ्या अंगावर आला, तर मी त्याला दहा गुद्दे चढवीन! मीं काय बांगड्या भरल्या आहेत?

### ४२३. बाजार

१ बाजार करणें—हव्या असतील त्या वस्तु बाजारांतून विकत आणणें. उ० लोकांनी तुमच्या जिनसा विकत आणून देणें, हें किती दिवस चालणार? तुमच्या मुलांनी बाजार करावयास शिकलें पाहिजे.

२ बाजार मांडणें—अनेक पदार्थ इतस्ततः अव्यवस्थितपणें पसरणें.

३ बाजार भरविणें—अनेक माणसें (ज्यांचा कांही उपयोग नाही, किंवा ज्यांच्या योगें घोटाळा मात्र होतो, अशीं माणसें), एके ठिकाणीं गोळा करणें.

### ४२४. बाजू

१ बाजू राखणें—अब्रू संभाळणें; फजिती किंवा दुर्लौकिक होण्याचा संभव असता तो न होऊं देणें.

२ बाजू राहणें—फजिती किंवा दुर्लौकिक होण्याचा संभव असतां एखाद्या अनुकूल गोष्टीमुळे तो न होणें.

४२५ बाणा मिरविणें. किंवा उचलणें—अभिमान बाळगणें; निश्चय, निर्धार करणें. उ० ज्याच्या त्याच्यावर हल्ला करण्याचा जो त्यानें बाणा उचलला आहे, तो विचारी मनुष्यास खास आवडणार नाही.

विष्णुशास्त्री चिपळूणकर,–निबंधमाला.

४२६ बात झोकणें—खोटी बातमी सांगणें.

४२७ बापशेटीची पेंढ—हवें त्याने हवी तितकी न्यावी अशी वस्तु.

४२८ बार—बंदूक उडविण्यासाठीं तींत ठासलेली दारू.

१ बार उडविणें—कठीण, दुर्घट काम पार पाडणें; अकल्पित रीतीनें काम फत्ते करणें. [ "बंदुकीचा बार उडविणें" ह्या प्रकारावरून ही शब्दसंहति निघाली आहे ].

२ बार भरणें—पढवून ठेवणें; अमुक प्रसंग आला असता अमुक करावयाचें, अशा संबंधाच्या सूचना त्या त्या माणसांस देऊन ठेवणें; इष्ट हेतु सफल होण्यासाठी जरूर जी तजवीज ती अगोदरच शहाणपणानें करून ठेवणें.

४२९ बोलबाला दिसणें, असणें किंवा होणें—उत्कर्ष होणें. भरभराटीच्या स्थितींत असणें. उ० चालुक्य घराण्यातील आरंभींच्या राजांच्या कारकीर्दींत बौद्ध धर्माचा महाराष्ट्रांत फारसा बोलबाला दिसत नव्हता, असें डॉ. भांडारकरांनी सांगितलें आहे.

चिं० वि० वैद्य,–मध्ययुगीन भारत.

उ० आंधळ्याला भिक्षा वाढा, बाई! तुमचा बोलबाला होईल!

[ ह्या शब्दाचा स्त्रीलिंगीहि ह्याच अर्थानें उपयोग होतो ].

४३० बारा पंधरा करणें—असंबद्ध म्हणजे ताळमेळाशिवाय बोलणें. [एकदा बारा तर नंतर पंधरा असें म्हणणें].

४३१ बारा वाजविणें—दुपारचे बारा वाजले, म्हणजे दिवसाला उतरती कळा लागते आणि रात्रीचे बारा वाजले, म्हणजे रात्रीला उतरती कळा लागते. "त्यावरुन बारा वाजणें" म्हणजे उतरती कळा लागणें; (आणि अतिशयोक्तीने) समाप्त होणें. "बारा वाजविणें," म्हणजे उतरती कळा लागेल असें करणें (आणि अतिशयोक्तीने) समाप्त करणें; उध्वस्त करणें; नाश, हानि, नुकसान करणें. उ० तू उधारीनें माल देत गेलास तर लवकरच तुझ्या दुकानाचे बारा वाजतील!

४३२ बाळकडू असणें—गोडी असणें; उपजतची असलेली प्रवृत्ति किंवा गुण असणें. उ०सृष्टिसौंदर्याच्या अभिरुचीचें मात्र त्याला (ग्यारिबाल्डीला) बाळकडूच होतें, म्हटलें तरी चालेल. न० चिं० केळकर,—ग्यारिबाल्डी.

४३३ बिब्बा घालणें—एखाद्या सुरळीतपणें चाललेल्या कामांत हरकत आणणें किंवा तें बिघडविणें.

## ४३४. बिऱ्हाड

१. बिऱ्हाड—

(क) राहावयासाठी भाड्याने घेतलेली जागा, घर इ०. उ० चर्नीरोडवरील अरविंद हाउसमधील नागोपंताची जागा फारच हवेशीर आहे.

(ख) एखाद्या ठिकाणीं राहणें; वसति; वास्तव्य. उ० माटेकराच्या वाड्यांत आमचें बिऱ्हाड आज सतत बारा वर्षें आहे.

(ग) सामानसुमान; चीजवस्त. उ० नलिनीबाईचें बिऱ्हाड दोन हेलकऱ्याच्या डोक्यावर जाण्याइतकें थोडें आहे.

(घ) स्पष्टपणें न बोलता चोरुन ठेवलेला मजकूर. उ० आपण घरोब्याने बोलत आहों; बिऱ्हाड ठेवण्याचें कारण नाही.

२ बिऱ्हाड उचलणें—एखाद्या ठिकाणाहून आपली चीजवस्त घेऊन निघून जाणें.

३. बिऱ्हाड करणें—

(क) कायमचें वास्तव्य करावयाच्या उद्देशानें आपल्या सामानासुमानासह, बायकामुलांसह एखाद्या ठिकाणीं राहणें.

(ख) एखाद्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्या घरीं किंवा शरिरात ठाणें करून राहणें. उ० कफानें मोरोपंताच्या छातींत बिऱ्हाड केलें आहे.

४३५. बुद्धि फाकणें—

(क) बुद्धीचें सामर्थ्य किंवा आवाका विस्तृत होणें.

(ख) मति किंवा विचार सभ्रान्त होणें किंवा गोंधळणें.

४३६ (एखाद्याचे) बेचाळीस उद्धरणें—त्याच्या बेचाळीस पिढ्यांच्या पितरांना शिव्या देणें. [ "उद्धरणें" हा शब्द लाक्षणिक अर्थानें घ्यावयाचा; कारण त्याचा अर्थ स्वर्गास चढविणें किंवा पोंचविणें असा न घेता, नरकात लोटणें असा घ्यावयाचा आहे ].

४३७ बेड बाहेर पडणे किंवा बेड फुटणें—गुप्त गोष्ट बाहेर पडणें. एखाद्या गुप्त ठेवलेल्या गोष्टीचा हास्यास्पद किंवा निंद्य भाग किंवा प्रकार उघडकीस येणें.

४३८ बेत करणें—बेत म्ह० सकल्प; आराखडा;-उद्देश; नमुना. भोजनांत खाद्यपेयें अमुक अमुक करावयाची अशी योजना. उ० दाराबाहेर जर शेपन्नास आगंतुक आरोळ्या देत आहेत, तर त्यापैकी एकासच आत घेऊन त्यास राजोपचार करून पचपक्वान्नी भोजन घालणें, यापेक्षा सरसकट मुक्तद्वार करून साऱ्या मंडळीस सारभाताचा साधा बेत करणें बरें नव्हे काय?

विष्णुशास्त्री चिपळूणकर, —निबंधमाला.

४३९ बेलभंडार उचलणे—बेलाचीं पानें आणि हळद-जीं देवाच्या मूर्तीवर वाहिलेलीं असतात तीं-काढून तीं हातात धरणें. शपथ घेतेवेळीं असें करण्याची चाल आहे. उ० मी बेलभंडार उचलून असें म्हणेन की, माझ्या मनांत यत्किंचित् कपट नाही!

४४० बोऱ्या उडणें—फजिती होणें.

४४१. बोल

१ बोल—

(क) भाषण; शब्द. उ० आनंदरावाचा बोल कधी खोटा होणार नाही.

(ख) ठपका; दोष. (क्रियापद "ठेवणें" किंवा "लावणें"), उ० तू माझ्या बाबांना उगीच बोल लावूं नको.

२ बोल बोलूं देत नाही—एक अक्षरदेखील बोलू देत नाही. उ० बाळासाहेबांनी मोठा गहजब केला आणि रामभाऊला बोल बोलू दिला नाही!

३ त्याच्या बोलांत बोल नाही किंवा त्याच्या बोलण्यांत बोलणे नाही—त्याचें भाषण मेळ सोडून असतें, तो एकदा एक बोलतो आणि नंतर दुसरेंच कांही बोलतो. उ० पाटोळ्याच्या वचनावर मी अवलंबून कसा राहूं? कारण त्याच्या बोलण्यात बोलणें नसतें!

४ एखाद्याच्या बोलण्यावर जाणे—त्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून वागणें.

५ बोलाफुलास गांठ पडली—(क) जसें भाकीत करण्यांत आलें होतें तसा परिणाम घडून आला. जें होईल म्हणून तर्क करण्यात आला होता, तें घडून आलें. (ख) केवळ कर्मधर्मसंयोगानें तसें घडून आलें.

४४२ एखाद्याची बोळवण किंवा बोळवणी करणें—त्याला निरोप देणें.

४४३ बोळ्यानें दूध पिणें—दुसऱ्याच्या सांगीप्रमाणे वागणें; स्वतःची अक्कल नसल्यामुळे दुसऱ्याच्या मतानें चालणें; बुद्धिहीन असणें. उ० त्या बदमाषाच्या मानभावी शब्दांना का कमळोपंत फसणार? कमळोपंत कांही बोळ्यानें दूध पीत नाही! [ तान्ह्या मुलाना स्वतः दूध पितां येत नाही, म्हणून त्यांना बोळ्यानें दूध पाजावें लागतें. यावरून 'बोळ्यानें दूध पिणें' म्हणजे मुलांप्रमाणे बुद्धिहीन किंवा अडाणी असणें असा अर्थ झाला ].

## ४४४. ब्रीद

१ ब्रीद—सं० विरुत म्ह० स्तोत्र; प्रशंसात्मक गाणें; पद इ०. एखाद्या चांगल्या गुणावरून मिळालेलें जें यश, त्याला "ब्रीद" असें म्हणतात आणि तें यश न जाऊं देणें याला "ब्रीद पाळणें," "राखणें" किंवा "ब्रीदास जागणें" असें म्हणतात. उ०

अनाथासी संभाळावें । ब्रीद पाळावें आपुलें ॥—एकनाथ.

उ० मृत्यूच्या दाढेंत जे आपोआपच सापडले, त्यांवर आघात करणें, हें शिवाजीचें ब्रीद नव्हतें. —गो० स० सरदेसाई.

२ ब्रीद पाळणें, राखणें किंवा सत्य करणें—संपादिलेलें यश अर्हित आहे असें कृतीनें किंवा वर्तनानें सिद्ध करून दाखविणें. उ०

मग कंटनाळ चरचर तो सत्य करावया विरुद कापी ।
मिटक्या देउनि मटमट घटघट त्या स्वाहितासुदका पी ॥
—मोरोपंत,—कर्ण०, अ० ४५, आ० १४.

## ४४५. भट्टी

१. भट्टी—पदार्थाला आंच देण्यासाठी केलेली रचना किंवा तींत ठेवलेला पदार्थ.

२ भट्टी साधणें—एखादें काम करण्याची खुबी किंवा हातोटी कळणें किंवा प्राप्त होणें. उ० आमचा स्वयंपाकी सारे पदार्थ चांगले करतो, पण त्याला अजून चहाची भट्टी साधली नाही.

३ भट्टी बिघडणें—एखादी गोष्ट करण्याच्या क्रियेंत कांहीतरी क्रमभंग किंवा चुकी झाल्यामुळे ती व्हावी तशी चांगली न होणें. [ "भट्टी बिनसणें" असाहि वाक्प्रचार आहे ].

४४६. (एखाद्याच्या नांवें) भंडार उधळणें—त्याची स्तुति करणें.

## ४४७. भर

१. भर—व्युत्पत्तिः—(फारसी) बहार = प्रगल्भावस्था; पूर्णत्व; कळस. [ बहार-बहर-भर. भर हा शब्द पुल्लिंगी आहे ].

(क) पूर्णता; विपुलता; विकासाचा कळस. उ० ज्वानीचा भर निघून गेल्यामुळे अंगांतील कुवतहि कमी वाटूं लागली. —कृष्णशास्त्री चिपळूणकर,–रासेलस.

(ख) ओढा; अवलंब; आधार. उ० ह्या मुलाचा अभ्यासापेक्षा खेळण्याकडे भर जास्ती आहे. उ० ह्या सांगलीकरबोवा हरदासाचा विशेष भर ज्ञानेश्वरीकडे आहे.

२. आपल्या भराने चालणें—स्वच्छंदाने वागणें.

४४८. भर

१. भर—व्युत्पत्तिः—(संस्कृत) भृ = भरणें. "भर" हा शब्द स्त्रीलिंगी आहे.

(क) भरता येईल तितकें सामान; सोसता येईल इतकें ओझें; करतां येईल तितकें काम. उ० आता गाडीची भर झाली, तींत जास्ती सामान राहणार नाहीं; तुला आणखी दोन श्लोक समजून सांगितले, म्हणजे उद्याच्या घड्याची भर झाली.

(ख) पोकळ किंवा रिकामी जागा, खड्डा किंवा उणीव भरून काढण्यासाठीं जें कांही भरावयाचें किंवा घालावयाचें, तें. उ० पडवीची जमीन वीतभर खोल आहे; भर घालून ती ओटीच्या जमिनीबरोबर करावी, असें माझ्या मनांत आहे.

२ भर करणें—न्यूनता भरून काढणें.

३ एखाद्याची भर करणें—आपण न भोगतां त्याला देऊन टाकणें. उ० माऊबंदकीचा निकाल लागून गणेशपंताच्या वाट्याला जे पैसे आले, त्याचे त्याने काय केलें? सासुरवाडीची भर केली! उ० त्या कृपणाने आपण खाल्लें नाही, दुसऱ्यासहि खाऊं घातलें नाहीं आणि शेवटीं चोरांची भर केली!

४ भर घेणें—घेतां येईल तितकें पूर्णपणें घेणें.

५ भर देणें—उत्तेजन देणें; चेतविणें. उ० पंढरिनाथाला द्राक्षांच्या व्यापारात पैसे घालावयास कोणीं भर दिली?

६ भर पडणें—जोड मिळणें. उ० शिवाजीची आई जिजाबाई हिचा सांप्रत नवऱ्याने आणि बापाने त्याग केल्यामुळे तिच्या नैसर्गिक मानी स्वभावात निश्चय, धैर्य, साहस इत्यादि गुणांची भर पडली होती. —गो० स० सरदेसाई.

७ भरीस घालणें—न्यूनता नाहीशी करण्यासाठीं कमी असेल तें घालणें. उ० तुला भिक्षावळीचे तेरा रुपये आले, त्यात मीं चार रुपयांची भर घालून ही अंगठी तुझ्यासाठी करविली.

८. एखाद्या गोष्टीच्या किंवा माणसाच्या भरीस पडणें—

(क) ती पतकरून मग ती पार पाडण्याच्या खटाटोपात पडणें; तिच्या नादीं लागणें. उ० त्या मुलाची समजूत पाडण्याच्या भरीस तू पडू नको. त्यांची कधी समजूत पडावयाची नाही. बसूं दे रडत त्याला!

(ख) त्याची सर्व संपत्ति व्यसनाच्या भरीस पडली म्हणजे त्याची सर्व संपत्ति व्यसनांच्या भक्ष्यस्थानीं पडली.

९. भरीं भरणें—

(क) एखाद्या वस्तूचा अनोनात नाद घेऊन एकसारखी तीव्र करीत सुटणें. उ० माधवरावाला अलीकडे तसबिरीचा भारी नाद लागला आहे. त्याने ५००तसबिरी आतापर्यंत विकत घेतल्या; आणि आता भरीं भरल्यासारखा आणखी ५०० तसबिरी विकत घ्यावयाला तो निघाला आहे!

(ख) आपण कोण, आपली योग्यता काय, हें विसरून जाऊन एखाद्या वस्तूच्या नादीं लागणें.

४४९ भरतें येणें—जोर येणें: समृद्धि प्राप्त होणें. उ० ज्या माणसाचा आवडता नातलग नुकताच मरण पावला आहे, त्याच्या भेटीस जें कोणी येईल, त्याला पाहून त्या हतभागी माणसाच्या दुःखाला भरतें येतें.

४५० भरारी मारणें—उडणें; उड्डाण करणें; जलदीने प्रवास करणें. मधली भाग अज्ञीत्रात गाळून किंवा त्याच्याकडे पोंचवावें तितकें लक्ष न पोंचवून, एकदम पुढल्या भागावर जाणें. उ० जी हकीकत घडली ती साद्यंत सांग. भराऱ्या मारू नको. उ० बाळाजी विश्वनाथ पेशवे व खंडेराव दाभाडे सेनापति, यांनी मराठी राज्याची हद्द वाढविण्यासाठी दिल्लीपर्यंत भरारी मारली.

४५१ भांडण किंवा कलह उकरून काढणें—मागल्या गोष्टींचें उच्चारण किंवा उल्लेख करून शमलेलें किंवा शमत आलेलें भांडण उपस्थित करणें; प्रतिपक्ष्याला क्षोभ येईल, अशा गत गोष्टी बोलून शमलेलें भांडण चेतविणें.

४५२. भीक

१. भीक—

(क) भिक्षा; याचना.

(ख) याचना करून मिळालेला पदार्थ. उ० भिकेची हंडी कधीं शिंक्यास चढत नाहीं

(ग) कमताई; उणीव; टंचाई. उ० तुझे बँकेत पैसे असताना अशी भीक का?

२. भीक घालणें—

(क) वचकून असणें. उ० तो एकनाथपंत माझ्यावर आपला अंमल चालवूं पाहतो, पण मी कोठे त्याला भीक घालायला बसलों आहें!

(ख) मागितलेली वस्तु देणें; एखाद्याची विनंती मान्य करणें. उ० मीं त्याला परोपरीनें विनविलें, पण त्याने माझ्या शब्दाला भीक घातली नाहीं.

"भीक घालणें" ह्या वाक्प्रचाराचे (क) आणि (ख) हे दोन्ही अर्थ नकारार्थी योजले जातात.

३ भीक काढणें—अडचण किंवा एखादी वस्तु न मिळाल्याकारणानें होणारी गैरसोय सोसणें.

४ एखाद्याला भीक लागणें—त्याला कमताई असणें. उ० लोकांजवळ तोंड वेंगाडून हे पदार्थ तू का मागतोस? तुला जें पाहिजे आहे तें विकत घे; तुला काय भीक लागली आहे? तुझ्या बापाला तर चारशे रुपये पगार आहे!

५ भिकेचे डोहाळे—दारिद्र्य आणणाऱ्या गोष्टी करण्याकडे प्रवृत्ति उ० अरे शाम्या, तूं अलीकडे अगदी अभ्यास करीनासा झाला आहेस! तुला भिकेचे डोहाळे आठवले आहेत खास!

६ भिकेची हुंडी शिंक्यास चढत नाहीं—जो मनुष्य भिकेच्या अन्नावर पोट भरतो, त्याच्याजवळ अन्न शिंक्यावर झाकून ठेवण्याइतकें विपुल असावयाचें नाही. त्याला थोडेंच मिळणार आणि जें त्याला मिळणार, तें सारेंच तो खाणार; तेव्हा शिलकीस अन्न कसें पडणार?

७ भीक नको पण कुत्रा आटोप—मजवर उपकार करावयाचें तुझ्या मनांत नसले तर नको करूं, पण निदान अपकार तरी करू नको. मी जें मागतों आहे तें तुझी इच्छा नसल्यास मला देऊ नको, पण ह्या अकल्पित संकटांतून सोडीव. [ एखादी गोष्ट आपण मोठ्या उत्कंठेने मिळावयाचा प्रयत्न करीत असतां जर एखादें अकल्पित संकट आलें, तर त्या प्रसंगीं हें सांप्रदायिक वाक्य योजतात ].

८ भीक असून दारिद्र्य कां ?—भीक मागावयाचा क्रम सुरू झाल्यावर मग अडचण का सोसावी? दहा घरीं भिक्षा मागून पुरेसें अन्न मिळालें नाही, तर नेलाशक पंचवीस घरीं भिक्षा मागावी; त्याला काय हरकत आहे?

९ सदा पीक सदा भीक—एकापेक्षा अधिक वेळा कांही जमिनींतून पीक काढीत असतात. परंतु तें पीक तुटपुंजें असल्याकारणाने शेताच्या मालकास नेहमी अडचण सोसावी लागते.

१० भिकेची भाकरी आणि म्हणे शिळी कां ?—भिक्षा मागून जें मिळालें असेल, त्यांत दोष काढणें हा निर्लज्जपणा होय! भीक मागावयाची आणि पुन्हा दात्याने दिलेली वस्तु चांगली नाही, म्हणून त्याला दोष द्यावयाचा, हें निंद्य.

## ४५३. भीड

१. भीड—(क) भिडस्तेपणा; भीति, संकोच; मनाचा कोवळेपणा. (ख) विनंती; आग्रह. (ग) लाज; वचक. ह्यांच्यापुढे येणारीं क्रियापदें धर, राख, ठेव, सुट, चेप, मर, घाल, खर्च इ०.

२ मला भीड तुटत नाही—कोणी मला काही विनंती केली असतां मला भीड तुटत नाही, म्हणजे माझ्याने ती अमान्य करवत नाही.

३ एखाद्याची भीड तोडणें—त्याने केलेली विनंती अमान्य करणें.

४ भीड घालणें किंवा भिडेस घालणें—आग्रह करणें; विनंती करणें; गळ घालणें; एखाद्याला अनुकूल करून घेण्यासाठी त्याची विनवणी करणें. उ०

न घालिन भिडेस मी जरिहि कार्यलोभी तिला। मोरोपंत,—केकावलि.

५ भीड खर्चणें—आपल्याविषयी दुसऱ्याच्या मनांत जो आदर आहे, त्याच्या जोरावर त्याला काही विनंती करणें किंवा त्याच्याजवळ कांहीतरी मागणें. उ० आजपर्यंत मीं तुला तीन वेळा नोकरी लावून दिली आणि तिन्ही वेळा तूं नोकरी सोडून दिलीस; आता मी तुझ्यासाठी कोणाच्याहिपाशी भीड खर्चणार नाही (म्ह० कोणालाहि विनंती करणार नाही).

६ भिडेला गुंतणें—भिणें; संकोच बाळगणें; कचरणें. उ० ही मुलगी तुम्हांस पसंत असली तरच लग्न जुळवा; उगीच भिडेला गुंतूं नका!

७ वडील माणसांची कांहीतरी भीड राख—त्याचा मान ठेव; त्याच्याशीं उर्मटपणाने वागू नको. उ० रामभाऊंनी तुला तें काम करावयास सांगितलें आणि तूं तें साफ नाकारलेंस; तूं त्याची अगदींच कशी भीड राखली नाहीस?

८ भीड भिकेची वहीण—भिडेला गुंतून जर आपण एखाद्याची भलतीच विनंती मान्य केली, तर तेणेंकरून आपलें मोठें नुकसान होतें किंवा आपणास फार अडचणी काढाव्या लागतात. पुढे म्हणींच्या प्रकरणात पाहा.

९ भीड धरणें—लाजणें, भिऊन; बचकून असणें. मर्यादेचें अतिक्रमण न व्हावें म्हणून फार फार जपणें. उ०

शिष्ट नसावा महाम्याड। शिष्टें न धरावी भीड।
शिष्ट बोलका सुघड। निवडा प्रौढ निजबुद्धि॥ एकनाथ,—अंगदशिष्टाई.

१० भीड चेपणें—परिचयाच्या योगाने भीति किंवा दरारा नाहीसा होणें.

४५४. भोग

१ भोग येणें—सुखदुःखादिरूप दैवगति प्राप्त होणें. उ०

आलिया भोगासी असावें सादर॥ —तुकाराम

२ भोगास येणें—अनुभवण्याचा प्रसंग कपाळीं येणें.

४५५ भोवऱ्यांत सापडणें—लवकर नाहीसा न होणाऱ्या अडचणींत गुंतणें. पाण्यातील भोवऱ्यात गुंतलेला मनुष्य किंवा जनावर मोठ्या कष्टाने बाहेर पडूं शकतें].

४५६ भ्रमाचा भोपळा फुटणें—एखादी वस्तु भारी किंमतीची आहे, असा आपला ग्रह झालेला असतां तिचें खरें स्वरूप प्रकट होऊन ती कुचकामाची आहे, असें निदर्शनास येणें.

४५७ (एखाद्या गोष्टीचा) मक्ता घेणें—ती आपण करूं किंवा पुरवूं अशी हमी घेणें. उ० तुला काड्याची पेटी पाहिजे तर विकत आण. तुला काड्या पुरविण्याचा मीं काय मक्ता घेतला आहे ?

४५८ (एखाद्या गोष्टीवर) मखलाशी करणें—तिला नीटनेटकेपणाचें स्वरूप देणें. [आपण एखादा कागद पाहून त्यात कमजास्ती जें करणें तें केलें आहे व आता तो आपणास कबूल आहे, हें सुचविण्यासाठी त्यावर केलेली जी सही किंवा निशाणी तिला "मखलाशी" म्हणतात].

४५९ जीव मत्यास येणें—अगदी थकून जाणें. उ० सकाळपासून पन्नास पन्नास पानाच्या सहा पंक्तींना वाढून वाढून शारदाबाईंचा जीव अगदी मत्यास आला आहे !

४६०(या दोघांच्या) मधून विस्तव जात नाही—त्याच्यांत वैमनस्य आहे.

४६१ मन मिळणें—मनांच्या आवडी, निवडी वगैरे अगदी सारख्या असणें किंवा जमणाऱ्या होणें. उ० स्त्रीपुरुषांचीं मनें मिळालीं नाहीत, तर त्यांचा संसार सुखावह होऊं शकत नाही.

४६२ मनांतल्या मनांत जळणें—आतल्या आत जळफळणें किंवा चरफडणें. मनातील राग शब्दांनी व्यक्त न करितां धुमसत राहणें.

४६३ मनाला द्रव येणें—मनांत दया किंवा प्रेम ह्या भावनांचा प्रादुर्भाव होणें.

४६४ मरतां मरतां हातपाय झाडणें—सर्व शक्ति नष्टप्राय झाली असतां पुन्हा एकदा उरली असेल, तितकी शक्ति वेचून प्रयत्न करणें.

४६५ मरमरेसें करणें—अतोनात गांजणें किंवा उपद्रविणें.

४६६ (एखाद्याच्या) मसणांत गोवऱ्या जाणें—तो आसन्नमरण होणें किंवा मरणाच्या पंथास लागणें.

४६७. माग

१ माग—(संस्कृत मार्ग,) रस्ता; वाट.

२ माग येणें—मार्गक्रमणाची खूण दिसणें. उ०

देवाजीचा माग येथवरी आला । येथे गुप्त झाला, काय करूं ?

तुकाराम,—सांवता चरित्र.

३ मागमूस—(माग + मूस) पत्ता; तपास; शोध. (क्रियापद-लावणें, काढणें, निघणें इ० ). उ० परमानंदजींचे दागिने चोरीस गेले. त्यांचा मागमूस अजून कांहीच लागला नाही.

४ माग काढणें—एखादा मनुष्य कोणत्या वाटेने गेला, ह्याचा तपास लावणें.

५ माग लागणे—पत्ता, तपास लागणें.

४६८. (अंगांत) मांग शिरणे किंवा येणें—

(क) अंगात तीव्र क्रोधाचा संचार होणें उ० अलीकडे काशीनाथपंत ज्याच्या-त्याच्या वर तोंड टाकीत असतो। त्याच्या अंगात मांग शिरला आहे खास! [फाशी देण्याचें काम मांगाकडे असतें. यावरून "मांग" म्ह० मांगाच्या अंगची क्रूर, कठोर, तामसी वृत्ति, इत्यादि अर्थ झाले].

(ख) भलभलत्या गोष्टी करण्याकडे प्रवृत्ति होणें. उ० तुझ्या अंगात मांग शिरला आहे की काय?

४६९ मागून आलेले लोण पुढे पोचविणें—पूर्वीपासून चालत आलेले परिपाठ पुढे चालू ठेवणें. [आट्यापाट्यांच्या खेळांत एक गडी सर्व पाट्या ओलांडून परत येऊं लागला म्हणजे तो "लोण घेऊन येत आहे," असें म्हणतात].

४७० माटमूट करणें—भिऊन जाणें; कसें होईल, काय होईल, ह्या विचाराने घाबरून जाणें. उ० सासुला पाहताच वासंतीचा जीव माटमूट करूं लागला!

४७१ (एखाद्यावर) मात करणें—

(क) बुद्धिबळाच्या डावात प्रतिपक्षाच्या राजाला अडविणें.

(ख) बुद्धीचें किंवा कुशलतेचें कृत्य करून प्रतिपक्षाला जिंकणें. अघटित, अप्रतिम, विचित्र किंवा लोकोत्तर कृत्य करणें. उ०

दुसरी द्वारका देवें रचियेली। तुका म्हणे केली मात तेणें॥ —तुकाराम.

## ४७२. माती

१. माती—

(क) मृत्तिका; धूळ.

(ख) नासाडी. उ० दारूच्या व्यसनाने बाबूराव डबेवाल्याच्या संसाराची माती झाली. अति तेथे माती (म्ह० कोणतीही गोष्ट अतिरेकाला नेल्याने नुकसान होतें). उ० गाड्याच्या पायीं त्याने आपल्या जन्माची माती करून घेतली!

याच अर्थाने "मातेरें" हाहि शब्द योजला जातो.

(ग) अगदी काही नाही. उ० तुला काय कळतें माती?

(घ) अगदी निरुपयोगी किंवा बिनकिंमतीचा पदार्थ. उ० त्या विठूशेटला पैशाची फार जरूरी होती, म्हणून त्याला आपलें सामान मातीच्या मोलाने विकावें लागलें.

२ मातीआड करणें, घालणें, ठेवणें किंवा टाकणें—(क) पुरून टाकणें. (ख) विसरून जाणें; पुन्हा पुन्हा त्याच गोष्टीचा उल्लेख किंवा उच्चार न करणें.

३ एखाद्या वस्तूची माती करणें—तिची नासाडी करणें; तिची सुख प्रदता हिरावून घेणें.

४ माती टाकणें, घालणें किंवा लोटणें—(क) बुझविणें. (ख) विसरण्याचा प्रयत्न करणें. उ० ह्या बालविवाहाच्या वादावर आता माती लोटली पाहिजे.

५ माती देणें—प्रेताला मूठमाती देणें; प्रेत पुरणें.

## ४७३. मात्रा

१. मात्रा—

(क) गायनात ऱ्हस्व स्वर उच्चारावयास लागणारा जो वेळ, त्याला मात्रा म्हणतात. दीर्घ स्वराच्या दोन मात्रा. उ० आर्येच्या प्रथम पादीं आणि तृतीय पादीं बारा-बारा मात्रा असतात.

(ख) माप.

(ग) महत्त्वाची किंवा हिशेबांत घ्यावयाच्या योग्यतेची वस्तु किंवा परिमाण. उ० ह्या अफाट विश्वामध्ये मनुष्य ही क्षुल्लक मात्रा आहे!

(घ) अक्षराच्या डोक्यावर जी एक प्रकारची तिरकस रेघ असते, तिला मात्रा असें म्हणतात. उ० 'क' ह्या अक्षराला एक मात्रा दिल्यानें 'के' हें अक्षर होतें. 'ए' ह्या स्वरावर एक मात्रा दिल्यानें 'ऐ' हा स्वर होतो.

(ङ) धातु वगैरे खनिज द्रव्यांचें वैद्यक शास्त्राप्रमाणें तयार केलेलें औषध. उ० सूतशेखराची मात्रा, रससिंदुराची मात्रा, हेमगर्भाची मात्रा, इ.

(च) पैसा; ऐवज; संपत्ति. उ० त्या जहागिरदाराजवळ आता फारशी मात्रा उरली नाही.

२ मात्रा न चालणें—इलाज न चालणें; सामर्थ्याची प्रौढि फुकटकामाची ठरणें. [ सात्रीनें गुणावह अशीं जीं औषधें त्यात मात्राची गणना होते. वैद्यानें रोग्याला मात्रा दिली असता ती लागू पडली नाही, म्हणजे "मात्रा चालली नाही," असें म्हणतात. यावरून एन्हवीच्या व्यवहारांत "मात्रा लागू पडणें," इलाज फलद्रूप होणें. "मात्रा लागू न पडणें किंवा न चालणें" म्ह० इलाज निष्फळ होणें असे प्रयोग होतात ].

३. मात्रा वर असणें—वरचढ असणें. उ० अरे जा! शिवरामपंत काय करणार आहे माझें वाकडें? माझी मात्रा वर आहे!

४७४ माय विणें—माय म्हणजे माता म्हणजे आई प्रसूत होणें; विशिष्ट गुणानी युक्त अशा पुत्रास जन्म देणें. उ० मला शिवी देण्याला कोणाची माय व्याली आहे, हें पाहतों (म्हणजे मला शिवी देण्याचें धाडस ज्याला आहे, असा पुत्र कोणती आई प्रसवली आहे, तें पाहतों). ह्या स्पष्टीकरणावरून "कोणाची माय व्याली आहे?" ह्याचा अर्थ "कोणाचें धाडस होणार आहे!" हा कसा निघतो, हें विद्यार्थ्यांना समजण्याजोगें आहे.

४७५ माशा मारीत बसणें—निरुद्योगी बसणें.

४७६ माशी शिंकणें—हरकत होणें; विघ्न येणें; माशीच्या शिंकण्यामुळे काम बंद ठेवावें लागणें. एखाद्या मनुष्याने काही काम करावयाचें तें आळसावर टकलिलें, आणि तें का न केलें याबद्दल तो काही तरी पुळपुळीत सबबी सांगूं लागला, तर त्याच्या उपहासार्थ वरील वाक्य योजतात. उ० पत्र टपालात टाकावयाला तू गेलास, आणि तें टाकलें नाहीस. वाटेंत जाता जाता माशी शिंकली की काय?

४७७ (एखाद्या कामाची) माळ (एखाद्याच्या) गळ्यांत घालणें—तें काम सर्वथैव त्याच्याकडे सोपविणें. [लग्नाच्या विधींत वधू आणि वर एकमेकाच्या गळ्यात माळा घालतात, म्हणजे आपलें सर्वस्व एकमेकांच्या हवालीं पूर्णपणें करतात, म्हणजे आपल्या सुस्थितीची जबाबदारी एकमेकाच्या हवालीं करतात. यावरून "माळ घालणें," ह्याचा वर दाखविल्याप्रमाणे प्रयोग केला जातो].

४७८ (एखाद्याला) मिरच्या लागणें—त्याचा चरफडाट होणें. उ० रामभाऊंचे दोष काढले, म्हणजे गणपतरावाला मिरच्या लागतात. ["अगाला, नाकाला, मिरच्या लागणें," असाहि याच अर्थानें वाक्प्रचार आहे].

४७९ मिशांवर ताव देणें—समाचार घेईन, उट्टें काढीन, अशी प्रतिज्ञा करून मिशाना ऐटीनें पीळ भरणें.

४८० (अंगाला) मुंग्या येणें—वातादि आजारामुळे अंगाला एकप्रकारची बधिरता येणें.

४८१ मुली उजविणें—मुलींची लग्नें करून देऊन त्याच्या ऋणांतून मुक्त होणें.

४८२ मूग गिळणें किंवा मूग गिळून बसणें—न बोलता, स्वस्थपणें, मुकाट्यानें बसणें. आपण उत्तर द्यावयाला असमर्थ असल्यामुळे किंवा उत्तर दिल्यास अनर्थ होईल अशी आपली खात्री असल्या कारणाने गप्प बसणें; नाइलाजामुळे चूप बसणें. उ० प्रेमजी हा कासोपंताला कितीहि टाकून बोलला, तरी कासोपंत मूग गिळून बसतो; कारण, कासोपंताला प्रेमजीपासून पुष्कळ लाभ करून घ्यावयाचे आहेत!

४८३ मूळ जाणें—आमंत्रण करावयाला जाणें (मुलीला माहेरीं आणावयाला किंवा वरपक्षाकडून वधूपक्षाकडे वरातीला).

४८४ मेख मारणें—प्रतिपक्ष्याचें काही न चालेल, अशी तजवीज करून टेवणें.

४८५ मेतकूट जमणें—स्नेह जुळणें; मनास मन मिळून जाणें.

४८६ (एखाद्याची) मोट बांधणें—त्याची इच्छा नसता त्याला एखादें काम करावयाला भाग पाडणें; त्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्यावर एखादें काम लादणें.

४८७ (एखाद्याची) मोडशी जिरविणें—त्याला खूप चोप देणें; त्याची खोडकी मोडणें; त्याचें पारिपत्य करणें.

४८८ मोळी बुचकळणें—स्नान करणें; अंघोळ करणें. लाकडाच्या काटक्या एकत्र बांधल्या, म्हणजे त्या जुडग्याला "मोळी" म्हणतात. त्याप्रमाणे शरीर हें अनेक हाडें एकाशीं एक जुळून बनलेलें आहे. यावरून शरीराला तिरस्काराने "मोळी" असें म्हणतात.

४८९ योगक्षेम चालविणें—"योग" म्हणजे इष्ट वस्तु मिळविणें आणि "क्षेम" म्हणजे मिळविलेल्या वस्तूंचें रक्षण करणें. यावरून "एखाद्या मनुष्याचा योगक्षेम चालविणें," म्हणजे त्याला पाहिजे असेल तें मिळवून देणें आणि नंतर त्याच्या रक्षणाची काळजी वाहणें; त्याच्या संबंधाची सर्व प्रकारची जबाबदारी आपल्याकडे घेणें; अनुरूप क्रियापदें "वाहणें," "पाहणें," "चालविणें" इ०. "योगक्षेम" हा संस्कृत पुल्लिंगी शब्द आहे.

४९० रग जिरविणें—खोडकी मोडणें; उद्दामपणाला प्रतिबंध करणें, शासन करून एखाद्याचा ताठा नाहीसा करणें.

४९१ रंगणांत येणें—प्रतिपक्ष्याशीं लढावयासाठी पुढें सरसावणें. ["रंगण" हा "समरांगण," ह्याचा अपभ्रंश. "समरांगण" म्हणजे लढण्याची जागा].

४९२ रंगारूपास आणणें—फलद्रूप, वैभवशाली, सुखावह, सर्वांगसुंदर किंवा पूर्ण करणें. उ० शिवरामपंतांनी आपल्या मीमांसा ग्रंथाचा नुसता कच्चा खर्डा तयार केला आहे. तो रंगारूपास आणावयाला त्याना वर्ष दीड वर्ष लागेल! रंगारूपास येणें किंवा चढणें ह्याचा अर्थ वरील सरणीने जाणावा. [चितारी चित्राच्या मुख्य मुख्य रेघा काढून आराखडा तयार करतो. मग त्यांत रंग वगैरे भरून रूपाची हुबेहूब आकृति बनवितो. ह्यावरून ही शब्दसंहति उत्पन्न झाली आहे].

४९३ रंगास येणें—फुलून दिसणें; पूर्णतेस येणें; विकास पावणें. उ० बाळकृष्णपंत शिदोरे यांचा संसार रंगास येणार तोंच त्यांची बायको मरण पावली! [व्युत्पत्ति वरीलप्रमाणें जाणावी. रंग देण्यापर्यंत ज्या चित्राची मजल येऊन पोंचली आहे, तें बहुतेक पूर्णतेस आलेलेंच असतें].

४९४ रजाचा गज करणें—अगदी क्षुल्लक वस्तूला अतोनात महत्त्व देणें; ज्यांत कांही अर्थ नाही, अशी गोष्ट फुगवून सांगणे किंवा वर्णिणें, अतिशयोक्ति करणें; (रज = कण; अणु. गज = कापड मोजावयाची धातूची किंवा लाकडाची पट्टी].

४९५ रंजक पिणें—बंदूक किंवा तोफ उडवावयाची असतां तिच्या कान्यावर थोडीशी दारू घालावी लागते. ती दारू पेटवून दिली, म्हणजे बंदूक-किंवा तोफ बार होऊन उडते आणि गोळी लक्ष्यावर जाऊन आदळते. रंजक पेटवून बार झाला नाही, तर "बंदूक (किंवा तोफ) रंजक प्याली" असें म्हणतात.

४९६ रडकुंडीस येणें—अतिशय दगदग झाल्यामुळे रडण्याच्या स्थितीस येणें; रडें कोसळण्याइतका श्रम होणें. उ० आपल्या मुलीला स्थळें शोधतां शोधतां वासुदेव-

राव अगदी रडकुंडीस आले. याच अर्थाने "एखाद्याचा जीव रडकुंडीस येणें," असेंहि म्हणतात.

४९७ रडतराव किंवा रडतराऊत घोड्यावर बसविणें—ज्याला त्या गोष्टीची हौस नाही, त्याला ती गोष्ट जुलमाने करावयास लावणें. [ राऊत = स्वार ].

४९८ रमारमी होणें—अगदी बेतास बात होणें; शिल्लक न राहणें; जितक्याची जरूर असेल, तेवढ्यालाच पुरून शिल्लक न राहणें.

४९९ राईचा पर्वत करणें—"रजाचा गज करणें" ही शब्दसंहति पाहा. [ राई = मोहरीचा दाणा ].

५०० राखरांगोळी करणें—पूर्ण विध्वंस करणें.

५०१. राग

१ कोप; घुस्सा. उ० तुझा बाप त्याच रागाऊन कैदेत गेला, असें शिवरामपंतानी काशिनाथपंताना म्हटलें, तेव्हा त्याला राग आला.

२ (एखाद्याला) राग आणणें—त्याला कोपयुक्त करणें, त्याला खिजविणें.

३ राग गिळणें—अतिशय राग आलेला असतां तो प्रयत्नाने आवरून धरणें. उ० वरिष्ठाने इसन अलीला "सूवर" म्हटलें, तेव्हा त्याला राग गिळतां आला नाही आणि तो त्या वरिष्ठाच्या अंगावर धावून गेला.

४ (एखाद्याचा) राग करणें—तो दृष्टीस पडला, त्याची गोष्ट निघाली म्ह० रागावणें किंवा त्याचा त्राग करणें. उ० इतके दिवस माझ्या मुलाचें काम धनीसाहेबांना आवडत होतें, परंतु बाईसाहेब माहेराहून आल्यापासून तीं दोघेंहि त्याचा भारी राग करू लागलीं आहेत.

५ नाकावर राग असणें—क्षुल्लक कारणाने रागावण्याकडे प्रवृत्ति असणें. मागे ले० ५३, उपांक ४३ पाहा.

५०२ रातांबे पिकणें—गाल तांबडे लाल होणें (उन्हात चालल्यामुळे किंवा क्रियाविशेष श्रम केल्यामुळे ). रातांबा हें फळ पिकलें म्हणजे तांबडें लाल होतें. त्याची साल वाळवून त्याची आमसुलें करतात. त्याच्या तेलाला रातांबेल किंवा कोकमतेल असें म्हणतात. [ रातांब्याला कोकम असाहि शब्द आहे ].

५०३ रान खवळणें—क्रोधाने किंवा भुकेने, व्याकुळ होणें. [ शिकारी लोकांनी जनावराना त्यांच्या वसतिस्थानापासून हुसकून लाविलें म्हणजे तीं घाबरून सैरावैरा पळत सुटतात. तेव्हा "रान खवळलें" असें म्हणतात. क्रोधाने किंवा भुकेने मनुष्याचें शरीर क्षुब्ध झालें म्हणजे तें खवळलेल्या रानाप्रमाणें होतें. यावरून ही शब्दसंहति उत्पन्न झाली आहे ].

५०४ राम म्हणणें—मरणसमयीं रामाचें नांव मुखाने उच्चारावें म्हणजे उत्तम गति प्राप्त होते, अशी हिंदूंची समजूत आहे. यावरून पुढील प्रयोग प्रचारात

आले आहेत. उ० त्याने राम म्हटला ( म्हणजे तो मेला ). तो राम म्हणावयाच्या बेतात आहे ( म्ह० तो मरणोन्मुख झाला आहे ). त्या पेटीने राम म्हटला ( म्ह० ती पेटी मोडली ). राम म्हण ( म्ह० मरावयाला तयार अस किंवा सिद्ध हो ).

५०५ राळ करणें—( क ) फजिती करणें. ( ख ) विध्वंस करणें.

५०६ ( एखाद्याचा ) रेच उतरणें—त्याची खोड मोडणें; त्याच्या गर्वाचा परिहार करणें. उ०

उतरी वैराग्यबळें पडरींचा तो दिशादिशा रेच। मोरो०,—मंत्रभाग०

५०७ रेषा उमटणें—प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत ज्या गोष्टी घडावयाच्या, त्या त्याच्या कपाळावर लिहिलेल्या असतात, असें आपण समजतों. अक्षरें ह्या एक प्रकारच्या रेषाच होत. कोणी मनुष्य भाग्यास चढेल, असा संभव नसता जर तो अकस्मात् भाग्यास चढला, तर त्याच्या कपाळावरील अक्षररूप रेषा स्पष्ट नव्हती, ती आता स्पष्ट दिसूं लागली, असें होतें. यावरून " रेषा उमटणें किंवा उपटणें " म्हणजे भाग्याची रेषा स्पष्ट दिसूं लागणें किंवा भाग्यवत होणें.

५०८ लकडा लावणें—तगादा किंवा निकड लावणें. उ० रामभाऊच्या मागे मीं एकसारखा आठ दिवस लकडा लावला, तेव्हा त्याने चिंगीच्या परकरासाठी मला चीट आणून दिलें.

५०९ लघुशंकेस जाणें—लघवीस जाणें.

५१० लवनभंजन करणें—नम्रपणाने गोड गोड भाषण करणें. व्युत्पत्ति:—लवणें + भजणें = नमणें आणि मान देणें.

५११ (एखाद्याची) लाज राखणें—तो निंदेस, उपहासास किंवा अपमानास पात्र न होईल, असें करणें.

५१२ (एखाद्याचे) लाड पुरविणें—त्याची हौस पुरविणें किंवा भागविणें; तो मागत असेल ती वस्तु त्याला देणें.

५१३ लांडे कारभार करणें—दुसऱ्याच्या कारभारांत अधिकप्रसंगीपणाने ढवळाढवळ करणें किंवा ढवळाढवळ करून तें बिघडविणें.

५१४ लावालावी करणें—इकडच्या चहाड्या तिकडे आणि तिकडच्या इकडे, सांगून दोन माणसांत भांडण किंवा वैमनस्य उत्पन्न करून देणें.

५१५ लाही होऊन जाणें—संतापणें. " अंगाची लाही होणें, " असाहि प्रयोग " संतापणें " ह्या अर्थानें होतो.

५१६ लोण बारगळणें—एखादा नियम उल्लंघिल्यामुळे निरुपयोगी होणें; फुकट जाणें. आट्यापाट्याच्या खेळांत खालून वर येणारा गडी पाटीवाल्यापाशीं तोंड मागतो, त्या वेळीं वरचे गडी खाली जातात. अशा रीतीने खालून येणारे गडी आणि

वरून येणारे गडी यांची एका चौकात गाठ पडणें, याचें नाव "तोंड मिळणें" किंवा "लोण मिळणें." अशी गाठ न पडतां म्हणजे वरचा गडी (असल्यास तो) खालच्या गड्यास न मिळतां खालचा गडी किंवा वरचा गडी पुढे जाणें, ह्याला "लोण बारगळणें," असें म्हणतात. असें झालें म्हणजे तो नियम मोडणारा गडी "बारगळला" असें म्हणतात. गडी बारगळला म्हणजे तो "मरतो" म्ह० खेळात निरुपयोगी होतो व बाहेर पडतो. उ० असा आजपर्यंत कोणीं राज्यकर्त्यानें किंवा शास्त्रकारानें कायदाकानू केलेला आठवत नाहीं, की अमुक एका विषयास अमुक अमुकच पृष्ठें लागावीं. तीं शास्त्रोक्त मर्यादा उल्लंघिली की लोण बारगळलें!

विष्णुशास्त्री चिपळूणकर,–निबंधमाला.

५१७ (एखाद्याचें) वकीलपत्र घेणें—त्याच्याबद्दल बोलावयाचा किंवा त्याची बाजू खरी म्हणून सिद्ध करावयाचा पतकर घेणें. [याचा उपहासानेंहि उपयोग केला जातो].

५१८ वचपा काढणें—एका कामात जें कांही कमीजास्ती झालें असेल, तें दुसऱ्या कामात सुधारून घेणें; नुकसान भरून काढणें.

५१९ वज्रलेप होणें—कायम टिकणारा होणें. उ० लहानपणीं मुलांस केलेला उपदेश वज्रलेप होतो.

५२० वडाची साल पिंपळाला लावणें—नसता संबंध जोडणें; अतिशयोक्ति करणें.

५२१ वड्याचें तेल वांग्यावर काढणें—एकावरचा राग दुसऱ्याला शिव्या देऊन शमवून घेणें (पहिल्याचें पारिपत्य शक्य नसल्यामुळे).

५५२ वणवण करीत हिंडणें—फार श्रम करीत हिंडणें; विशेष कारणावांचून हिंडण्याची दगदग करणें. [संस्कृत—वनात् वनम् = एका रानांतून दुसऱ्या रानांत].

५२३ (एखाद्याला) वनवास आणणें—त्याला सतावणें, गांजणें किंवा उपद्रविणें. उ० ह्या पोरानी मला वनवास आणिला आहे!

५२४. वयांत येणें

१ तारुण्याच्या भरांत येणें.

२ बालपण जाऊन संसाराची जबाबदारी वाहावयाला योग्य अशा वयाचें होणें.

३ कायद्याच्या दृष्टीनें मुलगा २० व्या वर्षी आणि मुलगी १८ व्या वर्षी वयात येते; म्हणजे ह्या वयानंतर त्यांच्याकडून जे अपराध होतील, त्यांना सवलत देण्यांत येत नाही.

## ५२५. वर्दळ

१. वर्दळ—

(क) घर्षण, झिजविण्याची क्रिया; रहदारी. उ० कोतवालचावडीच्या वाटवर नेहेमी वर्दळ फार असते.

(ख) उपद्रव, त्रास; धिंगामस्ती; धागडधिंगा. उ० ह्या पोरांनी मघापासून भारी वर्दळ माडली आहे!

२ वर्दळ घालणें—भांडत बसणें; हेका धरून बसणें.

३ वर्दळीवर येणें—हमरी तुमरी करू लागणें; भांडणास प्रवृत्त होणें.

५२६ वरवंटा फिरविणें—पाट्यावर पदार्थ ठेवून त्याच्यावर वरवंटा फिरविल्याने त्या पदार्थांचा चुराडा होतो. " एखाद्या वस्तूवर वरवंटा फिरविणें " म्हणजे तिचा विध्वंस करणें किंवा तिची पायमल्ली करणें.

५२७ वरचष्मा मिळविणें, करणें ( किंवा होणें )—वरचष्मा=वरचढपणा, मोठेपणा; श्रेष्ठपणा; करडा अंमल. " वरचष्मा मिळविणें " किंवा " वरचष्मा करणें " म्ह० श्रेष्ठ होणें किंवा ठरणें ". " एखाद्याचा वरचष्मा होणें " म्ह० तो श्रेष्ठ ठरणें. [ व्युत्पत्ति –( फारसी ) चष्म् = डोळा ]

५२८ वाकडें—वैर. वाकडें पडणें म्ह० सलोख्याचा किंवा मैत्रीचा संबंध नाहीसा होणें. उ० गोविंदराव आणि लक्ष्मणराव यांचें आज तीन वर्षें वाकडें पडलें आहे. उ० त्याचें माझ्याशीं वाकडें आहे.

५२९ वाकुल्या दाखविणें—तोंडें वाकडींतिकडीं करणें, वेडावणें, थट्टा, मस्करी करणें, तुच्छता दर्शविणें. उ०

> स्वानंदें खेळती । वाकुल्या दाविती । स्वर्गींचे देव टाकिती ।
> उच्छिष्ट ज्याचें ॥ —जयरामस्वामी.
>
> दिवसात वाकुल्या शत दावित होतेंच नंदनवसतितें ॥
>
> —मोरोपंत.

## ५३०. वाचा

१. वाचा—

(क) भाषण, बोलणें. उ० त्या साधुपुरुषाची वाचा कधी असत्य ठरत नाही!

(ख) भाषण करण्याचें इंद्रिय किंवा सामर्थ्य. उ० देवाने मानवी प्राण्यांस मात्र वाचा दिली आहे, पशूंस दिली नाही.

(ग) आकाशवाणी.

२ वाचा नरकांत घालविणें—खोटें बोलणें, दिलेलें वचन न पाळणें.

३ वाचा फुटणें—बोलण्याची शक्ति येणें. उ० हा मुलगा अशक्त आहे. तो दोन वर्षांचा झाला असून त्याला अद्यापि वाचा फुटली नाहीं. उ० माधवरावांच्या पोपटाला थोडथोडी वाचा फुटूं लागली आहे. उ० अशा संकटाच्या वेळीं कोणास तरी वाचा फुटो! (म्ह० तो माझी तरफदारी करूं लागो).

४ वाचा बसणें—बोलण्याची शक्ति नाहींशी होणें. उ० काय हकीकत झाली असेल ती सांगत का नाहीस? तुझी वाचा कशानें बसली?

५ वाचा विटाळणें—(क) खोटें बोलणें. (ख) भलत्याच माणसाची प्रार्थना किंवा याचना करणें. उ० खोटें बोलून उगीच वाचा विटाळतोस कशाला? उ० मी पुन्हा तुझ्याबद्दल त्या शिरस्तेदारापाशी रदबदली करून वाचा विटाळणार नाहीं!

५३१ वाचाळपंचविशी लावणें—गलागला बोलणें; नीरस भाषण करीत सुटणें.

५३२ वाच्यता करणें—परिस्फुटता करणें. गुप्त ठेवण्याच्या गोष्टीचा बोभाटा करणें. उ० उद्यां माझ्यावर जप्ती वारंट येणार आहे अशी कुणकुण माझ्या कानावर आली आहे. म्हणून मी आपलें सामानसुमान आवरून मुंबईस घेऊन जाणार आहें. ह्या माझ्या बेताची अगदीं देखील वाच्यता करूं नको!

५३३. वाट

१. वाट—

(क) रस्ता; मार्ग. उ० खडकीला कोणत्या वाटेनें जावें बरें?

(ख) लाक्षणिक अर्थानें:—वर्तनक्रम; पद्धति; परिपाटी. उ० काशीनाथपंतानें अन्यायाच्या वाटेनें पैसे मिळविले.

(ग) परिणाम; गति; निकाल; शेवट. उ० मीं पाटलाकडे फिर्याद दिली आहे. तिची काय वाट होते, ती पाहावी!

(घ) तऱ्हा; प्रकार; रीति.

(ङ) बेंबीच्या खालीं पोटांत वाटीच्या आकाराचा उंचवटा असतो, तो. जड ओझें उचलल्यानें ही वाट सरून (म्ह० स्थानभ्रष्ट होऊन), पोट दुखूं लागतें किंवा अन्य तऱ्हेनें उपद्रव होतो.

(च) संभव; शक्यता. उ० आज माझ्या घराहून पत्र येण्याची वाट आहे.

२ तिघांच्या तीन वाटा करणें किंवा चौघांच्या चार वाटा करणें—त्यांची दाणादाण, फाटाफूट करणें; त्यांच्यातील ऐक्याचा भंग करणें. उ०

केला तुवां देसत भर्तृघात, क्षणें तिघांचा रचिल्या तिवात।

वामन,—भरतभाव.

३ चार वाटा, दहा वाटा किंवा बारा वाटा मोकळ्या—विस्तीर्ण जगांत

हिंडावयाची मोकळीक किं० परवानगी. उ० माझ्या सांगण्याप्रमाणे तूं चालत नाहीस, मग माझ्या घरीं तरी कशाला राहतोस? येथून निघून जाईनास! तुला दहा वाटा मोकळ्या आहेत!

४ त्याला तिवाटांची माती येत नाहीं किंवा समजत नाहीं—तो अत्यंत अडाणी आहे.

५ देखली वाट पाहणें किंवा० करणें—ज्या वाटेने कोणी आला असेल, त्याच वाटेनें परत जाणें; तो जसा आला तसा जाणें.

६ मधल्या वाटेस येणें—इष्ट वस्तु न मिळवितां येणें [ "जाणें," "नेणें" किंवा "आणणें" हींहि क्रियापदें या सरणीच्या अर्थानें योजण्यांत येतात ].

७. वाट करणें—

(क) रस्ता करणें. उ० सतरंजीचा कोपरा दुमडून त्या सुताराला वाट करून दे.

(ख) (लाक्षणिक अर्थानें) वर्तनक्रम ठरविणें; दाखवून देणें; व्यवस्था, मांडणी वगैरे करणें.

(ग) नाहींसा करणें; दूर करणें.

८ एखाद्याची वाट धरणें—त्याच्या गतीला प्रतिबंध करणें.

९ वाट पाहणें—अपेक्षिणें; उत्कंठेनें इच्छिणें. उ० अमेरिकेंतील मोठमोठीं राज्यें बळकावून स्पेन देश धनाढ्य व बलिष्ठ झाला होता. हे लोक फार मदोन्मत्त झाले होते व त्यांचा पाडाव केव्हां होईल, याची इतर राष्ट्रें सारखी वाट पाहत राहिलीं होतीं.

प्रोफेसर वै० का० राजवाडे.

उ० तुझी आई तुझी केव्हांची वाट पाहात आहे तरी! तुला पक्का एक तास उशीर लागला!

१० वाट मारणें—रस्त्यांत लपून बसून मुशाफरांस लुटणें. उ० ह्या रस्त्यानें एकट्या दुकट्यानें रात्रीं प्रवास करणें फार धोक्याचें आहे. ह्या टापूंत वाट मारणारे दोनतीन बेरड आहेत!

११ वाट लागणें—

(क) दूर होणें; नष्ट होणें.

(ख) विल्हेस लागणें; निकालात निघणें.

(ग) समाप्त होणें; शिल्लक न राहणें.

१२ वाट वावरणें—निरर्थक खेप घालणें; व्यर्थ हेलपाटा घालणें.

१३ वाट वाहणें—वाटेवर रहदारी असणें; मुसाफरांनीं किंवा प्रवाशांनीं वाट गजबजलेली असणें. उ० आळंदीला जातांना तुला सोबतीची कांहीं जरुरी नाहीं. रात्रंदिवस ती वाट वाहत असते!

१४ वाट होणें—गत होणें; ० शेवट होणें. उ० माझ्याजवळ एक सुंदर कुलूप होतें, तें आता कोठे दिसेनासें झालें आहे. त्याची वाट काय झाली, कोण जाणे?

१५ वाटेवर येणें—योग्य पद्धतीप्रमाणे, समंजसपणानें बोलूं किंवा वागू लागणें, ताळ्यावर, योग्य मार्गावर येणें. उ० असा आडमुठ्यासारखा बोलूं नको. नीट वाटेवर येऊन बोल!

१६ एखाद्याच्या वाटेस जाणें—त्याची खोडी करणें; त्याला राग आणणें किंवा त्याला चिडवणें; त्याची कुरापत काढणें. उ० माझ्या वाटेस कोणी जाऊं नका; गेला, तर एकेकाची ऐशी हड्डी नरम करीन कीं ज्याचें नाव तें!

का दात घेसि भेंगुनि? जाऊं माझ्या नको वाटेस।

सौ० सरस्वतीबाई भिडे.

१७. वाटेस लावणें—

(क) हाकलून देणें; निरोप देणें. उ० पीतांबरराव भिकाऱ्यांना फक्त आदित्यवारीं भिक्षा वाढतो, आणि इतर दिवशीं जे भिकारी येतील, त्याना "आदित्यवारीं या," असें सागून वाटेस लावतो.

(ख) योग्य मार्गास किंवा क्रमास लावणें. उ० माझ्या तिन्ही मुलांसाठीं नोकऱ्या मिळवून देऊन मीं त्याना वाटेस लावलें.

१८. वाटेवर पडणें—अल्प श्रमानें, मुळींच श्रम न करता, प्राप्त, किंवा साध्य होण्याजोगें असणें. उ० नोकऱ्या काय वाटेवर पडल्या आहेत? त्यासाठीं किती खेटे घालावे लागतात, ते तुम्हाला काय ठाऊक?

१९. वाट लावणें—

(क) आपल्या वाटेंतून काढून टाकणें. उ० माझ्या अंगावर दोन चोर आले होते, त्याची मीं हां हां म्हणता वाट लावली!

(ख) विल्हेवाट करणें. उ० दहा प्रकरणांची मीं तीन तासात वाट लाविली.

(ग) खाऊन टाकणें; मोडून, तोडून टाकणें. उ० त्याने एकट्याने अच्छेर पोह्याची वाट लावली. उ० शारदेच्या हातीं ह्या जिनगरी बाहुल्या दिल्या, की तीन दिवसाच्या आत ती त्यांची वाट लावील!

५३४ (एखाद्याला) वाटाण्याची अक्षता लावणें—त्याची विनंती अमान्य करणें; त्याला नकारात्मक उत्तर देणें; त्याला निराश करणें. [वाटाणे गरगरीत वाटोळे असल्याकारणानें ते कपाळास लाविल्याबरोबर खाली गळून पडावयाचेच. तेव्हा ही अक्षत लावून न लावून सारखीच! कपाळाला ओलें कुंकू लावून त्यावर तांदूळ चिकटावतात, ह्या विधीला "अक्षत लावणें," असें म्हणतात. "वाटाण्याच्या अक्षता लावणें" त्याचाहि "वाटाण्याची अक्षत लावणें" ह्याच अर्थानें उपयोग होतो].

५३५ वाटोळे होणें ( किंवा करणें )—सर्वस्वी नाश होणें ( किंवा करणें ).
व्युत्पत्तिः—वाटोळें = ० शून्य, पूर्ण अभाव; नाश.

## ५३६. वारा

१. वायु—

२ वाजता वारा लागूं न देणें—कोणत्याहि प्रकारचा त्रास किंवा उपद्रव सोसावयास सिद्ध नसणें व त्याचा प्रतिकार करावयास तत्पर असणें. उ० म्हादबाची सर कोणाला येणार आहे ? तो वाजता वाराहि लागूं देत नाही.

३ एखाद्याचा वारा न घेणें किंवा न पडूं देणें—त्याच्या संसर्गास न राहणें. त्याच्यापासून दूर किंवा अलिप्त राहणें. उ० तूं दुर्गुणी माणसांचा वारासुद्धा घेत जाऊं नकोस !

४ वारा पडणें—वारा वाहावयाचा बंद होणें किंवा खळणें.

५ वारा पिणें—उदासीन, खिन्न होणें.

६ वारा वाहील तशी पाठ देणें—परिस्थिति बदलेल तिच्याप्रमाणे किंवा तिला अनुसरून आपल्या ठायीं बदल करणें.

७ वाऱ्याची मोट बांधणें—जगांतील सारा वारा गोळा करून त्याचा एक गठ्ठा बांधणें; कोणी एखादें दुर्घट काम करावयास प्रवृत्त झाला म्हणजे म्हणतात, " तूं पतकरलेलें काम वाऱ्याची मोट बांधण्याप्रमाणेच होय ! "

८ वाऱ्याशीं भांडणें—भांडावयाला विशेषसें किंवा महत्त्वाचें कारण नसतां मांडत सुटणें. [ भांडणाला दोन पक्ष लागतात. भांडणाची इच्छा प्रबळ झाली, म्हणजे भांडखोर माणूस वारा हा दुसरा पक्ष धरून " तूं अमुक दिशेने कां वाहतोस ? तमुक दिशेने कां वाहत नाहीस ? " म्हणून त्याच्याशीं भांडखोर भांडत सुटतो. भांडखोर माणसाविषयीचें हें अत्युक्तिगर्भ वर्णन आहे ].

९ एखाद्याच्या वाऱ्यास उभें न राहणें—त्याच्याशीं यत्किंचित् संबंध न ठेवणें. उ० तूं त्या सऱ्याच्या वाऱ्यासहि उभा राहत जाऊं नको ! नाहीतर त्याचे दुर्गुण तुला लागतील !

## ५३७. वारें

१. वारें—

( क ) वारा, वायु.

( ख ) एखाद्या विशिष्ट ठिकाणाहून वाहत आल्यामुळे तेथील गुणांनी युक्त असा जो वायु तो किंवा त्या गुणाचा समुदाय. उ० पटकीचें वारें. उ० पडशाचें वारें. उ० संपत्तीचें किंवा अधिकाराचें वारें ( म्ह० संपत्ति किंवा अधिकार प्राप्त झाल्यामुळे अंगीं येणारे दुर्गुण ).

(ग) गुणविशेषाची द्योतक अशी जी चेहऱ्याची घडण ती. उ० माणकोजीच्या तोंडावर कारकुनीचें वारें दिसत आहे.

(घ) एखादी गोष्ट करण्याकडे प्रसंगविशेषापुरता झालेला जो कल तो. उ० गोपाळाच्या अंगात आता बागडण्याचें वारें आलें आहेसें दिसतें!

(ङ) सामर्थ्य; उत्साह; रंग. उ० तारुण्याचें वारें.

(च) आविर्भाव; देखावा. उ० चोरांच्या पुढे शामूअण्णाने पहिल्वान-गिरीचें वारें अंगीं आणण्याचा प्रयत्न केला, पण तो फसला!

२ (अंगावरून) वारें जाणें—शरिरांतील काही बिघाडामुळे तो विशिष्ट भाग किंवा अवयव, लुळा पडणें. उ० कमळाबाईच्या डाव्या अंगावरून वारें गेलें आहे; चिंतूनानाच्या हातावरून वारें गेलें आहे!

३ वारें फिरणें—अगदी उलट प्रकारची वर्तणूक होणे; वस्तुस्थितींत विपर्यास म्हणजे बदल होणें. उ० गोंद्याला नोकरी लागल्यापासून सखूबाईचें वारें फिरलें (म्ह० तिची पूर्वीची साधेपणाची वर्तणूक पालटली).

४ वारें लागणें—संसर्ग होणें; संगति लागणें; संबंध घडणें. उ० नाशकास आपण होतों, तेव्हा आपला गडी सांगितलेलें काम ऐकत असे; पण पुण्याला आल्या-पासून तो ऐकेनासा झाला आहे. त्याला पुण्याचें वारें लागलें खास!

५ आधीच तारे त्यांत शिरलें वारें—आधीच द्वाड, तशांत त्या द्वाड-पणाला उत्तेजक परिस्थिति जमून आल्यास तो द्वाडपणा भयंकर किंवा उपद्रवकारक होणारच!

५३८ एखाद्याला वाळींत टाकणें किंवा घालणें—त्याच्यावर बहिष्कार घालणें किंवा त्याला जातीच्या बाहेर टाकणें.

५३९ वाहत्या गंगेत हात धुऊन घ्यावे—अनुकूल परिस्थिति जमून आल्या-मुळे जर आपलें काम सहजगत्या होण्याजोगें असेल, तर तें तातडतीने किंवा अवश्य करून घ्यावें!

५४० वाहिली तीं गंगा आणि राहिलें तें तीर्थ—पाणी वाहून गेलें, तर ती गंगा किंवा पवित्र नदी होते व पाणी तेथेच साचून राहिलें, तर त्याला "तीर्थ" म्ह० पवित्र पाण्याचा संचय, हें नांव प्राप्त होतें. सारांश, पाणी कोणत्याहि स्थितींत असलें, तरी पवित्रच! त्याप्रमाणे पैसा धर्मकृत्यात खर्चिला तर पुण्य लागतें आणि तो शिलकीस टाकला, तरी तो आपल्या अडचणीच्या वेळीं कामास येण्याजोगा असतो. सारांश, पैसा हा सर्व प्रकारें उपयोगी किंवा मूल्यवान् आहे.

५४१ विकत श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करणें—आपल्या मागे मुद्दाम काहीतरी उपद्व्याप किंवा लचांड लावून घेऊन त्रास भोगीत बसणें. [मृत माणसाची

क्रिया किंवा श्राद्ध करावयास पुत्र किंवा दुसरा कोणी नातलग नसल्यास कोणातरी इसमास पैसे देऊन त्याचेकडून तो विधि करवितात. ह्या वेळेपुरता तो मृताचा पुत्र होतो. त्याला सव्यापसव्याची दगदग करावी लागते. परंतु कोणा एका मनुष्याचे आई-बाप जिवंत असले आणि दुसऱ्या कोणाबद्दल क्रियादि विधीने सव्यापसव्य करण्याची संधि त्याला न मिळाली, तर तो मनुष्य आपल्या पदरचे पैसे दुसऱ्यास देऊन त्याच्या मृत नातलगाची क्रिया करून सव्यापसव्य करण्याची संधि मिळवितो. भिकार हौसेच्या अधीन होणाऱ्या माणसाच्या ह्या हास्यास्पद वर्तनावरून वरील शब्दसंहति प्रचारांत आली आहे ].

५४२ (एखाद्या कामाचा) विडा उचलणें—तें करण्याची प्रतिज्ञा घेणें. उ० मुलांनी दुपारीं धिंगामस्ती करून माझी झोप मोडण्याचा जणू काय विडाच उचलिला होता !

५४३ (पैजेचा) विडा उचलणें—एखादें दुर्घट कार्य करावयाचें असतां मंडळींचा जमाव करून त्याच्यापुढे तबकांत एक विडा मांडावयाची पूर्वी चाल असे. जो कोणी तें कार्य करील, त्याला अमुक बक्षीस दिलें जाईल, असें त्या वेळीं जाहीर केलें जात असे. तें कार्य करावयाची ज्याची धमक असे, तो "तें कार्य मी पतकरतों" अशी सर्वांसमक्ष प्रतिज्ञा करून विडा उचलीत असे. त्यालाच "पैजेचा विडा" म्हणत. [ मागे लेखांक ३८५ पाहा ].

५४४ विधिनिषेध नसणें—करावयास योग्य काय आणि अयोग्य काय, यासंबंधाचा तिळमात्र विचार नसणें. उ० तो देशद्रोह करून देखील पैसे मिळवील ! त्याला कसलाच विधिनिषेध नाही ! त्याला पैसे मिळाले म्हणजे झालें ! [ विधि = अमुक गोष्ट करावी, असा नियम. निषेध = अमुक गोष्ट न करावी, असा प्रतिबंध ].

## ५४५. बिमु

१ बिमु—[ संस्कृत व्यूह = समुदाय किंवा सैन्याची विशेष प्रकारची रचना ].

(क) एखाद्याला गोत्यात आणण्यासाठी केलेली मसलत. उ० माझी नोकरी जावी, म्हणून गोंधाने मोठा बिमु रचला होता. पण सुदैवाने तो ढासळला !

(ख) मनोरथ; आरंभिलेलें मोठें कार्य; बेत.

२ एखाद्याचा बिमु ढासळून टाकणें—त्याने आरंभिलेल्या कृत्यात विघ्न आणणें. बिमु म्ह० बेत किंवा आरंभिलेलें मोठें कार्य.

[ १. क आणि ख आणि २. ह्या वाक्प्रचारांत बिमूबद्दल "व्यूह" हा शब्द घातला तरी चालतो ].

५४६ विरजण घालणें—सामर्थ्य, सुखप्रदता उत्साह इ० कमी करणें. [ दुधाचें दही करण्यासाठी त्यांत जें ताक घालतात, त्याला "विरजण" म्हणतात. हें विरजण घातल्याने त्या दुधाची मधुरता नाहीशी होते. यावरून "एखाद्याने आरंभिलेल्या

कृत्यावर विरजण घालणें" म्हणजे त्याचें सामर्थ्य, उत्साह, उल्हास वगैरे कमी करणें, अर्थात् त्याला खचविणें ]. "विरजण पडणें" म्ह० एखाद्याचा उल्हास किंवा उत्साह कमी होणें.

५४७ (एखादी गोष्ट) विल्हेस लावणे किंवा तिची विल्हेवाट लावणे—ती निकालात काढणें; तिचा निकाल करून टाकणें [ व्युत्पत्तिः-(आरबी) विलाइयह = वर्ग; प्रांत; दर्जा ].

५४८ विळा मोडून खिळा करणे—विळा घडविण्याला श्रम जास्ती पडतात, आणि खिळा घडविण्याला श्रम कमी पडतात. विळा मोडून त्या लोखंडाचा जर कोणी माणूस खिळा घडवू लागला, तर विळा घडविण्याला जे श्रम पूर्वी झालेले आहेत, ते तो फुकट घालवितो, असें होतें. शिवाय त्याच्या पदरांत खिळ्या-सारखी कमी किंमतीची आणि कमी कौशल्याची वस्तु पडते. यावरून "खिळा करणें" म्ह० य.कश्चित् लाभासाठी फार मोठें नुकसान करून घेणें.

५४९ विळाभोपळ्याइतके उजू किंवा सरळ—विळा आणि भोपळा यांच्यांत शत्रुत्वाचा संबंध आहे. कारण विळ्याने भोपळा चिरतात. यावरून "त्या दोघांचें विळ्याभोपळ्याइतकें उजू किंवा सरळ आहे," म्हणजे ते दोघे एकमेकांचे हाड-वैरी आहेत. उजू म्ह० मैत्री, आणि लक्षणेने शत्रुत्व.

५५० वीट येणें—कंटाळा, किळस, येणें.

## ५५१. वेड

१ मेंदूमध्ये काही बिघाड झाल्यामुळे उत्पन्न होणारा आजार.

२ वेड घेऊन पेडगावास जाणें—वेड्याचें सोंग घेऊन आपला मतलब साधावयास झटणें.

३ वेड पांघरणें—वेड्याचें सोंग घेणें, मुद्दाम वेड्यासारखें वर्तन करणें.

४ एखाद्याला वेड भरणें—त्याला वेड लागणें. "एखाद्या वस्तूचें वेड लागणें," म्ह० तिचा नाद लागणें; तीच वस्तु ध्यानी मनीं घोळत राहणें. उ० अली-कडे विनूनोवाला किमयाचें वेड लागलें आहे.

५ एखाद्याला वेड लावणें—

(क) त्याला मोहित करणें; त्याचें मन आकृष्ट करणें. उ० त्या सतारवाल्या वस्तादानें मला जसें वेड लावून सोडलें आहे!

(ख) त्याला घोटाळ्यांत घालणें. उ० त्या किमयागाराने जनार्दनपंताला वेड लावून सोडलें आहे! उ० असल्या घरखोडीच्या भाषणानी तूं मला वेड लावू पाहतोस काय?

५५२ वेळ मारून नेणे—प्रसंगीं कमीपणा दिसून देणें; युक्तिप्रयुक्तींनी प्रसंग साजरा करणें किंवा पार पाडून नेणे.

## ५५३. शंख

१. शंख—

( क ) समुद्रांत राहणारा एक प्राणी.

( ख ) त्या प्राण्याचें घर ( ज्यांत तो राहतो तें ). देवावर पाणी घालण्याकडे किंवा युद्धांत रणवाद्य म्हणून वाजविण्याकडे व अन्य प्रसंगीं, त्याचा उपयोग केला जातो.

( ग ) बोटावर ज्या शंखाकृति रेषा असतात त्या.

( घ ) मूर्ख; अडाणी माणूस.

( ङ ) नवनिधींपैकीं एक निधि.

( च ) गालाचें हाड.

( छ ) एक संख्या.

( ज ) अभाव; पूज्य. उ० ज्ञानाच्या नांवानें शंख म्ह० मूर्ख, अडाणी. उ० बुद्धीच्या नांवानें शंख म्हणजे बुद्धिहीन.

२ शंख करणें—बोंबलणें; ओरडणें; विलाप करणें; रडणें (दुःख, वेदना, वगैरेंचा अतिरेक होऊन ती असह्य झाली, म्हणजे मनुष्य बोंबलतो ).

३ शंख वाजणें—(क) संपणें; न उरणें. (ख) पराभूत होणें. उ० अजमासापेक्षा जास्ती पानें झालीं, त्यामुळे लाडवांचा शंख वाजला! उ० म्यॅट्रिक्युलेशनच्या परीक्षेला चिंतामणरावांचा पुतण्या बसला होता, त्याचा शंख वाजला! (म्ह० तो नापास झाला ). "घंट वाजणें," ह्याचाहि हाच अर्थ होतो.

४ एखाद्याच्या नांवानें शंख करणें—त्याच्या नांवानें ओरडणें; त्याचें नांव घेऊन त्याला मोठमोठ्यानें हाका मारणें; त्याला शिव्या देणें किंवा त्याची निंदा करणें. उ० तुझे मास्तर जें स्पष्टीकरण देतात, त्याच्याकडे तुझें लक्ष्य असूं दे! नाहीतर तूं परीक्षेत नापास होऊन उगीच त्यांच्या नावानें शंख करशील!

५. शंखासारखें—स्वच्छ, निर्मळ. उ० सिंहगडावर देवटाकें म्ह० नावाचें जें टाकें आहे, त्याचें पाणी शंखासारखें आहे!

५५४. शतपावली करणें—भोजनानंतर अन्न चांगलें ,जिरण्याच्या मार्गास लागावें, यासाठी घरांतल्या घरांत थोड्याशा फेऱ्या घालणें. [ शत=शंभर. "शतपावली करणें," ह्याचा शब्दशः अर्थ शंभर पावलें चालणें ].

## ५५५. शब्द

१. शब्द—

( क ) कोणत्याहि प्रकारचा ध्वनि. उ० पोपटाचा, गाडीचा, वाद्याचा शब्द; चालतांना पावलांचा शब्द ( म्ह० आवाज ).

(ख) एखाद्या वस्तूचा किंवा कल्पनेचा, दर्शक किंवा व्यंजक जो अक्षरसमूह तो. उ० व्याकरणात शब्दाविषयीं विचार केलेला असतो.

(ग) दोष. [ क्रियापदें "घेणें," "लावणें," "ठेवणें;" इ० ].

(घ) आज्ञा. हुकूम.

२. एखाद्याचा शब्द खाली न पडूं देणें—

(क) त्याच्या प्रत्येक बोलण्यास उत्तर देणें; त्याच्या उत्तरास प्रत्युत्तर देणें; वादविवादात किंवा भांडणात माघार न घेणें.

(ख) कोणीं कांही काम सांगताच तें करावयाला सिद्ध होणें.

३. शब्द खाली पाडणें—दुसऱ्याच्या सांगण्याप्रमाणे न करणें; त्याच्या शब्दाला किंमत न देणें, त्याचा आग्रह किंवा भीड, अमान्य करणें.

४. शब्द झेलणें—ज्याची सेवा, चाकरी, शुश्रूषा, खुशामत वगैरे करावयाची असेल, त्याच्या तोंडून आज्ञा निघताच तिच्याप्रमाणे करणें, आज्ञा झाल्याबरोबर ती बजावण्यास सरसावणें. उ० समर्थांचा शब्द झेलावयास सारीं माणसें तत्पर असतात. त्याचें उणें कशानें पडणार?

५. शब्द ठेवणें किंवा लावणें—दोष देणें, ठपका ठेवणें.

५५६ (एखाद्याचीं) शंभर वर्षें भरणें—त्याचा मरणकाल येऊन ठेपणें. उ० तू माझ्या वाटेस गेलास, तर तुझीं शंभर वर्षें भरलींच असें समज! (म्हणजे मी तुझें पारिपत्य करीन!) [ मनुष्याची आयुर्मर्यादा शंभर वर्षांची असें समजलें जातें ].

५५७ (एखाद्याला) शरण जाणें—याचें वर्चस्व कबूल करून त्याची दया भाकणें, त्याची क्षमा मागणें. उ० मुसलमानानी कधीहि पूर्णपणें न जिंकिले, असे सर्व हिंदुस्थानात मराठेच होत! रुद्रवध्ये रजपूतहि मुसलमानाना अखेर शरण गेले; पण मराठे कधीहि गेले नाहीत! न० चिं० केळकर,—मराठे व इंग्रज.

५५८ शह देणें—जेथून प्रतिपक्ष्यावर हावे तेव्हा तुटून पडता येईल, अशा ठिकाणीं बसून त्याला भीति दाखविणें. [ प्रतिपक्ष्याच्या राजावर आपल्या मोहऱ्याची उडी पडेल, अशा ठिकाणी आपलें मोहोरें आणून बसविलें असतां प्रतिपक्ष्याच्या राजाला "शह दिला," असा बुद्धिबळाच्या खेळातील पारिभाषिक शब्द आहे ].

व्युत्पत्ति.—(फारसी) शह् = राजा. बुद्धिबळाच्या डावात प्रतिपक्ष्याच्या राजाला अडचणीची स्थिति. ह्या स्थितींतून राजाची सुटका किंवा बचाव करणें ह्याला "नाशह" असा पारिभाषिक शब्द आहे, आणि क्रियापद "करणें" हें आहे. (फारसी) नह् शह् म्ह० अडचणीचें निवारण, ह्यापासून मराठी "नाशह" हा शब्द झाला आहे.

५५९ शहानिशा करणें—चौकशी करणें; भवति न भवति करणें; एखाद्या गोष्टीची संदिग्धता नाहीशी करण्याचा प्रयत्न करणें.

व्युत्पत्ति —(फारसी) शह् नह् शह् म्ह० धोका, आणि त्या धोक्यापासून बचाव, हल्ला आणि हल्ल्यापासून निवारण. ह्यावरून मराठी शब्द "शहानिशा" ह्याचा अर्थ एखाद्या गोष्टीसंबंधाची अनुकूल आणि प्रतिकूल प्रमाणें विचारात घेऊन केलेला निकाल. एखाद्या गोष्टीची शहानिशा करणें म्हणजे तिची वाटाघाट करून तिचें खरें स्वरूप ठरविणें

५६० शालजोडींतलें देणें—सभ्यपणाचा अतिक्रम न करता एखाद्याची खूप खरडपट्टी काढणें [ व्युत्पत्ति—शालजोडींत गुंडाळलेले ( जोडे ) मारणें ]

५६१ शास्त्रार्थ करणें—थोडेसेंच करणें, नावाला करणें; केलें असें म्हणावयाला जितकें थोडें चालेल, तितकेंच थोडें करणें. उ० आम्ही गरीब माणसें. आम्ही शास्त्राला तूप घेतों ! ( म्ह० अगदी थोडें घेतों ! )

[ धर्मासाठी किंवा शास्त्रासाठी जें करणें तें थोडें असतें ]

५६२ शिखरास हात पोचणें—मनोरथ पुरतेपणीं सफल होणें; मनाची महत्त्वाकांक्षा तृप्त होणें

## ५६३. शिंग

१ गाय, म्हैस वगैरे जनावरांच्या डोक्यावरील अस्थिविशेष, त्यांच्या आत्म संरक्षणाचें साधन

२ शिंगे यावयाची असणें, शिंगे उरणें, आणखी शिंगें असणें, काय शिंगे असणें, इ० हे वाक्प्रचार नेहमीं करणरूपी प्रश्नवाक्यात येतात ह्या प्रश्नांचीं उत्तरें नेहमी नकारार्थी असतात आणि ह्या प्रश्नामध्ये थोडासा विनोद किंवा उपहास गर्भित असतो ह्या वाक्प्रचाराचे रूढीने ग्राह्य ठरविलेले प्रयोग पुढें वाक्यांत योजून दाखविले आहेत. ठराविक इयत्ता, परिमाण, माप, इत्यादिकांची पूर्णता झालेली आहे, असा प्रश्न विचारणाराचा अभिप्राय असतो, असें विद्यार्थ्याला दिसून येईल

३ बाराला काय शिंगें उरलीं ( किंवा राहिलीं ) आहेत ? बारा वाजावयाला दोनच मिनिटें काय तो अवकाश आहे. बारा वाजलेच म्हणावयाचें ! बाराचा वेळ भरल्याच आहे !

४ भित्र्याला आणखी काय शिंगें असतात ?—अरे, तू गलेलठ्ठ, शक्तिमान् गडी असून त्या चोराला भिऊन पळून गेलास ? धिक्कार असो तुला ! दोन रट्टे घटवायाचे होतेस की नाही ! भित्राच तू ! भित्र्याला आणखी काय शिंगें असतात ? ( म्ह० भित्र्या माणसाचें लक्षण तुला पूर्णपणें लागू पडतें ).

५ मिडवाइफला आणखी काय शिंगें यावयाचीं असतात ?—मला मिडवाइफचें सगळें काम माहीत आहे आणि तें करण्याचा मला अनुभवही आहे. मला डिप्लोमा मिळाला नाही, इतकेंच काय तें मिडवाइफ ह्या नांवाला मी पूर्णपणें पात्र आहें

टीप:—प्रथम वासरूं असतें तें मोठें होऊन त्याला शिंगें येतात; आणि बैल ही संज्ञा प्राप्त होते आणि तें बैलाची कामें करावयाला समर्थ होतें. शिंगें व्हावयाचीं तितकीं पूर्ण लांब नसलीं झालीं, तरी तें वासरूं बैलाचीं कामें करावयाला समर्थ असतेंच. ह्यावरून वरील वाक्प्रचार उत्पन्न झालेले आहेत.

५६४ शितावरून भाताची परीक्षा करणें—वस्तूच्या लहानशा भागावरून त्या सर्व वस्तूची परीक्षा करणें.

५६५ शितोडा टाकणें किंवा उडविणें—थोडासा कलंक लावणें; थोडासा दोष देणें; जातां जातां एखाद्याविषयीं लहानसें कुत्सित विधान करणें.

५६६ शिष्टाई करणें—दोन पक्षांतील भांडण मिटविण्याच्या उद्देशाने एका पक्षाच्या तर्फेने दुसऱ्या पक्षास चार बोधाच्या गोष्टी सांगणें; मध्यस्थी करणें. उ० अंगदशिष्टाई, कृष्णशिष्टाई वगैरे.

५६७ शुक होणें किंवा शुकशुकाट होणें—जिकडे तिकडे स्तब्धता किंवा शांतता होणें.

### ५६८. शेण

१ गायी, म्हशी वगैरे जनावरांची विष्ठा.

२ शेण खाणें—न करावी ती गोष्ट करणें किंवा न बोलावी ती गोष्ट बोलणें; भलती गोष्ट करणें किंवा बोलणें.

३ शेणाचा दिवा लावणें किंवा लागणें—दिवाळें काढणें किंवा निघणें. उ० मोतीचंदाने शेणाचा दिवा लावला; आता तूं हजार रुपयांना ठार बुडालास!

५६९ खर्चास शेंडी फुटणें—खर्चाच्या बाबी किंवा कलमें वाढणें.

### ५७० शोभा

१ शोभा—तेज; संमान. लाक्षणिक अर्थानें:—फजिती; बेअब्रू; खरडपट्टी; अपमान.

२ एखाद्याची शोभा करणें—त्याची फजिती करणें; त्याची बेअब्रू करणें.

३ शोभा होणें—फजिती होणें.

५७१ संगनमत करणें—आपला कांही हेतु साधण्यासाठी किंवा एखाद्या पक्षाला बळकटी आणण्यासाठी दोन किंवा अधिक माणसांनी अगदी एकसारखीं विधानें करणें किंवा एकाच धोरणानें वागणें. उ० भोळ्या ब्राह्मणाला फसविण्यासाठी तीन धूर्तांनी संगनमत केलें.

५७२ सती जाणें—मृत पतीच्या चितेवर स्वतास जाळून घेणें. उ० मोहित्यांची कन्या पुतळाबाई ही शिवाजीची तिसरी बायको होती. ती शिवाजीबरोबर सती गेली. गो० स० सरदेसाई.

### ५७३ सत्त्व

१. सत्त्व—

(क) सत्त्व, रजस् आणि तमस् हे मायेचे जे तीन गुण त्यांतील पहिला; ह्या गुणाच्या उत्कर्षानें शांति, क्षमा, दया इत्यादि गुणांची वृद्धि होते.

(ख) अस्तित्व. उ० ब्रह्माचें सत्त्व दुर्ज्ञेय आहे!

(ग) पदार्थाचा कस म्हणजे सारभूत अंश. उ० गुळवेलीचें सत्त्व तापावर देतात. उ० गव्हाचें सत्त्व पौष्टिक असतें.

(घ) ज्या गुणावरुन एखाद्या माणसाची प्रसिद्धि झालेली असते, तो त्याच्या अंगचा गुण. उ० हरिश्चंद्रानें अनेक दुःखें सोशिलीं; पण सत्त्व सोडिलें नाही!

२ एखाद्याचें सत्त्व घेणें किंवा हरण करणें—त्याचा बाणा किंवा अभिमान सोडून द्यावयाला त्याला भाग पाडणें. उ० सगुणाबाई उसने पदार्थ फार फार मागते, जणों काय लोकाचें सत्त्व हरण करावयाचा तिने विडाच उचलिला आहे!

३ सत्त्वास जागणें—सत्त्व राखणें; अडचणीच्या प्रसंगींहि सत्त्व न सोडणें.

४ सत्त्व पाहणें—परीक्षा पाहणें; परीक्षेंत कितपत टिकतो, हें पाहणें. उ० विश्वामित्रानें हरिश्चंद्राचें सत्त्व पाहण्याचा भारी खटाटोप केला; पण हरिश्चंद्रानें आपलें सत्त्व जाऊं दिलें नाही!

५७४ संपुटांत येणे—आकारमान आकुंचित होणें; संख्येनें कमी होणें; विस्तार कमी होणें. उ० आमच्या सभेंतील सभासदाची संख्या अगदी संपुटांत आली आहे!

### ५७५. समाचार

१ समाचार—हकीकत; वृत्तान्त. एखाद्याच्या हालहवालीची खबर किंवा बातमी. उ० माझा मुलगा कलकत्त्याला असतो; त्याचा अलीकडे चार महिन्यात समाचार कळला नाही, म्हणुन आम्हाला फार काळजी लागली आहे.

२ एखाद्याचा समाचार घेणें—

(क) त्याची तब्येत कशी काय आहे वगैरेसंबंधाची विचारपूस करणें. उ० रामभाऊ आजारी आहेत, असें मला कळताच मी त्यांचा समाचार घ्यावयास गेलों.

(ख) त्याचें पारिपत्य करणें. उ० आपल्याच जातभाईच्या मदतीनें शिवाजी आपणावर उठतो, हें त्यांस (म्ह० मोगल सरदारास) कसें सहन व्हावें? तेव्हा गोवळकोंडेकर व शिवाजी ह्या दोघाचाहि समाचार घेण्यासाठी मोगलांनी कंबर बांधली.

गो० स० सरदेसाई.

उ० स्पेनचें अजस्र आरमार चाल करून आलें, तेव्हा इग्लंडने न भिता त्याला टक्कर दिली व त्याचा खरपूस समाचार घेतला. प्रो० वै० का० राजवाडे.

५७६ समिध शेकणें—ज्या गृहस्थानें स्मार्ताग्नि ठेविला आहे, त्याला त्यांत रोज यथाविधि आहुति द्याव्या लागतात. परंतु प्रवासादिकांमुळे ह्या नियमांत कांही दिवस व्यत्यय येण्यासारखा असल्यास तो आपल्या स्मार्ताग्नीवर एक मंत्र म्हणून एक समिध शेकून ठेवतो. मग कांही दिवसांनी अडचण दूर झाल्यावर तो पुन्हा आहुति देण्याचा नित्याचा क्रम चालू करतो, तो असा. कोणता तरी अग्नि घेऊन त्यावर ही शेकून ठेविलेली समिध दोन मंत्र म्हणून अर्पण करतो. असें केलें म्हणजे पुन्हा त्याचा स्मार्ताग्नि १सिद्ध होतो आणि त्यांत नेहमीप्रमाणें आहुति देतां येतात. समिध शेकून घेतल्यापासून बारा दिवसांच्या आंत हा स्मार्ताग्नि ह्या विधीनें पुन्हा सिद्ध करतां येतो. परंतु हा अवधि काही कारणानें लांबला, तर ती शेकून घेतलेली समिध निरुपयोगी होते आणि नंतर तो स्मार्ताग्नि मुळापासून एका गुंतागुंतीच्या आणि लांबलचक विधीनें पुन्हा सिद्ध करावा लागतो.

वरील विधीनें समिध शेकून घेतली म्हणजे अग्नीचें वीर्य आणि पावित्र्य त्या समिधेच्या ठायीं येतें आणि त्या समिधेची आहुति कोणत्याहि अग्नीवर दिली, तरी तो स्मार्ताग्नि सिद्ध होतो.

समिध शेकणें ह्या विधीमध्ये अग्नीचें वीर्य आणि पावित्र्य त्यांतून काढून घेतलें जातें, इतकाच अर्थ मराठींत रूढ झालेल्या वाक्प्रचारांना आधारभूत झाला आहे. हे वाक्प्रचार पुढे दिले आहेत. कांहींतून "समिध" हा शब्दहि गळून गेला आहे.

१ त्या कारभाराची समिध माझ्या अंगावर किंवा डोक्यावर शेकली *त्या कारभारामुळे माझें नुकसान झालें.*

२ माझी मसलत माझ्याच अंगावर शेकली—*तिनें मलाच चट्टा लागला.*

३ त्या माणसाच्या नादीं तुम्ही लागूं नका. त्याची संगति तुमच्यावर शेकेल—*तुमची मानहानि होईल किंवा तुम्हाला कांहीतरी त्रास सोसावा लागेल.*

४ मी मधुकररावाला जामीन राहिलों, हा मीं मोठा वेडेपणा केला. ही जामिनकी मजवर शेकली—*मला सारे पैसे भरावे लागले.*

५ लग्नकार्यातून सोवळ्याओवळ्याची समिधच शेकलेली असते. (गो० ग० आगरकर)—*सोवळ्याओवळ्याकडे विशेषसें महत्त्व त्या वेळीं देण्यांत येत नाहीं.*

५७७ समीकरण बसविणें—दोन गोष्टींची एकता किंवा एकवाक्यता आहे, असें ठरविणें. [ "समीकरण," हा बीजगणितातील पारिभाषिक शब्द आहे. यांत दोन पदसंहतींची तुल्यता सांगितलेली असते; जसें, $(क + ख) \times (क - ख) = क^2 - ख^2$].

५७८ समुद्रांत सुई शोधणें—अशक्य गोष्ट करावयास प्रवृत्त होणें.

५७९. सर

१ बरोबरी; तुल्यता.

२ सर येणें—योग्यता प्राप्त होणें, बरोबरीची किंमत पावणें. उ० माधवराव कुठे मोठे वक्ते होते अलीकडच्या कोणत्याहि वक्त्याला त्याची सर येत नाही!

३ सर पावणें किंवा पवणे—बरोबरीचा होणें किंवा ठरणें. उ० यःकश्चित् मुरकुट गरुडाची सर कसें पावेल?

५८० सर करणें,—काबीज करणें, जिंकून घेणें. उ० शिवाजीनें तोरणा किल्ला इ० स० १६४६ मध्ये सर केला. बाजीरावानें घोसाळगड हा किल्ला इ० स० १७३७ मध्ये सर केला.

५८१ सारर पसरणें किंवा पेरणें—गोड गोड बोलून एखाद्याचें मन वश करणें. उ० राममाऊ भेटला, म्हणजे साखर पसरतो मात्र, परंतु मला बिऱ्हाडाला जागा काही देत नाही!

५८२ सांगड घालणें—

(क) सबंध जोडून देणें. उ० रामा आणि विनायक हे दोघे एकाच इयत्तेत आहेत. त्या दोघांची सांगड घालून द्या म्हणजे हा त्याला गणितांत मदत करील, आणि तो ह्याला व्याकरणात मदत करील तेणेंकरून दोघांचाहि फायदा होईल.

(ख) विरोधपरिहार किंवा एकवाक्यता करणें. उ० महाभारताच्या उपसंहारात त्या काळीं विधवांचें केशवपन करीत नसत, असें मीं लिहिलें आहे. पण मृच्छकटिकांत विवाहित तरुणींच्या केशकर्तनाचा उल्लेख आहे. या दोन प्रकारांची सांगड कशी घालावयाची ते समजत नाही.

चिं० वि० वैद्य,—संस्कृत वाङ्मयाचा इतिहास

५८३ मुलगी सांगून येणें—मुलीच्या बापानें किंवा नातलगानें, "आमची मुलगी स्वीकारा," अशी मुलास किंवा मुलाच्या तर्फेच्या कोणा माणसास विनंती करणें उ० आमच्या मुलाला पुष्कळ मुली सांगून आल्या, पण त्या परगावच्या असल्यामुळे आम्हीं त्या नाकारल्या.

५८४ साठी उलटणें—म्हातारपण येणें. [साठाव्या वर्षापासून मनुष्याच्या बौद्धिक आणि शारीरिक शक्तीचा ऱ्हास होऊं लागतो].

५८५ सात पांच करणें—एकदा एक बोलणें आणि नंतर दुसरें बोलणें, ज्या बोलण्यात ताळमेळ नाही, असें बोलणें; विसंगतपणाचें भाषण करणें.

५८६ साता समुद्राच्या पलीकडे ठेवणें—फार जपून ठेवणें. साता समुद्रापलीकडे = फार दूर. कोणास न दिसेल, अशा ठिकाणीं किंवा अशा बंदोबस्तानें.

५८७ साप साप म्हणून भुई धोपटणे किंवा बडविणे—खरोखर साप नसतां तो आहे, अशी आपली खोटीच समजूत करून घेऊन किंवा खोटी सबब दाखवून त्या कल्पित सापाला मारण्यासाठी जमीन धोपटणें. यावरून ह्या शब्दसहतीचा

हा अर्थः—एखाद्यावर नसता दोष लादून त्याला शिक्षा करणें किंवा त्याच्या विरुद्ध ओरड करणें.

५८८. सूत

१ सूत—कापूस वगैरेंचा धागा किंवा दोरा.

२ दोघांचें सूत असणें—त्याच्यांत निकट मैत्रीचा संबंध असणें.

३ एखाद्याशीं सूत नसणें—त्याच्याशीं मैत्रीचा संबंध नसणें. प्रथम मैत्री असून पुढें बिनसल्यास "पूर्वीसारखें सूत नाही," असें म्हणतात.

४ सुताने सूत लागणें—एक गोष्ट शोधून काढल्यामुळे दुसरी समजणें; थोडासा सुगावा लागून एखादी गुप्त गोष्ट क्रमाने आणि ओघाने समजत किंवा उकलत जाणें.

५ सुतास लागणें—सुरळीतपणें चालू लागणें. उ० माझ्या मुलाला मीं मास्तर ठेविल्यापासून त्याचें अभ्यास सुतास लागलें.

६ सुताने चंद्राला ओवाळणें—[ पुढे "ओवाळणें," हें क्रियापद पाहा ].

७ सुताने स्वर्ग गांठणें किंवा सुताने स्वर्गास जाणें किंवा चढणें—यत्किंचित् सुगावा लागताच वस्तूचें सर्व स्वरूप तर्कानें जाणणें.

५८९ सूप फडफडणें—विवाह वगैरे कार्य समाप्त होणें. [ विवाह, मुंज, वगैरे कार्य संपलें, म्हणजे यजमान सूप फडफडवितो. मग कार्यासाठी परगावाहून आलेली मंडळी परत आपआपल्या घरीं जावयाला मोकळी होते ].

५९० सुपारी देणें—एखाद्या माणसाकडे आपण कांही काम विधिपूर्वक सोपविलें, म्हणजे त्याला सुपारी देण्याची चाल आहे. सुपारी देण्यात आली म्हणजे ठराव पक्का होऊन तो कोणत्याहि पक्षाला मोडतां येत नाही. यावरून "एखाद्याला काही एका कामाची सुपारी देणें," म्हणजे त्याचेकडे तें काम सर्वथैव सोपविणें.

५९१ सूं करणें, सूंबाल्या करणें, सूंबाल्या हाकणें किंवा बाल्या हाकणें—पळून जाणें.

५९२ सूर्याची पिलें दाखविणें—एखाद्याच्या कानशिलावर दोन बाजूंनी आपले दोन तळहात जोराने दाबून त्याला उंच उचलणें. उ० मुलांना सूर्याचीं पिलें दाखविणें, हें फार वाईट आहे!

५९३ सूर वाहणें—संभवनीयता, शक्यता असणें; रंग दिसणें. उ० मला नोकरी मिळण्याचा सूर वाहत नाही. उ० मुलीला हें स्थळ मिळेल, असा सूर वाहत नाही.

५९४ सोनाराने कान टोचणें—मुलाचे कान मुंकली वगैरे दागिने घालण्यासाठी टोचावे लागतात. हें कान टोचण्याचें काम घरचीं माणसें करूं लागलीं, तर

मुलें रडून, ओरडून गोंधळ करतात. पण सोनारापुढे मुकाट्याने बसून कान टोचवून घेतात. यावरून वरील शब्दसंहतीचा अर्थ हा की, घरच्या माणसांनी दिलेली ताकीद कोणाला रुचत नाही, पण तिऱ्हाइताने दिलेली ताकीद मुकाट्याने पाळली जाते.

५९५. (एखाद्याचें) सोनें होणें—

(१) मृत्यूमुळे त्याच्या हालअपेष्टा नाहीशा किंवा समाप्त होणें.

(२) एखाद्या स्त्रीचें सोनें होणें—

वृद्ध पतीच्या अगोदर मरण आल्यामुळे तिची वैधव्यदशा चुकणें.

५९६ (एखाद्याच्या घरांत)-सोन्याचा धूर निघत असणें—तो अतिशय श्रीमंत असणें.

५९७ सोमवती घालणें—सोमवारी अमावास्या आली असता तिला "सोमवती अमावास्या" म्हणतात. असा योग घडतो, त्या दिवशीं स्त्रिया ब्राह्मणांना १०८ फलांचें दान करतात. ह्या दानाला "सोमवती" म्हणतात, व ह्या विधीला "सोमवती घालणें" म्हणतात. कोणी मनुष्य एखाद्या वस्तूची पुष्कळशी संख्या जुळवूं लागला असता त्याची थट्टा करून म्हणतात, "तुला ह्या वस्तूची सोमवती घालावयाची आहे काय?" उ० हीं इतकीं कुलपें कशाला घेतोस? तुला कुलपाची सोमवती का घालावयाची आहे?

५९८ सोस करणें—हावरेपणाने मिळविण्याची इच्छा करणें. अतिलोभ धरणें. उ० तू खणाचा इतका सोस कशाला करतेस? [सं० शोष].

५९९ सोक्षमोक्ष होणें—निकाला लागणें.

६०० (एखाद्याचें) स्तोम किंवा पोम माजविणें—त्याची फाजील प्रशंसा करणें. उ० गिरिधरराव मोठे वक्ते म्हणून लोकांनी त्याचें फारच स्तोम माजविलें आहे! मला तर त्याच्या भाषणात वक्तृत्वाचा कांही विशेष गुण आढळत नाही. स्वार्थसाधु लोक श्रीमंताचें उगीच स्तोम माजवितात!

## ६०१. स्वर्ग

१. *देवाचें वसतिस्थान.*

२ स्वर्ग दोन बोटे उरणें—गर्वाने अतिशय फुगून जाणें; उन्मत्त होणें. यत्किंचित् वैभव प्राप्त झालें, म्हणजे हलक्या मनाचा माणुस गर्वानें फुगून जातो, तेव्हा त्याच्या संबंधाने हा प्रयोग करतात. उ० कोयनाबाईच्या मुलाची मराठी सहाव्या इयत्तेची परीक्षा उतरली; आता तिला स्वर्ग दोन बोटें उरला, असें झालें आहे!

३ स्वर्गास हात पोंचणें—इच्छिलेलें जें अति उच्च पद, तें मिळणें; आतुरतेने इच्छिलेली स्थिति प्राप्त होणें; परावलंबित्वाच्या दरींतून बाहेर पडून स्वतंत्र होणें; कृतकृत्य होणें.

४ स्वर्गी ध्वज लावणें—मोठें कृत्य करणें. (ह्यात उपहासाचा अंश असतो). "स्वर्गी" हा शब्द गाळल्यासहि तोच अर्थ होतो.

५ आपण मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाही—आपण स्वता कष्ट केल्याशिवाय किंवा तसदी भोगल्याशिवाय आपणास सुख होत नाही किंवा आपली सोय जुळत नाही.

६०२ स्वाहा करणें—गिळकृत करणें. (होमांत आहुति टाकताना इष्ट देवतेचें नाव चतुर्थ्यन्त करून त्यापुढे "स्वाहा" असा शब्द उच्चारतात).

६०३ (एखाद्याचा) हट्ट जिरणे (किंवा जिरविणें)—त्याचा आडमुठेपणा किंवा मगरूरी नाहीशी होणें. (त्याला पारिपत्य करून त्याचा आडमुठेपणा घालविणें; त्याची खोड मोडणें).

६०४ हट्टास पेटणें—जें होणें असेल तें होवो, मी अमुकच तऱ्हेने वागणार असा आग्रह किंवा हेका धरून बसणें.

६०५ (एखाद्याच्या दारात) हत्ती झुलत असणें—त्याची वैभवसंपन्न स्थिति असणें.

६०६ हाबेलडी—त्रेधा, फजिती, घाबरघुडी यावरून "हाबेलडी होणें, उडणें, करणें, उडविणें," इत्यादि शब्दसहतीचे अर्थ विद्यार्थ्यांस कळण्याजोगे आहेत. [व्युत्पत्ति—हिंदी भाषेत; हा! बे! लवडी! = ठीक! अरे! बायल्या!]

६०७. हमरी तुमरी

१. हमरी तुमरी—मी की तू, मला की तुला, माझा की तुझा, यांबद्दल वादविवाद किंवा भांडण.

२ हमरी तुमरी करणें—शिवीगाळ करून भांडणें.

३ हमरी तुमरीवर येणें—भांडता भांडता शिवीगाळ करण्यापर्यंत येणें; एकेरीवर येणें.

६०८ हरभऱ्याचे झाडावर चढणें—लबाड मनुष्याने स्वार्थ साधण्यासाठी केलेल्या स्तुतीला भुलणें किंवा फसणें. एखाद्याला हरभऱ्याच्या झाडावर चढविणें, म्ह० लबाडीची स्तुति करून त्याला फसविणें.

६०९. हरताळ

१. पिवळ्या रंगाचा एक विषारी पदार्थ.

२ हरताळ लावणें—रद्द करणें, कुचकिंमतीचा करणें, खोटा करणें किंवा पाडणें [पूर्वी हाताने पोथ्या लिहीत, तेव्हा एखादें अशुद्ध अक्षर पडलेलें असल्यास तें बुझाविण्यासाठी हरताळीचा तेथे लेप करून तें दिसेनासें करीत].

३ हरताळ लागणें—रद्द पडणें, चुकीचा ठरणें.

४. हरताळ पडणे—

(क) राजा किंवा त्याच्या घराण्यांतील कोणी माणूस मेलें असतां दुकानें बंद करण्यात येतात, तेव्हा "हरताळ पडली," असें म्हणतात.

(ख) दुर्मीळ होणें. उ० हल्ली सुतार लोकावर हरताळ पडली आहे. (म्ह० सुतार लोक कामाला मिळत नाहीत, असें झालें आहे).

६१० हरामाचा माल किंवा पैसा—लबाडीनें, अन्यायानें मिळविलेला माल किंवा पैसा. ह्याच्या उलट हलालाचा माल किंवा पैसा.

६११ हसून गोड करणें—आपल्या हातून कांही चुकी झाली असल्यास हसून आणि गोड गोड बोलून दुसऱ्याचा राग घालविणें. ह्याच अर्थानें "हसून साजरें करणें," ह्याचाहि उपयोग केला जातो.

६१२ हळकुंडासाठीं लग्न मोडणें—एखादी क्षुल्लक बाब न जुळल्यामुळे मोठें कार्य जुळत आलेलें असेल, तें मोडून टाकणें.

### ६१३. हळद

१. हळद—पिवळ्या रंगाचा कंदविशेष.

२. हळद लावणे—

(क) विवाहाच्या वेळीं वधूस आणि वरास अगोदर हळद लावून स्नान घालतात. यावरून "एखाद्या मुलीला किंवा मुलाला हळद लागली," ह्याचा अर्थ विवाहविधीला सुरुवात झाली किंवा तो समाप्त झाला, असा होतो. उ० मुलीला स्थळें पाहतां पाहतां उद्धवराव अगदी दमून गेले होते. शेवटीं तिला एकदाचें स्थळ मिळून हळद लागली!

(ख) वैभवास किंवा मानमान्यतेस चढणें.

### ६१४. हाका

१ हाका मारीत बसणे—चरफडत, ओरडत बसणें.

२ एखाद्याच्या नांवानें हाका मारीत बसणे—"त्यानें माझें नुकसान केलें," अशी विनाकारण ओरड करीत सुटणें.

६१५ (एखाद्या कामीं) हातखंडा असणे—तें काम हमखासीनें पार पाडा ण्याचें कौशल्य किंवा पटाईतपणा अंगीं असणें. उ० भाडण उकरून काढण्याच्या कामीं मजुळाबाईचा हातखंडा आहे; प्यादेमात करण्यांत सिद्धेश्वरपंताचा हातखंडा आहे.

६१६ हाय खाणे किंवा घेणे—धास्ती घेणें; दहशत घेणें; जिवाला लावून घेणें ["हाय!" हें दु:खसूचक अव्यय आहे] "हैरत घेणें किंवा खाणें" ह्याचाहि असाच अर्थ आहे.

६१७ हायदोस घालणें—"हाये दोस्त् दूल्हा" हा उद्गार मुसलमान लोक ताबुताच्या पुढे काढतात. त्याचा अर्थ "हाय! हाय! मित्रा, नवरदेवा!!"

असा आहे. इमाम हसन आणि इमाम हुसेन यांचीं लग्नें झालेलीं होतीं. त्यांना लवकरच करबवलाच्या (करबलाच्या) लढाईत मरण आलें. त्याच्या संबंधाचा हा शोकोद्गार असून डोले हे त्यांच्या कबरा होत. हा उद्गार काढतांना मुसलमान लोक ताबुताच्या पुढे नाचून धिंगामस्ती करीत असतात. यावरून "हायदोस घालणें," म्हणजे धिंगामस्ती करणें असा मराठींत अर्थ झाला.

## ६१८. हार

१. हार—

(क) नुकसान; हानि. [अनुरूप क्रियापद येणें, लागणें किंवा बसणें]. उ० आंब्याच्या व्यापारांत शांतारामपंतांना मोठी हार आली!

(ख) पराभव; अंगावर डाव लागणें. उ० मराठ्यांशीं लढतांना मुसलमान लोकांना अनेक वेळां हार आली. उ० सोंगट्यांच्या डावांत सखारामपंतांना हार आली.

२ हार खाणें—आपण कमी दर्जाचे आहों, असें कबूल करणें. आपला पक्ष कमी जोराचा आहे, असें कबूल करणें; चीत होणें; पराभव पावणें; खचून जाणें. उ० आल्फ्रेड जसा रणशूर, एकनिश्चयी व संकटांत हार न खाणारा होता, तसाच मुत्सद्दीहि होता. —प्रोफेसर वै० का० राजवाडे.

३ एखाद्याला हार जाणें—त्याच्याकडून पराभव पावणें; त्याच्याहून आपण कमी दर्जाचे आहों, असें म्हणावयाला लोकांना संधि देणें. उ० नखानें चित्रें उठविण्याच्या कामीं माझा मित्र धुंडिराज कोणालाहि हार जाणार नाही! (म्ह० त्यानें उठविलेलीं चित्रें इतरांच्याहून बरच्या प्रतीचीं ठरतील).

४ आजपर्यंत तो कोणाच्याहि हारीं गेला नव्हता!—तो कोणाकडूनहि पराभूत झाला नव्हता! कोणापेक्षांहि कमी योग्यतेचा तो ठरला नव्हता.

५ हार मानली की झगडा तुटला—आपण कमी आहों किंवा आपला पराभव झाला, असें आपण कबूल केलें, म्हणजे तंट्याचें कारणच राहिलें नाही! तंटा मिटलाच!

६ हार मानली, पण झगडा तुटों—"आम्ही चुकलों," असें आम्ही कबूल करितों. कोणीकडून तरी तंटा मिटो, म्हणजे झालें!

६१९ त्याचे हाल कुत्रा-खाईना!—त्याला अति विपन्न दशा प्राप्त झाली! उ० तूं जर असा उद्योगधंदा सोडून देऊन भलत्याच माणसांची संगति करून राहिलास तर तुझे हाल कुत्रा खाणार नाही (म्ह० तुला अतोनात हालअपेष्टा काढाव्या लागतील).

६२० हिंग लावून विचारणें—बेचव पदार्थ खाण्याजोगा करावयाचा झाल्यास त्याला हिंग लावतात, म्हणजे त्याला कांहीं थोडीशी तरी चव येते. परंतु

जो पदार्थ अगदीच टाकाऊ—ज्याला हिंग लावूनहि कांही चव येण्याजोगी नाही—त्याला हिंग कोण लावणार? ज्याला कोणीहि हिंग लावणार नाही, तो पदार्थ अर्थात् भिकार आणि नादान असाच असावयाचा यावरून "त्याला कोणी हिंग लावूनहि विचारणार नाही," याचा अर्थ तो अगदी टाकाऊ कुचकिंमतीचा आहे, असा होतो [हा वाक्प्रचार नेहमी अकरणरूपी योजला जातो]

६२१ हिशेबात घेणें—विचारात घेणें.

६२२ हुतुतू घालणे—आरडाओरडा करून धिंगामस्ती करणें ["हुतुतू" हा मुलांचा एक खेळ आहे त्यात "हुतुतू! हुतुतू!" असा शब्द उच्चारीत उच्चारीत धावावयाचें असतें]

६२३ होस हो देणे किंवा मिळविणे—समति दर्शविणें उ० समर्थांची मर्जी आपणावर असावी म्हणून खुशामती लोक त्याच्या मूर्ख विचाराला देखील होस हो देवून देतात!

## ६२४. होळी

१ एखाद्या वस्तूची होळी करणें—ती जाळणें, तिचा विध्वंस करणें उ० मारुतीनें लंकेची होळी केली उ० ग्रीक व लॅटिन भाषांतील माननीय ग्रंथ लोकांनी वाचू नयेत, असें पोपने वेळोवेळी फर्माविलें होतें एका धर्मवेड्या पोपने अशा ग्रंथाची एकदा होळी केली होती प्रोफेसर वै० का० राजवाडे,—आंग्लसाहित्य

२ होळी होणें—जळून जाणें

६२५ क्षिति न बाळगणे—"क्षिति" म्ह० पर्वा किंवा काळजी "क्षिति न बाळगणें" म्हणजे पर्वा न करणें अंत करणाला लावून न घेणें ["क्षिति" ह्याचें शुद्ध रूप "क्षति"] उ० त्याला कशाचीच क्षिति नाही उ० बाळकृष्णाला कितीहि रागें भरलें, तरी त्याला त्याची तिळमरहि क्षिति (म्ह० पर्वा) वाटत नाही उ० त्याने मला लबाड म्हटलें तर म्हटलें! मी त्याची क्षितीच बाळगीत नाहीं!

◆ ◆ ◆

६२६. १ ज्यांत सर्वनामें अंतर्भूत झालीं आहेत, असे वाक्प्रचार संख्येने थोडे आहेत; तथापि ते महत्त्वाचे आहेत. ते संभाषणांत पुष्कळ वेळा योजण्यांत येतात आणि त्यांच्या योगाने संभाषणाला विशेष चटकदारपणा येतो. ह्या सर्व वाक्प्रचारांचा बरोबर अर्थ करणें आणि सारख्या सारख्या वाक्प्रचारांतील सूक्ष्म भेद शब्दांनी व्यक्त करणें कठीण आहे; तथापि आम्ही त्या दिशेनें प्रयत्न करीत आहों. आम्हीं काहींचे अर्थ देऊन त्यांच्या स्पष्टीकरणार्थ उदाहरणें दिलीं आहेत आणि कांहींचा अर्थ देण्याची आवश्यकता न वाटल्यावरून त्यांचा वाक्यांत नुसता उपयोग करून दाखविला आहे.

२ जीं सर्वनामें आम्हीं पुढे घेतलीं आहेत, त्यांचे लिंगवचनपुरुषादिकावरून किंवा अर्थावरून वेगळे वेगळे समूह किंवा वर्ग पाडल्याने विद्यार्थ्यांची विशेष सोय होईल, असें न वाटल्यावरून नुसत्या वर्णानुक्रमाने तीं सर्वनामें दिलीं आहेत. काही वाक्प्रचार जे, लिंगवचनपुरुषादिकांत योग्य फेरफार करून अन्य प्रसंगीं योजता येतात, ते फक्त प्रथमपुरुषी, पुल्लिंगी आणि एकवचनी दिले आहेत. "माझा मी तें काम करीन, तूं लुडबुडावयाला येऊं नको!" ह्या वाक्यांत "माझा मी" ह्याचा "मी एकटा" किंवा "तुझ्या किंवा दुसऱ्या कोणाच्या मदतीची अपेक्षा न करतां मीच" असा अर्थ होतो. येथे "माझा मी" ह्याचा ज्या सरणीने अर्थ होतो, त्याच सरणीने "आमचे आम्ही", "तुझा तूं", "तुमचे तुम्ही", "तिची ती" वगैरेंचे अर्थ होतात. म्हणून "माझा मी" हाच एक वाक्प्रचार देऊन तेथे सर्व लिंगवचनपुरुषादिकात त्याचा उपयोग करतां येतो, अशा मतलबाची टीप दिली आहे.

३ ह्या प्रकरणांत आम्हीं सर्वनामें आणि सर्वनामापासून उत्पन्न झालेले इतर कोटींत पडणारेहि शब्द समाविष्ट केले आहेत.

६२७ असा—खरें पाहिलें असता; वास्तविक रीत्या. उ० दुपारीं मी निजत असा नाहीं. जेवण झाल्यावर जरा आडवा होतों. झोप आली तर आली, नाही आली तर नाहीं (म्ह० झोप घ्यावी अशा संकल्पानें कांहीं मी निजत नाहीं). उ० मी नियमानें असा फिरावयास जात नाहीं. संध्याकाळीं कुठेंतरी कामासाठीं जातों. काम आटोपल्यावर जर दिवस असला, तर पर्वतीकडे किंवा चतुःशृंगीकडे थोडेंसें चक्कर मारून येतों (म्ह० घरून बाहेर पडतांना फिरावयास जावयाचें, असा माझा उद्देश नसतो).

६२८ असाच—सामान्य प्रतीचा; ज्याच्या अंगीं कांही विशेष गुण नाहीं असा; ज्याचें नांव सांगण्या इतक्या महत्त्वाचें नाही असा; ज्याचें नांव तुम्हांला माहीत असण्याचा संभव नाही असा. उ० आमच्या मुलाला औषध द्यावयाला असाच एक डॉक्टर आम्हीं बोलावून आणला होता.

६२९ असा तसा—सामान्य प्रतीचा.

टीप—( ह्याचा उपयोग करणरूपी किंवा अकरणरूपीहि होऊं शकतो ).

उ० आजच्या सभेचा अध्यक्ष होता कोणी असा तसा ! म्ह० अध्यक्षपणाला नालायक). उ० तो कारकून असा तसा नाही हो ! ( म्ह० तो मोठा कर्तबगार माणूस आहे ! )

६३० हा पंडित अशातशांतला नाही—हा सामान्य प्रतीचा पंडित नाही; हा जाडा पंडित आहे.

६३१ अहंपणा किंवा अहंता—( क ) मीपणा, अहंकार, बढाई; स्वतः-विषयींचें चांगलें मत. ( ख ) स्वताच्या सुखदुःखाविषयी जाणीव. धन, पुत्र, घरदार वगैरेसंबंधाने आपलेपणाची बुद्धि. उ० काशीनाथपंताला आपण फोटोग्राफींत पटाईत आहों, असा भारी अहंपणा आहे ! उ०

हलुहलु झडो अहंता सज्जमर्नी वार्द्धकीं जशी दाढी ।

केंद्र विवेक विषया निरहंद्व जन वस्तुतें जसा केंडी ॥ —मोरोपंत.

६३२ अहमहमिका—स्पर्धा; ईर्ष्या; चढाओढ. उ० त्याच्यापेक्षा मी विद्वान् होईन अशी अहमहमिका चालली.

६३३ अस्मादिक—ह्याचा मराठींतील अर्थ "आम्ही," असा आहे. बढाई मारावयाची असतां किंवा स्वतांविषयी विनोदाने बोलावयाचें असतां, ह्याचा उपयोग करतात. उ० रात्रीच्या वेळीं आम्हांला त्या रानांतून जावयाला काय हरकत आहे ? अस्मादिकाच्या कोण वाटेस जाणार आहे ? [ अस्मादिकाच्या = आमच्या ].

६३४ आपआपला किंवा आपलाला—ज्याचा जो असेल तो. उ० मुलांनो. आता संध्याकाळ झाली. खेळ आटोपून आपआपल्या किंवा आपलाल्या घरीं जा, उ० शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या प्रसंगीं इंग्रज, पोर्तुगीज वगैरे परदेशचे व्यापारी, पाळेगार व मांडलिक राजे यांनी आपआपल्या वकिलांच्या हातीं नजराणे पाठवून शिवाजीचें अभिनंदन केलें. —गो० स० सरदेसाई.

६३५ आपण—( प्रथम पुरुष ) मी किंवा आम्ही. उ० सदूभाऊच्या कारभारात आपण नाही रे बोला पडणार !

६३६ आपण—( द्वितीय पुरुष ) तुम्ही ( बहुमानार्थी ). उ० आजच्या सभेचे अध्यक्ष व्हावयाला आपण योग्य आहां !

६३७ आपण होऊन—स्वताच्याच प्रेरणेने; स्वताच्या बुद्धीचा उपयोग करून दुसऱ्याने सांगावयाच्या अगोदर; दुसऱ्यावर अवलंबून न राहतां. उ० मी आपण होऊन हें घड्याळ तुला बक्षीस देणार होतों. माझ्या यजमानाने आपण होऊन माझा पगार आठ रुपये होता, तो दहा रुपये केला. उ० आपण होऊन श्लोकाचा अर्थ करण्याचा शाताराम मुळीच प्रयत्न करीत नाही; त्याला सारेंच लोकांनी सांगावें लागतें !

६३८ आपला किंवा आपला तो—पादपूरक शब्द. [हे शब्द दोन्ही वचनी आणि तिन्ही लिंगी योग्य ते फेरफार करून योजतां येतात]. उ० मी फिरावयाला गेलों होतों, तेव्हा मला कोण भेटला असा तुझा तर्क आहे? आपला तो गोविंदा भेटला (म्ह० गोविंदा भेटला). याचप्रमाणे "आपली ती," "आपले ते," "आपल्या त्या," ह्यांचे अर्थ जाणावे.

६३९ आपला—कोणतीहि विशिष्ट क्रिया करणारा जो कोणी असेल त्याचा. (तिन्ही पुरुषी, तिन्ही लिंगी आणि दोन्ही वचनी). उ० सध्या मला आपलीं कामें पाहावयाला फुरसूद नाही.

६४० आपला—मी आपला म्ह० मजविषयी म्हणाल तर, (तिन्ही पुरुषी, दोन्ही वचनी आणि तिन्ही लिंगी). उ० मी आपला ह्याच वाटेने जाणार. कोणी मजबरोबर या किंवा नका येऊं! तुम्ही ह्याला कितीहि बोध करा, तो आपला तसाच वागणार!

६४१ आपल्या आपण—(क) दुसऱ्याच्या मदतीवांचून; दुसऱ्याच्या प्रेरणेशिवाय; अंगच्या जोरावर. (ख) दुसऱ्या कोणाच्या मध्यस्थीवांचून; दवदवलीशिवाय किंवा आर्जव, आग्रह केल्याशिवाय. उ० तूं मुद्दाम गळूं फोडूं नको. आज त्याला पोटीस लावलें, म्हणजे उद्या तें आपल्या आपण फुटेल (आपल्या आपण म्ह० पिकल्याबरोबर). उ० त्याला जेवावयाला कशाला बोलावितेस? त्याला भूक लागली म्हणजे तो आपल्या आपणच (म्ह० कोणी न हाका मारतां) येईल! उ० काठीभोंवती आपण वेल गुंडाळण्याचें कारण नाही. तो आपल्या आपणच काठीला वेटोळीं घालीत घालीत वर चढेल, (आपल्या आपण म्ह० निसर्गाच्या नियमाप्रमाणे).

६४२ आपसूक किंवा आपसुख—आपल्या स्वतःच्या सुखासमाधानानें किंवा इच्छेनें; लोकांनीं प्रेरणा न करतां. उ० जेवावयाला येण्यासाठीं रामूचें इतकें आर्जव कशाला करतेस? पान चरचरलें, म्हणजे तो आपसूकच येईल!

६४३ आपला म्हणणें—एखाद्या माणसाचें कल्याण करण्याची जबाबदारी आपल्या शिरावर आहे, असें समजून चालणें किंवा वागणें. उ० त्याला नेताजीनें एकदा आपला म्हटलें, त्याच्यासाठीं तो हवी तितकी घस सोशील.

६४४ आपलासा म्हणणें किंवा समजणें—एखादा मनुष्य आपल्याशीं स्नेहभावानें वागणारा आहे, असें म्हणणें, समजणें किंवा समजून वागणें.

६४५ आपली वाढवून खाणें—आपलपोटेपणानें आपली सोय अगोदर करून घेणें.

६४६ आपोआप—बाह्य शक्ति न लाविली तरी; स्वयंप्रेरणेनें खटपट, त्रास, मेहेनत, तसदी न करता किंवा सोसता. उ० ती खिडकी त्या गड्यानें मिटविली नाही, ती आपोआप मिटली. उ० गवत लावावें लागत नाही, तें आपोआप उगवतें.

६४७ आम्ही—प्रथमपुरुषवाचक अनेकवचनी सर्वनाम उ० तुमची मदत असल्याशिवाय आम्ही काय करणार ?

६४८ कसा—

( क ) कोणत्या प्रकारचा ? कोणत्या रीतीने ?

( ख ) विनंती अधिक आग्रहाची किंवा अगत्याची करावयाची असता किंवा मजकूर जोरदार करावयाचा असता, ह्या विशेषणाचा किंवा क्रियाविशेषणाचा उपयोग केला जातो उ० मघापासून मुलें एकसारखीं पाणी मागत आहेत विहिरींची एक घागर भरून आण कशी ! (म्ह० आणच आण !) उ० केशवराव जोशी लफंगा माणूस आहे. तुझे उसने घेतलेले पैसे तो कधी देणार नाही. तू त्या पैशावर पाणी सोड कसा ! (म्ह० आपले पैसे गेले, ते बुडाले, ते कधीच परत मिळावयाचे नाहीत, असें पक्कें समजून रहा !)

उ०—घे आपणास राया सोडवुनी द्रौपदीस लाव कसा !

मोरोपंत,—सभापर्व

[ लाव कसा, म्ह० अवश्य लाव ]

उ०—रे सहदेवा ! सत्वर पुष्कळसा अग्नि आण जाच कसा !
जाळू याचे हे कर, आम्हा हा सोसवेल जाच कसा ? ।। ३६ ।।

मोरोपंत,—सभापर्व

[ जाच कसा ( कवितेंतील ओळ पहिली ) म्ह० कृपा करून जा ]

६४९ कसा काय ?—कोणत्या प्रकारचा उ० तुमची तब्येत आज कशी काय आहे ? उ० काल्च्या आवळीमाननाचा बसा काय बेत झाला ?

६५० कसें ?—कोणत्या रीतीने ? उ० हें कोडें कसें सोडवावयाचें ?

६५१ कसा तो—बिल्कूल, मुळीच, अगदी उ० स्वाभिमान कसा तो बाबूरावाला टाऊक नाही ! उ० आज वारा कसा तो मुळीच वाहत नाही उ० सद्या रानड्याला लाज कशी तीं माहीत नाही !

६५२ कसाबसा—मोठ्या कष्टानं उ० मी येथे कसेबसे दिवस घालवीत आहें (म्हणजे अति कष्टाने) उ० मी झुंबरलाल मारवाड्यापासून कसेबसे दहा रुपये मिळविले (म्ह० भारी प्रयासाने)

६५३ कसा झाला तरी तो पडला श्रीमंताचा मुलगा—त्याच्यासंबंधाने कितीहि प्रतिकूल गोष्टी असल्या तरी तो श्रीमंताचा मुलगा आहे खरा !

६५४ किती केले तरी—सर्व पाहतां, कितीहि अनुकूल दृष्टीने पाहिलें तरी उ० किती केलें तरी तो तुकोबा पडला आडमुठ्या ! तो का वळावयाचा आहे ? (म्ह० त्याला कितीहि बोध केला, तरी तो वळणार नाही !)

६५५ मीं त्याची किती काकुळती केली?—मीं त्याची अतोनात काकुळती केली.

## ६५६. कांहीं

१. कित्येक. उ० काही लोक ह्या वाटेने जात होते आणि काही लोक त्या वाटेनें जात होते.

२ अंशतः, थोडासा. उ० काही सोन्याचा गुण आणि काही सवागीचा गुण.

३ कांहींच्या बाहींच—अतिविचित्र किंवा विलक्षण. उ० नारायणरावाची मागणी कांहींच्या बाहीच होती! (म्ह० मूर्खपणाची).

६५७ काय—उ० काय खाल्ल्याने माझी पोटदुखी उठते, हें डॉक्टराला अजून कळलें नाही.

१ काय......आणि......काय?—दोन वस्तु अगदी सारख्याच किंवा अगदी समान आहेत असा अर्थ बोलून दाखवावयाचा असता हे शब्द योजले जातात. उ० रामा काय आणि गोविंदा काय-एकच. उ० हें पत्र तूं आज टपालात टाकलेंस काय आणि उद्या टाकलेंस काय एकच. विलायतीची मेल त्या पत्राला सापडेलच.

६५८ काय तो—केवळ; फक्त. उ० हल्ली लिस्बनहून गोव्यापर्यंत दरसाल एका आगबोटीची सफर होत असते व केप ऑफ् गुडहोप पासून जपानपर्यंतच्या अफाट अंतरात गोवा, दमण आणि दीव हीं तीन ठिकाणें काय तीं पोर्तुगीज लोकांच्या ताब्यात आहेत— गो० स० सरदेसाई. उ० ह्या वर्गात गोविंदा काय तो हुशार मुलगा आहे; सारा द्वाडपणा काय तो माझ्या मुलाचा, बाकीचीं सारीं मुलें सालस!!

६५९ काय होय? काय होत?—निरुपयोगी; त्याज्य. उ० आजान्याला बासुदी काय होय? उ० निःस्पृहाला धन आणि अधिकाराच्या जागा काय होत?

६६० कांहीं तरी—उ० यावर काही तरी तोड काढली पाहिजे.

६६१ किती—उ० हापूसचा एक आंबा घ्यावयाला किती पैसे पडतात? उ० तुझ्यासाठीं मीं किती दुःख भोगलें, ह्याची तुला कल्पना नाही!

६६२ कितीतरी?—फार, अतोनात. उ० वामनरावानीं त्या विठूमल्ल मारवाड्याची कितीतरी मनधरणी केली! तो वळला नाही!

६६३ कोण?—अतिशय उ० त्र्यंबकरावाचें मन वळवावयाला मला कोण प्रयास पडले! (म्ह० फार अतोनात).

६६४ कोणता कां किंवा कोणचा कां—हवा तो. उ० दोन्ही वाट्या सारख्या आहेत. कोणतीहि का घेईनास! [ तिन्ही लिंगीं आणि दोन्ही वचनीं ].

६६५ कोणी का—हवा तो. [ तिन्ही लिंगीं आणि दोन्ही वचनीं याचा उपयोग

होतो ]. उ० माझ्या सोबतीला कोणी का येईना ! उ० कोणी का धोतरें आणाना ! मला तीं मिळाल्याशीं कारण. उ० कोणी का औषध देईना ! माझ्या मुलाला गुण आला म्हणजे झालें !

६६६. कोणी, कोणीतरी—

(क) हवा तो, हवें तें, इ० [ याचा उपयोग तिन्ही लिंगी आणि दोन्ही वचनीं होतो ]. उ० कोणी ब्राह्मण बोलवा, आमची त्याला हरकत नाही. उ०

कोणी वदा, कोणी निंदा । आम्हा स्वहिताचा धंदा ॥—तुकाराम

(ख) ज्याचें महत्त्व नाही असा माणूस. उ० मला निरोप सांगावयाला आला होता कोणी. मीं त्याचें नांव, गाव विचारून घेतलें नाही.

(ग) कोणीहि; अमुकच असा आग्रह किंवा हेका धरण्याचें कारण नाही. उ० मला तहान लागली आहे. कोणीहि पाणी द्या रे !

(घ) भिकार; नालायक; य.कश्चित माणूस. ज्याचें नावगाव मी तुम्हांस सांगूं इच्छित नाही, असा एक मनुष्य. उ० मुलीला लोटावयाची का आहे ? आपला कोणीतरी मुलगा आणि दिलें एकदाचें लग्न लावून ! असें करून कसें चालेल ? उ० ही जबाबदारीची जागा आहे; येथे कोणीतरी माणूस नेमून चालावयाचें नाही.

६६७ जसा—जणों काय ! उ० कालपासून जिनगरी बाहुलीसाठी गोदी माझ्या मागे जशी गिऱ्यासारखी लागली आहे ! उ० मीं काशीनाथपंताचें काही देणेंघेणें वाकडें केलें नाही. पण तो जसा हात धुऊन माझ्या पाठीस लागला आहे.

६६८ जो तो—प्रत्येक मनुष्य. उ० आगबोट फुटली तेव्हा जो तो आपला जीव बचावण्याच्या मार्गाला लागला. दुसऱ्याकडे तेव्हा कोण लक्ष्य देतो ?

६६९ ज्याला त्याला—प्रत्येकाला; सर्वांनाच. उ० ज्याला त्याला मुलगी गोरी पाहिजे आणि हजार रुपये हुंडा पाहिजे !

६७० ज्यांत त्यांत—प्रत्येक कामात किंवा प्रकरणांत; प्रत्येक गोष्टींत. उ० गोविंदराव लुडबुड्या माणूस आहे. तो ज्यांत त्यांत असावयाचाच !

६७१ ज्यानें त्यानें—प्रत्येकानें. उ० मी पडलों गरीब ! ज्यानें त्यानें माझी टवाळकी करावी ! करा नापडे !

६७२ जो उठला तो—प्रत्येक माणूस उ० जो उठला तो माझ्या लेकराला चिडवितो. उ० अलीकडे जो उठला तो होस्याला फेस रागूं लागला आहे.

६७३ जो पाहावा तो—प्रत्येक माणूस. उ० जो पाहावा तो कपाळाला भस्माचे पट्टे ओढून आणि हातात पळीपंचपात्री घेऊन निव्वतीर्थाकडे चाल्लेला होता.

६७४ ज्याचा तो—एकएकटा; प्रत्येक माणूस; विशिष्ट इसम दुसऱ्याच्या मदतीवर अवलंबून न राहणारा. उ० ज्याचा तो पडला पुळपुळीत ! मग दुसऱ्यांनी सावरून काय होणार ?

६७५ ज्याचा त्याला—सर्वांना; प्रत्येकाला; ज्याला योग्य किंवा जरूर असेल त्याला. स्वतःसंबंधाने जरूर तो–किंवा जरूर तितका. उ० ज्याची त्याला काहीतरी काळजी पाहिजे लागते; सारेच दुसऱ्यांनी पाहून कितीशा निभाव लागणार?

६७६. ज्याचे नांव तें—

(क) अगदी; बिल्कूल; मुळीच. उ० विठ्ठलपंताने जमनालाल मारवाड्याचे परोपरीने आर्जव केले,–पण तो ज्याचे नाव तें वळेना! (हा प्रयोग नेहमी अकरण-रूपी येतो).

(ख) अति उत्कृष्ट किंवा उत्कृष्ट रीतीने. उ० माझें चित्र असें साधलें आहे की, ज्याचें नाव तें!

६७७ तुमचा किंवा तुमचा तो—पादपूरक शब्द. [हे शब्द दोन्ही वचनीं आणि तिन्ही लिंगी योग्य ते फेरफार करून योजण्यात येतात]. उ० इत्र्याच्या चढाओढींत पाच मुलींनी भाग घेतला. ह्या पाच मुलींत तुमची ती मनकर्णिका शृंगारपुरे ही मुलगी होती.

६७८ तेरीमेरी—अरेतुरेपर्यंत आलेलें भांडण. हमरीतुमरीवर आलेलें भांडण. [तेरी = तुझी. मेरी = माझी]. उ० पहिल्याने गोपाळा आणि पांडुरंग विनोदाने बोलत होते, पण पुढे अगदी तेरीमेरीवर आले!

६७९ हमरीतुमरी—कडाक्याचें भांडण; सतप्त होऊन किंवा चिडीस जाऊन बोलण्याची स्थिति किंवा प्रवृत्ति. उ० शिवरामाला त्याच्या मर्जीविरुद्ध कोणी काही सांगता कामा नये. तो लागलाच हमरीतुमरीवर येतो!

६८० देव तुमचें भलें करो—देव तुमचें कल्याण करो! [बोलतांना शब्द किंवा मजकूर सुचला नाही म्हणजे तो सुचेतोपर्यंत हें वाक्य वेळ मारून काढण्यासाठी रेंगाळत रेंगाळत उच्चारीत असतात].

६८१ नाही तेच—भलतेंच काहीतरी. उ० जावईबोवा, नाही तेंच मागत बसू नका! सासऱ्याच्या ऐपतींत असेल, तें मागा. उ० नान्या, नाही तोच हट्ट घेतलास तर तुझी समजूत कोणीहि करणार नाही!

६८२ ममता—माया; प्रेम. ही वस्तु माझी आहे अशी जाणीव आणि तिच्या संबंधाची काळजी.

६८३ मी म्हणणें—जोरात असणें. उ० त्या वेळीं मी कसचा घराबाहेर पडतों? तेव्हा पाऊस मी म्हणत होता!

६८४ माझा मी—मी एकटा, दुसऱ्याची मदत न घेतां. उ० ह्या तुम्ही सारे खग दूर! हा जो पसारा मीं मांडला आहे, तो माझा मी निस्तरीन. [त्याच-प्रमाणे तुझा तूं, त्याचा तो, इ० चा उपयोग जाणावा].

६८५ मी मी म्हणणे—स्वताच्या पराक्रमाची किंवा कर्तृत्वाची बढाई मारणें किंवा ऐट मिरविणें. उ० भिन्यार्शी सामना करावयाला कोणीहि पुढे जाईनात. मी मी म्हणणारे सारे पहिलवान् कचरू लागले !

६८६ मी तूं करणें, मीतूवर येणें—भांडणावर येणें. हमरीतुमरी करूं लागणें. उ० सद्या आणि पाड्या हीं दोन पोरें एकत्र झालीं, की लगेच मीतूवर येतात !

६८७ यंव्...त्यंव्, हें...तें, असें...तसें, ह्या रीतीने, त्या रीतीने. एखाद्या माणसाच्या बढाईखोर भाषणाची यट्टा किंवा टवाळकी करावयाची असतां या वाक्प्रचाराचा उपयोग केला जातो. उ० चरक वगैरे पाठ केलेले, आमच्या आयुर्वेदांत यन् आहे त्यव् आहे, अशा गप्पा ठोकणारे वैद्यराज...ह्या व अशा व्यक्ति वर्णन करण्यात कर्वीने कमाल केली आहे. प्रोफेसर वै० का० राजवाडे,—आंग्लसाहित्य.

६८८ युष्मादिक—तुम्ही. दुसऱ्याविषयी विनोदाने किंवा तिरस्काराने बोलावयाचें असता "युष्मादिक" ह्या शब्दाचा उपयोग करतात. उ० हें कुलूप आम्हांला उघडता येत नाही. आता युष्मादिक काय दिवे लावणार तें पाहूं !

६८९ येवढा तेवढा—फार थोडा. उ० ह्या कवठाच्या चटणीला येवढा तेवढा गूळ पुरणार नाही ! आणखी पावशेर गूळतरी घालावा लागेल !

६९० येवढ्याशा तेवढ्याशावरून—अगदी थोडक्या कारणावरून. उ० आमची शेजारीण जान्हवीबाई येवढ्याशा तेवढ्याशावरूनं चिरडीस जाते !



६९१ ज्या वाक्प्रचारांमध्ये विशेषणें येतात, असे वाक्प्रचार मराठींत पुष्कळ आहेत; त्यांपैकी कांही निवडक असे पुढे दिले आहेत.

६९२. अकरावा

१-अकरावा बृहस्पति—दाट मैत्री. उ० गिरिधरराव आणि श्रीनिवासराव या दोघांत अकरावा बृहस्पति आहे. [ बारावा बृहस्पति = शत्रुत्व ].

२ अकरावा रुद्र—अतितापट माणूस.

६९३ अकुतोभय—ज्याला कोणत्याहि दिशेकडून भय नाही असें. अत्यंत सुरक्षित. [ सं० अकुतः + भय—बहुव्रीहि समास; अकुतः = कोठूनहि नाही भय ( भीति ) ज्याला असा ]. उ० कोरलईचा किल्ला अकुतोभय असल्याकारणाने त्याच्यावर फिरंग्याचा कित्येक दिवसापासून डोळा होता. उ०

योरास अधम निंदी जो चढला अकुतोभय स्थाना।
जो अधम तो सदाधम, पात्र बुधांच्या कधी न हो माना॥
—सौ० सरस्वतीबाई भिडे.

६९४. अक्रीत

१ ( क ) फुकटचें; त्याच्याबद्दल आपण किंमत दिलेली नाही असें. उ० मला कोणाचें अक्रीत नको. देवाच्या दयेने मला पुष्कळ मिळत आहे!

२ ( ख ) लबाडीने मिळविलेला किंवा चालविलेला. उ० अक्रिताचा पैसा ( किंवा धंदा ) कधी यशस्वी होत नाही!

३ अक्रिताचा व्यवहार किंवा व्यापार—लबाडीने चालविलेला व्यवहार किंवा व्यापार.

६९५ अखंड दंडायमान—लांबलचक..उ० रात्रीच्या अंधेरात तो संलु गडी अखंड दंडायमान पडून घोरत होता. त्याला पाहतांच् राजू मोलकरीण घाबरली!

६९६. अंगचा

१. अंगची बुद्धि—जन्मजात बुद्धि; दुसऱ्याच्या शिकविण्यावरुन किंवा ग्रंथांच्या अध्ययनाने, उत्पन्न किंवा संपादित नव्हे अशी.

२. अंगची गोष्ट—

( क ) स्वताची, व्यक्तिविषयक अशी गोष्ट.

( ख ) स्वता जाणलेली किंवा शोधून काढलेली गोष्ट. ह्याच्या उलट, लोकांपासून उचललेली किंवा शिकून घेतलेली.

३ अंगचा झरा—पृथ्वीच्या गर्भापासून ज्याचा उगम होतो असा झरा.

ह्याच्या उलट, "पावसाच्या पाण्यापासून उत्पन्न होणारा झरा." उ० तुकोबा पाटलाच्या विहिरीला अगचे झरे सात आहेत, एकच काय तो पावसाळी झरा आहे.

४. अगचा धनी—दुसऱ्याचा ताबा ज्याच्यावर नाही असा, स्वताचा मालक.

५ अगचा लिहिणार—आपलें काम आपणच लिहून काढणारा म्हणजे कारकुनाकडून न लिहविणारा. उ० मोरोपत कवि हा अगचा लिहिणारा होता

६ अगचे खूर, पाय, इ०—त्याच द्रव्यातून कोरून किंवा घडवून केलेले. उ० ह्या पोळपाटाला अगचे खूर आहेत, त्या पाटाला अगचे गजवाल आहेत

७ अगचा मळ—आपल्या जवळची अगदी निनकिंमतीची किंवा टाकाऊ वस्तु उ० रामकृष्णपत मारी कजूष आहे! तो अगचा मळहि देणार नाही! उ यजमान खूष झाले आणि त्यानी दिलें काय? अगचा मळ जसा काढून टाकावा तसा त्यानी मला दिला एक पागोट्याचा नोळा झालें!

८ अगचा कल्पक—ज्याला शिकविल्यावाचून, म्ह० जन्मजात बुद्धीच्या सामर्थ्याने, कल्पना सुचते असा [टीप—याच सरणीने "अंगचा कारागीर," "अंगचा गाणारा," "अंगचा शहाणा," "अंगचा चितारी," "अगचा वक्ता" इत्यादि शब्दसहतींचे अर्थ जाणावे].

६९७ अठरा गुणाचा खडोबा—

१ सर्व तऱ्हेच्या लुच्चेगिऱ्यांत पटाईत

२ रोगी मूल, ज्याला नेहमी काहीतरी दुखणें होतें, असें मूल

६९८ अदत्त—चिक्कू कृपण, देण्याकडे ज्यांची प्रवृत्ति नाही असा. ['अदत्त" ह्याचा खरा अर्थ "न दिलेला," परतु व्यवहारात त्याचा अर्थ "न देणारा" किंवा "ज्याच्या हातून देणें घडलें नाही, घडत नाही, घडणें शक्य नाही," असा घेण्यांत येतो]

६९९ अधळा

१ अधळा—

(क) ज्याला डोळ्यानी दिसत नाही असा (प्राणी).

(ख) ज्या डोळ्याने दिसत नाही असा (डोळा).

(ग) ज्याला अंतश्चक्षु किंवा ज्ञानचक्षु नाही असा, ज्याला सारासार विचार नाही असा, मूर्ख, अडाणी; बेअक्कली

२ अधळी कोशिंबीर—एक प्रकारचा मुलाचा खळ

३ अधळी गाय—हीन, दीन, गरीब, निरुपद्रवी असा माणूस

४ अधळी वेळ किंवा अधळे नक्षत्र—(फलज्योतिषात) ज्या वेळीं (किंवा ज्या नक्षत्रावर हरवलेली वस्तु सापडत नाही अशी वेळ किंवा असें नक्षत्र)

५ अंधळें गारूड—लबाडी; लुच्चेगिरी; खलबत; कट; चक्रान्त.

६ एखाद्याला अंधळें नक्षत्र लागणें—एखादी वस्तु सहज दिसण्याजोगी असून ती ज्याला दिसत नाही, त्याला "अंधळें नक्षत्र लागलें आहे," असें म्हणतात. उ० पाटाजवळ फणी असून ती तुला दिसली नाही; तुला अंधळें नक्षत्र लागलें आहे की काय ?

७. अंधळें वरण—ज्या वरणातील डोळ निवडून काढलेले नाहीत, असें वरण. ह्याच्या उलट "डोळस वरण."

८ अंधळ्या—(स्त्रीलिंगी अनेकवचन)—चित्रा नक्षत्र किंवा त्या नक्षत्रांत पडलेला पाऊस.

९ अंधळ्याचा रस्ता—सरळ रस्ता म्हणजे ज्या रस्त्याने कोणीहि माणूस गेला, तरी चुकणार नाही असा रस्ता.

१० अंधळ्याची काठी—अंधळ्या, अशक्त, पंगु माणसाला वाट दाखविणारा किंवा आश्रय देणारा माणूस.

११ अंधळ्यांची माळ किंवा माळका—वाट दाखवावयास एक डोळस माणूस पुढे घालून, एका अंधळ्याच्या पाठीवर दुसऱ्या अंधळ्याने हात ठेवून व अशा रीतीने एक लांब रांग करून रस्त्याने भिक्षा मागणाऱ्या अंधळ्याची रांग. मूर्ख, भम्ली अशा माणसांची परंपरा किंवा समुदाय.

१२ अंधळ्याची मिठी—घट्ट मिठी; मगरमिठी.

१३ अंधळा कारभार—अव्यवस्थित किंवा मूर्खपणाचें काम.

७०० अन्नास मोताद—ज्याला खावयाला अन्न मिळत नाही असा.

[टीपः—"मोताद" हा शब्द स्त्रीलिंगी नाम असून त्याचा अर्थ खाद्यपेयादिकांचें अत्यल्प परिमाण किंवा प्रमाण. चतुर्थ्यन्त नामाशीं हा शब्द जोडून आला असतां "ज्याला तें मिळत नाही किंवा विपुल मिळत नाही तो" अशा अर्थाची ती शब्दसंहति होते. उ० अन्नाला मोताद, वस्त्राला मोताद इ० ].

७०१ अलबत्यागलबत्या—कोणीतरी; यःकश्चित्; लुडबुड्या माणूस. [विशेष खुलासा पुढे "एकेरी, समस्त व समस्तकल्प शब्द" ह्या प्रकरणात पाहा].

७०२. अवघड

१ कठीण; दुःसरकारक; असह्य. उ० हें उदाहरण अवघड आहे, तें मला सुटत नाही. आऱ्यावाऱ्याची घाटी कठीण आहे. तीदेखील आमचा मुलगा चढून गेला. माझ्या मुलावरून तीन अवघड दुखणीं गेलीं.

२ अवघड वाटणें—दुःसरकारक, असह्य होणें; दुःख वाटणें. उ० कमळी सासरीं जावयाला निघाली, तेव्हा तिच्या आईला अति अवघड वाटलें !

७०३ अवजड—अवाढव्य; बोजड, वागवावयाला कठीण. उ०

सत्तारशकट अवजड, पुरुष स्त्री दोन हीं तया चाकें।
जरि एक उच्च, दुसरें नीच, तरी शकट हा कसा हाके ? ॥
—बाळकृष्ण अनंत भिडे.

७०४ अष्टपैलू—हिऱ्याला सहाणेवर घासून ज्या बाजू करतात, त्यांना "पैलू" असें म्हणतात. ज्या हिऱ्याला आठ पैलू आहेत, तो प्रकाशात कसाहि धरला तरी तो चकचकणारच. यावरून "अष्टपैलू माणूस" म्हणजे कोणत्याहि कामात घातला, तरी तें काम उत्कृष्टपणें करणारा माणूस असा अर्थ होतो.

७०५ अस्त्युत्तर—(क) कृतघ्न (ख) योग्य किंवा खरी गोष्ट नाकबूल करणारा. [ अस्ति=आहे, उत्तर = जबाब. कोणी काहीहि बोललें, तरी त्यावर उत्तर ज्याच्याजवळ तयार आहे किंवा त्यावर उत्तर देण्याला जो निर्लज्जपणानें तयार असतो तो ]

७०६ आगजाळी स्त्री—भाडखोर, भागेखोर स्त्री.

७०७. आडवा

१. आडवा—

(क) समांतर नव्हे असा; काटकोनांत असलेला. उ० ह्या खांबाला ही फळी आडवी बांध.

(ख) रुंद; उभा नव्हे तो. उ० नारायण अलीकडे आडवा वाढत चालला आहे ( म्हणजे तो उंचीनें न वाढतां लठ्ठ होत चालला आहे ).

(ग) प्रतिकूल; उलटा; नुकसान करणारा. आडवें दैव उ० त्याला दैव आडवें आलें ( म्हणजे त्याच्यावर दुर्दैव ओढवलें ).

(घ) उलट परिणाम करणारा; विरुद्ध. उ० माझ्या औषधानें माधवाला एव्हाना गुण आला असता. परंतु त्यानें काल वासुदी खाली, ती आडवी आली.

२ आडवें उभें—कुटिल नीति. उ० आडवें उभें करून श्रीकान्तरावानें त्या घराचा कबजा घेतला ( म्हणजे कांहीतरी हिकमती आणि लटपटी करून ).

३ आडवें पाणी—नदीचें, तळ्याचें किंवा विहिरीचें पाणी. ( याच्या उलट "पावसाचें पाणी" ).

४ आडव्या अंगाचा—लठ्ठ, ठेंगणा आणि जाडा. याच अर्थानें "आडव्या बांध्याचा," "आडव्या काठीचा," "आडव्या हाडाचा" हे प्रयोग होतात.

५ आडव्या जिभेचा—(क) शिवीगाळ करणारा, रानवट किंवा गावंढळ भाषण करणारा. (ख) संबंधरहित भाषण करणारा.

६. आडवें जाणें—

(क) दुसऱ्याच्या जाण्याच्या मार्गाला काटकोन करून जाणें. उ० मांजर आडवें गेलें, म्हणून तो वृद्ध ब्राह्मण पद्माकरभट परत फिरला.

(ख) हरकत करणें; अडथळा आणणें. उ० माझ्या विचाराला तूं नेहमी आडवा जात असतोस. ही तुझी खोड चांगली नाही!

७. आडवें येणें किंवा पडणें—

(क) एखाद्याच्या वाटेंत येणें; त्याला अडथळा करणें किंवा हरकत करणें; प्रतिबंधक, प्रतिकूल किंवा विरोधी होणें, त्याला खचविणें किंवा नाउमेद करणें. उ० मी हें काम हौसेनें करावयाला निघालों आहें, मला तूं आडवा येऊं नको. मलकाप्या आडवा पडला नसता, तर सुखावानें हें माझें काम तडीस लावलें असतें.

(ख) सामोरें जाणें. उ० आम्ही काशीयात्रा करून परत आलों, तेव्हा सारे गावकरी आम्हांला आडवे आले.

(ग) जन्माच्या वेळीं मुलाचें डोकें पुढें न येतां मूल आईचे उदरांत वाकडें होणें. उ० आडवें आलें, तर कापून काढावें.

८ आडवें लावणें—कुत्सित दृष्टीनें पाहणें. मी कांही बोललों, तरी तूं मला आडवें लावतोस! तुला काय म्हणावें?

९ आडवें होणें—विश्रांति घ्यावयाच्या उद्देशानें अंथरुणावर हातपाय पसरून निजणें. उ० तुम्ही फार दमलेले आहां; जरा आडवे व्हा, म्हणजे तुम्हांला बरें वाटेल.

१० आडवें घेणें—दोषैकदृष्टीने पाहणें. उ० कमलाकरपंत आपल्या नोकराचा प्रत्येक शब्द आडवा घेतो.

११ आडवें नेसणें किंवा लावून घेणें—लुगडें पुरतेपणीं न नेसणें. [ह्याच्या उलट "नीट नेसणें"].

१२ आडवें आलें असतां कापून काढावें—आपल्या कामांत कोणी हरकत करावयाला आला, तर त्याची भीडमुरवत न बाळगतां त्याला वाटेंतून दूर केलें पाहिजे. अशा वेळीं मैत्रीभंग होईल की काय, हा विचार मनात आणूं नये. [मागे ७ (ग) पाहा].

### ७०८. आंबट

१. आंबट—

(क) आंबा, चिंच वगैरेंच्या रुचीप्रमाणें ज्याची रुचि आहे असा.

(ख) निरुत्साह; खिन्न.

२ आंबट तोंड—खिन्नतेची, निराशेची मुद्रा.

३ आंबट ओला—अर्धवट ओला: अर्धवट वाळलेला; ओलसर.

४ आंबट पांकी—भलत्याच चैनी करणारा.

५ आंबट करणें किंवा होणें—निराश करणें (किंवा होणें).

६. आंबलेला—

(क) आंबट झालेला. उ० आंबलेली डाळ.

(ख) खिन्न; हिरमुष्ठ; असंतुष्ट झालेला. ज्याला कशाचीच हौस वाटत नाही असा. [ "आंबलेला, विटलेला" असाहि प्रयोग होतो ].

७०९. आयता

१ श्रमावांचून किंवा पैसा न खर्च करतां मिळालेला. उ० मकरंदरावांनी घर बांधतेवेळीं पायासाठीं जमीन खणली, तों त्यांनां पूर्वीच्या काळच्या एका घराचा आयताच पाया लागला.

२ अकल्पित किंवा अनपेक्षित रीतीनें प्राप्त झालेला.

३ आयती वेळ—ऐन कामाची, घाईची किंवा जरुरीची वेळ. उ० अगोदर सारी तयारी करून ठेव, नाहीतर आयत्या वेळीं तुझी घांदल उडेल!

४ आयत्या पिठावर रेघा ओढणें किंवा गुटका मारणें—श्रमावांचून मिळालेल्या पैशावर चैनबाजी करणें.

५ आयत्यावर कोयता—श्रमावाचून मिळालेल्या पदार्थांची किंवा मालाची नासाडी करावयास कोणी कचरत नाही!

६ आयत्यावर रायतें करणें—हल्ली आपणाजवळ जें कांही आयतें मिळालेलें आहे, तें खर्चून त्याचा उपभोग घेणें किंवा चैन करणें.

७ आयत्या बिळांत नागोबा बळी—दुसऱ्याच्या श्रमाचें फळ किंवा यश जो आपण घेऊं पाहतो तो. मुंग्यानी स्वतःच्या वसतीसाठी केलेल्या वारुळात किंवा बिळांत साप घुसला आणि तेथे राहू लागला, तर तेथल्या मुंग्या चेंचटून मरतात किंवा ती जागा सोडून जातात आणि सापाला ती जागा निर्वेध राहावयाला सापडते. बळी म्ह० समर्थ, शिरजोर, जबरदस्तीने मालकी हक्क चालविणारा.

७१० आर्ष—"ऋषि" या शब्दापासून "आर्ष" हें विशेषण. "आर्ष" म्ह० ऋषीसंबंधी. ऋषींनी केलेलें किंवा उच्चारलेलें. एके काळीं संस्कृत भाषा प्रचलित असल्याकारणानें तिच्यात फेरबदल होत असत. म्हणजे कांही शब्द व रूपें हीं नष्ट होऊन नवीन शब्द व रूपें भाषेंत येत असत. ऋषींनी आपल्या ऋचांत योजलेले शब्द व रूपें हीं जेव्हा अप्रचलित झालीं, तेव्हा त्यांना "आर्ष" (म्ह० ऋषींनी योजलेलीं), असें म्हणत. असे अप्रचलित शब्द व रूपें चालू नसल्यामुळे कानाला विचित्र लागत. यावरून "आर्ष" या शब्दाचा विचित्र, तऱ्हेवाईक, रूढ मार्ग न अनुसरणारा असा अर्थ झाला.

७११ आला गेला—पहीपाहुणा; अतिथि; अभ्यागत. उ० रेवदंड्यास भाऊ नेनेंच्या घरीं आल्यागेल्याचा पाहुणचार चांगला होत असे.

७१२ आला दिवस—जो दिवस उगवतो तो म्ह० प्रत्येक दिवस. उ० आम्हीं मुंबई सोडल्यापासून आमचा मुलगा आला दिवस खेळतो आहे! अभ्यास बिल्कुल करीत नाही!

७१३ आली गेली—नफानुकसान; यशापयश. उ० तुम्ही सांगता त्याप्रमाणें मी खरेदीविक्री वगैरे कामें चालवितों. मी आपली अक्कल लढवीत नाहीं. असें असून तुम्ही आली गेली मजवर लोटता याचा अर्थ काय?

७१४ घरीं आलेली—विधवा.

७१५ ईनमीन सव्वातीन—अगदी अल्पसंख्या. [ ई = ही; न् = अन् = आणि; मी = मी स्वता; सव्वा = "सवा" ह्या नावाची स्त्री, मिळून एकंदर तीन माणसें ]. उ० त्या संस्थेंत ईनमीन सव्वातीन माणसें आहेत!

७१६ इकडचा तिकडचा—नाना ठिकाणचा.

### ७१७. उघडा

१. उघडा—

(क) ज्याच्यावर झाकण, पांघरूण, पोषाख, आच्छादन वगैरे नाही असा. उ० थंडीच्या वेळीं अंगणात उघडा हिंडलास तर तुला सर्दी होईल.

(ख) स्पष्ट दिसणारा; विशेष श्रम न करतां समजण्याजोगा. उ० ह्या श्लोकाचा अर्थ तर अगदी उघडा आहे! त्यांत तुला कठीण काय वाटतें?

(ग) ज्याला आश्रय नाही, ज्याला रक्षिणारा कोणी नाही, असा. उ० आईबाप मेल्यापासून हें पोर उघडें आहे.

(घ) जगजाहीर; लपून नसलेला. उ० माझे सारे व्यवसाय उघडे असतात, त्यांत कधी चोरटेपणा नसतो.

(ङ) नागडा उघडा; उघडा बोडका; अगदी वस्त्ररहित; अंगावर वस्त्र न घेतलेला.

२ उघडा होणें किंवा उघडा पडणें—निराश्रित होणें; आधाररहित होणें. अनुकंपा करणारें माणूस नाहीसें होणें. उ० माझी कन्या कनवाळू असल्यामुळें ती वृद्धापकाळीं माझी सर्व प्रकारें शुश्रूषा करीलसें मला वाटत होतें. तिला ज्वर येऊन ती काल रात्रीं वारली. आतां मी उघडा झालों. आतां या जगांत मला दुसरें कोणी राहिलें नाही. कृष्णशास्त्री चिपळूणकर,—रासेलस.

३ एखाद्याला उघडा करणें किंवा पाडणें—त्याला देऊं केलेली मदत न दिल्यामुळे त्याला संकटांत, पेचांत किंवा पश्चाइत्तींत पाडणें. उ० दुकान उघडण्याला निम्में भांडवल मी देईन, असें मधुसूदनपंत म्हणाला होता; पण त्याने एक पैहि भांडवल दिलें नाही, आणि मला आयत्या वेळीं उघडें पाडलें!

४ उघडा करणें किंवा पाडणें—प्रसिद्ध करणें; लपवून ठेवावयाची गोष्ट प्रकट करणें. ह्याच अर्थानें " उघड्यावर आणणें " याचा उपयोग होतो.

५ उघड्या माथ्यानें—

(क) न संकोचतां, न कचरतां.

(ख) निर्लज्जपणानें.

७१८. उचलला किंवा उचललेला

१ उचललेला पगार—ठरवून टाकलेला किंवा नेमस्त केलेला पगार.

२ उचललेले काम—अंगीकारलेलें किंवा पतकरलेलें काम.

३ उचलला हात—स्वेच्छेने द्यावयासाठी पुढे केलेला हात. उ० आईबाप जें उचलल्या हाताने मला देतील, तें मी घेत असतों

४ उचलला संसार—तुटपुंज्या प्राप्तीवर चालविलेला संसार.

७१९ उडाणटप्पू—जो कोणी एका विषयावर फार वेळ गुंतून न राहतां एकावरून दुसऱ्यावर व दुसऱ्यावरून तिसऱ्यावर जातो तो, अस्थिर, चंचल, हातीं घेतलेलें कोणतेंहि काम पुरतेपणीं करीत नाही तो.

७२०. उणा

१ उणा—कमी, कमती. योग्य किंवा आवश्यक असें नेहमींचें जें परिमाण त्याच्यापेक्षा कमी.

२ उणादुणा—कमीजास्ती, मर्यादा सोडून असलेला, अपमानकारक. उ० 'कोणाला उणेंदुणें बोलणें बोलू नये !

३ उणें उत्तर—अपमानकारक किंवा तिरस्कारव्यंजक भाषण. उ० मी कोणाला उणें उत्तर कधीं करीत नाहीं आणि कोणाचें उणें उत्तर ऐकून घेत नाहीं !

४ एखाद्याचें उणें काढणें—त्याच्या अंगचा उणेपणा स्पष्ट शब्दांनी बोलून दाखविणें. त्याचीं वर्मेंकर्मे काढणें किंवा तीं काढून त्याला टोमणें मारणें. उ० शेजारणीचें उणें काढण्यांत मला गे बाई काय मोक्ष मिळावयाचा आहे ?

५ उणा पुरा—सुमारें. उ० मला पुण्यास आल्याला उणापुरा एक महिना झाला. उ० आम्ही आनेमोहराचे तांदूळ खाऊं लागल्याला उणें पुरें एक वर्ष झालें.

६ अंगीं उणा तर जाणे खाणाखुणा—त्याला आपला कमीपणा ठाऊक आहे, त्याला लोकांची टीका पटते

७२१ उपटसुंभ—हक्क नसता एखाद्या स्थानावर किंवा अधिकाराच्या पदावर, येऊन बसतो तो. वशिल्याच्या जोरावर जो मनुष्य इतरास तुच्छून वरच्या जागेवर जातो तो. [ टीप—ह्या शब्दाचें " उपटसुम्या " असेंहि रूप योजण्यात येतें ].

## ७२२. उभा

१. उभा—

(क) न बसलेला. उ० उभा राहून किती वेळ बोलशील? या झोपाळ्यावर येऊन बैस.

(ख) उभा केलेला; आडवा न ठेवलेला. उ० तें कपाट या खोलींत उभें करावयाला जागा नाही.

(ग) सिद्ध; तयार. उ० माझें घर विकत घ्यावयास कोणी उभा राहिला, म्हणजे मी घराची किंमत सांगेन.

(घ) चालू. उ० माझें घर बांधण्याचें काम आज उभें आहे.

२ उभा पहारा—खडा पहारा; काळजीपूर्वक केलेली राखण.

३ उभें काम—जरुरीचें किंवा चालढकलीवर न लोटण्याजोगें काम. उ० माझीं अगदीं उभीं कामें तीन आहेत. वनभोजनास तुमच्या मंडळीबरोबर यावयाला मला अगदी फुरसत नाही.

४ उभें वैर, उभा दावा किंवा द्वेष—जागतें; न विझलेलें; न विझणारें; न विझण्याजोगें; वैर इ०.

५ उभा बाजार—सबंध बाजार; ह्या टोकापासून त्या टोकापर्यंतचा सर्व बाजार. उ० तू दाखविलेल्या रंगाची लोकर उभ्या बाजारात मिळत नाही.

६ उभें पीक—न कापलेलें पीक.

७ उभें वर्ष—सबंध वर्ष; आरंभापासून तों अखेरपर्यंतचें वर्ष. उ० उभ्या वर्षांत मी आईबापांना भेटलों नाहीं. उ० उभ्या वर्षाला पुरण्याइतकी हळद मीं चैत्रांत दळली, पण माझ्या सुनेनें ती चार महिन्यातच संपवून टाकली!

८ उभा दोरा—धावरी शिवण; ह्याच्या उलट "टीप".

९ उभा वारा—अस्खलित; न खळणारा वारा.

१०. उभा पाऊस—

(क) ज्याच्या धारा लांब रेषेंत पडत असतात, असा पाऊस. ह्याच्या उलट "वाकडा पाऊस".

(ख) न खळणारा; एकसारखा पडत असलेला पाऊस.

११ उभा रस्ता—सबंध किंवा सरळ रस्ता.

१२ उभा लगाम—कमानदार लगाम.

१३ उभी चाकरी—श्रमदायक, जिकिरीची नोकरी. (जी करताना विश्रांतीसाठी बसावयाला फुरसत सापडत नाही).

१४ उभी चौथ—कृष्णपक्षातील चतुर्थीच्या दिवशीं सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत पायांवर उभें राहण्याचें व्रत पाळणारे लोक ह्या तिथीस, "उभी चौथ" असें म्हणतात.

१५ उभी दुपार किंवा उभे दोन प्रहर—ऐन मध्यान्ह.

१६ उभी रास—वांटण्या पाडावयाच्या अगोदर रास करून ठेवलेलें पीक किंवा धान्य.

१७ उभी विळी—न मिटणारी विळी.

१८ उभें दुखणें—अंथरुणाला न खिळविणारें दुखणें; साधारण दुखणें; जें आलें असतां मनुष्य हिंडूं फिरूं शकतो.

१९ उभी कुडी—उंच आणि सडपातळ बांधा. उ० विश्वंभररावांची गाय उभ्या कुडीची आहे.

२० उभा खडपा, उभा सूळ किंवा उभा सुळका—लंब रेषेंत असलेली डोंगराची बाजू.

२१ समशेर घेऊन उभा—दोष काढून शासन करावयास तयार.

[ फारसी—शम्शेर म्ह० तरवार ].

२२ उभा करणें—

( क ) थांबविणें. उ० गाडी उभी कर.

( ख ) लंबरेषेंत ठेवणें. उ० समई आडवी पडली आहे; ती उभी कर.

( ग ) परत मिळविणें. उ० चिंचेच्या व्यापारांत पडलेलें भांडवल उभें केल्या शिवाय सच्चिदानंदराव तांदुळांत एक पैसाहि घालणार नाही !

२३ एखाद्याला उभा धरणें—त्याला छळींत किंवा तगादा करीत राहणें; त्याला विश्रांति न घेऊं देणें. उ० तुझें मूल भारी रडकें; आज सारा दिवस त्यानें मला उभें धरलें आहे. उ० सावकारानें विश्वंभरभटाला कर्जासाठी आज आठ दिवस उभें धरलें आहे.

२४ एखाद्याला उभा जाळणें—त्याला जाच करणें किंवा छळणें.

२५ घामानें उभा न्हाणें—घामानें सर्वांगीं डबडबून जाणें. उ० तुमच्या गावाला उष्मा फार. मी घामानें उभा न्हालों आहें ( म्ह० घामानें चिंब भिजून गेलों आहें ).

२६. उभा राहणें—

( क ) मिळणें; परत मिळणें; वसूल होणें. उ० द्राक्षांच्या व्यापारांत घातलेलें हुकुमचंदाचें भांडवल अद्यापि सारें उभें राहिलें नाही.

( ख ) सिद्ध होणें; तयार असणें. उ० माझ्याशीं वेदान्तावर बोलावयाला तुमच्यापैकी कोण उभा राहतो, तो राहूं द्या. मी त्याला हार जाणार नाही !

( ग ) जवळ येऊन ठेपणें. उ० माझ्या मुलीचें लग्न उभें राहिलें आहे. तुम्हांला उसनें द्यावयाला मजजवळ पैसे कसे मिळणार ?

(घ) प्रतिबंध किंवा अडथळा करावयास वाटेंत येणें. उ० आम्हांसारख्या गरिबांच्या हौसा कशा भागाव्या? जेथे तेथें पैशाची उणीव उभी राहते.

(ङ) घडून येणें. उ० त्या वेळीं एक गोष्ट उभी राहिली. तेणेंकरून व्यंकटरावाचा बेत जागच्या जागींच राहिला.

२७ एखाद्याला उभा असणें—त्याला मदत करावयाला तत्पर असणें. उ० आम्हांसारख्या गरिबाला कोण उभा राहणार?

२८ एखाद्याच्या सावलीस उभें न राहणें—त्याची संगत न धरणें; त्याला टाळणें उ०

शत्रुशीं करुनि सख्य बांधवा गाजि त्या लव दया न दाखवा।
सावलीसहि न त्याचिया उभें राहणें उचित, तें हरी शुभें॥
—वि० वा० भिडे.

२९ उभ्याने यावें आणि ओणव्याने जावें—येते समयीं आपण ताठ्यात आलों, तरी जातांना नम्रपणाने जाण्याला कचरूं नये (म्हणजे प्रसंग पडेल तशा रीतीने वागावयास आपली तयारी असली पाहिजे).

३० उभें नेसणें, उभें लावून घेणें किंवा उभें लावणें—*लुगडें वगैरे अंगाभोवती अर्धवट गुंडाळून घेणें. [ घाईच्या वेळीं लुगडें नेसण्याची ही एक बायकाची तऱ्हा आहे ].*

३१ उभा इंद्र करणें—एखाद्या कामाला पुन्हा सुरुवात करणें.

३२ एखाद्याला उभें वारें सुटणें—त्याला अस्वस्थ वाटणें किंवा चैन पडेनासें होणें. उ० तुझ्या पोरीला मी पुन्हा आपल्या घरीं राहावयाला नेणार नाही; मागल्या शनिवारीं तिला नेली होती, तेव्हा तिला जसें उभें वारें सुटलें होतें!

३३ उभांग माणूस—अंगापिंडानें ताठ आणि उभ्या कुडीचा माणूस. [ उभांग = उभें आहे अंग ज्याचें, असा ].

७२३. उष्टा

१. उष्टा—

(क) खाऊन किंवा भोगून उरलेला. उ० ही उष्टी भाकरी कुत्र्याला टाक.

(ख) अर्धवट; पुरतेपणीं भोगून किंवा वापरून टाकून दिलेला. उ०, तें खोब्रें नारायणाने उष्टें केलेलें आहे. तें तूं खाऊ नको.

(ग) खाणें किंवा पिणें झाल्यानंतर तोंड किंवा हात ज्याने धुतले नाहीत असा. उ० मी उष्टा आहें. आंचवून आल्यावर हीं मोतीं पाहीन.

(घ) खाणें किंवा पिणें झाल्यावर न धुतलेले असे हात किंवा तोंड. उ० उष्ट्या हाताने तो कावळा देखील हाकलणार नाही (म्हणजे तो अत्यंत अदत्त,

चिक्कू आहे. न धुतलेल्या हाताने कावळा हाकलल्यास एखादें शीत उडून कदाचित् कावळ्याच्या जवळ पडेल आणि तें त्याला खावयाला मिळेल, म्हणून).

२ उष्टी कल्पना—दुसऱ्या माणसाने पूर्वी काढलेली, परतु आतां नवीन म्हणून सांगण्यात येणारी कल्पना उ० उष्ट्या कल्पनांनी तुझें पुस्तक भरलें आहे याच अर्थाने "उष्टा विचार," "उष्टें भाषण" वगैरेंचा उपयोग केला जातो.

३ उष्टा बोल—पूर्वी कोणीतरी काढलेला किंवा सुचविलेला, परंतु आता आपला म्हणून दिमाखाने सांगितला जाणारा विचार

४ उष्टा विटाळ—जेवीत असता किंवा जेवणें झाल्यावर आंचवावयाच्या अगोदरचा अपवित्रपणा. उ० उष्ट्या विटाळाने मला किंवा ह्या पाण्याच्या हंड्याला शिवू नको.

५ उष्टी हळद—वधूच्या घरीं देवदेवक बसावयाच्या आधी वधूस न्हावयास घालून तिच्या अंगास लावून उरलेली हळद वराच्या अंगास लावण्यासाठी वाजत गाजत नेतात, ती हळद किंवा ती हळद नेण्याचा विधि

६ उष्टेरळी—उष्टें अन्न टाकून धावयासाठी केलेला खड्डा.

७ उष्टा नवरा—बिजवराचा नवरा उ० इतके दिवस कमळीला स्थळें पाहता पाहतां शेवटीं तिला उष्टा नवरा पतकरावा लागला!

७२४ उसने धैर्य, बळ किंवा अवसान—उसनें म्हणजे खरोखरी अंगीं नसलेलें किंवा जें आहे, त्याची शिकस्त किंवा पराकाष्ठा.

७२५ एकछत्री राज्य—एका राजाच्या हाताखालचा प्रदेश, (ज्या प्रदेशावर दुसरा कोणीहि मालकी सांगावयाला येऊ शकत नाही असा).

७२६ काळातून ओढलेला—खावयाला न मिळाल्यामुळे किडकिडीत, उपासमारीमुळे जो मरावयाचा, परतु मेला नाही असा, अति हडकुळा. उ० चाद्रिका-बाईंचीं मुलें जशीं काळातून ओढल्यासारखीं दिसतात!

## ७२७. ओला

१. ओला—

(क) ज्यांत पाण्याचा अंश मुरला आहे असा; भिजलेला, कोरडा नव्हे तो.

(ख) रसाळ, वाळून शुष्क न झालेला. उ० ही गुळवेलीची मुळी ओली आहे, तोपर्यंत तिचें सत्त्व काढा.

(ग) पैकेवाला, कंगाल नव्हे असा. उ० श्रीरामपंत राहतो भिकाऱ्यासारखा, पण तो आंतून चांगला ओला आहे बरें का!

(घ) फायदेशीर. उ० रिकाड्याचा व्यापार पहिल्यासारखा आता ओला राहिला नाही.

(ङ) ज्यांत पैसे खळखळत आहेत असा (हात); पैसे खर्चावयाला तयार असा (हात). उ० "हात ओला तर मैत्र भला."

२ ओलें कोरडें पाहून जेवणें—चोखंदळेपणाने जेवणें.

३ ओलें जाळणें—कडक अंमल चालविणें; क्रूरपणाने अधिकार चालविणें.

४ ओली कोरडी भाकर—अल्पस्वल्प, जाडेंभरडें अन्न. उ० प्रामाणिकपणाने जी ओली कोरडी भाकर मिळेल, तिची योग्यता लुच्चेगिरीने मिळालेल्या तूपसाखरेपेक्षा जास्ती आहे. उ० लाळघोटेपणाने पंचपक्वान्नें मिळालीं, तरी स्वाभिमानाने मिळालेल्या ओल्या कोरड्या भाकरीहून तीं कमी दर्जाचीं होत!

७२८ और—आणखी. ह्या परभाषेंतून आलेल्या शब्दाचा हा मूळचा अर्थ नष्ट होऊन त्याचा अर्थ "विचित्र, आश्चर्यकारक, मूर्खपणाचा" असा झाला आहे. खुद्द मराठींतील "आणखी" हाहि शब्द "आणीक" ह्या रूपाने विचित्र, आश्चर्यकारक, मूर्खपणाचा ह्या अर्थानीं योजला जातो. "न्यारा" हा शब्द "निराळा" ह्याचा अपभ्रंश असून तोहि विचित्र, आश्चर्यकारक, मूर्खपणाचा ह्या अर्थानी योजला जातो. और, आणीक आणि न्यारा हे रानवट किंवा अशुद्ध शब्द आहेत, तरी सभ्य आणि सुशिक्षित वर्गानें त्यांचा स्वीकार केलेला आहे. ते विद्यार्थ्यांनी योजावयाला कचरण्याचें कारण नाही. ह्या शब्दात थोडासा विनोद किंवा उपहास असतो. उ० आपल्या स्वतःच्या देशांत, स्वजनांच्या साहाय्याने, स्वदेशीयांच्या सुखासाठी, सुव्यस्थित स्वराज्य स्थापण्याचा प्रयत्न करणाऱ्या छत्रपति शिवाजी महाराजाना जे कोणी चोर, लुटारू आणि दरोडेखोर म्हणतात, याची सत्यप्रीति, विवेकबुद्धि, न्यायप्रियता, और (किंवा न्यारी किंवा आणीक) आहे!

### ७२९. कच्चा

१. कच्चा—

(क) अपक्व; पुरतेपणीं न शिजविलेला किंवा न पिकलेला. उ० साळूबाई, तुमचा आजचा भात कच्चा आहे.

(ख) अपुरता; ओबडधोबड; ज्यावर अद्यापि सफाईचा हात मारलेला नाही असा. उ० कच्चा खर्डा; कच्चा मसुदा; कच्चा वेत; कच्चें चित्र.

(ग) सरासरीचा; ठोकळ मानाचा. उ० कच्ची हकीकत; कच्चा हिशेब.

(घ) बळकट नव्हे असें. उ० मातीचें काम कच्चें असतें; चुन्याचें काम पक्कें असतें.

(ङ) इयत्तेहून कमी. उ० आम्ही एका तासांत एक कच्चा कोस चालतों!

२ कच्चींबच्चीं—कच्ची म्ह० अपक्व, बच्ची म्ह० पिलें. कच्चींबच्चीं = लहान मुलें.

७३० कवडीमोल—कवडी हें ज्याचें मोल आहे असा म्ह० अगदी बिनकिंमतीचा, टाकाऊ.

७३१ कागदी घोडे नाचविणे—कागदावर कोरडी वाटाघाट करणें. ज्याच्यापासून काही लाभ होण्याजोगा नाही असा खटाटोप करणें. [ लहान मुलें कागदाचे घोडे वगैरेंचीं चित्रें कातरून त्यांच्या सावल्या भिंतीवर पाडून त्या घोड्यांना नाचवून खेळ खेळतात. त्यावरून हा वाक्प्रचार उत्पन्न झाला आहे ].

७३२ काडीचा—काडीइतका देखील, अगदी थोडा देखील. उ० तू जे कागद लिहिलेस, त्याचा मला काडीचा उपयोग नाही!

## ७३३. काणा

१ डोळा काणा असावा, पण मुलूख काणा नसावा—डोळ्यांत काही व्यंग असलें तरी हरकत नाही, परंतु आपला देश धनधान्यादिकांच्या बाबतींत अपूर्ण किंवा असमृद्ध नसावा.

२ अंधळ्यांत काणा राजा—जेथे सारेच अडाणी आहेत, तेथे एखाद्या थोड्याशा शहाण्याचें तेज पडतें!

७३४ कातर वेळ—दिवस समाप्त व्हावयाचा आणि रात्र सुरू व्हावयाचा समय, ऐन सध्याकाळ.

## ७३५. काळा

१ कृष्णवर्ण. उ० कावळ्याचा रंग काळा.

२ काळें करणे—निघून जाणें, पळून जाणें. [ ह्याचा नेहमी वाईट अर्थानें उपयोग होतो ]. उ० माझ्या घरात तू क्षणभरहि राहू नको! ऊठ, काळें कर! उ० हा गुन्हा करून तुकारामाने काळें केलें!

टीपः—येथे "काळें" ह्याचें "तोंड" हें विशेषण अध्याहृत आहे.

३ काळ्याचे पांढरें होणें—म्हातारा होणें, केसांचा काळा वर्ण जाऊन ते पांढरे होणें. उ० तुमचे काळ्याचे पांढरे झाले, आणि अजून "विनंती विशेष" कोणाला लिहावें, आणि "विज्ञापना विशेष" कोणाला लिहावें, हें तुम्हाला समजूं नये काय?

४ काळा फत्तर—अगदी मूर्ख किंवा अडाणी माणूस.

५ काळी रात्र किंवा काळी शिळी रात्र—ऐन काळोखी रात्र (जेव्हा कोणाचीहि मदत मिळणें संभवनीय नसतें). उ० तुम्ही सोन्यात थेलाधाक पैसा घाला, कारण सोनें काळ्या रात्रीं उपयोगी पडतें.

६ काळें तोंड—मनुष्याने लाजिरवाणीं कृत्यें केल्यामुळे कलंकित झालेलें तोंड. उ० तुझें काळें तोंड दृष्टीआड कर एकदाचें!

७ काळें पाणी—मोठ्या अपराधाबद्दल शिक्षा म्हणून सरकारने गुन्हेगाराला जो दूरचा देश राहावयास ठरविलेला असतो तो. उ० खुनाच्या कृत्यात सामील असल्याच्या आरोपावरून तुकोबाला काळ्या पाण्यावर पाठविण्यात आलें.

८ काळेंबेरें—कपट. उ० माझ्या मनात काही काळेंबेरें नव्हतें.

७३६. काळी

१ काळी जमीन; शेतकीच्या उपयोगाची जमीन; शेतकीकडे लाविलेली जमीन. उ० हिंदुस्थानाच्या काळीचा एकंदर वसूल सुमारें तीस कोटी आहे. उ० काळी पिकली म्हणून पादरी वाचली (म्ह० शेतें चांगली पिकली म्हणून गाव किंवा गावात राहणारे लोक वाचले).

२ म्हैस. उ० "ज्याचे घरीं काळी, त्याची सदा दिवाळी."

७३७ गेला बाजार तरी—बाजाराची घडामोडीची वेळ सरल्यावर देखील; पुष्कळ गिऱ्हाईक नसताना देखील; किमानपक्षीं. उ० ह्या घड्याळाची मला गेला बाजार तरी सतरा रुपये किंमत येईल. [येथे "तरी" हा शब्द गाळला तरी चालतो].

७३८ घाशीरामी—जुलमी; मूर्खपणाची कारकीर्द. [पूर्वी "घाशीराम" ह्या नांवाचा एक मूर्ख आणि जुलमी कोतवाल होऊन गेला. त्यावरून हा शब्द निघालेला आहे].

७३९ चंगीभंगी—चैनबाजींत किंवा रंगेलपणांत् निमग्न; गांजा वगैरे व्यसनांच्या आधीन.

७४० चारी ठाव जेवणें—ताटाच्या चारी बाजू चार खाद्यांनी भरून जें जेवण, तें चारी ठाव जेवण. अनेक प्रकारचीं खाद्यें व तोंडीलावणीं यांचें जें जेवण तें. उ० आम्ही गरीब माणसें, आम्हांला कसचें चारी ठाव जेवण! भात आहे तर भाजी नाही, भाकरी आहे तर तूप नाही, अशी आमची स्थिति!

७४१ चारी दिशा मोकळ्या होणें—वाटेल तिकडे जाण्याला मोकळीक प्राप्त होणें.

७४२ चालत्या गाड्याला खीळ घालणें—सुरळीतपणें चालत असलेल्या कामांत विघ्न आणणें; सुरळीत चाललेल्या गतीला प्रतिबंध करणें.

७४३ चावून चिकट—पुष्कळ वेळपर्यंत चावल्यामुळे चिकट झालेला. लाक्षणिक अर्थानें—फार वेळ वाटाघाट केल्यामुळे कंटाळवाणा झालेला.

७४४. छांदिष्ट

"छंदस्" ह्याचा पद्य किंवा वेद असा मूळचा अर्थ, संस्कृत भाषा ही एके काळीं प्रचलित म्हणजे बोलण्याची भाषा असल्याकारणाने प्रचलित भाषेच्या नियमांप्रमाणे तीमध्ये हरएक फेरफार कालगतीने होत गेले. ह्या नियमांप्रमाणे काही शब्द

व रूपें वगैरे हीं संस्कृत भाषेंतून नाहीशीं झालीं, तेव्हा त्यास 'छादस्' म्हणजे वेदांतील," असें पाणिन्यादि वैयाकरण्यांनी नाव दिलें. त्या वेळेस 'छादस्' शब्दामध्ये निंदेचा अर्थ बिलकूल नव्हता. परंतु "लोकव्यवहाराच्या बाहेरचा," असा सामान्य अर्थ घेऊन लोकानी "छादस्" शब्दाचा अर्थ तऱ्हेवाईक, चमत्कारिक, कोणाची पर्वा न बाळगणारा असा निंदाव्यंजक केला. उ० धीरेन्द्रराव हा भारी छादिष्ट माणूस आहे. वि० वा० भिडे,—मराठी शब्दार्थांचें उद्घाटन.

७४५. जागता

१. जागता—दक्ष, सामर्थ्य, अधिकार, कर्तबगारी, शक्ति इत्यादिकानी परिपूर्ण.

२ जागतें देवस्थान—जेथील देव कडक आहे, असें स्थान.

३ जागता मंत्र—इष्ट कार्य घडवून आणावयाला पूर्णपणें समर्थ असा मंत्र.

४ जागतें औषध—निश्चयानें गुण करणारें औषध; रामबाण औषध.

५ जागता धर्म—लोकाकडून शुद्ध स्वरूपात पाळला जाणारा धर्म.

६ जागती भाषा—प्रचलित, किंवा चालू अशी भाषा. उ० आज मराठी जागती भाषा आहे संस्कृत जागती नाही.

७. जागती ज्योत—

(क) कडक देव किंवा मंत्र.

(ख) अत्यंत दक्ष म्ह० सर्व बाजूंस सारखी नजर ठेवून असणारा माणूस.

८ जागतें ज्ञान, जागती विद्या—न विसरलेलें ज्ञान किंवा विद्या. प्रसंगीं उपयोगी पडेल, असें ज्ञान किंवा अशी विद्या.

९ जागती झोप—गाढ नव्हे अशी झोप.

७४६. जातीचा—

(क) खरा; इरसाल; जातिवंत. उ० जातीचा घोडा.

(ख) हाडाचा; स्वभावतः. उ० मुरराव हा जातीचा गरीब मुलगा आहे.

७४७ टळटळीत दुपारीं—भर दुपारीं; ऐन दोन प्रहरीं.

७४८. डोळस

१. डोळस—

(क) डोळ्यांनी पाहावयाला समर्थ (ह्याच्या उलट अधळा).

(ख) ज्याची नजर भारी तीक्ष्ण अथवा सूक्ष्म आहे असा.

(ग) शहाणा; चाणाक्ष; धूर्त; हुषार.

२ डोळस वरण—ज्यांतील डाळींचीं सालपटें शिजविण्याच्या पूर्वी निवडून काढलेलीं नाहीत, असें वरण.

७४९ ताकपिठ्या—पात्रांमध्ये ताकपिठाची जी योग्यता, त्या योग्यतेचा

माणूस; भिकार, हलक्या दर्जाचा. उ० रामनवमीला आम्हाला एक ताकपिठ्या हरदास मिळाला होता.

७५०. तिखट

१. तिखट—

(क) जिभेला झोंबणारा. उ० लवंगी मिरची भारी तिखट असते. उ० साळुकाबाईचा मसाला फार तिखट असतो.

(ख) प्रखर; जीव कासावीस करणारा. उ० आजचें उन्ह भारी तिखट आहे.

(ग) तीक्ष्ण धारेचें. उ० ही विळी फार तिखट आहे.

(घ) लवकर जाणण्याची, समजण्याची किंवा ओळखण्याची ज्याला ताकद आहे असा. उ० तिखट कान; तिखट डोळे, तिखट बुद्धि इत्यादि.

(ङ) मर्मभेदक; काळजाला घरे पाडणारें. उ० त्या वक्त्याचें भाषण फार तिखट होतें.

२ पदार्थांत तिखटमीठ घालणे—पदार्थ रुचकर करण्यासाठी त्यात मसाला वगैरे घालणें.

३ एखादी गोष्ट तिखटमीठ लावून सांगणे—अतिशयोक्ति करून किंवा लोकाना विशेष मनोरंजक होईल अशा शैलीनें एखादी गोष्ट सांगणें. [ मागे लेखांक ३०४ पाहा ].

४ कानामागून आले शिंगाडे झालें अतितिखट—गुरांना जन्मत च कान असतात आणि नतर कित्येक दिवसांनी शिंगें फुटतात; परतु हीं मागून उत्पन्न झालेलींच शिंगें कानापेक्षा अधिक बोचणारीं व अधिक उपद्रव करणारीं असतात. ह्या दाखल्यावरून लहान माणूस मोठ्या माणसाला उपदेश करू लागला किंवा त्याचे दोष दाखवू लागला म्हणजे त्याची निंदा करताना हें वाक्य योजतात

५ पुढे तिखट आणि मागे पोंचट—पहिल्याने अवसान दाखवून नंतर भ्याडपणामुळे मागे हटणारा.

७५१ तैलबुद्धि—बुद्धिमान् माणूस पाण्यावर तेल जसें पसरतें तशी ज्याची बुद्धि एखाद्या विषयावर पसरते, म्हणजे एखाद्या विषयाचें आक्रमण किंवा आकलन करते, असा माणूस.

७५२. थक्क

१ आश्चर्यादि भावनानी स्तब्ध झालेला

२ थक्क करणें—आश्चर्य वाटविणें उ० आपला जोसेफ जगाला थक्क करून सोडील × × हें त्या बिचारीच्या स्वप्नांतहि कधी आलें नसेल!

न० चिं० केळकर,—ग्यारिबॉल्डी.

७५३ दर्भ्या—मृताची उत्तरक्रिया सांगणारा ब्राह्मण. [ पुण्याकडे त्याला "कारटा" असें म्हणतात तो हातात दर्भ घेऊन तयार असतो. ह्यावरून त्याला "दर्भ्या" असा शब्द योजतात. व्यवहारांत त्याचा अर्थ "अपशकुनी, नाशकारक, उपद्रवी माणूस" असा होतो ].

७५४ दरिद्रनाम संवत्सरे—अत्यंत दरिद्री, ज्या संवत्सराचें नाव "दरिद्र" असें आहे, तें संवत्सर म्ह० वर्ष. ज्या वर्षात दारिद्र्य भोगावें लागतें तें वर्ष, असा मूळचा अर्थ, नंतर "अत्यंत दरिद्री" असा अर्थ झाला.

७५५ दिवटा—नेअकली माणूस "दिवटी" म्हणजे मशाल. मशाल प्रकाश पाडते, तसा हा माणूस आपल्या कुळावर पराक्रमाने प्रकाश पाडतो "प्रकाश" ह्याचा लाक्षणिक अर्थ काळोखी किंवा काळिमा

७५६. दीड

१ एक आणि अर्धा मिळून जें परिमाण, तितका.

२ दीड शहाणा, दीड चतुर—आपणाला इतर लोकांपेक्षा दीडपट अक्कल आहे असें समजणारा, पण खरोखरी ज्याला मुळीच अक्कल नाही असा माणूस, मूर्ख, बेअकली मनुष्य.

३ दीड दमडीचा—ज्याची किंमत दीड दमडी म्ह० अत्यल्प आहे, असा कुचकिंमतीचा, भिकार, नादान

४ दीड दमडीचा शिपाई—भितरा म्हणून लढण्याच्या कामीं ज्याचा कांही उपयोग नाही, असा शिपाई.

७५७ द्राक्षापाकात्मक—अतिस्पष्ट, उघड आणि मधुर, क्लेश न देणारा. उ० द्राक्षापाकात्मक जी कविता तीच उत्कृष्ट होय

७५८ नसता—निरुपयोगी, अनावश्यक. उ० यमकादिकांच्या नसत्या अढचणी लावून घेतल्याने मराठी कवितेंत कमीपणा आला आहे, असें कित्येकांचें म्हणणें आहे उ० नसत्या पचाईतींत तू पडतोस कशाला ?

७५९ नावाचा—

(क) खरा, त्या नावाला खरोखरी योग्य. उ० हें काम मी नरसिंगगिरजी-कडून करवीन, तरच नावाचा !

(ख) नावापुरताच, केवळ नाव धारण करणारा, नामधारी उ० सारा कार भार वजिराच्या हातात असे हा नावाचा मात्र बादशहा होता.

७६० लेखणीचा धड—लेखनाच्या कामीं जो चतुर तो

७६१ पंडितंमन्य—अंगीं विद्वत्ता नसून जो आपण पंडित म्हणून दिमाख मिरवितो तो.

७६२. पांढरा

१ पांढरा—श्वेतवर्ण; शुभ्र; सफेत.

२ पांढऱ्या पायाचा—वाईट गुणाचा; अपशकुनी. उ० हें पांढऱ्या पायाचें पोर घरात आल्यापासून आमच्या कुटुंबामध्ये कलागती सुरू झाल्या !

३ पांढरा कावळा—निसर्गात नसलेली वस्तु. [ खपुष्प, वंध्यापुत्र, शशशृंग वगैरेंप्रमाणें ].

४ पांढरा परीस—लबाड माणूस; अट्टल सोदा.

५ पांढरी पोळी—साधी पोळी (पुरणपोळी, गुळाची पोळी इ० नव्हे ती).

६. पांढरें पाणी—पातळ ताक. उ० आम्हां कोकणस्थाना मागल्या भातावर थोडेंतरी पांढरें पाणी लागतेंच; तुम्हा देशस्थाचें आंबट वरणावर चालतें.

७ पांढरीचा डोळा—गावचा महार.

८ पांढऱ्यावर काळें करणें—कागदावर नमूद करणें. लिहिणें. [ कागदाचा रंग पांढरा असतो व शाईचा रंग काळा असतो. त्यावरून ह्या वाक्याचा अर्थ "कागदावर लिहिणें," असा झाला ]. उ० तोंडाने हवें तें बोला, पण कधी पांढऱ्यावर काळें करूं नका ( म्हणजे लेखाने आपणास बांधून किंवा अडकावून घेऊं नका ). उ० श्रीशिवाजी छत्रपति महाराज यांना पांढऱ्यावर काळें करतां येत नसे, असें मूर्खपणाचें विधान डफ नावाच्या एका इंग्रज इतिहासकाराने केलें आहे, तें साफ खोटें आहे, असें कै० वि० का० राजवाडे, आबा चांदोरकर, वगैरे विद्वानांनी अनेक प्रमाणावरून सिद्ध केलें आहे.

९ पांढऱ्या मिशाचे किंवा पांढऱ्या मिशावाले—म्हातारे लोक. उ० पांढऱ्या मिशावाले देखील ओंवळ्याने जेवतात; मग आम्हा पोराना कां हसता ?

७६३ पाताळयंत्री—गुप्त मसलती करणारा; ज्याचें यंत्र पाताळात ठेविलें असल्यामुळे दिसत नाही, पण ते कळ दाबल्याबरोबर पृथ्वीवर कार्य घडविलें, अशा यंत्राप्रमाणे आपलें इष्ट साधणारा ( माणूस ).

७६४ पायलीचे पंधरा—अतिविपुल.

७६५. पालथा

१ ज्याचें तोंड खाली आहे असा. उ० पालथ्या घागरीवर पाणी ओतणें, हें फुकट आहे.

२ घर, गाव, वगैरे पालथें घालणें—

( क ) हरवलेली वस्तु शोधण्यासाठी घर, गाव वगैरेंचा कानाकोपरा पाहणें. उ० चमेलीबाईंचा एक दोन आणे किंमतीचा पुटका चांदीचा मणि हरवला होता. त्याच्यासाठी तिने सारें घर पालथें घातलें !

(ए) घर, गाव वगैरेंमध्ये भटकणें. उ० ह्या मुलाला रांगतां येऊं लागल्यापासून तें सारें घर पालथें घालूं लागलें आहे. उ० शामूला सुटी असली म्हणजे तो सारा गाव पालथा घालतो!

३ एखाद्याला पालथा घालणें—त्याला पराजित करणें. उ० गोविंदशास्त्री आरनाळकर मोठ्या ऐटीनें न्यायशास्त्रावर बचंभटशास्त्री पुणेंकर यांच्याशीं वादविवाद करावयास आले, पण त्यांना आमच्या पुणेंकर शास्त्र्यांनी ऐसें पालथें घातलें की यवरे यव!

७६६ पोकळ—रिकामा. ज्यात तथ्य, सत्त्व, खरेपणा नाहीं असा. उ० पोकळ डामडौल, पोकळ वचन किंवा प्रतिज्ञा, पोकळ बढाई, पोकळ अवसान, पोकळ सनद, पोकळ जमाखर्च, पोकळ खरेदीखत इ०.

७६७ फाटक्या अंगाचा—कृश; रोडका; हाडक्या.

७६८ फुटक्या तिन्हीसांजा—ऐन संध्याकाळच्या सुरुवातीस किंवा अगदी संधिप्रकाश सुरू होतो तोंच. उ० फुटक्या तिन्ही सांजा मी तुम्हांला खायला कांहीदेखील देणार नाहीं! ("फुटक्या तिन्ही सांजा," ही शब्दसहति नामाप्रमाणेंहि योजली जाते).

७६९—बद्दू होणें—कलंकित होणें. उ० कोणाचेंहि नांव एकदा बद्दू झालें, म्हणजे त्याचा जन्म फुकट जातो! [फारसी – बद् = वाईट].

७७० बत्तीसगुणी किंवा बत्तीसलक्षणी—पुरुषांचीं व बायकांचीं लक्षणें ३२ कल्पिलीं आहेत. तीं सारीं ज्या पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या ठायीं आहेत, असा पुरुष किंवा अशी बायको.

७७१ बारा घरचे बारा—अनेक ठिकाणचे अनेक, परस्परांशीं कोणत्याहि नात्यानें संबद्ध नाहीत असे.

७७२ बारा बदरचें पाणी प्यालेला—चवचाल माणूस, अनुभविक माणूस.

७७३. बालबोध

१ *मुलांना समजण्यासारखें; सोपें.*

२ एक प्रकारची लिपि. [ज्या लिपींत हें पुस्तक छापलेलें आहे ती. याच्या उलट "मोडी लिपि"]

३ बालबोध माणूस—सरळपणानें वागणारा; ज्याला छक्केपंजे ठाऊक नाहींत असा माणूस.

४ बालबोध घर—ज्या घरांत सारीं माणसें सरळमार्गी आणि नीतिमान् आहेत, असें घर. ज्या घरात अलीकडचे ढंग, चारगटपणा किंवा पद्धति शिरल्या नाहीत असें घर. त्याचप्रमाणें "बालबोध घराणें," "बालबोध कुटुंब," हे प्रयोग योजतात.

७७४ विलंदर लुचा—अट्टल लुचा. "बुलद" ह्या फारसी शब्दाचा "उंच" असा अर्थ असून मराठींत विलद किंवा विलदर ह्याचा "अट्टल सोदा" असा अर्थ झाला आहे.

७७५ बेगडी—दिसण्यांत भपकेदार पण आंतून हलका, पोकळ किंवा नकली. उ० बेगडी मानमरातबाला भुलून पुष्कळ नराधम आपल्या देशबांधवांना शत्रूंच्या हवालीं करतात.!

७७६ मरतमढ्यासारखा—अशक्त. उ० तुला खायला यथेच्छ मिळत असून असा मरतमढ्यासारखा कां दिसतोस (चालतोस, किंवा काम करतोस)? [मढ्याच्या अंगात कांही शक्ति किंवा काम करण्याचें सामर्थ्य नसतें, त्याच्यामागे "मरत," हें पुनरुक्तिपर विशेषण अर्थ जोरदार करण्याकरिता जोडिलेलें आहे].

७७७ मामळभट्टी—अजागळ, गैरती, बावळट असा जो मनुष्य, त्याला मामळभटाची उपमा देतात आणि बावळटासारखें जें कांही तें मामळभट्टी उ० आज हें असें मामळभट्टी धोतर का नेसलाव? "गोठणऱ्या गाई आणि मामळभट दान देई," ह्या म्हणींत "मामळभट" म्हणजे कोणी तरी मूर्ख किंवा वेडा माणूस असा अर्थ आहे

७७८. मुका

१ मुकें यंत्र—चालताना, म्ह० काम करीत असता, ज्याचा आवाज होत नाही किंवा विशेषसा आवाज होत नाही असें यंत्र (त्याचप्रमाणे "मुका चरक," "मुका घाणा" वगैरेचा उपयोग होतो).

२ मुकी अर्जी—एखाद्याची नालस्ती करण्यासाठी बिनसहीचा किंवा खोट्या सहीनें केलेला अर्ज उ० मुक्या अर्ज्या करून गोंद्याने आजपर्यंत कितीतरी लोकांचीं नुकसानें केलीं आहेत

३ मुकी मण्यार—हिरवट माणूस

४ मुकें जनावर—ज्याला बोलतां येत नाही, असें जनावर, ज्याला मारलें असता ओरडून आपलें दु:ख व्यक्त करता येत नाहीं, असें जनावर. उ० मुक्या जनावराला मारणें फार वाईट आहे!

टीप—येथे "मुकें" हा शब्द जनावराची दीन स्थिति जोरदार रीतीनें दाखविण्यासाठी योजलेला आहे

७७९ मेला किंवा मेलेला

१. मेला किंवा मेलेला—

(क) ज्याच्या शरिरातून प्राण निघून गेला आहे, असा (प्राणी), मृत.

(ख) ज्याची जीवनक्रिया आणि वर्धनक्रिया बंद झाली आहे, असें (झाड).

(ग) ज्याचें वीर्य (म्ह० विरी) नष्ट झालें आहे असा (चुना वगैरे).

२ मेली भाकर—ज्याच्या अंगीं पोट भरण्याची धमक नाही आणि जो दुसऱ्यावर भारभूत होऊन राहतो, तो जें अन्न खातो, त्याला "मेलेलें अन्न" किंवा "मेलेली भाकर" असें म्हणतात.

३ मेलेले काम—निरुत्साहानें केलेलें किंवा चालविलेलें काम.

४ मेलेलें तेल—समई वगैरे दिवा मालविल्यावर जें अवशिष्ट तेल तें. दीपुटेल.

५ मेलेलें पाणी—आधण आणून नंतर पिण्यासाठी गार केलेलें पाणी.

६ मेलेले रक्त—(क) म्हातारपणामुळे अंगातील रक्त कमजोर होतें, तें. (ख) त्वचेला सुई वगैरे टोचून ज्याला कळत नाही त्याचें रक्त.

७ मेलेले हत्यार—निरुपयोगी हत्यार.

८ मेलेल्या आईचें दूध प्यालेला—कर्तृत्वशून्य. उ० मला कशाला भीति घालतोस? मी काही मेलेल्या आईचें दूध प्यालेला नाही! तू एक रट्टा चढविलास तर मी दहा चढवीन!

७८० मनासारखा—इच्छिल्याप्रमाणे; आवडण्याजोगा; जसा हवा किंवा असावा तसा. उ० सोलापुरास चार वर्षांत माझीं दहा बिऱ्हाडें झालीं; पण मनासारखें एकहि बिऱ्हाड मला मिळालें नाही!

७८१ म्हणण्यासारखा—फार चांगला, तादृश; विशेषसा किंवा वाखाणण्यासारखा; आवडण्याजोगा! उदा० तो लांबटाण्या असून शर्यतींत म्हणण्यासारखा पुढे आला नाही. उ०, त्या हरदासाची कथा काही म्हणण्यासारखी नसते.

७८२ यथास्थित—जितकें पाहिजे असेल तितकें; खूप, मनमुराद; तृप्ति होण्याइतकें. उ० आम्ही मास्तराच्या दुकानात यथास्थित मर्जी खाल्ली.

उ० लोकांच्या घरीं जेवावयाला गेल्यावर यथास्थित पक्वान्नें खावीं! मागे पुढे पाहू नये!

टीप—"यथास्थित," ह्याचा मूळचा अर्थ "जसें होतें तसेंच असलेलें."

७८३. मोकळा

१. मोकळा—

(क) न बांधलेला; न जखडलेला. उ० तो बैल मोकळा सुटला होता. त्याने यथेच्छ शेत खाल्लें.

(ख) कडी, कुलूप, झाकण वगैरेंनीं बंद न केलेलें. उ० दार मोकळें टाकूं नको. येथे चोरट्यांचा फार उपद्रव आहे.

(ग) जेथे वसति, बिऱ्हाड, माणसें वगैरे नाहीत असा. उ० सध्या ही खोली अगदी मोकळी आहे. येथे तुम्ही राहा.

(घ) त्रासापासून सुटका झालेला. उ० ह्या गळ्याला जी रग लागली होती

ती कांही पुसूं नका. त्याला पोटीस लावून तें पिकवून फोडलें आणि त्यांतील पू बाहेर काढला, तेव्हा रग थांबली आणि मी मोकळा झालों.

(ङ) ज्याच्यावर दाब नाही; ज्याला कोणी आवरणारा नाही; ज्याला कांही जाच नाही असा. उ० तुम्ही गावीं गेल्यापासून तुमचा मुलगा मोकळा सुटल्यासारखा झाला आहे. तो रोज सिनेमाला जात असतो. त्याच्याजवळ इतके पैसे कोठून येतात कोण जाणे !

(च) शंका न बाळगणारा; संकोच न धरणारा; आडपडदा न ठेवणारा.

उ० खुष होऊन ते घनगर मोठ्या संतोषानें व मोकळ्या मनानें त्याशीं संभाषण करावयास लागले. कृष्णशास्त्री चिपळूणकर,—रासेलस.

२. तोंड मोकळें सोडणें—

(क) यथेच्छ बोलणें; शिव्या देत सुटणें.

(ख) मनास येईल तितकें खाणें.

३. हात मोकळा सोडणें—

(क) औदार्य दाखविणें.

(ख) अनियंत्रितपणें वागणें.

४. कंठ मोकळा करणें—

(क) मोठा आवाज काढणें. उ०

मोकळा करुनि कंठ तेधवा आठवोनि मनिं जानकीधवा ।
ते रडे, भरतही तसा रडे जोवरी नयन होति कोरडे ॥

वामनपंडित,—भरतभाव.

(ख) गावयाच्या पूर्वी खाकरून वगैरे घसा स्वच्छ करणें.

## ७८४ रिकामा

१. रिकामा—

(क) पोकळ; ज्याच्या आत कांही नाही असा. उ० ही घागर रिकामी आहे (म्ह० पाण्यानें भरलेली नाही). उ० हें घर रिकामें आहे (म्ह० त्यांत कोणी राहात नाही). उ० ही खोली रिकामी आहे (म्ह० हींत कांही सामानसुमान नाही).

(ख) पुराव्यानें, प्रमाणानें, उदाहरणानें वगैरे ज्याची सत्यता किंवा यथार्थता सिद्ध करून देतां येत नाही असा; ज्यात तथ्यांश नाही असा; निराधार. उ० रिकामा डौल; रिकामी स्तुति.

(ग) ज्या जागेवरचा अधिकारी किंवा कोणीहि काम करणारा, गैरहजर आहे किंवा अद्यापि नेमिलेला नाही अशी. उ० ह्या कचेरींत तीन कारकुनांच्या जागा रिकाम्या आहेत.

(घ) निरर्थक; निष्फळ; निष्प्रयोजक. उ० रिकामी दगदग, रिकामी पायपिटी, रिकामी चौकशी, रिकामें बोलणें, रिकामे ढंग इ०.

(ङ) जरूर ती सामग्री, हत्यारें वगैरे ज्याच्याजवळ नाहीत असा. उदा० माझीं हत्यारें सारीं घरीं आहेत. मी रिकामा तुमच्या घरीं येऊन काय करणार?

(च) ज्याला उद्योग किंवा धंदा नाही असा. उ० "रिकामा न्हावी भिंतीला (किंवा कुडाला) तुंबड्या लावी." उ० माझा पुतण्या बी. ए. पास झाल्यापासून रिकामा आहे. कोठे नोकरी असल्यास सांगा.

(छ) एकटा. उ० मी तुला पुढे घालून घेऊन जाणार. रिकामा परत जाणार नाहीं (म्ह० तुला बरोबर घेतल्याशिवाय).

(ज) कोणाच्याहि मालकीचा नसलेला; बिनवारशी. (उ० आर्यांनी दक्षिणेकडील हा दंडकारण्याचा भाग कोणापासून जिंकून घेतला, असें म्हणण्यापेक्षा त्यांना तो रिकामा सापडून त्यांनी तेथे वसाहती केल्या, असे म्हणणेंच अधिक जुळेल.

चिं० वि० वैद्य,—मध्ययुगीन भारत.

२ रिकामटेकडा; रिकामटवळा—निरुद्योगी.

३ रिकामा वेळ—फुरसतीचा वेळ.

४ रिकाम्या रानीं—पुढे क्रियाविशेषणांच्या प्रकरणांत पाहा.

## ७८५. रोकडा

१. रोकडा—

(क) नाण्याच्या रूपाने असलेला (पैसा). उ० आम्ही लोक श्रीमंत असतों, पंचवीस पंचवीस माणसांचीं कुटुंबें पोसतों, परंतु आमच्या जवळ कधीं रोकडा पैसा असावयाचा नाही.

(ख) रोकठोक; स्पष्ट; शंकाबाह्य; संशय न राहूं देणारा; धडधडीत. उ० रोकडें प्रमाण; रोकडा पुरावा.

२ रोकडा जबाब—भीड किंवा मुरवत न बाळगतां स्पष्ट शब्दांनी दिलेलें उत्तर. उ० माझा तुझ्यावर काडीइतका देखील भरवसा नाही, असा रोकडा जबाब भोलागीरने आपल्या नोकरास दिला.

## ७८६. लंगडा

१. लंगडा—

(क) ज्याच्या पायांत कांही उणेपणा आहे आणि म्हणून ज्याला नीट चालतां येत नाही असा (माणूस, जनावर इ०).

(ख) ज्यांत कांही उणेपणा असल्याकारणाने ज्याने नीट चालतां येत नाही असा (पाय).

(ग) जरूर ती वस्तु, भाग, अवयव, बळकटी किंवा ताकद नसल्यामुळे कामाला निरुपयोगी असें. उ० लंगडें यंत्र, लंगडा पुरावा वगैरे.

(घ) ज्याच्या मदतीला हुशार किंवा कर्तेगार इसम नाही, असा माणूस. उ० माझा हेडक्लार्क रजेवर गेल्यामुळे मी अगदी लंगडा झालों आहें!

७८७ लठ्ठ—स्थूल, जाडी. "लट्ठ निरंजन" किंवा "लठ्ठ भारती," ह्याचाहि तोच अर्थ होतो.

७८८ लब्धप्रतिष्ठ किंवा लब्धप्रतिष्ठित—जो खरोखरी प्रतिष्ठित नाही, पण प्रतिष्ठितपणाचा डौल दाखवितो व लोकांनी आपणाला मोठेपणा द्यावा, अशी इच्छा करतो तो., [संस्कृत—मिळविली आहे कीर्ति किंवा मानमान्यता ज्याने असा. व्यवहारांत "लब्धप्रतिष्ठ," "लब्धप्रतिष्ठित," ह्याचा उपयोग नेहेमी उपहासाने करतात].

७८९. लोणकढें—

(क) शुद्ध लोणी; कढवून तयार केलेलें (तूप); साजूक (तूप).

(ख) अगदी खोटा; बनावट. उ० लोणकढी थाप; लोणकढी बात इ०

७९०. वाकडा

१. वाकडा—

(क) सरळ नाही तो. उ० वाकडा रस्ता.

(ख) प्रतिकूल; वैरी. उ० जगन्नाथपंताला कासोपंत वाकडा होता, म्हणून ती जागा त्याला मिळाली नाही.

(ग) योग्य तो मान, योग्य त्या माणसाला किंवा वस्तूला, जो देत नाही तो. उ० सन्मार्गाला वाकडा असूं नको.

२ एखाद्याला वाकडे दाखविणें—त्याला वेडावणें; त्याच्यापुढे तोंडें वेडीं-वाकडीं करणें.

३ वाकडी पगडी करून—दिमाखाने; बेमुरवतीने.

४ वाकडे पाऊल पडणें—भलत्याच मार्गाने जाणें. उ० उगीच भरमसाटपणें बोलूं नका. माझें कोठे वाकडें पाऊल पडलें आहे तें दाखवा आणि मग बेलाशक माझा कान उपटा!

५. वाकडी नजर किंवा वाकडा डोळा—

(क) नुकसान करावयाच्या इच्छेने फेकलेली दृष्टि; नुकसान करावयाची इच्छा. उ० तू माझ्याकडे वाकड्या नजरेने पाहूं लागलास, तर मी किती दिवस टिकाव धरूं शकेन? उ० राममाऊंच्या घराकडे देवाने वाकडी नजर केली आहे खास!

(ख) पापी दृष्टि. उ० विठ्ठलराव वाकड्या नजरेने स्त्रियांकडे पाहतात.

६ वाकडी समजूत—खोटा ग्रह; वस्तुस्थितीशीं न जमणारें मत.

### ७९१. वेडा

१. वेडा—

(क) ज्याच्या मेंदूत बिघाड झाला आहे असा. उ० हा वेडा आहे.

(ख) मूर्ख; मूर्खपणाचा उ० वेड्यासारखा बोल नको. उ० ही वेडी कल्पना तुझ्या डोक्यात कोणीं भरवून दिली?

(ग) आसक्त—मोहित. उ० त्या गवयाने मला अगदी वेडा करून सोडलें!

२ वेडें पीक—एकदा येऊ लागलें म्हणजे पुष्कळ येणारें पीक.

३ वेडा पीर—मूर्ख, मगरगट्ट्या माणूस.

४ वेडा मधुरा—घाम न येता चाळीस दिवस टिकणारा ताप.

५ वेडे चार, वेडे चाळे—मूर्खपणाचीं कृत्यें.

७९२ शंभर नंबरी—अत्यंत शुद्ध; शुद्धतेचे शंभर गुण धरले, तर शंभरचे शंभर गुण ज्यात आहेत असा; ज्यात बिल्कूल भेसळ नाही असा. उ० शंभर नंबरी सोनें.

७९३ शुष्काशुष्की— निरुपयोगी, निष्फल, कोरडा, रुक्ष.

### ७९४. शाळू

१ शाळू दिवस म्ह० हिंवाळ्याचे दिवस, ज्यात सूर्य क्षितिजाच्यावर बारा तासांहून कमी वेळ असतो, ते दिवस.

२ शाळू सोबती—ज्याचा सहवास थोडे दिवसच आपणास लाभावयाचा आहे, असा माणूस याचप्रमाणे "शाळू ऐश्वर्य" किंवा "शाळू आयुष्य" म्हणजे क्षणभंगुर ऐश्वर्य किंवा आयुष्य.

टीप.—"शाळू" म्हणून जोंधळ्याची एक जात आहे. ह्या जातीचा जोंधळा हिंवाळ्यात पिकतो आणि हिंवाळ्याचे दिवस फार लहान असतात, ह्यावरून "शाळू" म्ह० थोड्या मुदतीचा अल्पकाळ टिकणारा, क्षणभंगुर असा अर्थ रूढ झाला.

७९५ शिकंदर—म्यासिडोनियाचा "सिकंदर" म्हणून एक पराक्रमी राजा होऊन गेला. शिकंदर, अल्सिकंदर, असकंदर व अलेक्झांडर हीं त्याच शब्दाचीं भिन्न भिन्न रूपें होत (लाक्षणिक अर्थाने "शिकंदर" ह्याचा अर्थ गावचा पुंड, वात्रट, द्वाड माणूस असा होतो. शिकंदर नशीब म्ह० मोठ्या संकटातून निभावून किंवा बचावून नेणारें जें नशीब किंवा दैव, तें

७९६ सर्वतोमुखी—सर्व लोक जी बोलत आहेत किंवा सांगत आहेत ती (बातमी इ०). उ० नहिरोबा त्या खुनाच्या आरोपांतून निर्दोषी म्हणून सुटला, ही बातमी घटकेच्या आंत सर्वतोमुखी झाली. टीप—सर्वतोमुखी ह्या क्रियाविशेषणरूप शब्दाचाहि वरीलप्रमाणेच अर्थ होऊं शकेल.

७९७ सांगोपांग—पूर्ण अंगें आणि उपांगें यासहवर्तमान असलेला. उ० *बालविवाह ह्या विषयाचें त्या वक्त्यानें सांगोपांग विवरण केलें.*

७९८ शेणामेणाचा—अशक्त.

७९९ सात ताड उंच—अतिशय उंच. [ ताडाचें झाड बिनफांद्याचें असतें, म्हणून तें आहे त्यापेक्षा जास्ती उंच दिसतें. एकावर एक सात ताड उभे करून होणारी जी उंची, ती सात ताड उंची ].

८०० सांबापुढचा किंवा शंकरापुढचा—बिनअकली, बेवकूब माणूस; अजागळ. [ देवळांत सांबाच्या मूर्तीपुढे नंदीबैलाची मूर्ति असते. " सांबापुढचा " ह्या विशेषणाचें विशेष्य " नंदीबैल " हें अध्याहृत आहे ].

८०१ साळसूद—सरळमार्गी. [ सं० शालाशुद्ध. " शाला " म्ह० शिक्षण. ज्याला शुद्ध वळण आहे, ज्याच्या ठायीं लबाडी किंवा वक्रता नाहीं असा ].

८०२ सुमाराचा—मध्यम प्रतीचा; साधारण.

८०३ सूर्यवंशी—सूर्य उगवल्यानंतर उठणारा ( माणूस ).

८०४ सोळा आणे—पूर्ण. उ० *अच्युतरावांची सोळा आणे फजिती झाली.* [ रुपयाचे सोळा आणे म्हणजे पूर्ण रुपया; सबंध रुपया ].

८०५ कानाचा हलका—कोणीं कांहीहि गोष्ट सांगितली, तरी ती खरी समजून चालणारा.



८०६ नामें, सर्वनामें किंवा विशेषणें यांच्याशीं क्रियापदें साहचर्यानें येऊन जे वाक्प्रचार होतात, त्यांपैकीं शेकडों आतापर्यंत येऊन गेले आणि हजारों अजून न आलेले असे आहेत. हे न आलेले सर्व वाक्प्रचार क्रियापदांच्या सदरांत सामील करावयास पाहिजेत. परंतु त्यांची संख्या फारच मोठी आहे. एक एक क्रियापद घेऊन त्याचे वेगळे वेगळे अर्थ देणें व त्याच्या बरोबर योजिलीं जाणारीं जीं नामें, विशेषणें वगैरे आहेत, तीं देऊन त्यांचे अर्थ देणें व त्यांना उदाहरणें देऊन त्यांचें स्पष्टीकरण करणें, हें फार मोठें काम आहे. यासाठीं या क्रियापदांच्या सदरांत सुमारें ४० क्रियापदें नमुन्यादाखल घेऊन त्यांचे आम्ही अर्थ देतों. त्याच्या विवरणावरून विद्यार्थ्यांना ह्या विषयाची दिशा समजेल. आम्हीं हीं जीं क्रियापदें नमुन्यांसाठीं घेतलीं आहेत, तीं मुद्दाम विशेष महत्त्वाचीं म्हणून निवडून घेतलेलीं आहेत, असें समजूं नये.

८०७. अंतरणें

१ अंतरावर किंवा दूर जाणें आवश्यक होणें; उपभोगाची शक्यता न राहणें; दूर पडणें; मुकणें.

२ नष्ट होणें; नाहींसें होणें; करणें किंवा आचरणें अशक्य होणें—उ० मी आजारी असल्यामुळे कालचें माझें देवदर्शन अंतरलें. चांगल्या सज्जन व शानी लोकांच्या भाषणापासून व उपदेशापासून जो लाभ व्हावयाचा, तोहि पण असें केल्यानें अंतरला.

कृष्णशास्त्री चिपळूणकर,—रासेलस.

३ एखाद्या माणसाला किंवा पदार्थाला अंतरणें—त्यांच्यापासून दूर अंतरावर जाणें जरूर पडणें किंवा होणें; त्याला मुकणें; त्याच्यापासून नाइलाजास्तव दूर होणें किंवा वियुक्त होणें. उ० तेथून माझी बदली येथे झाल्याकारणानें मी तेथच्या सुदर्शनबोवांच्या बोधामृताला अंतरलों.

४ एखाद्याचे पाय अंतरणें—त्याच्या पायांची सेवा करण्याची संधि नष्ट होणें; त्याच्या सहवासाला मुकणें. उ० ज्या देदीप्यमान, तेजोमय, सौभाग्यसूर्याच्या प्रकाशात मी मोठ्या भूषणानें व खऱ्या आनंदानें एकसारखीं सत्तावीस वर्षें वागत होतें, ते प्रत्यक्ष सेवा घेणारे दिव्य-सूर्यरूपी पाय मला अंतरल्यामुळे, अत्यंत दुःखरूप निबिड अंधारांत चांचपडत राहण्याचा प्रसंग येऊन पोहोंचला ! —श्री० रमाबाई रानडे.

८०८. आंचवणें

१ भोजनानंतर हात आणि तोंड ह्यांना अन्नाचे अवशेष चिकटलेले किंवा अडकलेले असतात, ते पाण्यानें धुऊन टाकणें.

२ (एखाद्या माणसाच्या सहवासाला, एखाद्या सुखाला किंवा चैनीला) आंचवणें—त्याचा उपभोग घेण्याला कोणत्याहि कारणानें असमर्थ होणें

किंवा न शकणें. उ० मी आदित्यवारीं आजारी पडलों, म्हणून तुमच्या वनभोजनाच्या मौजेस मी आंचवलों.

### ८०९. आठवणें

१ स्मरणांत येणें. उ० तो श्लोक मला चांगला पाठ येत होता, पण तो आयत्या वेळीं मला आठवेना.

२ भिकेचे डोहाळे आठवणें—[ मागे ले० ४५२ ( ५ ) पाहा ].

३ अवदसा आठवणें—[ मागे ले० ८२ ( २ ) पाहा ].

### ८१०. आणणें

१ घेऊन येणें. उ० तें पुस्तक इकडे आण.

२ अंतर्भूत करणें. उ० करणीचे पैसे हुंड्यातच आणा ( म्ह० हुंड्यांतच सामील करा ).

३ ( थोडक्यांत ) आणणें—साराशरूपानें सांगणें; संक्षेपानें देणें. उ० त्या दरवड्याच्या प्रसंगीं घडलेली हकीकत मी थोडक्यांत आणून तुम्हांला लिहीत आहे.

४ मनाला आणणें—मनावर घेणें; महत्त्वाचें समजणें. उ० मी रागाच्या वेळीं तुम्हाला बोललों, तें मनाला आणूं नका.

५ मनांत आणणें—करावयाचा संकल्प करणें; पतकरणें. उ० तूं मनांत आणलेंस तर माझें काम सहज होण्याजोगें आहे.

६ लागवडीस आणणें—शेताच्या उपयोगाला जमीन येईल, असें करणें. उ० आर्य लोक उत्तरेकडून खालीं येऊं लागले, तेव्हा त्यांनी तेथील जंगलें तोडून जमीन साफ केली व ती लागवडीस आणली.

चिंतामण विनायक वैद्य,—मध्ययुगीन भारत.

टीपः—" आणणें, " हें क्रियापद " ईत " प्रत्ययान्त कोणत्याहि क्रियापदाशीं जोडलें असतां त्या क्रियापदाची क्रिया बहुतेक पूर्ण झाली आहे, असा अर्थ होतो. उ० ही भिंत मीं बांधीत आणली होती, म्ह० बहुतेक बांधिली होती.

### ८११. उचलणें ( सकर्मक )

१ खालून वर घेणें किंवा नेणें. उ० हा धोंडा शिदरामण्णानें उचलला.

२ पतकरणें; स्वीकारणें; तत्परतेनें करूं लागणें. उ० सर्वांनी आपापली कामें उचललीं असतां संसारांत घोटाळा होत नाहीं.

३ मालकास न विचारतां त्याची वस्तु घेणें. [ वाईट अर्थानें ]

४ उचल्या—अनाहारबुद्धीनें दुसऱ्याची वस्तु जो त्याची नजर चुकवून घेतो, तो; भामटा.

५ विडा उचलणें—तत्परतेनें करावयाचा बेत, निश्चय किंवा संकल्प विधि-

पूर्वक करणें. उ० तूं मला छळण्याचा विडा उचलला आहेस की काय ? [ मागे ले० ५४२ पाहा ].

६ पैजेचा विडा उचलणें—मी अमुक गोष्ट करीन, अशी प्रतिज्ञा भोगणें. [ मागे ले० ३८५ व ५४३ पाहा ]. उ०

विडा पैजेचा उचलुं नको, उगी तराजू तोलुं नको,
गहाण कुणाचें डुलुं नको. —अनंतफंदी.

७ बेलभंडार उचलणें—शपथ घेणें. शपथ घेतेवेळीं देवावरील बेलभंडार उचलण्याची चाल आहे. [ मागे ले० ४३९ पाहा ].

८ जीभ उचलणें—बोलण्यासाठी किंवा बोलताना जीभ हालविणें. उ० उचलली जीभ आणि लावली टाळ्याला, हें करणें निंद्य आहे ( म्ह० विचारावांचून बोलणें निंद्य आहे ).

९ तंटा उचलणें—पुन्हा तंटा उत्पन्न किंवा उपस्थित करणें.

१० एखाद्याला उचलून धरणें— त्याचा पक्ष घेणें, त्याची तरफदारी करणें. उ० समर्थानें उचलून धरलें, म्हणजे बगलबच्चयाच्या वैभवाला काय उणें ? उ० दहा रुपड्यासाठी सावकारानें आज महिनाभर मला उचलून धरिलें आहे ( म्ह० तगादा लाविला आहे ). उ० त्या भिकाऱ्यानें मघापासून आम्हाला उचलून धरिलें आहे भिक्षेसाठी तो आम्हाला त्रास–उपद्रव देत आहे ).

११ उचलून देणें—वेगळें काढून देणें. उ० तू आमच्यांत जेवावयाला आलास तर कर्ज तरी भागविता येईल पण तुला बोर्डींगांत राहावयासाठी पांच रुपयेदेखील उचलून देणें आम्हाला जड जाईल.

## ८१२. उचलणें (अकर्मक)

१ उत्पन्न होणें, फुगणें; उठणें उ० गळू कालच उचललें; लाटा जोरानें उचलत होत्या, हा उकिरडा भारी लवकर उचलला ( म्ह० वाढला, फुगला ); ही जमीन शेणामातीनें सारवा म्हणजे ती लवकर उचलणार नाही ( म्ह० तिच्यावर पोपडे धरणार नाहीत ), आभाळांत एकाएकी ढग उचलले ( म्ह० गोळा झाले, दिसू लागले ).

२ उंचीनें वाढणें. उ० दोन दिवस पाऊस लागताच हीं रोपें उचललीं.

३ उचलून येणें किंवा उचलणें—यातीची भावना होणें, कळमळणें. उ० कालच्या उपोषणामुळे आज मला क्षणोक्षणीं उचलतें आहे.

४ उचलून जाणें—वऱ्हाडी माणसें बरोबर घेऊन वधूपक्षानें (किंवा वरपक्षानें) वरपक्षाचे ( किंवा वधूपक्षाचे ) गांवीं लग्नासाठी जाणें.

५ उचलून बोलणें किंवा उचलून गोष्टी सांगणें—वढाईखोरपणानें किंवा ऐटीनें व आपला दर्जा न ओळखतां बोलणें.

## ८१३. उठणें

१. उठणें—

(क) ताजा होणें; टवटवीत होणें; जोराने वाढणें. उ० या झाडावर थोडासा पाऊस पडताच तीं उठतील.

(ख) चकचकीत होणें; स्पष्ट, सुंदर किंवा डोळ्यात भरण्याजोगा होणें. उ० ह्या चित्रावर सफाईचा हात देताच तें उठून दिसूं लागलें.

२ वठणें; आकृति उमटून दिसूं लागणें. उ० चाबकाचे, काठीचे, छडीचे वळ बैलाचे अंगावर उठले आहेत.

३ (एखाद्या माणसावर) उठणें—त्याच्यावर हल्ला करावयास, त्याला निंदावयास, त्याची अपकीर्ति करावयास किंवा त्याला छळावयास सरसावणें.

४ उठून जाणें—रागाने किंवा परवानगीवांचून निघून जाणें; चालतें होणें. उ० लोकांनी त्याची यट्टा सुरू करताच तो मंडळींतून उठून गेला!

५ रोज उठून किंवा नित्य उठून—रोजच्या रोज; दररोज; फार फार वेळां. उ० रोज उठून तुम्हाला ताक आम्हीं कोठून पुरवावें?

६ मनुष्यांतून किंवा माणसांतून उठणे—नीति, अनीति, पाप, पुण्य वगैरेंची परवा न करता वागत असणें.

## ८१४. उडविणें

१ उडावयास लावणें—उ० खबूतरें उडविणें, पतंग उडविणें इ०.

२ पैसे उडाविणें—अनावश्यक किंवा विलासाच्या वस्तूंवर खर्च करणें. उ० डोमेनिकोचा आजा पुरा दरिद्री होता व त्याच्या बापाने जें काय दोन पैसे मिळविले होते, ते त्याचे त्यानेच मूर्खपणाने सट्टयाचे व्यापारधंदे व चैनबाजी करून उडवूनहि टाकिले होते. न० चिं० केळकर,—ग्यारिबाल्डी.

३ एखादी जिन्नस उडविणे—ती खर्चून टाकणें; तिचा फन्ना करणें. उ० विनायक, सदाशिव आणि पुंडलीक ह्यांनी दोन शेर पोडणीचे पोहे एका घटकेंत उडविले.

४ आपल्यावरचा दोष उडाविणें—त्या दोषास आपण पात्र नाही, असें सिद्ध करून देणें.

५ प्रश्न उडाविणें—प्रश्न टाळणें.

## ८१५. उद्धरणें

१ खालून वर नेणें; उचलणें.

२ हीन दीन स्थितींतून काढून वैभवाच्या स्थितीस नेणें; स्वर्गादि उत्कृष्ट

लोकीं पोचविणें. उ० भगीरथानें आपल्या भस्मीभूत पितराना स्वर्गीय गंगा पाताळांतून आणून उद्धरिलें.

३ वरील अर्थाची विपरीत लक्षणा होऊन "एखाद्याचे पितर उद्धरणें," ह्याचा अर्थ "त्याच्या पितरांना शिव्या देणें," असा झाला.

## ८१६. ओढणें

[ ह्या क्रियापदाचे काही वाक्प्रचार मात्र पुढे दिले आहेत ].

१ खेचणें; आकर्षिणें ( चाकू, लिळा वगैरेंनी ) रेघ काढणें. उ० माझा हात ओढूं नको. येथे तांबड्या शाईची रेघ ओढ. त्या गवयाच्या तानांकडे माझें लक्ष्य ओढलें गेलें.

२ ओढून धरणें—ताणणें; एखादा सौदा किंवा व्यवहार जुळविण्यांत आपला हेका न सोडणें.

३ ओढून विकणें—महागाईच्या दरानें विकणें.

४ जमीन ओढणें—ती लागवडींत आणणें.

५ एखाद्याला गुवावरून ओढणें—त्याची फजिती करणें; त्याला रागें भरणें. उ० शाम्याला त्याची आई रोज गुवावरून ओढते, पण त्याचें आपलें आहे तें आहेच !

६ री ओढणें—गवयाचा मदतनीस त्याच्या शेवटच्या शब्दाचा जो सूर लांबवितो, त्याला "री" असें म्हणतात; तो सूर लांबविणें ह्याला "री ओढणें" म्हणतात; यावरून एखाद्याची "री ओढवाणें" म्हणजे तो बोलेल तसें बोलणें ( त्याला दुजोरा किंवा पाठिंबा देण्यासाठी ). ह्या शब्दसंहतीचा निंदेमध्ये उपयोग केला जातो. उ० छत्रपति शिवाजी महाराज यांना लिहितां वाचतां येत नव्हतें. इंग्रजी इतिहासकार डफ् याच्या ह्या खोट्या सिद्धान्ताची री बऱ्याच परकीय इतिहासकारांनी ओढली आहे. —आत्रा चांदोरकर.

## ८१७. ओढवणें

१ वाईट, अनिष्ट गोष्ट, दुःख इत्यादि येणें, प्राप्त होणें किंवा भोगास येणें. उ० दैव, दुर्दैव, संकट, प्रसंग, कर्म इत्यादि ओढवणें. उ० त्या महाद्याच्या संगतीला हा श्यामू लागला नसता, तर ही पंचाईत त्याच्यावर ओढवली नसती.

२ चांगल्या अर्थानेंहि "दैव ओढवणें" याचा उपयोग होतो. उ० दैव ओढवलें, म्हणजे ऐश्वर्य आपणाला शोधीत येतें !

## ८१८. ओवाळणें

१ पूजेच्या वेळीं निरंजन वगैरे पदार्थ देवापुढे फिरविणें.

२ मंगलप्रसंगीं किंवा आहेर वगैरेंचे प्रसंगीं निरंजन किंवा लामण दिवा वगैरे एखाद्या माणसाच्या किंवा देवाच्या पुढे फिरविणें.

३ सुताने चंद्रास ओवाळणें—शुद्ध द्वितीयेला वस्त्राचें सूत काढून तें चंद्राला अर्पण करून त्याच्यापाशीं वस्त्राची समृद्धि मागणें.

४ दिवा ओवाळणें—देवापुढे किंवा एखादी वस्तु देवाप्रमाणे फारच पूज्य असें समजून, तिच्यापुढे निरंजन फिरवून भक्तिभाव दाखविणें. एखाद्या वस्तूविषयी तिरस्कार दाखविणें किंवा तिची निंदा करणें, असाहि विपरीत लक्षणेने ह्या वाक्प्रचाराचा उपयोग केला जातो. उ० अहाहा ! काय तुझी अक्कल तरी ! तिच्यावरून दिवे ओवाळावे !

५ ओवाळून टाकणें—(दुसऱ्या वस्तूच्या अपेक्षेने) तुच्छ, कुचकिमतीचा म्हणून फेकून देणें. (उत्कृष्ट पदार्थाच्या तुलनेने) एखादी वस्तु नादान ठरवून फेकून देणें किंवा अव्हेरणें. उ० ही मोतीं उत्कृष्ट आहेत खरीं ! कालचीं मोतीं ह्याच्यावरुन ओवाळून टाकावीं !

६ (बळी) ओवाळून टाकणें—आपणाला प्रिय अशा माणसाला कांही भूतपिशाचादिकाची बाधा झालेली असल्यास ती घालविण्यासाठी भात, तांदूळ, लिंबें वगैरे पदार्थ त्या माणसावरून ओवाळून टाकतात. तेणेंकरून ती बाधा त्या भात वगैरे पदार्थांत येते, अशी समजूत आहे. ह्या पदार्थांना "बळी" असें म्हणतात. ह्या वाक्प्रचारातील "बळी" ह्या कर्माचा लोप केला तरी चालतो. उ० त्या मुलाला दृष्ट लागली असेल; त्याच्यावरून मीठ-मोहोऱ्या ओवाळून टाक ! कृष्णरावावरून ओवाळून टाकल्यापासून त्यांच्या आजाराला उतार पडत चालला आहे !

७ एखाद्या माणसावरून जीव, प्राण किंवा देह ओवाळून टाकणें—त्या माणसाच्या मानाने आपला जीव, प्राण किंवा देह कांहीच किंमतीचा नाही आणि त्या माणसासाठी आम्ही आपला जीव, प्राण किंवा देहहि अर्पण करावयाला सिद्ध आहों, असें म्हणणें.

## ८१९. करणें

[ह्या क्रियापदाचे कांही वाक्प्रचार मात्र पुढे देतों].

१ अंगाचें पाणी करणें—फार श्रम सोसणें.

२ एखाद्याची उचलबांगडी करणें—त्याला त्याच्या मर्जीविरुद्ध एका ठिकाणाहून उचलून दुसरीकडे नेऊन ठेवणें.

३ मला भोवळ करते—मला भोंवळ आली आहे.

४ शर्थ (किंवा शर्त) करणें किंवा करून सोडणें—अत्यंत कसोशीचा प्रयत्न करणें; एखाद्या कामीं फार कष्ट सोसणें; कमाल करणें. उ० माझ्यावर डाव लावावा म्हणून रामण्णाने आपल्याकडून शर्थ केली; पण मी काय डाव लावून घेणार आहे ? उ० शाम्या, तुझ्या खेळण्याची शर्थ झाली ! थोडा तरी अभ्यास करीत जा ! पावसाने तर शर्थ करून सोडली आहे; क्षणभर देखील कसा तो उघडत नाही !

५ केलें न केलेंसे करणें—निष्काळजीपणाने, कुचरपणाने एखादे काम करणें.

६ पंक्तिप्रपंच किंवा पंक्तिभेद करणें—पक्षपात करणें; सर्वांशीं समभावाने न वागणें; आपल्या वशिल्याच्या माणसास ज्यास्ती देणें व इतरास कमी देणें. उ० म्हाला जें देणें असेल, तें सर्वांस सारखें द्या, अशा पंक्तिप्रपंच करूं नका.

## ८२०. कसणे

१ दोरीने बांधणें किंवा आवळणें.

२ कसोटीवर घासणें—( सोनें वगैरेंची परीक्षा करण्यासाठी ).

३ पारखणें. उ० ह्या गडयाला मीं कसून पाहिला आहे. तो चोरटा नाही.

४ व्यायामादिकाच्या योगाने बळकट करणें. उ० त्याचें अंग व्यायामाने चांगलें कसलेलें आहे. ( उपयोग सकर्मक किंवा अकर्मक ).

५ कास कसणे—[ मागे ले० ३४, उपांक ३ पाहा ].

## ८२१. काढणे ( सकर्मक )

१ एखादी वस्तु एखाद्या विशिष्ट ठिकाणावरून किंवा आधारावरून, दूर करणें किंवा उचलणें. उ० मी पेटींतून पाच रुपये काढले. उ० तरवार काढणें ( म्हणजे उपसणें ).

२ निर्मिणें, उत्पन्न करणें; सुरू करणें. उ० चित्र काढणें, रेघ काढणें; मागावर लुगडें काढणें; शाळा वर्तमानपत्र वगैरे काढणें; चाल काढणें. उ० बाळूकाकांनी शेतातून पाच मण बटाटे काढले.

३ लोटणें, घालविणें. उ० आमच्याजवळ एकहि पैसा नव्हता, म्हणून आम्हीं खाशिवाय पांच दिवस काढले.

४ शोधणें. उ० वाट काढणें; युक्ति, यत्न, औषध वगैरे काढणें.

५ दोष काढणें—दोष दाखवून देणें.

६ दुखणें काढणें, भूक काढणें—दुखणें, भूक वगैरेंची व्यथा किंवा त्रास सोसणें. उ० " दुखणें काढावें पोरानी आणि भूक काढावी गुरानी. "

७ दैव काढणें—वैभवास, ऊर्जितावस्थेस चढणें.

८ एखाद्याचें दुखणें काढणें—त्याच्या आजारात त्याची शुश्रूषा करणें.

९ तोंड काढणें—उपाय योजणें; अडचणींतून मोकळें होण्याची युक्ति करणें; इलाज शोधणें.

१० पाऊस तोंड बाहेर काढूं देत नाही—पाऊस इतका जोराचा आणि एकसारखा पडत आहे, कीं घराच्या बाहेर पडणें मुश्किलीचें झालें आहे.

११ एखाद्याची धिंड काढणें—त्याला गाढवावर बसवून सर्व गावभर फिरविणें ( त्याची अपकीर्ति किंवा उपहास करण्यासाठी पूर्वी सरकारी शिक्षेचा हा एक प्रकार होता ).

८२२. काढणें (अकर्मक)

१ बंद पडणें; खळणें; शमणें; निघणें; कमी होणें. उ० पाऊस काढला म्हणजे मी बाजारांत जाईन; तुझा ताप काढला म्हणजे तुला कोयनेल देईन.

८२३. खाणें

१ अन्नादि पदार्थ चर्वण करून जठरांत घालणें.

२ खर्च करावयास लावणें किंवा भाग पाडणें. उ० गोपाळरावानें माझा अर्धा तास खाल्ला; ह्या घरानें बळवंतरावाचे पांचशें रुपये खाल्ले; ह्या खटल्यानें त्या मारवाड्याचे १५०० रुपये खाल्ले.

३ पराजित करणें. उ० काशीकर शास्त्र्यानें पुण्याच्या रंगनाथशास्त्र्यांना एका क्षणांत खाऊन टाकलें!

४ खेळांत मारणें; निरुपयोगी करणें. उ० तुमच्या वजिरानें आमचा उंट खाल्ला.

५ हटविणें; कमजोर करणें; नाहींसा करणें. उ० तुमच्या औषधानें माझ्या खोकल्याला तीन दिवसांत खाऊन टाकिलें! नैट्रिक ॲसिड तांबें, पितळ वगैरे धातूंस खातें; हें कापड मळ खाणारें आहे.

६ अन्यायाच्या मार्गानें मिळविणें किंवा घेणें. उ० लाच खाणें; पैसा खाणें.

७ अनुभविणें; भोगणें; सेवणें; सोसणें. उ० हवा खाणें; विसावा खाणें; मार खाणें.

८ एखाद्याचा जीव खाणें—त्याला छळणें.

९ एखाद्याच्या जिवाला खाणें—ओंचणें. उ० तुझे शब्द माझ्या जिवाला खात आहेत.

१० शब्द, अक्षरें, वगैरे खाणें—लिहितांना किंवा बोलतांना शब्द वगळणें, म्ह० न लिहिणें किंवा न उच्चारणें.

११ दांत ओंठ खाणें—[ मागें ले० ५१, उपांक १८ पाहा ].

१२ तो डुलक्या खात आहे—त्याला डुलक्या येत आहेत.

१३ ठोकर खाणें—नुकसानीस पात्र होणें.

१४ एखाद्याला खायाला उठणें—त्याच्यावर हल्ला किंवा गहजब करावयास किंवा त्याच्यावर दोष लादण्यास आवेशानें सरसावणें.

१५ गटांगळ्या खाणें—पाण्यांत धडपडणें.

ऐसें वदे, रडे बहु, खाय गटकळ्या जळांत, करि "का! का!।"
धावे मराळ चरणीं कवळुनि काढी क्षणांत वरि काका ।। मोरोपंत.

१६ टक्केटोणपे खाणें—प्रतिकूल किंवा दुःखकारक स्थितीचा अनुभव प्राप्त होणें. उ० टक्केटोणपे खाऊनच माणसाला शहाणपण येतें!

## ८२४. घालणें

१ एखाद्या पदार्थात दुसरा पदार्थ घालणें—तो त्यांत शिरकावणें किंवा प्रविष्ट करणें. उ० पिशवींत पैसे घाल.

२ गहूं वगैरे दळावयाला घालणें—दळावयाचें काम सुरू करणें, धुणीं धुवायाला घालणें, घर बांधावयाला घालणें—धुवायला, बांधावयाला सुरुवात करणें.

३ त्याने मला हजार रुपयास घातलें—बुडविलें.

४ एखाद्यावर चोरीचा आळ घालणें—तूं चोरी केलीस असें त्याला म्हणणें.

५ भिंत, कूड वगैरे घालणें—बांधणें, रचणें किंवा उभारणें.

६ वाद, गोंधळ वगैरे घालणें—करणें किंवा माजविणें.

७ सणाच्या दिवशीं पुरण घालणें—पुरण हें खाद्य, खावयास किंवा नैवेद्यास सिद्ध करणें.

८ एखाद्याला शपथ घालणें—तूं अमुक गोष्ट कर किंवा करूं नको, असें म्हणून त्याच्यावर शपथेचा जोर ( किंवा आग्रह ) घालणें.

९ जेवण, समाराधना वगैरे घालणें—मित्र, ब्राह्मण, जातवाले, वगैरेंस भोजन अर्पण करणें.

१० उदाहरण, प्रश्न, कोडें वगैरे घालणें—सोडवावयासाठी देणें किंवा सांगणें.

११ एखाद्या कामाला हात घालणें—तें पतकरणें किंवा पतकरून करूं लागणें.

१२ उडी घालणें, झेप घालणें—उडी किंवा झेप मारणें.

१३ भीड घालणें—[ मागें लें० ४५३, ४ पहा ].

१४ दुकान, शाळा वगैरे घालणें—सुरू करणें किंवा मांडणें.

१५ चाल, सांप्रदाय वगैरे घालणें—प्रचलित करणें.

१६ एखाद्याच्या कानावर घालणें—त्याला कळविणें, निवेदिणें किंवा सांगणें.

१७ कित्त्यावर घालणें—अक्षराचा कित्ता गिरवून त्याप्रमाणे कागदावर शाईने अक्षर काढावयाला मुलाला शिकविण्याचा प्रारंभ करणें. उ० आपल्या इकडे मुलाला कित्त्यावर घालतात, तसा डोमेनिकोने जोसेफला लहानपणींच होडीवर घातला होता. न० चिं० केळकर,—ग्यारिबॉल्डी.

१८. कुत्र्याचे पाय मांजरावर आणि मांजराचे पाय कुत्र्यावर घालणें—

( क ) दोन माणसांत कलागत लावून देणें.

( ख ) अनीतीच्या खटपटी, लटपटी करणें.

१९ धाड घालणें—हल्ला करणें. उ० खाणीला बसलेला तो पोरगा दूर जाताच चिमण्यांनी त्या धान्यावर धाड घातली.

## ८२५. जळणें

१ अग्नीने दग्ध होणें. उ० हें लाकूड सारें जळालें; फोडणीचा जाळ छपराला लागून हें झोपडें जळालें.

२ मनोविकार तीव्र झाल्यामुळे प्रक्षुब्ध होणें. उ० रागाने (किंवा मत्सराने) तो जळत आहे.

३ ज्वराने तापून जाणें. उ० नारायण तापाने जसा जळतो आहे!

४ पीक जळणें—पीक वाळून जाणें. उ० वेळेवर पाऊस न पडल्यामुळे तुकोबाचीं पिकें जळून गेलीं.

५ पत्ता किंवा गंजीफ जळणें—पत्ता किंवा गंजीफ योग्य प्रसंगीं न टाकल्यामुळे किंवा अयोग्य प्रसंगीं टाकल्यामुळे निरुपयोगी होणें किंवा फुकट जाणें.

६ अंगांत राग, गर्व, मस्ती वगैरे जळणें—अतिरेकाला पोंचलेला असणें.

७ पैसा न जळणें—पैसा न संपणें. उ० कासोबा कशाला इतका कजूषपणा करतो तरी? त्याच्या घरांत जळतां जळणार नाही, इतका पैसा आहे!

८ जळत घर भाड्याने घेणें—हटकून नुकसान करणारी किंवा नाशास कारण होणारी वस्तु पतकरणें किंवा स्वीकारणें. उ० जळत घर भाड्याने आणि जुनें जोंधळे काढ्याने कोण घेणार?

९ जळत खांब खांद्यावर घेणें—दुसऱ्याचें उपद्रवकारक किंवा कष्टदायक काम लाभाची आशा नसतां पतकरणें.

## ८२६. जागणें

१ जागृत राहणें; झोप न घेतां बसणें.

२ प्रसंगीं आठवणें; उपयोगी पडणें किंवा कामास येणें. उ० आपल्या त्या त्रिविक्रम शास्त्र्यांनी कौमुदीची उजळणी तीन वर्षांत मुळीच केली नव्हती; परंतु गदाधर शास्त्र्याशीं वाद करताना ती प्रसंगाला जागली, म्हणून बरें झालें!

३ दक्ष असणें; सावध असणें; निष्काळजीपणा हातून होऊ न देणें. उ० चांगला राजा प्रजापालनीं जागतो.

४ कायम राहणें. उ० कोणतीहि कला व्यासंगाने टिकून राहते.

५ सत्याला किंवा नीतीला जागणें—सत्य स्मरून किंवा नीतीचें महत्त्व मनात आणून वागणें; सत्याचें किंवा नीतीचें उल्लंघन न होईल, अशा रीतीने वागणें.

६ सत्त्वाला जागणें—आपला मोठेपणा किंवा आपली इभ्रत कमी न होईल, असें करणें किंवा अशा रीतीने वागणें. उपयोगाच्या किंवा जरुरीच्या वेळीं उपयोगी पडणें.

त्या पाशाच्या कर्टी स्वल्पचि शाकाच लागलें होतें।
सत्परिचर्येंचि जडही समयीं सत्त्वासि जागलें हो! तें॥ —मोरोपंत.

## ८२७. जेवणें

१ भोजन करणें. उ० जेवीन तर तुपाशीं, नाहीतर उपाशी !

२ अनुभविणें. उ० पूर्वी लक्ष्मणरावानें जीं दुष्ट कृत्यें केलीं, त्याचें फळ तो जेवीत आहे.

३ दुसऱ्याच्या तोंडानें जेवणें—दुसरा बोलेल त्याप्रमाणे बोलणें (स्वतःला विचार करण्याची अक्कल नसल्यामुळे किंवा आपले विचार प्रगट केल्यास एखाद्या समर्थास घुस्सा येईल म्हणून). उ० त्या सभेंत सभासद पुष्कळ होते; पण बहुतेक अध्यक्षाच्या तोंडानें जेवणारेच होते !

४. जेवूं घालणे—

(क) ब्राह्मणादिकांस भोजन अर्पण करणें.

(ख) एखाद्याच्या जेवणाचा खर्च आपण सोसणें किंवा देणें.

५ जेवीन तर तुपाशीं, नाहीं तर उपाशी—मी मागितलेलें सर्व मला द्या. अर्धवट देऊं लागाल, तर मी मुळीच कांही घेणार नाहीं. माझ्या सर्व शर्ती तुम्हीं मान्य केल्या पाहिजेत टीपः—ह्या संप्रदायानें हट्टी स्वभावाचें वर्णन केलें जातें.

६ एखाद्याच्या बारशास जेवणें—मूल जन्मल्या दिवसापासून बाराव्या जो दिवस, त्याला किंवा त्या दिवसाच्या विधीला, "बारसें" म्हणतात. ह्या दिवशीं इष्टमित्रांना जेवावयास बोलावीत असतात. अशा प्रसंगीं जेवलेला मनुष्य त्या मुलापेक्षा वयानें, अनुभवानें व अकलेनें मोठा असणारच. यावरून "मी तुझ्या बारशास जेवलों आहें," याचा अर्थ "मी तुजपेक्षा मोठा आहें; तुजपेक्षा मला ज्यास्ती ज्ञान, अक्कल, अनुभव आहे; तुझ्या डावपेचांनीं मी फसावयाचा नाहीं," असा होतो.

टीपः—बारशाच्या दिवशीं घुगऱ्या म्ह० हरभऱ्याची उसळ, करावयाचा प्रघात आहे. यावरून "मीं तुझ्या बारशाच्या घुगऱ्या खाल्या आहेत," ह्याचाहि अर्थ वरच्याच सारखा होतो.

## ८२८. पडणे

१ पतन पावणें; एखाद्या स्थानापासून भ्रष्ट होणें; आधाररहित होणें. उ० झाडावरून फळ पडलें.

२ बंद होणें, चांगलासा न चालणें; कमी जोराचा होणें; मंदावणें; निरुपयोगी होणें. उ० वारा पडला. यंदा दुष्काळामुळे शालजोड्याचा व्यापार पडला. गातां गातां त्याचा घसा पडला.

३ मित्रत्व, सलोखा असणें किंवा जुळणें. उ० त्याचें माझें पडत नाहीं.

४ कर्मधर्मसंयोगानें असणें. उ० तो पडला ब्राह्मण, नाहीतर चढविले असते दोन रट्टे ! इंग्लंडचा राजा दुसरा चार्लस व शिवाजी यांची तुलना करतां यावयाची नाहीं. एक पडला विलासी व निरुद्योगी आणि दुसरा अगदीं त्याच्या उलट !
—गो० स० सरदेसाई.

५ एखाद्या वस्तूवर किंवा गोष्टीवर पडणें—ती तत्परतेने करूं लागणें; ती स्वीकारणें किंवा अंगीकारणें. उ० अलीकडे नीलकंठराव कादंबऱ्यावर पडला आहे. (म्ह० त्याने कादंबऱ्याच्या वाचनावर झोड दिली आहे).

६ येणें; सुरू होणें; दिसणें; पसरणें; उद्भवणें; शक्य असणें; होणें इ०. उ० अंधेर, प्रकाश, थंडी इ० पडणें. उ० त्याचे हातपाय गार पडले. रमाबाईने मिठाची वाण केली म्हणून तिच्या लोणच्यात किडे पडले. ह्या पद्यांत दोन पाठ पडतील.

७ रिकामें, निरुद्योगी बसणें. उ० येथे काय पडला आहेस? लाग एकदम कामाला!

८ लढाईत मारला जाणें. उ० संगमनेरची लढाई शिवाजीने जिंकली खरी, पण तींत शिधोजी निंबाळकर पडला (म्ह० मरण पावला).

९ एखाद्या कामांत पडणें—तें पतकरणें; त्यांत मन घालणें. उ० ज्या कामात विश्वंभरराव पडले, तें बिघडलें नाही, असें कधी व्हावयाचें नाही. तुझ्या कामात ब्राह्मण पडो!

१० आवश्यक होणें किंवा जरूर केलें पाहिजे असें होणें. उ० चिंतामणरावानी हातपाय गाळले, म्हणून मला हा त्रास सोसणें पडलें.

११ एखादा पदार्थ विकत घेतांना किंमत द्यावी लागणें. उ० नागपुरी उपरण्याना अकरा रुपये पडतात.

१२ घडून येणें.

१३ पराभूत होणें.

१४ जीव खाली पडणें किंवा भांड्यांत पडणें—जिवाला शांतता किंवा स्वस्थता प्राप्त होणें; काळजी दूर होणें.

१५ उघडें पडणें—हीन दीन होणें; आश्रयरहित होणें; कोणी त्राता किंवा कैवारी नाही, अशा दशेस येणें. उ०

वा! दळतां तिळहि पदर व्हावी व्यजनासि साग रामा जी।
ती खळसभेंत उघडी पडते न पडोनि सागरामाजी! ॥ ७७ ॥

मोरोपंत,— सभापर्व, अध्याय ५.

१६ तोंडघशी पडणें—मागे लेखांक ४७, उपांक १०२ पहा.

१७. एखाद्यावर तुटून पडणें—

(क) त्याच्यावर निकराने हल्ला करणें. उ० मऱ्हाठ्यांची फौज निजामाच्या सैन्यावर एकदम तुटून पडली, तेव्हा मुसलमान वीर सैरावैरा पळत सुटले.

(ख) त्याच्यावर वाक्प्रहार करणें. उ० शिवरामपंतांनी त्या स्मारकाच्या

सूचनेला हरकत घेतली, तेव्हां काय विचारतां? सर्व लोक त्याच्यावर एकजात तुटून पडले!

१८ एखाद्या गोष्टीला अनुमोदन पडणे—तिला रुकार मिळणें. ती संमत असणें. उ०

पडतां वानराचें अनुमोदन। स्वयें पुसे रघुनन्दन।
शिष्ट पाठवावा कोण। तो निवडोनि सांगा मज॥ —एकनाथ.

१९ शरपंजरी पडणें—आजाराने, दुखण्याने खितपत असणें किंवा झिजत असणें.

२० पचाईत किंवा मारामार पडणें—अडचण भासणें; दुष्कर होणें. उ० आमच्या तरुण विद्वानास इंग्रजी भाषेने इतकें वेडावून टाकलें आहे की, त्यांस आपल्या आईबापांशीं, बायकाशीं, बहिणींशीं, चाकरांशीं सुद्धा शुद्ध व सरळ बोलण्याची मारामार पडते. वि० कृ० चिपळूणकर,—निबंधमाला.

२१ चैन पडणें—आराम वाटणें. उ० मुलगी सासरीं गेल्यापासून मला अगदी चैन पडेनासें झालें आहे.

## ८२९. पाहणें

१. पाहणे—

(क) (डोळ्यानी) बघणें, अवलोकिणें. उ० हें पहा भिमाजी चिताऱ्याचें चित्र.

(ख) कोणत्याहि इंद्रियाने जाणणें किंवा जाणून घेणें. उ० ह्या आंब्याची चव पहा. हें कापड किती उबदार आहे पहा! तो गवई किती उत्कृष्ट गातो पहा तर खरें!

(ग) एखाद्या माणसाची, गोष्टीची, कारभाराची, प्रकरणाची, जबाबदारी पतकरणें. त्याची तजवीज, व्यवस्था वगैरे करण्याचें काम स्वीकारणें. उ० माझ्या मुलाचें गणित मी पाहीन, तुम्ही संस्कृत पहा म्हणजे झालें

(घ) परवा करणें. उ० तुम्हाला घर उत्तम बांधावयाचें असलें, तर पैशाकडे पाहून कसें चालेल? (म्ह० पैशाची पर्वा करून).

(ङ) पारखणें. उ० हें सोनें पहा. ह्या मुलाच्या अक्षराचें वळण पाहा.

(च) इच्छिणें. उ० नहिरवपताची नोकरी गोंधा बुडवूं पाहत आहे.

२ एखाद्याचा अंत पाहणें—त्याची कसून परीक्षा घेणें.

या जी! उद्धार करा दीनाचा, पाहता किती अंत?।
संत न अंत पहाती हातीं असता समर्थ भगवंत॥ मोरोपंत,—नामरसायन.

३ प्रश्न पाहणें—भूत आणि भविष्य गोष्टी, फलज्योतिष, रमल इ० शास्त्रावरून जाणणें किंवा माहीत करून घेणें आणि त्या सांगणें. उ० जोशीबोवा, आमचा एवढा प्रश्न पाहता काय?

४ एखाद्या वस्तूकडे ढुंकून न पाहणें—एखाद्या वस्तूला अनादर दाखविणें. तिच्याकडे ओझरत्या नजरेने सुद्धा न पाहणें. तिच्याशीं मुळीच संबंध न ठेवणें; ती तुच्छ लेखणें.

५ बरें पाहणे—चांगलें म्हणून समजणें; एखाद्याचें कल्याण चिंतिणें. उ० ह्या गावांत म्हादबाला कोणीहि बरें पाहत नाही.

## ८३०. बसणें

१ अधिष्ठित होणें. उ० कावेरी झोंपाळ्यावर बसली.

२ योग्य, उचित किंवा विवक्षित ठिकाणीं जुळणें किंवा जडणें. उ० पेटीला कुलूप बसलें. दाराला कडी बसली.

३ मार बसणे—माराच्या क्रियेला विषय होणें.

४ हें उदाहरण मला बसलें—तें चांगलें समजलें.

५ गळूं बसणे—म्ह० दबणें, चेपणें.

६ वैभव बसणें—वैभवानें अपकर्ष पावणें; वैभव कमी होणें.

७ दुकान बसणें, धंदा बसणें, व्यापार बसणें—बिनाकिफायतीचा होणें किंवा चालेनासा होणें.

८ तोटा बसणे, ठोकर बसणे—नुकसान लागणें.

९ त्या स्मारकाची वर्गणी माझ्या डोक्यावर बसली—म्हणजे मला ती द्यावी लागली.

१० हा सदरा माझ्या अंगाला बसत नाही—म्हणजे ठीक होत नाही.

११ हात बसणें—एखादी विशिष्ट क्रिया करण्याची सफाई हातास प्राप्त होणें. उ० कातरकामावर जनोबाचा चांगलासा हात बसला नाही.

१२ हा श्लोक मला चांगला बसला—म्हणजे उत्तम प्रकारें समजला किंवा मनांत ठसला.

१३ अक्षराचें वळण बसणें—म्हणजे तें वळण पक्कें होणें.

१४ लिहीत, रडत, वाचीत इ० बसणें—म्हणजे एकसारखें लिहीत, रडत, वाचीत राहणें.

१५ जेवायाला बसावयाचें, म्हणजे जेवणाला सुरुवात करावयाची.

१६ तूं दिलेल्या पैशांत आला तसला माल मीं आणला; मी पदरचे पैसे घालायाला थोडाच बसलों आहें!—म्हणजे पदरचे पैसे भरीस घालण्याचा उपद्व्याप मी उगीच कशाला करूं?

१७ उलट्या अंबारींत बसणें—हातांत झोळी घेऊन भिक्षा मागत हिंडणें. (कारण, भिक्षेची झोळी उलट्या अंबारीसारखी दिसते. अंबारी = हत्तीवरची बैठक. उलटी अंबारी = भिक्षेची झोळी).

१८ माझें मन त्या मुलावर बसलें आहे—तो मुलगा मला आवडता झाला आहे; त्याच्यावर माझें प्रेम जडलें आहे.

१९ पांचावर धारण बसणें—गर्भगळित होऊन जाणें; काय करावें तें सुचेनासें होणें; हताश होणें.

२० घरीं बसणें—उद्योगधंदा, नोकरी वगैरे सोडून किंवा न करतां रिकामें बसणें.

२१ एखाद्या स्त्रीच्या घरीं बसावयास जाणें—तिच्या घरीं तिच्या भेटीला किंवा तिच्याशीं गप्पागोष्टी करावयाला जाणें. उ० दोन्ही दिवस बहुतेक बायका आमच्या घरींच बसावयास येत. —श्रीमती रमाबाई रानडे.

टीपः—हा वाक्प्रचार बायकांच्या भाषेंतला आहे.

## ८३१. मरणें

१ मरण पावणें—उ० माणकोबा पटकीनें मेला

२ झाड, रोप इ० मरणें—त्याची जीवनक्रिया बंद होणें. उ० हें रोप सावटास लाविल्यामुळे मेलें (म्हणजे वाळून गेलें).

३ खेळाडू मरणें—खेळ खेळणाऱ्यांच्या संख्येंतून गळणें किंवा निरुपयोगी होणें. उ० आमच्या बाजूचे आतापर्यंत तीन गडी मेले (म्हणजे हा डाव खेळणाऱ्यांच्या संख्येंतून ते गळाले).

४ मी थंडीनें मरतों आहे—मी थंडीनें बेजार झालों आहें.

५ पारा मरणें—पाऱ्याची अस्थिरता, चंचलता नाहीशी होणें. उ० कोणत्या कृतीनें पारा मरतो, हे वैद्य लोकांस ठाऊक असतें.

६ रक्त मरणें—अंग मद्द होणें; त्वगिंद्रिय बधिर होणें. उ० त्या पोराला बदडून काढल्यानें काय उपयोग व्हावयाचा आहे? रोज रोज मार खाऊन त्याच्या अंगाचें रक्त मेलें आहे (म्हणजे त्याला मार लागावयाचा नाही, त्याचें अंग मद्द झालें आहे).

७ भूक मरणें—भूक नाहीशी होणें; भुकेची भावना लोपून जाणें; त्याचप्रमाणे तहान मरणें; इच्छा मरणें; महत्त्वाकांक्षा मरणें इ० चा उपयोग होतो. उ० जेवणाला फार उशीर झाल्यामुळे माझी भूक मरून गेली आहे.

८ पाणी मरणें—बेचव होणें. उ० तुम्ही पाण्याला आधण आणून नतर तें पितां, हा क्रम तुम्ही सोडून द्या. कारण मेलेल्या पाण्याला रुचि नसते. मेलेलें पाणी, दूध इ०. ज्यांतील पुष्टिकारक, उपयुक्त किंवा रुचिकर, अंश नाहीसा झाला आहे, असें.

९ आजारानें मरत पडणें—आजारानें झिजत असणें. उ० नारायणराव आज तीन वर्षें संग्रहिणीनें मरत पडला आहे (म्हणजे झिजत आहे; कष्ट भोगीत आहे).

१० एखाद्या रकमेला मरणें—तितकें नुकसान होणें. उ० हा व्यापारी साखरेच्या व्यापारात दहा हजार रुपयांना मेला (म्हणजे बुडाला).

११ कामानें मरणें—कामानें बेजार होणें. उ० तुम्हीं सर्वांनी खुशालचदा-प्रमाणें बसावें आणि मीं एकट्यानें मरावें, हा काय न्याय झाला? ("मरावें" म्हणजे काम करून कष्ट सोसावे).

१२ खाद्यासाठीं मरणें—तें मागत सुटणें. उ० पेढ्यासाठीं असा मरतोस का? जन्मांत कधीं तूं पेढा खाल्लाच नाहींस काय? ("मरणें" म्हणजे फाजील उत्सुक किंवा उत्कंठित होणें).

१३ मरतां मरतां—मरण निश्चित ठरलें असता. उ० आपण तीन असामी आहों आणि दरवडेखोर आहेत दहा; ते आपणास ठार तर मारणारच. पण आपण मरतां मरता थोडेतरी हातपाय झाडले पाहिजेत (म्हणजे आपण मरावयाच्या आधीं प्रयत्नांची कमाल केली पाहिजे).

१४ मरूं घालणें—तें मरणारच असें समजून त्याच्याविषयीं बेफिकीर राहणें. उ० गवळ्यानें तें रेडकू मरूं घातलें आहे (म्हणजे रेडकूं खास मरणार असें समजून गवळी त्याच्या खाण्यापिण्याची किंवा औषधाची तजवीज करीत नाहीं).

१५ मरून पडणें—उत्कंठेनें इच्छिणें. उ० प्रो० छत्रे याची सर्कस पाहा-वयाला चीनमधील लोक मरून पडत असत, असें ऐकिवांत आहे.

१६ मरूं मरूं करणें—लवकरच प्राण जाईल, असा रंग दिसणें.

१७ मरो मरोसें करणें—सतावणें. उ० हीं मुलें मला अगदीं मरो मरोसें करून सोडतात (म्हणजे मला भारी सतावतात किंवा त्रास देतात.)

१८ मेला जसा—अति शरमिंदा. उ० तो चोर घुसुपात खिडी घालतो आहे, इतक्यांत मी तेथें गेलों; मला पाहताच तो मेला जसा! (म्हणजे अतिशय लज्जित झाला!)

१९ मरीं मरणें—जिवाची पर्वा न करता कष्ट करणें.

२० पैसा मरणें—पैसा निरुपयोगी होणें, व्याज किंवा फायदा न मिळतां तो पैसादेखील परत येण्याची शक्यता नसणें. उ० तूं रामभाऊला पैसे उसने दिलेस, ते मेलेच असें समज! उ० ह्या चिंचेच्या व्यापारात पैसा घातलास, तो मरणारच!

## ८३२. मोडणें, तोडणें, फोडणें

ह्या तीन क्रियापदांच्या अर्थांतील विवेक आम्ही पुढें "तुल्यकल्प" शब्दाच्या प्रकरणांत देणार आहों. येथें फक्त हीं तीन क्रियापदें वाक्यांत योजून त्या वाक्यांचे अर्थ देतों.

(क) मोडणें—

(१) प्लेगामुळे मला घर किंवा बिऱ्हाड मोडावें लागलें. म्ह० कुटुंबातील माणसांनी पांगापांग करावी लागली. हल्ली आमचें घर रिकामें आहे. (२) माझी झोप

मोडूं नका म्ह० मला हाका मारून किंवा माझ्याजवळ कटकट करून झोपेंत व्यत्यय आणूं नका. ( ३ ) दुकान मोडणें म्ह० दुकानदारीचा धंदा सोडून देणें. ( ४ ) सभा मोडणें म्ह० ती बरखास्त करणें किंवा उधळून लावणें. (५) बंड मोडणें म्ह० तें चिरडून टाकणें किंवा नाहींसें करणें. ( ६ ) नियम, कायदा, क्रम, शिस्त मोडणें म्ह० न पाळणें; उल्लंघिणें. ( ७ ) बाजार, संस्था, शाळा, वाचनालय मोडणें म्ह० बंद करणें. ( ८ ) रुपया मोडणें म्ह० व्यक्तिशः कमी किंमतीची, परंतु समुच्चयानें त्याच किंमतीची नाणीं घेणें. ( ९ ) करन्सी नोट मोडणें म्ह० नोटेशीच्या मोबदला तितक्याच किंमतीची नाणीं किंवा कमी किंमतीच्या नोटा घेणें. ( १० ) प्रॉमिसरी नोट मोडणें म्ह० बाजारभावाप्रमाणे ती विकून मोबदल्याचे पैसे घेणें. ( ११ ) एखाद्याचें मन, *मर्जी मोडणें म्ह० त्याच्या इच्छेप्रमाणे न चालणें.* ( १२ ) वेळ, दिवस मोडणें म्ह० खर्च करणें ( सकारण असो किंवा निष्कारण असो ). ( १३ ) व्यसन मोडणें म्ह० स्वतावर नियंत्रणा घालून तें नाहींसें करणें. ( १४ ) वाद, मतभेद इ० मोडणें म्ह० समजूत घालून विरोध किंवा दुफळी नाहींशी करणें. ( १५ ) पागोटें मोडणें म्ह० त्याची रचना विस्कळीत करणें. ( १६ ) दागिना मोडणें म्ह० तो विकणें किंवा त्याचें रूपांतर करणें. ( १७ ) भय मोडणें म्ह० भय घालविणें किंवा निरस्त करणें; भीति वाटेनाशी करणें. ( १८ ) माडणी मोडणें म्ह० ती बदलणें किंवा रद्द करणें. ( १९ ) चालरीत मोडणें म्ह० ती सोडून देणें; न पाळणें. ( २० ) एकादशी व्रत इ० मोडणें म्ह० त्या दिवशीं जें खाता कामा नये तें खाल्ल्याकारणानें किंवा यथासांग नियम न पाळल्याकारणाने त्याचें पुण्य गमावून घेणें. ( २१ ) मातीचें चित्र मोडणें म्ह० तें छिन्न भिन्न करणें.

( ख ) तोडणें—

( १ ) मूल तोडणें म्ह० मुलाला आईनें अंगावरचें दूध प्यावयाला उराशीं न धरतां गायीचें वगैरे दूध घालूं लागणें. ( २ ) एखाद्याची मैत्री तोडणें म्ह० त्याच्याशीं असलेला मित्रत्वाचा संबंध तोडून देणें. ( ३ ) एखाद्या माणसाला तोडणें म्ह० त्याच्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवणें सोडून देणें. ( ४ ) एखादें दुकान तोडणें म्ह० त्या दुकानीं माल विकत घेणें सोडून देणें. ( ५ ) एखाद्याचें अन्न तोडणें म्ह० त्याला शिक्षा म्हणून किंवा त्याला सोसणार नाही म्हणून त्याला कमी खावयाला देणें. ( ६ ) एखाद्याचें मीठ तोडणें म्ह० त्याची नोकरी किंवा उदरनिर्वाहाचें साधन दुष्टाव्यानें नाहींसें करणें. (७) मानमरातब किंवा सरंजाम तोडणें म्ह० त्याला फाटा देणें किंवा तें कमी करणें. ( ८ ) सरकत किंवा पाती तोडणें म्ह० बंद करून टाकणें. ( ९ ) भांडण तोडणें म्ह० उभयपक्षांची समजुत घालून त्यांच्यांत पुनः सलोख्याचा संबंध उत्पन्न करणें; वैमनस्य नाहींसें करणें. ( १० ) ढेकणांनी, डासांनी मला काल रात्रीं अगदी तोडून खाल्लें म्ह० त्यांनी मला असंख्य ठिकाणीं दंश केला. ( ११ ) तोडून घेणें, देणें म्ह०

वेगळा किंवा एखाद्याच्या स्वतःच्या अधिकारातला किंवा जबाबदारीचा असा ठरवून घेणें किंवा देणें. ( १२ ) एखादें घर तोडणें म्ह० त्या घरीं न जाणें किंवा त्या घरांतील माणसाशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध न ठेवणें.

( ग ) फोडणें—

( १ ) भिंत फोडणें म्ह० आत शिरण्यासाठी भिंतींत भगदाड करणें किंवा पाडणें. ( २ ) घर फोडणें म्ह० चोरी करण्यासाठी कोठून तरी बेकायदेशीर रीतीनें वाट करून आत शिरणें. ( ३ ) गळू वगैरे फोडणें म्ह० सुईनें, चाकूनें किंवा अन्य साधनानें त्याला तोंड पाडून त्यातून पूं, नासकें रक्त वगैरे वाहविणें. ( ४ ) एखाद्याचे डोळे फोडणें म्ह० त्याच्या डोळ्यात सुरी वगैरे भोसकून त्याला अंध करणें. ( ५ ) डोळे फोडून पहा म्ह० नीट लक्ष देऊन पहा; वरवर पाहूं नका. ( ६ ) एखादी बातमी फोडणें म्ह० ती कळविणें; ती जाहीर करणें किंवा प्रकट करणें. ( ७ ) एखाद्याचीं वर्मे, कर्मे फोडणें म्ह० त्याला ती कळविणें योग्य नव्हे, त्याला किंवा समाजांत ती बाहीर करणें. ( ८ ) दहीं फोडणें म्ह० तें रवी वगैरेंनी सारखें करणें, त्यातील गुठळ्या मोडून टाकून तें पातळ करणें. ( ९ ) पाणी फोडणें म्ह० त्याला दुसरीकडून वाहावयाला वाट करून देणें. ( १० ) पाट फोडणें म्ह० बांध घालून किंवा कोठेतरी वाट पाडून, पाटाचें पाणी दुसऱ्या एका विशिष्ट दिशेने वाहील असें करणें.

८३३. मारणें ( सकर्मक )

१ ठार करणें. उ० त्याने साप मारला, वाघ मारला इ०.

२ छडी, काठी वगैरेंनी एखाद्या पदार्थावर तडाके देणें किंवा आघात करणें.

३ पारा, जस्त वगैरे धातु मारणें—ते दोषरहित करणें. उ० वैद्य पारा मारून त्याचा औषधाच्या कामीं उपयोग करतात.

४ वाट मारणें, गाव मारणें इ०—वाटेंतील, गावातील माणसांना लुटणें.

५ तहान, भूक वगैरे मारणें—ती तृप्त न करणें. उ० जवळपास चांगलें पिण्याजोगें पाणी नसल्याकारणानें मला त्या प्रवासात तहान मारावी लागली.

६ कामक्रोधादि मनोविकार मारले पाहिजेत—त्यांचेवर नियंत्रण घातलीं पाहिजे, ते आटोक्यात ठेविले पाहिजेत.

७ खिळा, खुंटी वगैरे मारणें—ठोकून भिंतींत वगैरे बसविणें.

८ बंदूक मारणें—ती उडविणें.

९ लढाई मारणें—जिंकणें.

१० ताव मारणें—तो विशिष्ट जागीं उभारणें.

११ लाट, नफा इ० मारणें—पैसा, नफा वगैरे मिळविणें.

१२ पैसे मारणें—लोकांचें काम करीत असतां अप्रामाणिकपणानें त्यात पैसे मिळविणें, लाटणें किंवा खाणें.

१३ मजा मारणे—करमणुकींत, चैनींत, गमतींत काळ घालविणें.

१४ एखाद्याच्या माथीं मारणें—त्याच्याकडे सोपविणें. उ० हें काम मी त्रिविक्रमपंताच्या माथीं मारणार आहें.

८३४. मारणे (अकर्मक)

१ उपद्रवकारक किंवा बाधक होणें. उ० आमच्या घराला, भिंतीला ह्या तळ्याची ओल मारते ओटीवर संडासाची घाण मारते म्ह० संडासाचा मपकारा येतो.

२ दृष्टोत्पत्तीस येणें—उ० ह्या लुगड्यांत थोडीशी हिरव्या रंगाची झांक मारते. ह्या मुलाच्या तोंडवळ्यात त्याच्या आईच्या गालाची झाक मारते.

३ पीडादायक, त्रासदायक होणें—उ० ह्या दिवाणखान्यात उन्हाच्या झळया भारी मारतात किंवा उन्हाची तिरीप मारते.

४ एकदम उसळणें—उ० माझें डोकें इतकें दुखत आहे की, मी ह्या कुशीचा त्या कुशीला वळलों, तरी मोठी शिणीक मारते. उ० मी ठेच लागून पडलों, तेव्हापासून ह्या गुडघ्यात थोडीशी चमक मारते

८३५. येणें

[ह्या क्रियापदाचे कांहीं अर्थ खालीं दिले आहेत.]

१ वळणीस येणे—एखाद्याच्या कब्ज्यात येऊन त्याची आशा पाळावयास सिद्ध होणें. उ०

तत्र विक्रमाविणें पळभरिहि न येतींच खळखळें वळणी।
श्रीमद्रामायणरस रसिकांला स्पष्ट लागतां अळणी॥ मोरोपंत,—नामरसायन.

२ ताळ्यावर येणे—चुकीचा मार्ग सोडून पुन्हा योग्य मार्गावर येणें.

३ वठणीस येणे—पुन्हा आशाधारक होणें, योग्य मार्गाने चालू लागणें.

४ गुणाला येणें—फलद्रूप होणें.

५ डोळ्याला पाणी येणे—अश्रूनी डोळे भरणें; रडावयाला येणें. उ० मृत पुत्राची गोष्ट निघताच मालिनीबाईच्या डोळ्याला पाणी येतें.

६ हुक्की येणें—मनावर इच्छा उत्पन्न होणें. उ० लहानपणीं शाळेंत शिकत असतां जोसेफला समुद्रावर सफर करावयाची एक दिवस हुक्की आली.

न० चिं० केळकर,—ग्यारिबॉल्डी.

७ पणात येणे—वयात येणें, प्रौढ दशेला येऊन पोचणें. उ० ,मचा बाळूकाका आता पणांत आला आहे म्ह० ऐन उमेदींत आला आहे. त्याचें शरीरसामर्थ्य आणि बुद्धिसामर्थ्य पूर्ण विकास पावलें आहे. उ० ही तुमची मुलगी शालिनी आता पणात येऊ लागली आहे म्ह० "पोक्त" होत चालली आहे ती "पोक्ती पुरवती" होऊ लागली आहे. तिचे अल्लडपणाचे दिवस आता सरलेच म्हणावयाचे.

८ संपुष्टांत येणें—संक्षिप्त होणें; लहान होणें; [पूजेच्या उपकरणात संपुट म्हणून एक लहान पात्र असतें. त्यात घातलेला पदार्थ थोडाच असतो. "संपुट" याचें "संपु" हें अपभ्रष्ट रूप होय].

९. ची सर येणें—ची योग्यता प्राप्त होणें; एखाद्या वस्तूशीं बरोबरी होणें. उ० मराठी भाषा प्रगल्भ झाली, तरी तिला संस्कृताची सर येणारच नाही, असें काही लोकांचें मत आहे.

८३६ लाजविणें—तुलना करून कमी प्रतीचा ठरविणें.

निःशेष लाजवावी लावण्यें चंद्रिका जिच्या ऐशी—।

कांति प्रकट शरीरीं आर्येच्या होय ही तरी कैशी ? ॥ —ग० रा० मोगरे.

८३७. लावणें

१ अन्नास लावणें—उपजीविकेचें साधन मिळवून देणें, नोकरी वगैरे लावून देणें.

२ ममता लावणें किंवा लावून घेणें—प्रेमळ वर्तनानें दुसऱ्याची ममता संपादणें.

३ छातीला हात लावून म्हणणें, सांगणें, इ०—खात्रीपूर्वक, न कचरता म्हणणें, सांगणें इ०.

४ शेणाचे दिवे लावणें—दिवाळें काढणें.

५ तुळस उपटून भांग लावणें—चांगल्याचा विध्वंस करून त्याच्या जागीं वाईट रूढ करणें, सुरू करणें किंवा संस्थापित करणें.

८३८ विचारणें किंवा पुसणें—एखाद्या वस्तूला किंवा माणसाला योग्य तो मान देणें, त्याची योग्य संभावना करणें किंवा किंमत ठरविणें. उ. इंग्लंडांतील अगदी सामान्य कवीचेहि ग्रंथ छापून निघाले आहेत, पण आमच्या देशांतील मोठमोठ्यासहि कोणी विचारीना ! विष्णुशास्त्री चिपळूणकर—निबंधमाला.

• • •

८३९. १ ज्या शब्दांना लिंग, वचन, विभक्ति, काळ इत्यादिकांच्या योगानें विकार होत नाहीत, त्यांना "अव्ययें" असें म्हणतात.

२ ह्या अव्ययांत "शब्दयोगी अव्ययें" म्हणून एक प्रकार आहे. शब्दयोगी अव्ययें नेहमी दुसऱ्या शब्दाशीं जोडूनच योजावीं लागतात; जसें—'तो माडीवर चढला' 'माझ्या दारापुढे तुळशीचीं झाडें आहेत.' शब्दयोगी अव्ययें हीं नामें किंवा सर्वनामें यांच्यापुढें आलीं असतां त्यापासून विभक्तींचीं कार्यें होतात.

३ कांहीं क्रियाविशेषण अव्ययें हीं रूपानें शब्दयोगी अव्ययाप्रमाणेंच असतात, परंतु वाक्यांत इतर शब्दांच्या संबंधानें त्यांची मांडणी वेगळ्या प्रकारची होते. उ० 'पलंगाखालीं पुस्तकें आहेत,' येथें "खालीं" हें शब्दयोगी अव्यय आहे. 'तो मुलगा खालीं बसला," येथें "खालीं हें क्रियाविशेषण अव्यय आहे. दोन्ही ठिकाणीं "खालीं" ह्या शब्दाचा अर्थ वस्तुतः एकच आहे, परंतु वाक्यांतील इतर शब्दांशीं त्याची जुळणी वेगळ्या तऱ्हेची आहे. आम्हीं पुढें शब्दयोगी अव्ययें ज्या वाक्यांत योजून दाखविलीं आहेत, त्यांच्यांत थोडासा बदल केला असतां, तींच वाक्यें क्रियाविशेषण अव्ययाचीं उदाहरणें होऊं शकतील.

४ कित्येक शब्दयोगी अव्ययें नामांचीं विभक्त्यन्त रूपें असतात. जसें, "प्रमाणें" हें "प्रमाण" ह्या नामाच्या तृतीयेचें एकवचन. "अन्वयें" हें "अन्वय" ह्या नामाच्या तृतीयेचें एकवचन.

८४०. अन्वयें

१ अमुक कायद्याच्या अमुक कलमाअन्वयें हा गुन्हा ठरत नाहीं, (अन्वयें म्ह० प्रमाणें). २. ह्या दस्तऐवजाअन्वयें (म्ह० त्यांतील अटी लक्षांत घेतल्यास).

८४१. आड

१ दृष्टीआड सृष्टि—(क) जेथें आपली नजर पोंचत नाहीं, असा जगाचा फार मोठा प्रदेश आहे. (ख) आपणाला दिसत नाहींत, कळत नाहींत, अशा पुष्कळ गोष्टी असतात. (ग) जें आपणास दिसत नाहीं, तें कितीहि मोठें किंवा चांगलें असलें, तरी आपणांस तें काय उपयोगाचें ?

२ गवताच्या गंजीआड चोर लपला होता—गंजी मध्यें आल्याकारणानें न दिसेल अशा रीतीनें इ०.

३ ढगाआड सूर्य झाला—ढग पुढें आल्यामुळें सूर्य दिसेनासा झाला.

४ दिवसाआड उजळणी करण्याचा परिपाठ ठेवावा—मध्यें एक दिवस रिकामा टाकून.

५ शेताआड चोरी—शेताच्या पांघरुणाखाली म्हणजे स्वतःचें शेत आहे, अशा सबबीवर केलेली चोरी. लोकांच्या शेतातील धान्याची चोरी करून तें धान्य आमच्याच शेतचें आहे, असें म्हणून ती चोरी लपविणें.

६ माझ्याआड येऊ नको—

(क) माझ्या उलट जाऊ नको. मला हरकत करू नको माझी नुकसानी होईल, असें करू नको.

(ख) पुढचें मला दिसणार नाही, अशा रीतीने उभा राहू नको.

७ माझ्या बेताआड कोणी आलेलें मला खपत नाही—माझा बेत सिद्धीस जाण्याला हरकत किंवा अडथळा कोणी केला, तर मला आवडत नाही

८ पडद्याआड रामाचें पात्र गेलें—तें पडद्याच्या दुसऱ्या बाजूस जाऊन दिसेनासें झालें.

९ मेलेल्या मुलाचे कपडे रमाबाईने दृष्टीआड केले—ते न दिसतील, ते नजरेस न पडतील, अशा ठिकाणीं तिने ते ठेवले.

१० हा उपदेश कानाआड करू नको—हा उपदेश तुझ्या कानीं पडलाच नाही जणों काय, अशा रीतीने वागू नको. हा उपदेश लक्षात बाळगून वर्तन कर.

११ वस्त्राआड जन नागवें—

(क) मनुष्य सभ्यपणाने बोलत असला किंवा गोड गोड बोलत असला, तरी त्याच्या पोटात कपट हें असावयाचेंच ! मनुष्य गोड गोड बोलला, म्हणजे आपण फसतां कामा नये, त्याच्या पोटात काहीतरी कपट हें असावयाचेंच !

(ख) मनुष्य दिसण्यात सद्वर्तनी दिसला, तरी त्याच्या अंगीं काहीतरी पापाचा अंश असावयाचाच !

## ८४२. आंत

१. गोविंदाच्या मनात कपट नाही (म्ह० त्याच्या ठायीं). २. माझे पैसे एका महिन्यात परत दे (म्ह० एक महिना सरावयाच्या अगोदर). ३. माधव-रावतर्फे आज जेवणाचें आहे. कितीला बोलावलेंच आहे आणखी आमंत्रण करा, म्हणजे खर्चांत खर्च होऊन जाईल ('खर्चांत खर्च,' म्हणजे एकपट खर्च करून दुप्पट कार्य) ४. तू आमच्यातच जेवांत जा म्हणजे पोटांत पोट भागविता येईल (म्ह० फारसा अधिक खर्च न करावा लागता). ५. तू खुर्ची आणावयाला बाजारांत जात आहेस मला एक स्टूल पाहिजे आहे, तेंहि घेऊन ये, म्हणजे कामात काम होऊन जाईल (म्ह० एकाच हेलपाट्यात, मुद्दाम वेगळा किंवा जास्ती वेळ खर्च करावा न लागता).

## ८४३. कडे

१. परमानंदाला कचेरींतून सुटावयास अगोदरच उशीर झाला होता, म्हणून त्याला वैद्याकडे जातां आलें नाही (वैद्याकडे म्ह० वैद्याच्या घरीं). २. सुरोपच्या

दक्षिणेकडे भूमध्यसमुद्र आहे ( दक्षिणेकडे म्ह० दक्षिण दिशेस ). ३. त्या सेनापतीकडे पुरेशी फौज नव्हती ( म्ह० त्याच्यापाशी ). ४. 'कौरवपांडवाच्या युद्धांत श्रीकृष्ण पांडवाकडे गेला ( म्ह० पांडवांच्या पक्षाला मिळाला ). ५. तुमच्या मुलाची परीक्षा उतरली नाही, याचा दोष त्याच्याकडे आहे ( म्ह० त्याच्याच माथीं ). ६. हें काम माझ्याकडे लागलें ( म्ह० हें काम करण्याची जबाबदारी मी माझ्या शिरावर घेतों ). ७. हा इसम पागेकडे आहे ( म्ह० पागेच्या कामावर आहे ). ८. हें काम त्या खात्याकडे सोपविण्यांत आलें ( म्ह० हें काम त्या खात्यांत व्हावें, असें ठरविण्यात आलें ). ९ मी तुला हे दहा रुपये देतों, आता माझ्याकडे तुझे कांही पैसे नाहीत ( म्ह० मी तुझें कांही लागत नाहीं किंवा मी तुझे न फेडिलेले असे कांही पैसे नाहीत). १०. तूं उद्याकडे मला भेट; उद्याकडे मी तुझ्या कामाचा निकाल करीन. ( उद्याकडे म्ह० उद्या ). " उद्याकडे, " हा प्रचार अशिक्षित लोकात आढळतो.

## ८४४. खाली

१. घडवंचीखालीं मांजर लपलें होतें ( म्ह० जमीन आणि घडवंचीची फळी यांच्यामधील जागेवर ). २. वर्गात कमलाकांत माझ्याखाली आहे ( म्ह० त्याचे अभ्यास माझ्यापेक्षा कमी दर्जाचे आहेत). ३. कामाखाली सारा दिवस गेला (म्ह० काम करता करता ). ४. वहिवाटीखाली, परिपाठाखाली पडणें ( म्ह० वहिवाटींत, परिपाठांत येणें ). ५. नित्याखाली पडणें (म्ह० नित्याच्या क्रमांतील होणें ). ६. मोठ्या नांवाखाली सारें पचून जातें ( म्ह० मपकीच्या किंवा अधिकाराच्या जोरावर दोष, अन्याय, पापें, लपवितां येतात. बड्या माणसाने कांहीहि अपराध, पातकें किंवा अन्याय केले, तरी त्यांच्यावर टीका करावयाला कोणी धजत नाही ). ७. तुझ्या पायाखाली काय आहे किंवा काय जळत आहे, तें पहा ( म्ह० खुद्द तुझीं कृत्यें किंवा तुझी स्थिति किंवा परिस्थिति वगैरे गोष्टी मनांत आण. खुद्द तुझ्या ठायीं जो कमीपणा आहे, तो लक्ष्यांत घे ). ८. अंतोबाने पुतण्याचे पैसे हाताखाली घातले ( म्ह० त्या पैशाचा त्याने अन्यायाने अपहार केला ). ९. दादाजी कोंडदेवाच्या शिक्षेखाली शिवाजी लहानाचा मोठा झाला ( म्ह० त्याच्याकडून शिक्षण मिळवून ). १०. दिव्याखाली अंधार ( म्ह० मनुष्य मोठ्या अधिकाराच्या पदावर असला, तरी त्याच्या अंगीं निंद्य गुण असावयाचेच ). ११. मोठ्याखाली लहानाची उघडीक होत नाही. ( म्ह० समर्थांच्या बगलबच्च्यांनी कांही केलें तरी खपतें ). १२. बाळकोबाच्या घराखालीं बाग आहे ( म्ह० घराच्या पलीकडे ). १३. ह्या मुलाला तुम्ही आपल्या देखरेखीखाली घ्या ( म्ह० तुम्ही ह्याच्यावर देखरेख करा ). १४. कमलाकराच्या हाताखाली दहा माणसें आहेत ( म्ह० त्याचा हुकूम पाळणारीं ). १५. पन्नास रुपये बिदागीखाली तो गवई हालत नाही म्ह० पन्नास रुपयाहून कमी बिदागी घेउन तो गावयाला सिद्ध होत नाही).

### ८४५. जवळ

१. मंत्राजीच्या घराजवळ एक विहीर आहे ( म्ह० घराच्या सान्निध्याला, किंवा शेजारीं ). २ मधुकररावजवळ पुष्कळ पैसा आहे(म्ह० त्याच्या शिल्कीस किंवा संग्रहीं). ३. शरच्चंद्रावाजवळ हल्ली एक स्वयंपाकी ब्राह्मण आहे ( म्ह० त्याच्या घरीं किंवा त्याच्यासाठीं स्वयंपाक करणारा ). ४ चंद्रकांताजवळ काय जादू आहे ? ( त्याच्या जवळ म्ह० त्याला ठाऊक अशी, किंवा त्याच्या उपयोगी पडेल अशी ). ५. वसंताचें पुस्तक इंदुशेखररावाजवळ नाही ( म्ह० त्यांच्या पेटींत वगैरे ) ६. कमलाकांताजवळ माया हा शब्द नाही ( म्ह० त्याच्या अंत करणात तिळमात्र माया नाही ) ७ कमलाकररावाजवळ दुजा भाव किंवा परका भाव नाही ( म्ह० तो आपलपोट्या नाही किंवा त्याच्या मनात आपपर ही भावना नाही ).

### ८४६. पर्यंत

१. श्रीकान्ताला मीं त्याच्या घरापर्यंत पोंचविलें ( म्ह० त्याचें घर आलें, तेव्हा त्याला तेथे सोडून मी परतलों ) २. त्या घागरींत गळ्यापर्यंत पाणी आहे (म्ह० घागर अगदी काठोकाठ भरलेली आहे ) ३. त्याचा पक्ष चंद्रसेनराव शेवटपर्यंत सोडणार नाही ( म्ह० तो आमरण त्याच्या पक्षाला चिकटून राहील ). ४. जीव आहे तोंपर्यंत औषधोपचार केले पाहिजेत ( म्ह० मनुष्य जिवंत आहे त्या अवधींत ) ५ लाहोरपर्यंत गर्दी दिसत होती ( म्ह० पुष्कळ लाहोरच्या प्रदेशावर देखील लोक होते ). ६ माझ्या मर्जीविरुद्ध वागलास तर मी तुला पायापासून डोक्यापर्यंत फोडून काढीन ( म्ह० नखशिखान्त, तुझ्या शरीराच्या सर्व भागावर मी छड्या मारीन ). ७ सरदाराची धाव कुंपणापर्यंत ( म्ह० लहान अवसानाच्या माणसाची कर्तृत्वशक्ति थोडीच असावयाची ). ८. एक वर्षपर्यंत इंदुशेखररावानी हा नियम पाळिला (म्ह० एक वर्षभर). ९. अथपासून इतिपर्यंत ( म्ह० प्रारंभापासून अंत येई तों, सुरवातीपासून तों अखेर येई तों )

### ८४७. पलीकडे

१. मधुकररावांच्या घरापलीकडे स्मशान आहे ( म्ह० घरापासून काही अंतरावर ). २. मकरंदरावाने त्या पोरक्या मुलाची जिवापलीकडे जोपासना केली ( म्ह० त्याला प्राणापेक्षा अधिक समजून ). ३ हे कागद शरच्चंद्ररावानी जिवापलीकडे ग्वाग करून ठेविले होते ( म्ह० फार काळजीने ) ४. पैशापलीकडे राघोपंताला कांहीं दिसत नाही ( म्ह० पैशापेक्षा अधिक मूल्यवान् असे त्याला कांहीच वाटत नाही ) ५. वृद्धेश्वराचें देऊळ नदीपलीकडे आहे ( म्हणजे नदीच्या पैल तीराला )

### ८४८. पाशीं

१. चंद्रसेनरावाला कोणी घोड्यापाशीं देखील उभें करणार नाही ( म्हणजे घोडे ठेवावयाच्या जागीं देखील त्याला कोणी उभें राहूं देणार नाही, मग सतरंजीवर

किंवा तक्रयार्शी, त्याला वसू देणें दूरच राहिलें। म्हणजे तो फार हलकट आहे)। २. माझ्यापाशी गोंदोबाच्या कांही लटपटी चालत नाहीत (म्हणजे तो मजपुढे किंवा मजशीं व्यवहार करताना, काही लबाड्या वगैरे करावयास धजत नाही मी त्याची सोदेगिरी चागली ओळखतों) ३. महिना सरत आला, आता तुला उसने पैसे द्यावयाला मजपाशी मुळीच नाहीत (मजपाशी म्हणजे माझ्या संग्रहास)

## ८४९ पासून

१. मुबईपासून पुणें ११९ मैल आहे (म्ह० मुबई आणि पुणें ह्याच्या मधील अंतर ११९ मैल आहे) २. हमीदखानापासून श्रीकान्तरावांनी हा घोडा विकत घेतला (म्ह० त्याच्याजवळून) ३. तू आपल्या बापापासून कोणतीहि गोष्ट चोरून ठेवू नको (म्हणजे त्याला न कळवितां) ४. उद्यापासून रोज तू सस्कृत शिकावयाला सुरुवात कर (म्हणजे उद्या शीक आणि नतर दररोज शीक). ५. हबीररावानी कोणा-पासून हें कर्ज काढलें? (म्ह० कोणाचें!)

## ८५०. पुढे

१ दिवाकररावाच्या दारापुढे मोठें अगण आहे (म्ह० घराच्या अग्रभागीं). २. देवापुढे रांगोळी घाल (म्ह० देवाच्या समोर) ३. ज्याचें कुर्डे त्याच्यापुढे (म्ह० ज्याने खोटेपणा केला त्याला तो जाचक होईल किंवा होवो!) ४. हें मूल कोणा-पुढे जेवावयास बसतें? (म्हणजे हें मूल जेवतांना त्याच्यावर कोणाचें लक्ष्य असतें.) ५. माझ्या डोळ्यापुढे उभा राहू नको (म्हणजे माझ्या नजरेस पडशील अशा ठिकाणीं म्ह० माझ्यासमोर) ६ सदानदरावाच्या आईचे मरणसमयींचे हाल सदा सर्वदा त्याच्या डोळ्यापुढे उभे राहतात (म्हणजे त्यांची त्याना स्मृति होते, ते त्यांना अतश्चक्षूने दिसतात). ७. रामाचे अभ्यास माझ्यापुढे आहेत (म्हणजे माझ्यापेक्षा चांगले किंवा आधिक). ८. मूर्खापुढे वाचली गीता, कालचा गोंधळ बरा होता '(म्ह० मूर्खाला बोध होण्यासाठीं) ९. भीमरावाच्या तोंडापुढे कोणाचा टिकाव लागणार? (म्ह० त्याच्यापाशी बरोबरीच्या नात्याने बोलावयाला कोण टिकणार?) १०. गोविंदरावापुढे काशीराम फिका पडून गेला (म्हणजे गोविंदरावाशीं तुलना केली असता किंवा तुलना केल्यावर) ११. त्या वैद्याचें नांव माझ्या तोंडापुढे आहे तोंडापुढे, म्ह० अगदी आठवण्याच्या बेतांत)

## ८५१. प्रमाणे

१ वडील भावाच्या उपदेशाप्रमाणे मी आजपर्यंत चालत आलों आहे. (म्ह० याच्या उपदेश न उल्लघितां) २ गोदी आपल्या आईप्रमाणेच नकटी आहे (म्ह० आई नकटी आहे, तशी गोदीदेखील नकटी आहे). ३. सतराच्या उदाहरणाप्रमाणे चोविसावें सोडवितां येईल (म्ह० त्याच रीतीने) ४. टिळकांच्या मताप्रमाणे कर्म-

मार्गाची योग्यता भक्तिमार्गाच्या योग्यतेहून श्रेष्ठ होय ( म्ह० त्याच्या विचारसरणीच्या अनुरोधाने ). ५. विहाराप्रमाणे घनश्याम हट्टी आहे ( म्ह० त्याच्या सारखाच ). ६ चोविसाव्या नियमाप्रमाणें ती निवडणूक रद्द होय ( म्ह० तो नियम लक्षांत घेऊन त्या नियमाच्या शर्तीवरून ).

## ८५२. प्रीत्यर्थ

१. सुशिक्षित म्हणविणाऱ्या प्रत्येकाच्या डोक्यात राजकीय विचार घोळूं लागतील व राजकीय सुधारणेप्रीत्यर्थ प्रयत्न करण्याची त्याला हाव सुटेल, तर त्यात काहीच गैर नाही. बा० ग० टिळक ( सुधारणेप्रीत्यर्थ म्ह०, सुधारणा घडवून आणण्याच बाबतींत ). २. मुलाच्या विद्येप्रीत्यर्थ पंढरीनाथाचे, दोन हजार रुपये खर्च झाले ( विद्येप्रीत्यर्थ म्ह० विद्येसाठी ).

## ८५३. भर

टीप—" भर " हें शुद्ध शब्दयोगी अव्यय आहे, हें विद्यार्थ्यांनें लक्षात बाळगावें.

१. मोरोपंत हा पंचाहत्तर वर्षांच्या वयाचा असून एका तासांत कोसभर चालतो ( म्ह० एका कोसाची मजल करतो ). २. हा वासुदेव दिवसभर खेळत असतो ( म्ह० सारा दिवस ). ३. हें सोनें तोळाभर निघेल, असें वाटत नाही ( म्ह० तोळ्याच्या परिमाणाचें ). ४. कृष्णाजीपंत महाबळेश्वरीं मधासाठी गावभर हिंडला, पण त्याला कोणाच्याहि घरीं मध मिळाला नाही ( गावभर म्ह० साऱ्या गावांत ). ५. अंगभर वस्त्र आणि हातभर बांगड्या देवाने द्याव्या, म्हणजे झालें ( अंगभर, म्ह० सर्व अंग झाकण्याइतकें वस्त्र, आणि मनगटापासून कोपरापर्यंतच्या सर्व हात झाकण्याइतक्या बांगड्या ). ६. रेसभर म्ह० रेसाइतका देखील किंवा अगदी थोडा सुद्धा.

## ८५४. भोंवती

१. गुमानंदरावाच्या घराभोंवती बाग आहे ( म्ह० घराच्या चारी बाजूस ). २. समर्थाभोंवती कार्यसाधु लोकांची गर्दी असायचीच ( म्ह० समर्थांच्या कच्छपी लागलेली ). ३. माझ्या भोंवती किरकिर लावूं नको ( म्ह० माझ्या जवळ ). ४. रखवालदार हातांत सोटा घेऊन घराभोंवती फिरत होता (म्ह० घराच्या सर्व बाजूंनी).

## ८५५. मागे

१. तो मधुसूदनरावामागे उभा होता ( मागे म्ह० त्याच्या पाठीशीं ). २. चद्रगुप्तामागे अशोक हा राजा होता ( मागे म्ह० पूर्वी किंवा अगोदर ). ३. चंद्रकांतरावांमागे शमर कामें आहेत ( म्ह० त्यांना करावयास पाहिजेत, अशीं ). ४. माझ्यामागे मुलाचें कसें होईल, याची मला काळजी वाटते ( माझ्यामागे, म्ह० मी घरीं नसतां; मी परगांवी गेलों असता किंवा मी मेल्यावर ) ५. मी आपल्या पुस्त-

काची एक प्रत त्याला द्यावी म्हणून तो चार दिवस माझ्यामागे लागला होता ( म्ह० माझी विनवणी करीत होता ). ६. त्या मारवाड्याने गोविंदपंतामागे मारी तगादा लावला ( म्ह० त्याने त्याला मारी निकड लावली ).

## ८५६. मुळे

१. खिळ्यासाठी नाल गेला, नालासाठी घोडा गेला, घोड्यासाठी स्वार गेला. इतका अनर्थ खिळ्यामुळे झाला ( खिळ्यामुळे म्ह० खिळ्याच्या कारणाने ). २. आळसामुळे रघुनाथ नापास झाला ( म्ह० त्याने आळसात काल घालविला म्हणून किंवा तो आळशी आहे म्हणून ).

## ८५७. वर

१. मेजावर पुस्तक ठेव ( म्ह० मेजाच्या पृष्ठभागाच्या आधाराने ) २. औरंगजेब मेल्यावर ( म्ह० तो मेल्यानंतर ), त्याच्या राज्याचा मालक कोण झाला ? ३. त्या सभेत शंमरावर लोक नव्हते ( म्ह० शंमराहून अधिक ). ४. वसंतरावांच्या भाषणावर कोणी टीका केली नाही ( म्ह० त्याच्या भाषणातील मुद्दे वगैरेंच्या संबंधाने कोणी काही बोललें नाही ). ५. कचेरींत माझ्यावर कोणी अंमलदार नाही ( म्ह० मला हुकूम करणारा किंवा माझ्यापेक्षा मोठ्या दर्जाचा ). ६. माझ्यावर दोन उमेदवार आहेत, त्यांना टाकून मला अगोदर नोकरी कशी मिळेल ? ( माझ्यावर म्ह० माझ्या अगोदर आलेले ). ७. दारावर भाजी घेतलेली स्वस्त पडते ( दारावर म्ह० आपल्या घरीं विकणाराने विकावयास आणलेली ). ८. चोरावर मोर ( म्ह० एका चोराने चोरलेली वस्तु त्याच्यापासून चोरणारा अट्टल चोर ). ९. हें काम दिरंगाईवर टाकूं नका ( म्ह० हें काम लवकरच करावयाला घ्या ). १०. प्रल्हादरावाच्या घरावर त्या मारवाड्याचा डोळा आहे ( म्ह० त्यांचें घर उपटण्याचा त्याचा विचार आहे ). ११. रामावर कमलाकान्ताचा दात आहे ( म्ह० रामाविषयी वैरबुद्धि ). १२. धर्मावर सोमवार सोडणें ( म्ह० लोकांच्या परोपकारबुद्धीमुळें मिळालेल्या पदार्थावर सोमवारच्या उपवासाचें पारणें फेडणें, म्हणजे स्वतः दिवसाचें अन्न वाचविणें); (मागे लेखांक ३३७ [ ५ ] पहा.) १३. अहो चंपकबाई, तुमचें लोणचें फक्कड झालें आहे! एका लोणच्याच्या फोडीवर माझें सारें जेवण झालें ! ( फोडीवर म्ह० फोड तोंडी लावून किंवा फोडीच्या चवीनें ). १४. त्या गावाचें नाव माझ्या अगदी ओठावर किंवा जिभेवर आहे ( म्ह० ओठांच्या किंवा जिभेच्या पूर्ण परिचयाचें किंवा हवें तेव्हा उच्चारता यावयाजोगें आहे, परंतु आता मात्र आठवत नाही ). १५. जुन्नरचा किल्ला शिवनेरी, हा पुण्याच्या उत्तरेस सुमारे पन्नास मैलांवर आहे ( म्ह० जेथे पन्नास मैलाचें अंतर भरतें तेथे ).

## ८५८. समोर

१. मजसमोर उभा राहूं नको ( म्ह० माझ्यापुढे ). २. आजोबांसमोर गोंधा

दांडगाई करीत नाही (म्ह० आजोबांना दिसेल अशा ठिकाणी). ३. त्याचें नां माझ्या डोळ्यासमोर आहे (म्ह० अगदी आठवण्याच्या बेतात आहे). ४. शेंकरा समोरचा (म्ह० नंदीबैल म्ह० मूर्ख, अडाणी माणूस).

•••

८५९. १. कांही क्रियाविशेषणें हीं मूळचीं नामाचीं विभक्त्यन्त रूपें असून पुढे केवळ त्यांच्या अर्थावरून हीं क्रियाविशेषणाप्रमाणे योजण्यात येऊं लागलीं. 'बुद्ध्या,' हें मूळचें 'बुद्धि,' ह्या संस्कृत शब्दाच्या तृतीयेचें एकवचन असून त्याचा अर्थ हल्ली 'मुद्दाम' किंवा 'जाणून बुजून' असा घेण्यात येतो. या प्रकारचे मराठी भाषेंत आणखी पुष्कळ शब्द आहेत. "रात्रौ" हें "रात्रि" ह्या संस्कृत शब्दाच्या सप्तमीचें एकवचन आहे. त्याचा अर्थ "रात्रीच्या वेळीं" असा आहे. "दिवा," हें संस्कृत दिव् शब्दाचें तृतीयेचें एकवचन. त्याचा अर्थ "दिवसास" असा आहे.

२. काही क्रियाविशेषणें वाक्यरचनेंत थोडासा फेरफार केला असतां शब्दयोगी अव्ययें होऊं शकतात. उ० घरापुढे अंगण आहे. तू पुढे चालू नको. येथें पहिल्या वाक्यांत 'पुढे,' हें शब्दयोगी अव्यय आहे आणि दुसऱ्यात क्रियाविशेषण आहे. अशा प्रकारचीं अव्ययें व त्यांचीं उदाहरणें मागील प्रकरणांत वरीचशीं आलेलीं असल्या कारणानें तीं बहुतेक ह्या प्रकरणांत वगळलेलीं आहेत, कारण, उदाहरणादाखल दिलेल्या वाक्यांत थोडासा फेरफार करून तेंच वाक्य क्रियाविशेषण अव्ययाचें उदाहरण बनविणें, हें विद्यार्थ्यांला कठीण जाणार नाही.

३. काही क्रियाविशेषणें क्रियापदाना कांही प्रत्यय लागून तयार होतात. उ० बोलता बोलता, बोलून चालून, रगडून, उठतां बसतां, येऊन जाऊन इत्यादि.

४. कित्येक क्रियाविशेषणें नामांप्रमाणें लिंगवचनादिकांवरून विकृति पावतात. उ० त्याला येऊं दे तर खरा ! उ० हीं कामें मीं कशींबशीं पार पाडलीं !

५. वरील सर्व प्रकारच्या क्रियाविशेषणांपैकीं निवडक अशा काहींचा संग्रह ह्या प्रकरणात केला आहे.

## ८६०. आड

१. आड—पलीकडे, पाठीमागे. २. सूर्याच्या आड ढग आले आहेत (म्ह० सूर्याला झाकून टाकतील अशा ठिकाणीं). ३. डोंगराच्या आड सूर्य गेला (आड म्हणजे पलीकडे, मागल्या बाजूस). ४ आड करणें म्ह० लपविणें, बाजूस टाकणें; झाकणें. ५ आड येणें म्ह० प्रतिबंधक किंवा हानिकारक होणें. उ० हर्षकाळीं एकाच कुटुंबात बाप शैव तर मुलगा बौद्ध असून तोहि पुढील आयुष्यांत मत पालटल्यास धर्मान्तर करी व हें धर्मान्तर त्याच्या कौटुंबिक किंवा सामाजिक नात्याच्या आड येत नसे ! (नात्याच्या आड येत नसे-म्ह० नात्याला किंवा नात्याने प्राप्त झालेल्या हक्काला बाधक होत नसे.) चिं० वि० वैद्य,—मध्ययुगीन भारत.

## ८६१. खालीं

१ ह्या गोमुखांतून खालीं टपकेल तितकें पाणी आपणाला पुरेल (म्ह० वरून पडेल तितकें). २. पंक्तींत लाडू वाढून खालीं पन्नास राहिले (म्ह० उरले; शिल्लक

पडले). ३. मारवाड्याचें कर्ज फेडल्याशिवाय माझा जीव ताळी पडणार नाही (म्ह० स्वस्थ होणार नाही). ४. आमच्या मंडळींपैकी तीन मुलगे वर चढले आणि दोन खाली राहिले (म्ह० खालच्या वर्गात).

## ८६२. पुढे

१. त्या कामीं माझें नाव पुढे करूं नको (म्ह० प्रकट करूं नको). २. माझ्याबरोबर चाल, पुढे जाऊ नको (म्ह० ज्यास्ती वेगाने चालू नको; चाललास, तर तू माझ्या शेजारीं असणार नाहीस). ३. पुढे पाठ, मागे सपाट (म्ह० नवा धडा शिकावयाचा, पण जुन्या धड्याची उजळणी न केल्यामुळे तो विसरून जावयाचा). ४. बरें, पुढे काय झालें? (पुढे म्ह० नतर).

## ८६३. मागे

१ पुढे पाठ मागे सपाट (म्ह० नवीन विषय शिकणें आणि जुन्या विषयाची उजळणी न केल्यामुळे तो विसरणें). २. मीं हें काम पतकरलें तें पतकरलें; आता मी मागे घ्यावयाचा नाहीं (म्ह० तें सोडून देणार नाहीं). ३. हा नियम आता मागे पडला (म्ह० रद्द झाला; त्याची अंमलबजावणी आता होत नाही). ४. तुम्ही आमच्याबरोबर फिरावयाला येत जा, म्हणजे तुमच्या आईच्या मरणाचें दुःख मागे पडेल (म्ह० कमी तीव्र होईल किंवा विसरलें जाईल). ५. मधुकर महिनाभर आजारी होता म्हणून मागे पडला (म्ह० त्याचे अभ्यास कमी झाले). ६. काटकसरीनें खर्च करा, म्हणजे चार पैसे मागे पडतील (म्ह० शिलकीस पडतील, शिल्लक राहतील). ७. मिरजकरबोवांच्या कथा पुण्यास सुरू होताच इतर सर्व हरिदास मागे पडले (म्ह० पिछे पडले; त्यांचें महत्त्व कमी झालें). ८ तुला मागे काय सांगितलें होतें, तें तुझ्या लक्ष्यांत आहे काय? (मागे, म्ह० कांहीं दिवसांपूर्वी). ९ मागे आपल्या लोकांत मामाच्या मुलीशी विवाह करण्याची चाल होती, हल्ली तशी चाल नाही (मागे, म्ह० गत काळीं; प्राचीन काळीं). १०. तू मागे राहिलास तर फसशील (मागे म्ह० पिछाडीला, लोकाना न दिसशील अशा ठिकाणीं). ११. आचवणीकर वैद्यबोवांच्या औषधाने जनूकाकाची पोटदुखी अगदी मागे पडली (म्ह० नाहीशी झाली). १२. हा नवा मुलगा वर्गांत येताच श्रीकान्त मागे पडला (म्ह० श्रीकान्ताची प्रतिष्ठा कमी झाली).

## ८६४. मागून

१. मी अगोदर जातों; तू मागून ये (मागून, म्ह० नतर). २. गाय पुढे चाललीं होती; मागून वासरू चाललें होतें. (मागून म्ह० तिच्या पाठोपाठ). ३. मागून पुढून बापच नवरा (म्ह० मागच्या खेपेलाहि आणि या खेपेलाहि म्ह० दोन्ही प्रसगीं). ४. मागून आलेलें लोण (आट्यापाट्याच्या खेळांत एका बाजूकडून आलेलें लोण.) ५. मागून आलेली वेंड (वेठ बिगारीच्या कायद्याने पूर्वीच्या वेठकऱ्याने आणलेलें ओझें).

## ८६५. मागेपुढे

१. मागेपुढे पाहून चाल; दांडग्यासारखा चालू नको (मागेपुढे म्ह० आपल्या शेजारी किंवा आजूबाजूस कोण आहे, हें पाहून). २. शंकरराव असें करतो, पण मागेपुढे तें त्याला बाचेल (मागेपुढे म्ह० केव्हाना केव्हातरी). ३. पोथीचीं पानें मागेपुढें झालीं आहेत, तीं क्रमानें लावून दे (मागेपुढे म्ह० अव्यवस्थित; भग्नक्रम). ४. मी सांगितलें आहे, तशा रीतीनें औषध तयार कर. मागेपुढे केलेंस, तर तें गुणावह होणार नाही (मागेपुढे म्ह० निष्काळजीपणानें किंवा योग्य क्रम किंवा प्रमाण न अनुसरतां). ५. मल्हारीला चोर भेटले, तेव्हा मागेपुढे न पाहतां (म्ह० तिळमात्र न कचरतां) तो त्यांच्या अंगावर तुटून पडला. ६. मृणालिनीबाईला बारातेरा रुपयांपर्यंत लुगडें ध्यावयाचें होतें. मीं लुगड्याची किंमत सतरा रुपये सांगितली, तेव्हा ती मागेपुढे करू लागली (म्ह० तितक्या किंमतीचें लुगडें घ्यावें किंवा घेऊं नये, ह्याबद्दल ती साशंक झाली; कचरू लागली). ७. शंभुरावाला मागेपुढे कोणी नाही (म्ह० त्याला आईबाप किंवा मुलेंबाळें, नाहीत). ८. मागेपुढे पाहून वागावें (म्ह० दूरवरचा विचार करून शहाणपणानें वागावें).

८६६ ओक्साबोक्शी—मोठया आवेशानें आणि हेल काढून. उ० मालिनी सासरीं जातांना ओक्साबोक्शी रडली.

८६७ अद्वातद्वा—हा "यद्वातद्वा" ह्या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे. "यद्वातद्वा" म्हणजे "हें की तें" "हें किंवा तें." समापणांत खरें हें की तें, असा वाद उत्पन्न झाला म्हणजे भांडणापर्यंत मजल येऊन ठेपते. यावरून "अद्वातद्वा" म्हणजे "ताळतंत्र सोडून", मूर्खाप्रमाणे" असा अर्थ झाला. क्रियापद "बोलणें, बरळणें" इ०.

८६८ इजां विजां तिजां—लागोपाठ तीन वेळां.

८६९ इतस्ततः किंवा इकडे तिकडे—(१) ठिकठिकाणीं, जागोजाग, येथपासून तेथपर्यंत (२) महत्वाचीं नव्हेत, अशा ठिकाणीं; कोठेतरी. उ० यमुना काकूचा आजचा सारा दिवस इतस्तत (किंवा इकडे तिकडे) भ्रमण करण्यांत गेला. उ० कोकरें मोठया आनंदानें त्या पलीकडच्या कुरणांत इकडे तिकडे बागडत होतीं.

८७० उठतां बसतां, उठल्या बसल्या—क्षणोक्षणीं; हरघडीला, सदासर्वदा; जेव्हा पाहावें तेव्हा. उ० चिंगीला उठल्या बसल्या (किंवा उठतां बसतां) हातांत बाहुली लागते.

८७१ उठल्या सुटल्या—वेळ योग्य आहे किंवा अयोग्य आहे, याचा विचार न करतां. उ० शशिकला उठल्या सुटल्या कुमुद्वतीच्या घरीं जाते उ० उठल्या सुटल्या चहा पिण्याची प्रवृत्ति फार अपायकारक आहे.

८७२. उडत उडत—

(क) एकाने दुसऱ्याला सांगावी, दुसऱ्याने तिसऱ्याला, तिसऱ्याने चवथ्याला अशा रीतीने; *विशेष आधारपूर्वक मानता येणार नाही, अशा प्रकारें.* उ० आमचे हेड्‌क्लार्क तीन महिन्यांची रजा घेणार आहेत, अशी बातमी उडत उडत माझ्या कानावर आली आहे.

(ख) संक्षेपाने. उ० कौमुदीबाईंनी मला रासन्हाणीच्या वेळेच्या गमती उडत उडत सांगितल्या.

८७३ एवंच—एकूण; साराशरूपाने; सर्वांचा मथितार्थ हा की.

८७४ एवी तेवी—ह्या रीतीने काय आणि त्या रीतीने काय, फळ तेंच! असें घेऊन चाललों तरी तेंच आणि तसें घेऊन चाललों तरी तेंच! कांही केलें तरी! *काही म्हटलें तरी! कोणत्याहि दृष्टीने विचार केला तरी! उ० एवी तेवी माझें पुणें* सुटणार! मग नाशिक काय आणि धुळें काय! एकच! धुळें दूर असलें तर असलें! एवी तेवी माझी नौकरी जाणार! मग वरिष्ठाला पक्षपातीपणाबद्दल पोटभर शिव्या तरी देऊन घेतों!

८७५ एवी-तेवी भर गो देवी!—कसेंहि झालें तरी, "हे देवि माझा उणेपणा भरून काढ" असें म्हणावें लागणारच! देवीची करुणा भाकावी लागणार! मग कमी करुणा भाकली काय आणि जास्ती करुणा भाकली काय, एकच! परिस्थिति प्रतिकूल आहे खरी, कांकू करून कसें चालेल? कोणता तरी एक मार्ग स्वीकारला पाहिजे!

८७६. करतलामलकवत्—

(क) (क्रियाविशेषण) अगदी स्पष्टपणें किंवा ठळक रीतीने. उ० सुब्रावाला दारूचा दुष्परिणाम करतलामलकवत् दिसत असून तो तें व्यसन सोडण्याचा काही प्रयत्न करीत नाही.

(ख) (विशेषण) अत्यंत सुकर. उ० तुमच्या पुस्तकाला विनायकराव प्रस्तावना लिहितील. असलीं कामें त्याना करतलामलकवत् आहेत.

टीपः—कर = हात, तल = तळवा, पृष्ठभाग. आमलक = आवळा, वत् = प्रमाणे. ह्या व्युत्पत्तीवरून वरील दोन्ही अर्थ साहजिकपणें निघणारे आहेत.

८७७ कर्मधर्मसंयोगाने—*प्रारब्धयोगाने दैवगतीने, यदृच्छेने.*

टीपः—पूर्व जन्मीं केलेलें कर्म (चांगलें किंवा वाईट) आणि ह्या जन्मीं केलेला धर्म (शक्त्यनुसार किंवा शक्त्यननुसार), ह्या दोहोंची एके समयीं गाठ पडून त्याचें फळ (चांगलें किंवा वाईट), एकदम भोगास येणें, हें क्वचित् प्रसंगीं घडतें. तसें घडणें, ही अपूर्व गोष्ट. ह्यावरून "कर्मधर्मसंयोगाने" ह्याचा अकल्पित रीतीने,

अनपेक्षित रीतीने, अचानक, ध्यानीं मनीं नसता, असा अर्थ झाला. कर्मधर्म संयोगाने जें घडतें, तें इष्ट असू शकेल किंवा अनिष्टहि असू शकेल. चिरपरिचयाच्या योगाने ह्या वाक्प्रचारातील मूळच्या गंभीर अर्थाची प्रतीति आपणास होईनाशी झाली आहे, आणि आपण तिचा उपयोग क्षुल्लक आणि भारदस्त प्रसंगीं बिनदिक्कत करू लागलों आहों!

८७८ कसेंबसें—मोठ्या कष्टानें; अति श्रमाने. उ० तें कंटाळवाणें काम मीं कसेंबसें शेवटास लावलें.

टीपः—"कसेंबसें" हें क्रियाविशेषण असून नामाप्रमाणे फिरतें.

८७९ कांकणभर—थोडयाशा अशाने. उ० इंदुमती द्वाड आहे, आणि सुलोचना तिच्याहून कांकणभर जास्ती आहे. ["काकणभरानें" किंवा "कांकण-भऱ्याने," अशींहि रूपें ह्याच अर्थाने योजिलीं जातात].

८८० कायावाचामनाने किंवा कायावाचामनेंकरून—सर्व सामर्थ्य खर्चून, कसूर न करतां शरिराचा, भाषणाचा आणि मनाचा पूर्ण उपयोग करून.

८८१. किंबहुना—

१ विस्तार करण्याचें काय कारण आहे? ज्यास्ती बोलण्याची काय जरुरी आहे?

२ इतकेंच नव्हे तर इ०; फार तर काय पण, इ०.

व्युत्पत्ति—संस्कृत किम् म्हणजे काय? बहुना म्हणजे पुष्कळ बोलणें, लिहिणें किंवा सांगणें इत्यादिकानी.

८८२ कोठे आणि...कोठे?—दोन वस्तूत फार मोठी तफावत किंवा भिन्नता आहे, असें सांगावयाचें असतां हे शब्द दोन वाक्यात योजतात. उ० कोठे इंद्राचा ऐरावत आणि कोठे शामभटाची तटाणी? उ० कोठे महादेव मोरेश्वर कुंटे यांचें वक्तृत्व आणि कोठे त्या गोविंदराव उंबरकट्टीचें वक्तृत्व?

८८३ खाऊन पिऊन—खाण्यापिण्याच्या संबधाने पाहिलें असतां उ० धीरेन्द्र-राव खाऊन पिऊन सुखी आहे (म्हणजे त्याला खाण्यापिण्याची ददात नाही किंवा तो मध्यम स्थितीतील मनुष्य आहे).

८८४ गुण्यागोविंदानें—प्रेमभावानें; भांडणें न करतां. उ० हर्षकाळीं एकाच राज्यांत किंवा एकाच शहरांत, किंबहुना एकाच कुटुंबात देखील हिंदु, बौद्ध व जैन या धर्मांचे अनुयायी गुण्यागोविंदाने राहून धर्माच्या गहन तत्वांवर अत्यंत सहनशीलतेने वादविवाद करीत. चिं० वि० वैद्य,—मध्ययुगीन भारत.

८८५ घरबसल्या—घरांतल्या घरांत; घरांत बसूनच; घर न सोडतां. उ० तुम्ही आपले पैसे मर्कंटाइल ब्यांकेंत व्याजीं लावा, म्हणजे तुम्हांला घरबसल्या सालिना २४ रुपये व्याजाचे मिळतील.

८८६ चालतां बोलतां—विशेष श्रम न करितां, अनायासें, सहजासहजीं.

८८७ जन्मजन्मान्तरीं—ह्या जन्मात आणि इतर जन्मात. [मनुष्याला अनेक जन्म प्राप्त होतात, असें समजण्यात येतें. "जन्मांतर" म्ह० दुसरा जन्म, म्हणजे चालू जन्माहून वेगळा जन्म]. उ० तुम्हीं मजवर जे उपकार केले आहेत, ते माझ्याकडून जन्मजन्मांतरींहि फिटावयाचे नाहीत! [टीप:—"जन्मोजन्मीं" व "जन्मजन्मीं," ह्याचाहि वरील अर्थानेच उपयोग होतो].

८८८ जन्मादारभ्य—जन्मल्यापासून. उ० कोळ्याच्या मुलाना जन्मादारभ्य पोहता येत असतें. उ० कौमुदीला जन्मादारभ्य खोटें बोलण्याची सवय आहे! [शुद्ध संस्कृत रूप "जन्मनः आरभ्य," असें आहे. "जन्मन्" प्रमाणे "जन्म," असाहि एक अपभ्रष्ट शब्द संस्कृतांत आहे. त्याच्या पंचमीच्या एक वचनाचें रूप "जन्मात्" असें होऊं शकेल].

८८९ जिकडे तिकडे—सर्व ठिकाणीं; पुष्कळ ठिकाणीं; जागोजाग. उ० रामदासाने जिकडे तिकडे मठ स्थापन करून महाराष्ट्रीयात साधुवर्गाच्या द्वारे सुशिक्षित करण्याची योजना करून ठेविली. —गो० स० सरदेसाई.

८९० जेमतेम—कसातरी; मोठ्या कष्टाने; प्रयासाने किंवा अडचणीने. उ० तीन रुपयाचें तूप आम्हाला जेमतेम पधरा दिवस पुरतें!

८९१ तिकडे—"तिकडे" म्हणजे त्या दिशेस किंवा त्या ठिकाणीं. हा शब्द क्रियाविशेषण असून जनानी भाषेत नामाप्रमाणें योजला जातो, आणि त्याचा अर्थ "माझे यजमान" असा होतो. प्रथमा विभक्तीहून इतर विभक्तींचेहि अर्थ "तिकडे" हा शब्द दर्शवितो. उ० तिकडे यायचें झालें काय? (म्हणजे पतिराज आले काय?) उ० हीं लुगडीं तिकडे दाखवा (म्ह० पतिराजांना दाखवा) उ० तिकडे आमत्रण पतकरलें काय? (म्ह० पतिराजानी). तिकडून म्ह० पतिरायाकडून. तिकडचा म्ह० पतिरायाचा. उ०

ती सुमति म्हणे, "आर्या! त्या तिकडेहि असेंच कळवावें" ॥
(तिकडे म्ह० मीं मनाने वरलेल्या पतीस.) —मोरोपंत.

८९२ दिवसा ढवळ्या—दिवसाच्या प्रकाशात. उ० सोन्याबापू दिवसाढवळ्या दारूच्या पिठ्यांत जाऊन दारू पितो! त्याला जनल्ला मनल्ला, काहीइतकी देखील नाही!

व्युत्पत्ति:—"ढवळ्या दिवसा" म्ह० दिवसाचा ढवळा प्रकाश असतां. "ढवळा" म्ह० पाढरा.

८९३ नखशिखान्त—नख = नख (पायाच्या बोटाचें), शिखा = शेंडी, अन्त = टोक. नखशिखान्त = पायाच्या बोटाच्या नखापासून तों शेंडीच्या केसाच्या

टोकापर्यंत; सर्व शरिरीं; पूर्णपणें. उ० पावसानें तो गडी नखशिखान्त भिजला आहे. उ० मी घामानें नखशिखान्त भिजून गेलों आहें.

८९४ नित्य उठून—रोजच्या रोज, दररोज; फार फार वेळां (८१३-५ पहा).

८९५ पोटातून—खरोखरी. उ० किसनला कांहीं हा बेत पोटातून आवडला नव्हता, परंतु तुझें मन मोडूं नये म्हणून त्यानें हो म्हटलें.

८९६ बापजन्मीं—सगळ्या आयुष्यात. उ० अगे चंद्रे, तुला बापजन्मीं तरी असली पैठणी नेसावयास मिळेल काय?

व्युत्पत्तिः—स्वत.च्या आयुर्मर्यादेंत बापाची आयुर्मर्यादा भरतीला घातली, तरी त्या दीर्घ कालावधींतसुद्धा; कितीहि दीर्घकाळपर्यंत वाट पाहिली तरी. ह्या शब्दाचा उपयोग बहुधा अकरणरूपीं होतो.

८९७ बोलून चालून—उघडपणें; अगदी उघड उघड; निर्विवादपणें. उ० मधुसूदन बोलून चालून पद्माकराचा शत्रु आहे, मग तो पद्माकराची निंदा कसा नाहीं करणार?

८९८ भरल्या पोटीं—पोट भरलेलें असतां. उ० भरल्या पोटीं त्या म्हाताऱ्याला एवढी लहानदेखील मजल चालणें कठीण जाईल!

८९९. मधल्यामधें किंवा मधल्या मधेच—

(क) आपला अधिकार नसता. उ० तूं मधल्यामधें त्या मनुष्याला कसें परतविलेंस? (म्ह० माझ्याकडे त्या माणसाला न आणता).

(ख) पात्रता नसता, उगीचच्या उगीच. उ० तुमचें दोघांचें वाकडें आणि मधल्यामधेच त्या बिचाऱ्या सटवाजीला मात्र धनीसाहेबाच्या शिव्या खाव्या लागतात!

९०० मनच्या मनीं—मनातल्या मनात; आपलें म्हणणें काय आहे, तें न सांगता, आपली इच्छा किंवा मागणी किंवा तक्रार न कळविता. उ० तू मनच्या मनीं नऊ मण जळलास, तर तुझी समजूत कोण पाहावयाला येईल?

९०१ मन मोकळें करून—उघड्या मनानें, संकोच, भीति, लाज वगैरे सोडून देऊन. उ० तुमच्या दुःखाचें कारण मला मन मोकळें करून सांगा. तुमचें रहस्य माझ्या तोंडून बाहेर फुटणार नाहीं.

९०२ मनापासून—खरोखरी; बेंबीच्या देठापासून. उ० नदीवर पोहावयाला जा, असें दादानी सांगतांच नाऱ्याला मनापासून आनंद झाला. उ० ही साडी तुला अगदी मनापासून आवडते काय?

९०३ म्हणतां म्हणतां—अगदी अल्प काळांत. उ० वारा अनुकूल असल्यामुळे म्हणतां म्हणतां आमची होडी सोमेश्वराच्या घाटाला जाऊन भिडली!

९०४ मुक्तकंठानें—मोठमोठ्यानें ओरडून; आम्हाला ऐकूं आलें नाहीं, अशी सबब कोणालाहि न राहील अशा रीतीनें.

९०५ मारून मुटकून—फार प्रयासानें; जबरदस्तीनें. उ० इंदुशेखर लग्न करून घ्यावयाला तयार नव्हता; पण चार मंडळी जमून त्यानी त्याला मारून मुटकून एकदाचें बोहोल्यावर उभें केलें!

९०६. यथा यथा—साधारणपणें; म्हणण्यासारखें-समाधानकारक नाहीं अशा रीतीनें. उ० मुंबईमध्ये विनायक भटजीची भिक्षुकी चांगलीशी जमली नाही. सध्या त्याचें तेथें यथा यथाच चाललें (म्ह० भिक्षुकीवर त्याना विशेषशी प्राप्ति होत नाहीं).

९०७ येऊन जाऊन—राहता राहतां; सरते शेवटीं; अखेरीस. उ० आमच्या शाळेंत येऊन जाऊन सात मास्तर. त्यापैकीं चार आहेत रजेवर. उरलेल्या तिघावर शाळेचें काम कसें चालविता येईल?

९०८ येथून तेथून—अव्वलपासून तों अखेरपर्यंत. उ० सध्या छापलीं जाणारीं सारीं पुस्तकें येथून तेथून अगदी नादान असतात, असा आमच्या लिहिण्याचा अभिप्राय कोणीं समजूं नये. —वि० कृ० चिपळूणकर,-निबंधमाला.

९०९. रगडून—खूप जोरानें; पुष्कळपणीं; मनमुराद; आवेशानें; घट्ट. उ० आज तो दगडू माळी रगडून पोहला. उ० दोरी रगडून ओढली तर तुटणार नाही काय?

९१० राजरोस—उघडपणें. उ० शरश्चंद्र राजरोस इराणीच्या दुकानात जाऊन चहा पितो!

टीपः—राजापर्यंत प्रकाश जाऊन पोचेल, म्ह० वर्दी जाऊन पोंचेल, अशा रीतीनें; आडपडदा न ठेवता.

९११ राजापासून रंकापर्यंत—श्रीमंतापासून तों गरिबापर्यंत सर्व दर्जाच्या लोकांत. उ० प्राचीन काळीं ब्राह्मणाला राजापासून रंकापर्यंत मान मिळत असे.

९१२ राहून राहून—पुनः पुनः. उ० शारदाबाईंना त्याच्या मेलेल्या

९१५ रिकाम्या हाताने—जरूर अशा वस्तु बरोबर न घेता, आणावयाची वस्तु न आणतां उ० बाळंतिणीच्या भेटीला जातांना चारतरी पानें बरोबर घेतलींच पाहिजेत रिकाम्या हाताने जाऊं नये उ० रिकाम्या हाताने देवदर्शनास जाऊ नये. शिंप्याकडे तुकाराम कपडे आणावयाला म्हणून गेला, तो रिकाम्याच हाताने परत आला काय ?

९१६ लाखाच्या ठिकाणीं—अत्यंत मूल्यवान् वस्तूप्रमाणे उ० आता अनूकाकाना पैशाची भारी गरज आहे तुम्ही त्याना आता दहा रुपये दिले, तर ते त्याना लाखाच्या ठिकाणीं होतील !

९१७ वर वर—बाहेरून, वरपार्गी. उ० मधुसूदन हा वाराणशीबाईंना वर-वर प्रेम दाखवितो खरा, पण तो कपटी आहे, हें त्या पूर्णपणें ओळखून आहेत !

९१८ वेळेनुसार—प्रसंगविशेषीं, कदाचित् सोयीची किंवा अनुकूल वेळ असल्यास उ० तुम्हाला कपाट पाहिजे असल्यास लिलावाना जात जा. वेळेनुसार चागलेसें एखादें कपाट अगदी थोडक्या किंमतींत तुम्हाला मिळून जाईल !

९१९ वेळेवारी—योग्य वेळीं, योग्य वेळ टळावयाच्या अगोदर. उ० मुलें सध्याकाळीं घरीं परत न आलीं, तर मला बाई भारी काळजी लागते.

९२० शापादपि शरादपि—शापापासून आणि शरापासून, शापाने आणि शरानें शाप देऊन आणि बाण मारून हा मूळचा अर्थ क्रियाविशेषणात्मक आहे शाप देऊन किंवा लढून शत्रूचा विध्वंस करण्याचें सामर्थ्य द्रोणाचार्यांच्या अगीं होतें. हल्ली " शापादपि शरादपि " ही शब्दसंहति विशेषणाप्रमाणे योजिली जाते आणि तिचा अर्थ, " सर्वप्रकारें बलिष्ठ किंवा समर्थ " असा घेण्यात येतो उ० तुझें नुकसान त्रिविक्रमपंताने केलें आहे, तें तू निमूटपणें सोशिलें पाहिजे सूड उगविण्याचा विचार करू नको कारण, तो आजकाल शापादपि शरादपि असा आहे !

९२१ शिरीं—ऐन घाईच्या वेळीं उ० ह्या लग्नाच्या शिरीं त्या हरदासाची कथा करावयास आम्हाला फुरसत कसची मिळणार ?

९२२ षट्कर्णी—हें आहे *क्रियाविशेषण, पण त्याचा विशेषणाप्रमाणेहि उपयोग* होतो. त्याचा अर्थ सहा कानात शिरलेला किंवा सहा कानांस, म्हणजे पुष्कळ लोकांस कळलेला [ एका माणसाला दोन कान आणि दोन माणसांना चार कान असतात एखाद्या गोष्टीचा विचार दोन माणसांनीच केल्यास तो विचार गुप्त राहतो आणखी दोन कान आले ( म्ह० तिसरा मनुष्य मेतला ), तर विचार गुप्त राहत नाही, तो जगजाहीर होतो ] उ० हा तुझा बेत षट्कर्णी होऊ देऊ नको, नाहीतर तुझी फसगत होईल !

९२३ सटी ( सठी ) सामासीं—कधीमधी, अगदी क्वचित् प्रसंगीं.

९२४ सातां सायासांनी—फार श्रमानी; कष्ट सोसून; काळजी वाहून, खटाटोप करून. उ० सातां सायासानी झालेलें माझें लेकरूं इगवणीनें मेलें की हो!

९२५ सैरावैरा—इतस्ततः; वाट फुटेल तिकडे. उ० आमच्या गोठ्याला आग लागली, तेव्हा गुरें दावीं तोडून सैरावैरा धावत सुटलीं! [संस्कृतांत "स्वैर" म्ह० अनियंत्रितपणें; त्याचें अपभ्रष्ट रूप "सैरा," असें होऊन त्याच्याशीं केवळ यमकासाठी "वैरा"-हा शब्द लाविला आहे. "वैरा"—हा शब्द अगदी अर्थहीन आहे].

९२६ हातींमटी—आळसात; निरुपयोगीपणानें. उ० दिवस गेला हातींमेटी मग चादण्यांत कापूस वेटीं. ["हेंटीमेटी असाहि प्रचार आहे"].

९२७ हातोहातीं—एकाच्या हातांतून दुसऱ्याच्या हातांत त्वरेनें जाईल, अशा रीतीनें. उ० काल रात्रीं गर्दीमध्ये चोरानी त्या भामिनीबाईचें बोचकें हातोहातीं लांबविलें!

९२८ हां हां म्हणतां—

१ प्रतिबंध किंवा अडथळा करीत असतां; नको नको म्हणत असता; थांबा, धीर धरा, अशी सूचना करीत असतां. उ०

तेव्हा धावुनि बैसे पार्थ सुभद्रारथीं जसा पार्टी—।
सुचिर क्षुधित ब्राह्मण हां हां म्हणतांहि वादिल्या तार्टी ॥

—मोरोपंत,—सुभद्राहरण.

२ अल्प काळांत.—उ० आमच्या टांग्याचे घोडे फार तल्लख होते. हा हां म्हणतां आम्हीं भिवंडी गाव गाठला!

◆ ◆ ◆

# ९. समस्तकल्प शब्द, समस्त शब्द, आणि एकेरी शब्द

९२९. १. विशेष प्रसंगीं अर्थ आटोपसरपणें आणि जोरदार रीतीनें व्यक्त करणारे शब्द मराठी भाषेंत पुष्कळ आहेत.-द, ब्र, कपि, खरवड, खुशालचंद, ग्रंथ, वगैरेंप्रमाणे कांही शब्द एकेरी आहेत. कर्णपिशाच्च, अरण्यरोदन, काकरव, कूपमंडूक, जावईशोध, वगैरेंप्रमाणे कांही समस्त म्ह० सामासिक शब्द आहेत आणि कांही शब्द असे आहेत की ते व्याकरणांत जरी सामासिक शब्द म्हणून गणले जात नाहीत, तरी अर्थावरून त्यांना सामासिक शब्द म्हणावयास कांही हरकत नाही. करनकरीचा वसा, सतीचें वाण, अडणीवरचा शंख, कानाचा कोपरा, कुत्र्याचें मूत, जन्मांची गांठ, जमीन अस्मानाचें अंतर, जाडें प्रकरण, उटावरचा शहाणा, जुलमाचा रामराम वगैरे त्या शब्दसंहति त्यांना सामासिक शब्दांप्रमाणे विशिष्ट अर्थ असतात. संस्कृतांत अलुक् समास म्हणून जो प्रकार आहे त्या प्रकारांत अशा जातींचे कांही शब्द येण्याजोगे आहेत.

२. मराठी व्याकरणकारांनी ह्या शब्दसंहतींचा एक वर्ग बांधून त्याला स्वतंत्र असें नांव अद्यापि दिलेलें नाही. तथापि ह्या शब्दसंहति मराठी भाषेंत महत्त्वाच्या आहेत आणि त्यांची माहिती विद्यार्थ्यांस असावयास पाहिजे, असें मनांत आणून आम्हीं त्यांना "समस्तकल्प" असें नांव देऊन त्यांचा संग्रह ह्या प्रकरणांत केला आहे.

३. समस्तकल्प शब्दांत जर एखादें विभक्त्यन्त पद असलें, तर त्याचें सामान्य-रूप त्या त्या प्रसंगीं होतें. "कानाचा कोपरा," ह्याचा "कानाच्या कोपऱ्याला," असा बदल होतो.

४ एकेरी शब्द, समस्त शब्द व समस्तकल्प शब्द, हे एका दृष्टीनें कोशांतच समाविष्ट करावयास पाहिजेत. परंतु वाक्प्रचार, व्याकरण आणि कोश ह्यांचे विषय एकमेकांशीं फार संनिकृष्ट किंवा संलग्न आहेत, ह्या कारणामुळे आम्हास ह्या पुस्तकांत मधून मधून कोश आणि व्याकरण ह्यांच्या प्रदेशांतहि संक्रमण करावें लागत आहे.

९३० अकरावा रुद्र—अति रागीट किंवा तापट माणूस.

९३१ अकलेचा खंदक—मूर्ख; बिनअकली माणूस. खंदकांत जसें पुष्कळ पाणी असतें, पण ओंगळ म्हणून पिण्याच्या लायकीचें नसतें, त्याप्रमाणे ज्याच्या डोक्यांत अकल आहे, पण कोणत्याहि चांगल्या किंवा उपयुक्त कामीं ती लावतां येण्याजोगी नाही, अशा मनुष्याला "अकलेचा खंदक" म्हणतात.

९३२ अक्काबाईचा फेरा—"अक्काबाई" हा शब्द लक्षणेनें दरिद्र स्थितीला

लावला जातो. "अक्काबाईचा फेरा" म्ह० दारिद्र्याचें येणें; दारिद्र्य. व्युत्पत्ति:—वडील बहिणीला अक्का किंवा अक्काबाई असें म्हणतात. लक्ष्मी ही संपत्तीची देवता. *तिची वडील बहीण दारिद्र्याची देवता अशी कल्पना करून त्या देवतेला "अक्काबाई"* अशी विनोदानें पदवी देण्यात आली आहे. मोरोपंतानेंहि पुढील आर्येत दारिद्र्याच्या देवतेला लक्ष्मीची ज्येष्ठ बहीण असें म्हटलें आहे:—

हृतशेषें मदपत्यें पळतीलचि जेवि पाडसें दूर ।
पावेल श्रीच्याचा ज्येष्ठेचा केवि पाड शेंदूर ॥ २ ॥

मोरोपंत,—भीष्मपर्व, अ० ५, आ० २.

९३३ अकांड तांडव—अकांड म्ह० भलत्याच वेळीं केलेलें आणि तांडव म्ह० शंकराचें नृत्य. हें शंकराचें नृत्य स्मशानभूमींत आणि पिशाचमंडळींत चालतें. *यावरून "अकांड तांडव" ह्या शब्दाचा उपयोग वेळ अवेळ मनांत न आणतां वें* वेड्यासारखें किंवा मूर्खासारखें केलेलें कृत्य, तें. रागाच्या भरात दुसऱ्यावर झाडलेला तातेरा. [ अनुरूप क्रियापद "करणें" ].

९३४ अंगचा मळ—अत्यल्प वस्तु. उ० हणमंतराव मोठा अदत्त आहे. *एखाद्या माणसाचा प्राण वांचवावयालासुद्धा तो अंगचा मळ देणार नाहीं !*

९३५ अंगदशिष्टाई—रामानें रावणाकडे आपल्या तर्फे बोलणें करण्यासाठीं वालिपुत्र जो अंगद, त्यास पाठविलें होतें. "शिष्टाई" म्ह० तटस्थपणानें केलेलें भाषण किंवा मध्यस्थी. "अंगदशिष्टाई" म्ह० अंगदानें केलेली शिष्टाई. ह्या मूळच्या *अर्थाचा विपर्यास होऊन "अंगदशिष्टाई" ह्याचा हल्लींचा अर्थ लुडबुडेपणा असा* झाला आहे.

९३६ अंगावरचें मूल—ज्या मुलाचें उपजीवन आईच्या दुधावर ( सर्वथैव किंवा अंशत: ) अवलंबून असतें, असें मूल.

९३७ अघळपघळ भाषण—

( क ) पुष्कळसें आणि मन मोकळें करून बोलणें.

( ख ) अंगीं प्रामाणिकपणा किंवा खरें प्रेम नसतां त्याचा आविर्भाव करून केलेलें जें भाषण त्यालाहि "अघळपघळ भाषण" असें म्हणतात.

९३८ *अजागळ—"अजागळ" हा शब्द "अजागलस्तन" ह्याचा अप*भ्रंश किंवा तोकडें रूप आहे. "अजा" म्ह० शेळी; "गळ" म्ह० गळा; "स्तन" म्ह० लोंबता मांसल अवयव. ह्या अवयवाचा शेळीला कांहीं उपयोग नसतो. यावरून "अजागळ" शब्दाचा निरुपयोगी असा प्रथम अर्थ होऊन नंतर मूर्ख, कर्तृत्वशून्य, बावळेट असा अर्थ झाला.

९३९ अडणीवरचा शंख—देवपूजेंत लागणारा शंख सर्वांना ठाऊकच आहे.

शंखाचें बूड गोल असतें, म्हणून तो देवापुढे ठेवावयासाठी एक बैठक केलेली असते, तिला "अडणी" म्हणतात. "शंख" हा शब्द व्यवहारात लक्षणेने मूर्ख व आशिक्षित माणसाला लावतात. जो मनुष्य मूर्ख व बिनअकली असल्याकारणानें कोठेहि ठेवतां येत नाही म्हणजे कोणत्याहि कामीं योजता येत नाही, अशा माणसाला वशिल्याच्या जोरावर एखादा हुद्दा मिळाल्यास त्याला डळमळून खाली पडण्याची भीति नसते. यावरून "अडणीवरचा-शंख" म्ह० उच्च पदीं असलेला मूर्ख, बिनअकली अधिकारी. "अडणी" ह्या शब्दाचा "वशीला" हा लाक्षणिक अर्थ होय.

९४० अडेलतट्टू—अडून बसणारा, हट्ट घेणारा माणूस. [ घुजरा तट्टू पदोपदी अडतो आणि पुढे चालत नाही, ह्या त्याच्या साम्यावरून "अडेलतट्टू" हा शब्द निघाला आहे ].

९४१ अढीच्या दिढी—उघळेपणाने; सढळ हाताने; महागाईच्या दराने; एकाच्या ठिकाणीं दीड खर्चून. व्युत्पत्ति :—दीड म्हणजे एक वस्तु सबंध आणि दुसरी अर्धी मिळून जें परिमाण, तें. जेथे एकाने काम होत असेल, तेथें दीड खर्चणें, हा उघळेपणा होय. अढी ह्या शब्दाचा "एक" असा अर्थ नाही; परंतु "दीड दीड" ह्या शब्दाशीं यमक जुळण्यासाठीं "अढी" हा शब्द "एक" ह्या अर्थाचा बनवून "अढीच्या दिढी" म्ह० एकाच्या (जागीं) दिढी (ने), ही शब्दसंहति उत्पन्न करण्यांत आली. ती क्रियाविशेषणाचें काम करते.

टीप:—"अढी" ह्याचा अर्थ "अर्धा" असा सहज होऊ शकेल आणि ह्या शब्दसंहतीचा अर्थ "अर्ध्याच्या जागीं दीड" असा करता येईल. परंतु आमच्या मताने पहिली व्युत्पत्ति ग्राह्य होय.

९४२ अतिरथि महारथि—मोठे योद्धे; वीर महावीर; एकाहून एक जास्ती पराक्रमी पुरुष. महारथ म्ह० १०,००० धनुर्धाऱ्यांशीं एकटा लढणारा. अतिरथ म्ह० शत्रूनी सर्व बाजूंनीं गराडा घातला असता जो लढूं शकतो तो वीर. "रथ" बद्दल "रथी" हें मराठी रूप होय.

९४३ अंधेर नगरी—जेथे नेहमी अंधेर म्हणजे अन्याय, जुल्म, पक्षपात वगैरे चालतात, अशी नगरी. यावरून "अंधेरनगर म्ह० अव्यवस्थितपणाचा कारभार, बेबंदशाही किंवा घोटाळा.

## ९४४. अनागोंदी

१. तुंगभद्रा नदीच्या उत्तर काठावर असलेलें गाव "आनेगुंडी" हें प्रथम विजयानगरच्या राज्याच्या राजधानीचें ठिकाण होतें. नंतर येथून राजधानी त्या नदीच्या दक्षिण काठावर "हंपी" येथे नेण्यांत आली. विजयानगर ह्या शहराचीं नावें विद्यानगरी, विजयानगरी अशीं पूर्वी होतीं. आनेगुंडी, हंपी आणि विजयानगर हीं स्थळें

हल्ली जरी विलग दिसतात, तरी तीं राज्याच्या वैभवाच्या काळीं सलग असून तीं एका मोठ्या शहराचे ते विभाग होते. हें राज्य इ० सन १३३६ मध्ये स्थापलें गेलें आणि इ० सन १५६५ मध्ये त्याचा लय झाला. [ "अनेगुंदी" म्ह० हत्तीच्या फिरण्याची जागा, ह्या कानडी नावाचा "अनागोंदी," हा मराठींत झालेला अपभ्रंश आहे, असें एका कानडी भाषा जाणणाऱ्यानें आम्हाला सांगितलें ].

२. विजयानगरचें राज्य दक्षिण हिंदुस्थानांत खूप मोठ्या भागावर पसरलेलें होतें. परंतु तेथील राजे आपण सर्व हिंदुस्थानचे राजे आहों आणि इतर राजे आपले मांडलिक आहेत, असें कल्पून त्यांच्याकडून खंडणीच्या रूपानें मोठमोठ्या रकमा आल्या आहेत, असें भपकेदारपणानें जमेच्या बाजूस दाखवीत आणि तेवढ्याच रकमा त्यांच्या नांवावर नजराणे, देणग्या, आहेर अशा भपकेदार शब्दांनीं खर्चाच्या बाजूस दाखवून जमा खर्चाची तोंडमिळवणी करून दाखवीत. यावरून "अनागोंदी" या शब्दाचा अर्थ भपकेदार, अव्यवस्थित, ताळतंत्र नसलेला असा क्रमाक्रमानें होत गेला. "अनागोंदी" हें विशेषण कारभार, जमाखर्च, व्यवस्था इत्यादि नामांच्या मागे योजण्यांत येतें.

९४५ अमरपट्टा—मरणापासून आपणांस भीति नाहीं, अशा प्रकारचें आश्वासन

१. पूर्वी राजानें कोणाला कांहीं बक्षीस किंवा दान दिलें असतां तत्संबंधाचा लेख तांब्याच्या पत्र्यावर कोरून तो पत्रा त्या माणसाला दिला जात असे. ह्या पत्र्याला "ताम्रपट्ट" किंवा ताम्रपट असें म्हणत. ह्या चालीच्या अनुरोधानें "अमरपट्टा" हा शब्द प्रचारांत आला आणि त्याचा अर्थ "अमरत्व दान केल्याचा दाखला" असा झाला. यम किंवा सर्व विध्वंसक काळ ह्यांच्या तडाख्यांतून कोणीहि माणूस किंवा कोणतीहि वस्तु वांचत नाहीं, असें म्हणावयाचें असतां "त्याला काय अमरपट्टा मिळाला आहे की काय!" असें वाक्य योजण्यांत येतें.

९४६ अरण्यरोदन—अरण्यांत रोदन केलें असतां तें निष्फळ होतें. कारण, सांत्वन करावयास किंवा समजूत घालावयाला तेथें कोणीहि येत नाहीं, यावरून "अरण्यरोदन" म्हणजे निष्फल प्रयत्न, निरुपयोगी रडपड; व्यर्थ मेहनत. "अरण्यरुदित" असेंहि रूढ आहे. उ० "सर्वसंग्रहाचे" मालक यांनीं सरकारचा आश्रय तुटला असतां आपल्या देशबंधूंची जी काकुळत केली, ती केवळ अरण्यरुदिता-प्रमाणें निष्फल झाली. विष्णुशास्त्री चिपळूणकर,—निबंधमाला.

९४७ अरेराव—अरे! अरे! करणारा; अरे! अरे! करण्यांत पटाईत; सदा लोकांच्या अंगावर खेकसणारा. या मूळच्या अर्थावरून "अरेराव" ह्याचा मगरूर, गर्विष्ठ किंवा अल्पाधिकारानें उन्मत्त झालेला माणूस असा अर्थ झाला आहे.

९४८ अर्धचंद्र—अष्टमीचा चंद्र अर्धा असून तो अर्धवर्तुळाकृति असतो. गचांडी देतांना हाताचा अंगठा व पुढचें बोट हीं ताणलीं जाऊन अर्ध्या चंद्राचा

आकार होतो. यावरून "अर्धचंद्र" म्हणजे गचांडी असा अर्थ झाला. अनुरूप क्रियापदें "देणें," "मारणें," "मिळणें" इ०.

९४९ अर्धांगी—"अर्ध" म्ह० अर्धे, "अंग" म्ह० शरीर. पत्नी ही पतीच्या शरिराचा अर्धा भाग आहे, असें समजलें जातें. "अर्धं भार्या मनुष्यस्य" वगैरे वचनांवरून हेंच सिद्ध होतें. यावरून "अर्धांगी" म्हणजे भार्या.

९५० अलबत्त्या गलबत्त्या—कोणीतरी क्षुल्लक माणूस; बिनकिंमतीचा माणूस. वरिष्ठाची थुंकी झेलणाऱ्या लोकाच्या ठायीं स्वाभिमानाचा लवलेश नसतो. वरिष्ठानें काहीहि विधान केलें, तरी त्यावर "अलबत्" म्हणून दुजोरा देणारे जे लोक त्यांना "अलबत्ते" किंवा "अलबत्त्ये" असा शब्द प्रथम लावण्यांत आला. नंतर हे असले लोक हलकटच असतात, यावरून "अलबत्त्या" शब्दाचा अर्थ "हलकट किंवा य:कश्चित् माणूस, लुडबुड्या माणूस" असा झाला. अलबत्त्याच्या पुढे "गलबत्त्या" हा शब्द केवळ यमकासाठी घातला आहे. उ० खुद्द त्या संस्थानिकाच्या कुटुंबांत चार पांच माणसें आहेत. परंतु पत्त्रीला पंचवीस अलबत्ते गलबत्ते असतात. त्यांच्यामुळे सारें माजघर भरून जातें!

९५१ अलीजा दरबार—अवाढव्य थाटमाट, अव्यवस्थित कारभार किंवा रहाटी. [आलीजाह् म्ह० भव्य, प्रचंड; अवाढव्य].

९५२ अलम् दुनिया—सर्व जग, जगांतील सारे लोक. [व्युत्पत्ति:—"अलम्," म्ह० सर्व; "दुनिया" म्ह० जग].

९५३ अल्लाची गाय—गरीब, निरुपद्रवी माणूस. (पुरुष असो किंवा स्त्री असो).

९५४ अवाचे सवा—एकाच्या जागीं सवा, पुष्कळ; अव्यवस्थित. उ० हुंडणावळीच्या बाबतींत तर सरकारनें आपल्या विलायती नोकरास अव्वाच्या सव्वा पैसे देऊन फुकट खर्च वाढविलेला आहे. —बा० ग० टिळक.

९५५ अष्टपैलू—आठ आहेत पैलू ज्याला असा (हिरा किंवा प्रकाशाचें परावर्तन करूं शकणारा पदार्थ). ज्या पदार्थाला आठ पैलू आहेत, त्यावर कोणत्याहि दिशेनें प्रकाशाचा किरण आला, तरी तो परावर्तित होऊन डोळ्यावर चमकतो, यावरून "अष्टपैलू माणूस," म्हणजे सर्व प्रकारचीं कामें करावयाला पूर्णपणें समर्थ असा माणूस.

९५६ अष्टाधिकार—आपणा आर्य लोकांच्या साध्या आणि निसर्गाच्या ग्रामव्यवस्थेंत प्रत्येक गावांत गावचीं कामें करणारे आठ अधिकारी असून त्यांच्या त्यांच्या अधिकारांचीं विशिष्ट क्षेत्रें किंवा कर्तव्यें ठरविलेलीं असत. हे अधिकारी आठ असत, ते येणेंप्रमाणे, कोळी, पाटील, देशमुख, कुलकर्णी, वर्तक, धर्माधिकारी, उपाध्या आणि जोशी. यावरून खाणें, पिणें, आघोळ करणें, निजणें वगैरे जीं देहा-

संबंधाचीं कामें त्यांना " अष्टाधिकार " हा शब्द विनोदानें योजला जाऊं लागला. उ० कालपासून ह्या एका लुगड्यावर माझे अष्टाधिकार झाले! मला दुसरें लुगडेंच नाही. मी तरी काय करूं!

९५७ अस्मानी सुलतानी—फारसी भाषेत अस्मान् = आकाश. सुलतान् = बादशाहा. यावरून "अस्मानी सुलतानी " ह्याचा अर्थ दुर्दैवामुळे किंवा राजाच्या दुष्टपणामुळे प्राप्त झालेलीं संकटें.

९५८ अळवावरचें पाणी—अळवाच्या पानावर पाणी पडलें किंवा टाकलें असता तें त्याला चिटकत किंवा लागत नाही. यत्किंचित् धक्का लागला असतां तें खाली पडतें. यावरून " अळवावरचें पाणी " म्हणजे चंचल, अस्थिर किंवा क्षणभंगुर अशी वस्तु.

९५९ अळीमिळी गुपचिळी—स्वस्थ व न बोलतां गप्प बसण्याची ताकीद एकमेकास करताना मुलें या शब्दाचा उपयोग करतात. मोठ्या माणसांसबधाने हा वाक्प्रचार विनोदानें योजला जातो. [ अनुरूप क्रियापद " घालणें " ].

९६० अक्षरशत्रु—अक्षरांस शत्रु समजून त्याना टाळणारा; ज्याला लिहितां वाचता येत नाही किंवा ज्याला शिकण्याचा अतोनात कंटाळा आहे असा. उ० छत्रपति शिवाजी महाराज अक्षरशत्रु होते, असें विधान इग्रज इतिहासकार डफ् याने जें केलें आहे, तें आबा चांदोरकर, वि० का० राजवाडे वगैरे विद्वानांनी साफ खोटें असें सिद्ध केलें आहे.

९६१ आऊट घटकांचा आनंद, आऊट घटकांचें राज्य—क्षणभंगुर आनंद, अधिकार किंवा अंमलदारी. (याच प्रकरणांत पुढें " शिराळशेट " हा शब्द पहा ).

९६२ आकाशाची कुऱ्हाड—ईश्वराने आणिलेली किंवा दिलेली दुःखकारक स्थिति; ईश्वरी क्षोभामुळें प्राप्त झालेलें संकट.

९६३ आकाशाची घाड—अर्थ वरच्याप्रमाणें.

९६४ आकाशपाणी—मद्य ( ताडी किंवा माडी ). [ टीपः—ताड आणि माड हीं झाडें फार उंच असतात, आणि त्याच्यापासून निघणारीं पेयें ( ताडी व माडी ) हीं त्याच्या माथ्याजवळ म्ह० जमिनीपासून फार उंचावर ( जणो काय आकाशात ) असतात. यावरून ताडी व माडी ह्याना " आकाशपाणी " हा शब्द लावण्यात येतो].

९६५ आकाशयान—विमान.

९६६ आकाशवाणी—कोणातरी मनुष्याचे शब्द. जेव्हा एखादी बातमी आपण अमक्याच्या तोंडून किंवा अमक्या ठिकाणीं ऐकली, असें श्रोत्याला कळवावयाचें नसतें, तेव्हा त्या बातमीला " आकाशवाणी " म्हणतात. उ०

खंडोपंत—" मी कापडाचें दुकान काढणार, हें तुम्हांला कोणीं सांगितलें ? "

बंडोपंत—" तशी आकाशवाणी माझ्या कानीं आली. पण तुम्ही दुकान काढणार, हें खरें ना ? "

९६७ आकाशपाताळाचा भेद—अति मोठा फरक. उ० ते शास्त्रीबोवा म्हणाले, " आत्मा आणि बुद्धि हीं जर तूं एक समजत असलास, तर आकाशपाताळाचा भेदच तूं नाहींसा केलास, असें म्हटलें पाहिजे ! " " काशीरामेश्वराचें अंतर " असाहि ह्याच अर्थानें प्रयोग आहे.

९६८ आखाडसासरा—नसता मोठेपणा आपणांकडे घेऊन दुसऱ्यावर करडा अमल चालवूं पाहणारा माणूस. ह्याच प्रकारची स्त्री असल्यास तिला " आखाडसासू " म्हणतात.

व्युत्पत्तिः—आषाढ महिन्यापुरता सासरा किंवा सासू. आषाढाच्या महिन्यांत सुनेनें सासऱ्याचें तोंड पाहूं नये, असा आपणांत परिपाठ आहे. म्हणून तिला शेजाऱ्याच्या घरीं किंवा दुसरीकडे कोठेतरी आषाढाच्या महिन्यात राहावयास पाठवितात. ह्या परक्या घरचा माणूस तिच्यावर खऱ्या सासऱ्यासारखा अधिकार गाजवूं लागतो, यावरून त्याला " आखाडसासरा " म्हणतात. खरा अधिकार नसतां तो गाजविणाऱ्याला " आखाडसासरा " म्हणतात; आणि नसता अधिकार गाजविणाऱ्या स्त्रीला " आखाडसासू " असें म्हणतात.

९६९. आगापिछा—आगा = पुढची बाजू, पिछा = मागची बाजू. यावरून पुढील दोन अर्थ निघाले.

(क) " आगा " म्ह० पुत्र, कन्या वगैरे पुढील पिढीचीं माणसें, आणि " पिछा " म्हणजे आईबाप वगैरे मागच्या पिढीचीं माणसें. " आगापिछा " म्हणजे पुढच्या आणि मागच्या पिढीचीं माणसें. उ० आता मला आगापिछा कांहीं नाहीं ! काशीवासास जावें, म्हणजे जन्माचें सार्थक होईल !

(ख) तपशीलवार वृत्तान्त; पूर्वपीठिका; सुगावा; तपास करण्याचीं किंवा लावण्याचीं साधनें. उ० त्या चोराचा कांहीं आगापिछा माहीत असल्याशिवाय त्याचा तपास कसा लागणार ?

९७० आग्या वेताळ—एका जातीचा वेताळ. वेताळ = एका जातीचें भूत. आग्या वेताळाचा मंत्र जपला म्हणजे हव्या त्या माणसाला किंवा पदार्थाला आग लावतां येते, म्हणजे तो जाळून त्याचें भस्म करतां येतें. लाक्षणिक रीत्या हा शब्द योजला म्हणजे त्याचा अर्थ " तामसी किंवा तडफड्या प्रकृतीचा माणूस " असा होतो. उ० आमचे रावसाहेब म्हणजे शुद्ध आग्या वेताळच आहेत !

९७१ अठरा विसवें दारिद्र्य—कोणत्याहि वस्तूचे वीस भाग कल्पिले, तर त्यांपैकी ५ भाग म्हणजे पाव वस्तु, १० भाग म्हणजे निमी वस्तु इत्यादि परिमाणें

होतात, त्यापैकी १८ भाग म्हणजे बहुतेक पूर्ण वस्तु. "विसवा" म्हणजे विसावा भाग. "अठरा विसवें दारिद्य" म्हणजे पराकाष्ठेचें दारिद्य.

९७२ अठरा धान्यांचें कडबोळें—बाजरी, गहूं, तांदूळ, हरभऱ्याची डाळ, उडीद वगैरे धान्यें भाजून त्या मिश्रणाचें केलेलें जें पीठ, त्याला "भाजणी" म्हणतात. कडबोळीं भाजणीचीं करतात. अर्थात् अनेक धान्यांच्या मिश्रणापासून कडबोळें तयार होतें. यावरून "अठरा धान्यांचें कडबोळें" म्हणजे अनेक वस्तूंच्या मिश्रणापासून बनलेली किंवा बनविलेली कोणतीहि वस्तु. [ येथें अठरा" हा शब्द विशिष्ट संख्या दाखवीत नाहीं. केवळ मोठी संख्या दाखवितो ].

९७३ अठरा पगड जात—हिंदु लोकांची पगड्या बांधण्याची तऱ्हा जातीजातींत वेगळी आहे. जितक्या जाती तितके पगड्यांचे प्रकार. यावरून "अठरा पगडजाती" म्हणजे सर्व जाती; सर्व जातींचे लोक.

९७४ अंडीं पिल्लीं—गुप्त गोष्टी, रहस्यें, वर्मे कर्मे, उ० माझ्यापुढे काशोबा घंटाळ्याचे दिमाख चालावयाचे नाहीत! त्याचीं अंडीं पिल्लीं मला सर्व माहीत आहेत! उ० तूं माझ्या उलट गेलास तर मी तुझीं सर्व अंडीं पिल्लीं बाहेर काढून तुझी फटफजिती करीन! याद राखून ऐस! [ मागे लेखांक ७४ पहा ].

९७५ आंतबट्ट्याचा व्यापार—ज्या व्यापारांत फायदा न होतां नुकसान झालें आहे किंवा नुकसान होणें हें खास आहे, तो आंतबट्ट्याचा व्यापार.

९७६ आतुर संन्यास—आपला मरणकाल अगदी जवळ येऊन ठेपला आहे, अशी मनाची समजूत झाली असता जो संन्यास घेतात तो.

९७७ आंवळ्याएवढें पूज्य—"पूज्य" म्ह० अभाव. "आवळ्यायेवढें पूज्य" म्ह० अत्यंताभाव. उ० शिवरामाचें संस्कृत जरा बरें आहे, परंतु गणिताविषयीं म्हणाल, तर आवळ्यायेवढें पूज्य! [ ह्या वाक्प्रचारांत "पूज्य," हा शब्द अध्याहृत ठेविला तरी चालतो. तसेंच "आंवळ्यायेवढे" ह्याच्या बद्दल "भोपळ्यायेवढें" म्हणण्याचाहि प्रघात आहे ].

९७८ आशाळभूत—एखाद्या वस्तूसाठी ( विशेषतः खाद्यपेयासाठीं, अति निर्लज्जपणाने आणि दुसऱ्यास किळस वाटेल, अशा रीतीने उत्सुक झालेला माणूस.

९७९ इळ्याभोपळ्या इतकें सूत—इळ्याने म्ह० विळ्याने भोपळा चिरतात, म्हणून विळा हा भोपळ्याचा शत्रु. "विळ्याभोपळ्याइतकें सूत" म्हणजे शत्रुत्वाचा संबंध. "विळ्याभोपळ्याइतकें वाकडें" याचाहि वरील अर्थाने उपयोग केला जातो.

९८० उंटाचें पिल्लूं—प्रथम प्रिय वाटणारी ( किंवा अप्रिय न वाटणारी ), आणि नंतर त्रासदायक होणारी अशी वस्तु.

९८१ उंटावरचा शहाणा—मूर्खपणाची सल्लामसलत देणारा माणूस. अति उच्च अशा वाहनावर बसणाऱ्या माणसाची बुद्धि "अति उच्च" असलीच पाहिजे. अशा काव्यमय कल्पनेपासून हा वाक्प्रचार उत्पन्न झाला आहे. ह्या वाक्प्रचाराच्या उत्पत्तीसंबंधाने एक गोष्ट सांगण्यात येते, पण ती केवळ हरदासी नक्कलच होय.

९८२ उणें उत्तर—अपमानकारक किंवा तिरस्कारव्यंजक भाषण किंवा जबाब. [ मागे लेखांक ७२०, ३ पहा ].

९८९ एरंडाचें गुन्हाळ—गुन्हाळांतील चरकांत ऊस घातला त्याच्यापासून मधुर रस मिळतो; परंतु एरंड चरकांत घातला असतां त्याच्यापासून गोड रस मिळणें तर दूरच, पण वांतिकारक रस निघतो; यावरून "एरंडाचें गुन्हाळ" म्हणजे कंटाळवाणें, नीरस व लांबच लांब भाषण.

९९० एळकोट—खंडोबाचे भक्त खंडोबाची तळी उचलतांना किंवा भिक्षा मागतांना "एळकोट!" हा शब्द उच्चारतात. यावरून "एळकोट" म्हणजे सर्वांनी हातभार लावून एकदिलाने केलेला प्रयत्न. तळी उचलतांना भक्तमंडळी गोंधळ आणि गडबड करीत असतात. ह्यावरून "एळकोट" म्हणजे गोंधळ किंवा अव्यवस्था, असा नंतर अर्थ झाला. उ० दहा घरचीं दहा माणसें आलीं आणि त्यानी सान्याच कामाचा एळकोट करून टाकला! [ मल्ल दैत्याशीं लढताना खंडोबाचे सात कोटी देव साहाय्यकारी होते. ह्या संख्येचा वाचक एळकोट हा शब्द आहे. कानडी भाषेंत एळ म्ह० सात आणि कोट म्ह० कोटी. कर्नाटकात राहणाऱ्या महाराष्ट्र-भाषाकोविदांनी साम आणि साधार माहिती आम्हांला द्यावी अशी विनंती आहे ].

९९१ ओ का ठो—काहींदेखील. उ० त्याला ओ का ठो देखील कळत नाही! (हें अक्षर "ओ" आहे किंवा "ठो" आहे, हेंदेखील त्याला समजत नाही). [ ह्या शब्दसंहतीचा उपयोग नेहमी अकरणरूपी होतो ].

९९२ ओनामा—मुलें प्रथम अक्षरें शिकूं लागतात, तेव्हा पहिला धडा "ओम् नमः सिद्धम्". ह्या वाक्याचें अपभ्रष्ट रूप "ओनामासीध" हें आहे. ह्या अपभ्रष्ट अक्षरात छाटाछाट होऊन "ओनामा" असा शब्द होऊन त्याचा अर्थ प्रारंभ असा झाला. ओनाम्या—ओनामा शिकणारा. कोणत्याहि विद्येच्या, शास्त्राच्या किंवा विषयाच्या अध्ययनाला ज्याने नवीनच सुरुवात केली आहे, असा. 'ॐ नमः सिद्धं' हा मंत्र मूळ जैनांचा असून त्यांनी त्याचें मागधी भाषेंत "ओनामासिधं" असें रूपांतर केलें आणि हेंच सर्व लोकांच्या तोंडीं हल्ली आहे.

चिं० वि० वैद्य,—संस्कृत वाङ्मयाचा इतिहास.

९९३ ओली आग—अतिवृष्टीने आलेलें संकट किंवा दुर्भिक्ष्य. उ० कोरडी आग पुरेल, पण ओली आग पुरवणार नाही!

९९४ ओली भिक्षा—शिजविलेल्या अन्नाची भिक्षा म्ह० माधुकरी. याच्या उलट "कोरडी भिक्षा" म्हणजे तांदूळ, बाजरी, जोंधळे वगैरेंची भिक्षा.

९९५ कचकच—कचकच हा आवाज होईल अशा रीतीने. उ० अन्नपूर्णाबाई आणि शारदाबाई एकमेकींशीं सदा कचकच भांडत असतात. [ माणसें रागावलीं म्हणजे दात ओठ खातात. दांत एकावर एक घासल्याने "कचकच" असा आवाज होतो ].

टीप:—"कचाकची" ह्याचा "दांतओठ खाऊन भांडणें" ह्या अर्थाने उपयोग होतो ].

९९६ कडू कारलें—अतिशय वाईट व न सुधारणाऱ्या स्वभावाचा माणूस. उ० नाऱ्या हें एक कडू कारलेंच आहे! त्याची संगत तूं धरलीस तर तो तुझ्या जिवाला सुख लागूं देणार नाही.

९९७ कत्तलची रात्र—मोहरम महिन्याच्या दहाव्या तारखेला रात्रीं हसन व हुसेन यांच्यांत मोठी भयंकर लढाई होऊन मोठी कत्तल झाली. यावरून "कत्तलची रात्र" याचा अर्थ "ऐन घाईची, गर्दीची किंवा आणीबाणीची वेळ" असा झाला.

९९८ कपी—एखाद्या मंडळींतील किंवा टोळींतील अत्यंत जुना माणूस.

टीप:—म्हातारीं माणसें हाडकीं, कुरूप, वेळच्या वेळीं श्मश्रु न करविणारीं, वाकडीं तिकडीं असल्यामुळे तीं माकडाप्रमाणें दिसतात; यावरून त्याना "कपि" (म्ह० माकड) ही संज्ञा लावण्यात येते.

९९९ कपिलाषष्ठीचा योग—फारच दुर्मिळ संधि; पुष्कळ कालाने प्राप्त होणारी संधि.

टीप:—भाद्रपद महिन्याची वद्य षष्ठी, ही तिथि मंगळवारीं येऊन त्या दिवशीं रोहिणी हें दिवसनक्षत्र, हस्त हें महानक्षत्र आणि व्यतिपातयोग इतक्या गोष्टी जुळल्या तर त्या षष्ठीला "कपिलाषष्ठी" म्हणतात; व त्या संयोगाला "कपिलाषष्ठीचा योग" असें म्हणतात. इतक्या सात गोष्टींचा योग साठ वर्षांनीं एकदा होतो. पुढे ज्योतिष-प्रकरणात हाच शब्द पहा.

१००० कंबख्ती—विपन्नावस्था; मार बसण्याची, खेटरें खाण्याची, शिव्या ऐकून घेण्याची वेळ; शक्यता, संभवनीयता किंवा स्थिति. [अनुरूप क्रियापद येणें, मरणें इ०]. उ० गोंद्याच्या हातून तो आरसा फुटला. बाबा दुपारीं घरीं आल्यावर आपली कंबख्ती निघणार ह्या भयानें गोंद्या जो पळून गेला, त्याचा अजून ठिकाण नाही!

१००१ करनकरीचा वसा—कर म्हटलें असेल तें करावयाचें नाही आणि करूं नको म्हटलें असेल, तें करावयाचें अशी वागण्याची तऱ्हा.

१००२ करणी—

(क) लग्नांत वराला धोतरजोडा, पागोटें वगैरे जे जिन्नस देतात, त्यांना "करणी" म्हणतात. उ० विश्वंभररावांनी आपल्या व्याह्यांना १००० रुपये हुंडा देऊन शिवाय २०० रुपयांची करणी केली.

(ख) मारणमारणादि कर्म. उ० मांत्रिकान विठोजीवर करणी करताच विठोजी भडाभडा रक्त ओकून मरण पावला.

१००३ कर्णपिशाच—एखादें वर्तमान गुप्तपणाने येऊन सांगणारा माणूस. उ० प्रश्नः—काल क्राफर्ड मार्केटात केळ्याच्या सालीवरून माझा पाय निसरून मी जमिनीवर आदळून पडलों आणि माझें पागोटें कोठल्या कोठेच उडून गेलें, हें तुला

कसें रे कळलें ? उत्तरः—सांगितलें मला कोणीं कर्णपिशाच्चानें ! पण तूं पडलास ही गोष्ट खरी ना ? उ० तुम्ही एक दोन कर्णपिशाचें आपलींशीं करून ठेवा, म्हणजे तुमच्याविषयीं कोण काय बोलतात, हें तुम्हांस तात्कालीन समजेल.

टीपः—आपल्या भक्ताला भूत, भविष्य कानात हळूच सांगणारें पिशाच असतें, ह्या समजावरून "कर्णपिशाच" ह्याचा अर्थ वरीलप्रमाणे झाला.

१००४ कर्णाचा अवतार—अत्यंत उदार मनुष्य. कोणीं कांहींहि वस्तु मागितली असता "देत नाही !" असा शब्द न वदणारा. [ कर्णाला जन्मजात कवचकुंडलें होतीं व तीं त्याच्या अंगावर असतील तोपर्यंत त्याला युद्धांत पराभूत करणें अशक्य होतें. ही त्याची अद्भुत शक्ति हिरावून घेण्यासाठी इन्द्र ( अर्जुनाचा पिता ) ब्राह्मणरूपानें आला आणि त्यानें कर्णाजवळ तीं कवचकुंडलें मागितलीं. कर्ण हा मोठा दाता असल्याकारणानें त्यानें तीं त्या ब्राह्मणास दिलीं. मग पुढें युद्धामध्यें अर्जुनानें त्याचा पराजय करून त्यास ठार मारिलें.

१००५ कर्दनकाळ—उग्र, भयंकर, रागीट किंवा तापट माणूस. अपराधाची क्षमा न करतां दंड करणारा. उ० गोदीसारख्या अल्लड पोरीला कर्दनकाळ सासू मिळाली, तर तिचे हाल कुत्रा खाणार नाही !

टीपः—कर्दन = युद्ध, तंटा, बखेडा किंवा मारामारी. काळ = यम,—जो सर्वांचा नाश करतो. तो "कर्दनकाळ" म्ह० युद्ध करून शत्रूला शासन करणारा. या व्युत्पत्तीवरून वरील अर्थ झाला. "कर्दनकाळ" हें अपभ्रष्ट रूप.

१००६ कर्मकटकट—त्रासदायक, जिकिरीचें, नावडतें असें काम. उ० मी झालों आता म्हातारा. तुमच्या मुलाला पाढेबिढे शिकवावयाला ठेवा एखादा मास्तर! माझ्यामागे ही कर्मकटकट लावू नका !

१००७ कर्मधर्मसंयोग—यदृच्छा; अकल्पित मेळ; प्रारब्धयोग. [ मागे लें० ८७७ पहा. ]

१००८ कल्याण—रामदास स्वामींचा "कल्याण" या नावाचा एक पट्टशिष्य होता. तो त्यांची सर्व प्रकारची सेवाचाकरी करावयास सिद्ध असे. यावरून कोणाहि भाविक शिष्यास हा शब्द विनोदानें किंवा उपहासानें लावण्यांत येतो.

१००९ कळस—अतिरेक; पराकाष्ठा. उ० रामानें तर दाडगाईचा कळसच करून सोडला !

टीपः—देवळावर कळस चढविला म्हणजे त्याच्या उंचीचा परमावधि होतो. ह्या रूपकावर आधारलेला अर्थ ह्या शब्दाला आला आहे.

१०१० कळसूत्री बाहुलें—दुसऱ्याच्या प्रेरणेनें चालणारें बाहुलें; स्वाभिमान विसरून जाऊन दुसरा आज्ञा करील त्याप्रमाणें वागणारा हलकट माणूस;

स्वताचें मन घट्ट नसल्याकारणाने दुसरा कोणी जें कांही सांगेल, तें खरें व योग्य समजून त्याप्रमाणे वागणारा, पुळपुळीत माणूस. उ० गोंद्याला तुम्ही फार कडक रीतीने वागवू नका तो चिथरला, तर तो आपल्या कळसूत्री बाहुल्यांकडून तुमच्यावर निनावी पत्रांचा भडिमार करवील! उ० वजिराच्या हातीं सर्व सत्ता असून बादशाहा त्याच्या हातांत नुसता कळसूत्री बाहुल्याप्रमाणे होता!

१०११ कळीचा नारद—कळ लावणारा, कलागती उत्पन्न करणारा माणूस नारदमुनींचा स्वर्गलोक, मृत्युलोक आणि पाताळलोक या तिन्ही लोकीं संचार असल्यामुळे त्याला सर्वत्र घडणाऱ्या सर्व गोष्टी कळत असत व अमुक घडलें, तमुक ठिकाणीं तमुक घडलें वगैरे वर्तमानें तो इकडचीं तिकडे आणि तिकडचीं इकडे सांगे, आणि तेणेंकरून अर्थात् कधी कधी नाहक तंटे उत्पन्न होत, यावरून नारद हा कळ लावणारा, कलागती उत्पन्न करणारा, म्हणून प्रसिद्ध झाला

१०१२ काकरव—कावळ्यांची ओरड, निंदकांनी केलेली निंदा. उ० चिंतामणरावांनी जर पाप केलेलें नाही, तर कासोबा, शिवोबा, गोंदोबा, बहिरोबा वगैरे चांडाळांच्या काकरवानें त्यांचें काय नुकसान होणार? [ काक = कावळा रव = ध्वनि, आवाज, ओरड ]

१०१३ काटीपैलवान—काडीजवान, काडीसारखा बारीक पण मजबूत असा पैलवान किंवा जवान.

१०१४ काथ्याकूट—व्यर्थ वाटाघाट. नाम ह्या प्रकरणात काथ्याकूट करणें. ( ले० १५३ पहा )

१०१५ काणा डोळा—पाहिलेलें असून पाहिलें नाही, असा बहाणा किंवा ढोंग. ( क्रियापद " करणें " )

१०१६ काळाचा तडाखा—काळ हा सर्व वस्तूंचा नाश करणारा आहे यावरून काळाचा तडाखा म्ह० काळाने होणारा विध्वंस, नाश, मरण इ०. उ० काळाच्या तडाख्यातून आजपर्यंत काय टिकून राहिलें आहे? काळाची दाढ किंवा काळाचें तोंड म्ह० नाश, विध्वंस, मरण [ येथे काळ हा राक्षस कल्पिलेला आहे ].

१०१७ कानाचा कोपरा—कोणीहि. उ० मी मुंबईस जाणार आहें, ही गोष्ट मी कानाच्या कोपऱ्याला कळू दिली नाही.

१०१८ काशीकर—पक्का भामट्या. काशीचे भामटे फार कुशल असतात अशा समजुतीवरून " काशीकर " याचा अर्थ वरीलप्रमाणे झाला आहे.

१०१९ काशीरामेश्वराचें अंतर—अतिशय मोठा भेद, फरक किंवा तफावत काशी हें क्षेत्र हिंदुस्थानच्या अगदी उत्तरेस आहे आणि रामेश्वर हें क्षेत्र अगदी दक्षिणेस आहे. ह्यावरून हा वाक्प्रचार उत्पन्न झाला.

१०२० काळीचें उत्पन्न—जमिनीचा महसूल. [ मागे ले. ७३६, १ पहा ].

१०२१ काळें पाणी—अपराधाबद्दल शिक्षा म्हणून जो दूरचा देश राहावयासाठी ठरवून दिलेला असतो तो. [ मागे ले० ७३५, उ० ७. पहा ].

१०२२ कुडमुड्या जोशी—हस्तसामुद्रिक, रमल, ज्योतिष वगैरे आपणांस समजतात असा ढोंग घालून जो भविष्यकथन करीत असतो तो.

१०२३ कुतरीं मांजरें—वेडेंव अक्षरें. उ० तूं सहा महिने अक्षर वळवीत आहेस, पण तुझ्या हाताला अजून मुळीच वळण लागलें नाही. काय हीं तुझीं कुतरीं मांजरें! कुणीं हें पत्र पाहिलें तर काय म्हणेल!

१०२४ कुत्र्याचें सूत—दुसडा, चिरडखोर, भांडखोर माणूस.

१०२५ कुत्र्याचें शेंपूट—ज्याला कितीहि शिक्षा किंवा बोध केला, तरी जो आपलें वाईट गुण सोडीत नाही, असा माणूस. ज्याला सरळ मार्ग दाखविला, तरी जो वाकड्याच मार्गानें जातो, तो आडमुठ्या.

१०२६ कुबेर—अतिशय संपत्तिमान् माणूस; कुबेर हा स्वर्गलोकचा धनाधिपति.

१०२७ कुंभकर्ण—झोपाळू माणूस; कुंभकर्णी झोंप म्ह० गाढ आणि पुष्कळ वेळ टिकणारी झोंप. [ कुंभकर्ण हा रावणाचा भाऊ होता व त्यानें तपश्चर्येने शंकरास संतुष्ट करून त्याचेपासून गाढ आणि पुष्कळ महिने टिकणाऱ्या झोपेचा वर मागून घेतला होता ].

१०२८ कुंभारणीचें घर—जेथे गेल्यानें बुद्धिभ्रंश होतो किंवा रूप पालटतें, असें स्थळ. पुढें "म्हणी" ह्या प्रकरणामध्ये पहा.

१०२९ कुऱ्हाडीचा दांडा—स्वार्थासाठीं किंवा केवळ दुष्ट बुद्धीनें, शत्रूला मदत करून आपल्या भाऊबंधांचें किंवा देशबांधवांचें नुकसान करणारा माणूस.

१०३० कूपमंडूक—विहिरींतील बेडकाचें जग म्हणजे त्या विहिरींतीलच संकुचित जागा; त्या विहिरीच्या बाहेर काय आहे, याची त्याला मुळीच कल्पना नसते. त्याप्रमाणे जो मनुष्य आपला गाव किंवा देश सोडून कधी बाहेर गेला नाही, त्याला आपला गाव किंवा देश चांगला असा वाटत असतो व इतर गाव किंवा देश याना तो विनाकारण तुच्छ लेखीत असतो. यावरून "कूपमंडूक," म्हणजे जग पाहिलेलें नाही, व आपला गाव किंवा देश, हेच चांगले असें म्हणून जो आपल्यां ठायीं धन्यता मानीत असतो, असा मनुष्य; आकुंचित मनाचा माणूस.

१०३१ कैकेयी—दुष्ट, कजाग व हट्टी स्त्री. [ अयोध्येचा राजा जो दशरथ, त्याला तीन बायका होत्या. त्यात कैकेयी ही त्याच्या प्रीतींतील होती. तिनें दशरथाला वचनांत पकडून रामाला चवदा वर्षें वनवास भोगावयास पाठविलें. राम वनवासास गेल्यावर दशरथ पुत्रविरहानें मरण पावला. ह्याचें तिला तिळमात्र दुःख न होतां,

आता आपला मुलगा भरत, ह्यास राज्य प्राप्त होईल म्हणून अति हर्ष झाला ].

१०३२ कोटकल्याण—(शुद्ध रूप कोटिकल्याण).

(क) फार मोठें कल्याण.

(ख) चांगला पुरण्याइतका व शिवाय पुरून उरण्याइतका पदार्थ. उ० मधुसूदन चार महिने विहाररावाच्या कच्छ्यीं होता. विहाररावानी त्याला दहा रुपयांची नोकरी लावून दिली. त्याचें कोटकल्याण झालें. उ० शेरभर दुधात आमचें कोटकल्याण होतें! खायला माणसें तरी आहेत कोण बाई!

१०३३ कोण्या झाडाचा पाला?—त्याची काय मोठीशी मातबरी? तो काय यःकश्चित् माणूस? उ० हमजेखानाची मला कशाला भीति दाखवितोस? तो कोण्या झाडाचा पाला?

१०३४ कोरड्यास—भाकरी वगैरेसारखा कोरडा पदार्थ चावून खावयाला कठीण असतो; त्याच्या बरोबर आमटी, वरण वगैरे ओला किंवा पातळ पदार्थ आवश्यक असतो. ह्यावरून "कोरड्यास" म्ह० कोरडा पदार्थ ज्याच्यामुळे सोयीने खातां येईल असा कांहीतरी पातळ पदार्थ. [ "कोरड्यास" हें मूळचें चतुर्थ्यन्त नाम असून तेंच स्वतंत्रपणें नपुंसकलिंगी नाम झालें, आणि तें प्रथमेप्रमाणे आणि प्रत्ययरहित द्वितीयेप्रमाणे योजण्यांत येऊं लागलें.

१०३५ कोल्हेकुई—हलकट लोकांनी एखाद्याविरुद्ध व्यर्थ केलेली ओरड. उ० माझा पक्ष बळकट आहे. कासोबा, बहिरोबा वगैरे हलकट लोकांनी मजविरुद्ध कितीहि कोल्हेकुई केली, तरी मी डरणार नाहीं!

व्युत्पत्तिः—कोल्ह्यांचा "कुई कुई" असा आवाज.

१०३६ कोळशांतील माणिक—अतिशय काळा माणूस. उ० शरचंद्ररावाला बायको मिळाली आहे, ती काय सांगूं? अगदी कोळशातलें माणिक!

१०३७ खडाजंगी—मोठा तंटा; आवेशयुक्त भांडण. उ० पन्नास वर्षांमागे बालविवाह ह्या विषयावर त्या काळच्या पुढाऱ्यांमध्ये खूप खडाजंगी उडत असे! [खडा=उभ्याने चालविलेलें म्हणजे विश्रांति न घेता चालविलेलें जंग (युद्ध)].

१०३८ खडान्खडा माहिती—अगदी बारीकसारीक गोष्टींची देखील माहिती. उ० तो फंड कोठे आणि कसा गडप झाला ह्यासंबंधाची खडान्खडा माहिती अच्युतरावाना आहे. [ जमिनींत माती असते आणि मातींत खडे असतात. एखाद्या जमिनींतील प्रत्येक खडा ज्याला माहीत आहे, त्याला त्या जमिनीची किंवा त्या जागेची किंवा ठिकाणाची पूर्ण माहिती असणारच ].

१०३९ खडाष्टक—वैरभाव; शत्रुत्व. [ पुढे ज्योतिष" ह्या प्रकरणांत खुलासेवार स्पष्टीकरण पहा ].

१०४० खप्पीदास—वस्ताद, करारी, न कचरणारा, चिकाटी धरणारा माणूस.

१०४१ खरवड—त्रासदायक माणूस. [दूध वगैरे पदार्थ तापविला असतां भाड्याच्या तळाला जो टणक थर बसतो, त्याला "खरवड" असें म्हणतात. तो काढण्याला भारी त्रास पडतो. यावरून त्रासदायक माणसाला "खरवड" ही संज्ञा साहजिक रीत्या लावण्यात येऊं लागली].

१०४२. खापरतोंड—

(क) निपणतूचा मुलगा.

(ख) दुर्दैवी, अपशकुनी माणूस. (ह्या अर्थाने "खापरतोंड्या" असाहि वाक्प्रचार आहे).

१०४३ खिरींत सराटा—खिरीसारख्या अति उत्कृष्ट पदार्थांत चुकून एखादा बारीकसा सराटा पडला असला आणि खिरीचा भुरका मारला असता तो तोंडात गेला, तर तो जिभेला, गालांना किंवा घशाला टोंचतो आणि तोंडातील सर्व खीर थुंकून टाकावी लागते आणि आस्वादनाच्या सर्व सुखाचा भंग होतो. ह्यावरून "खिरींत सराटा" ह्याचा अर्थ मंडळीच्या सुखाचा भंग करणारा त्रासदायक व उपद्रवी माणूस असा झाला.

१०४४ खिरींत हिंग—मंडळीच्या रंगाचा भंग करणारा उपद्रवी माणूस. स्पष्टीकरण वरच्याप्रमाणेच.

१०४५ खुशालचंद—कशाचीहि काळजी न करतां सुखविलासांत जो आपले दिवस घालवितो तो.

१०४६ खुशीचा सौदा—आपल्या इच्छेप्रमाणे जें काम करावयाची आपणाला पूर्ण मोकळीक आहे, असें काम

१०४७. खोगीरभरती—

(क) "खोगीर" म्हणजे घोड्यावर बसावयासाठी केलेली मऊ आणि जाडी अशी एक प्रकारची बैठक ती मऊ आणि जाडी करावयासाठी तिच्या आंत चिंध्या, केंस वगैरे अन्य कामाला निरुपयोगी असे पदार्थ भरलेले असतात यावरून "खोगीर-भरती," म्हणजे केवळ संख्या किंवा आकार फुगविण्यासाठी घेतलेले पदार्थ किंवा घेतलेलीं माणसें.

(ख) पूर्वी स्वारांच्या गणतीमध्ये खरे शिपायी जेव्हा एखाद्या सरदाराला मिळत नसत, तेव्हा तो घोड्यांच्या खोगिरावर शिपायांचा पोषाख घातलेले कोणीतरी लोक बसवून स्वारांची संख्या मोठी करून दाखवीत असे. अशा माणसांना "खोगीर-भरतीचीं माणसें" असें म्हणत

१०४८ गंगाजमनी—गंगेचें पाणी पांढरें आहे व जमुनेचें (यमुनेचें) काळें आहे. प्रयाग येथे त्या नद्यांचा संगम झाला आहे, तेथे ते दोन्ही प्रवाह भिन्न रंगाचे

स्पष्टपणें दिसतात. यावरून दोन भिन्न आणि विसदृश वस्तु एके ठिकाणीं जुळल्यास किंवा आल्या असल्यास "गगाजमनी" हें विशेषण लावितात. गगाजमनी काटाचें लुगडें, धोतर, उपरणें वगैरे कापडे आपल्या पाहण्यात येतात

१०४९. गगाजळी—

(क) भागीरथी वगैरे नद्यांचें तीर्थ किंवा कोणतेंहि पवित्र उदक ठेवण्याचें जें पात्र तें

(ख) शिल्कीचा किंवा जो कधीहि खर्च करावा लागण्याचा संभव नाही, असा पैसा ठेवावयासाठी केलेलें जें भाडें, हौद वगैरे तें

१०५० गर्वाची बाधा (किंवा व्यथा)—गर्वाची पीडा, असोनात गर्व, "गर्व" ह्या शब्दाचें पहिलें अक्षर "ग" हें आहे यावरून "ग" म्हणजे गर्व असा अर्थ घेण्यांत येतो

१०५१ गजान्त लक्ष्मी—अतिशय श्रीमती पूर्वी विलासाच्या व थाट माटाच्या सर्व वस्तु घेतल्यानतर आणखीहि पैसा ज्याच्या जवळ शिल्क असे, तोच हत्ती विकत घेत असे "गजान्त लक्ष्मी" म्हणजे हत्ती विकत घेण्याइतकी श्रीमती, अतोनात सपत्ति [स० "गज" म्हणजे हत्ती, "अर्ती" म्हणजे शेवटीं निच्या अशी लक्ष्मी म्हणजे सपत्ति बहुव्रीहि समास]

१०५२ गटारयंत्र—पुणें शहरांत भाग्या मारुती, जोगेश्वरी आणि रामेश्वर, ह्या तीन देवळाच्या पुढील गटारावर किंवा ओट्यावर आणि बुधवार पेठेंत दमदेरे ह्यांच्या वाड्यातील पटवेकऱ्याच्या दुकानांत भट, आचारी पाणके वगैरे लोक सध्याकाळीं दुसऱ्या दिवसाच्या आमंत्रणाची वाट पाहत बसतात तेथे त्या मडळींत इकडच्या तिकडच्या अनेक विषयावर गप्पा निघतात व त्या गावच्या सर्व बातम्या आणि खबरा यांच्यावर काथ्याकूट चालतो तेथील बातम्या आणि खबरा पुष्कळ वेळा निराधार व खोट्या ठरतात यावरून निराधार बातमीस "गटारबातमी" आणि जेथे ती उत्पन्न केली जाते, त्या स्थानाला किंवा ती उत्पन्न करणाऱ्या माणसाला "गटारयंत्र" असें म्हणतात.

१०५३ गडबडगुंडा—अव्यवस्थितपणें आणि घाईघाईनें केलेलें काम

१०५४ गंडांतर—अपमृत्यु, कोणताहि मोठा अनर्थ, ज्यावर आपली सत्ता चालत नाही असा उ० प्रियंवदाबाई—"काय सागू तुम्हांला गोपिकाबाई, किनई, मधुसूदनरावांना चाळीस दिवस ताप येत होता त्यांतून ते बचावण्याची यत्किंचित आशा नव्हती पण कर्मधर्मसयोगानें त्यांच्या घरीं एक पाहुणा आला; तो वैद्यकी जाणत असे त्यानें मधुसूदनरावांना तपासून एक औषध दिलें. त्या औषधानें ते दहा दिवसात पूर्ण बरे झाले आणि हल्लीं ते नेहमीप्रमाणें आपले सर्व व्यवहार करीत

असतात." गोपिकाबाई—"एरॅच का प्रियंवदाबाई? तर मग मोठेंच गंडांतर टळलें हो!"

[टीप:—" गंडांतर " ह्या शब्दाचा अधिक खुलासा पुढे ज्योतिष प्रकरणांत पहा].

१०५५ गद्धेपंचविशी—वयाचें पंचविसावें वर्ष,—ज्या वर्षाच्या थोडें अलीकडे किंवा थोडें पलीकडे मुलगा गाढवाप्रमाणें वर्तन करण्याचा संभव असतो, तें वर्ष. मुलगा बिघडण्याचा काळ किंवा त्याने त्या काळात केलेलीं मूर्खपणाचीं कृत्यें.

१०५६ गद्धेमल्हार—" मल्लार " ह्या नावाचा संगीतशास्त्रांत एक राग आहे. त्याचे शुद्ध, मेघ, मीया, सूर, गौड, नट, रामदासी, मेराबाई, सोरट, देस, नायकी, झाझ, धुंडिया आणि चारुणी असे चवदा प्रकार आहेत. शुद्ध मल्लारांत, आरोहात आणि अवरोहात सा, रे, म, प, ध असे पांच शुद्ध स्वर येतात. मल्लार रागाचे सर्व प्रकार इतर रागांप्रमाणेच कर्णमधुर असतात. त्यात कांही कर्कशपणा असतो, असें नव्हे. परंतु ह्या मल्लार रागाची गाढवाशीं सांगड का घालण्यात आली, हें आम्हांला सांगता येत नाही. तथापि इतकें खरें की " गद्धेमल्हार " ह्या शब्दसंहतीचा व्यवहारामध्ये " कर्णकटु गायन किंवा कर्कश भाषण " असा अर्थ झाला आहे. " मल्लार " ह्या शब्दाचें " मल्हार " हें अपभ्रष्ट रूप होय.

१०५७ गनिमी कावा—" गनीम " हा शब्द अरबी असून त्याचा अर्थ शत्रु किंवा वनतेचा शत्रु असा आहे. " कावा " हा हिंदुस्थानी शब्द असून त्याचा अर्थ लबाडी, युक्ति, हिकमत असा आहे. " गनिमी कावा " म्हणजे शत्रूला फसविण्यासाठी केलेली हिकमत. परकी मुसलमानी राजाच्या अफाट सैन्यापुढे आपल्या चिमुकल्या देशभक्त फौजेचा टिकाव लागावयाचा नाही, हें जाणून शिवाजीमहाराज त्या सैन्याची नासाडी करून त्याला बेरीस आणण्यासाठी अनेक हिकमती योजीत असत. आपण भ्यालों असा बहाणा करून शत्रूला पाठीवर घ्यावयाचें व तो अडचणीच्या स्थळीं आला म्हणजे त्याच्यावर उलटावयाचें व त्याची नासाडी करावयाची ही एक शिवाजी महाराजांची हिकमत असे. अशा हिकमतींना हे परके मुसल्मानी राजे " गनिमी कावा " म्हणत.

१०५८ गम्य—थोडेंसें ज्ञान किंवा माहिती. उ० भुजंगरावाला हस्तसामुद्रिकांत काही गम्य आहे काय? (म्हणजे त्याला तें काहीतरी समजतें काय?) उ० गणेशपंताला चित्रकलेंत गम्य नाही. तुझ्या चित्रातील गुणदोष त्याला कसे सांगतां येतील?

१०५९ गर्गाचार्यांचा मुहूर्त—मागील पांच घटिका रात्र शेष उरली म्हणजे उषःकाल होतो, तो गर्गमुनींच्या मतें शुभ आणि बृहस्पतीच्या मतें उत्तम शकुन. ह्या उषःकालाला " गर्गाचार्यांचा मुहूर्त " म्हणतात. [पुढे " ज्योतिष " प्रकरण पहा].

१०६० गर्भश्रीमंत—गर्भावस्थेपासून जो श्रीमंत तो; ज्याच्या जन्मापासून घरांत मुबलक पैसा आहे, असा माणूस.

१०६१ गळग्रह—डोईजड माणूस. उ० इंदुशेखरराव मला एक गळग्रहच होऊन बसला आहे!

१०६२ गाजरपारखी—ज्याला गाजराचीहि पारख करण्याची अक्कल नाही, असा माणूस. उ० ही शंभर रुपये किंमतीची मोत्यांची जोडी आहे आणि तुम्ही तिची किंमत १८।२० रुपये करतां! खरे गाजरपारखीच दिसतां!

१०६३ गाढवाचा खरारा—मूर्ख; बिनअकली माणूस.

१०६४ गाय—

(क) अनाथ; दीन दीन माणूस. उ० कासोबाची लबाडी मीं बाहेर काढली, तेव्हा तो गाय होऊन माझी क्षमा भाकूं लागला.

(ख) कन्या (जिच्या सुखदुःखाची जबाबदारी सर्वैथैव आपणांवर असते आणि तिला आपण जेथे स्थळ पाहून देऊं, तेथे जाऊन नांदावें लागतें). उ० अहो हेमचंद्रपंत, तुम्ही दीड हजार रुपयांना भुलून त्या रक्तपित्या पोराशीं गाय गोवूं नका! (म्ह० तुमच्या मुलीचें लग्न जुळवूं नका).

१०६५ गायीचे यजमान, पतिराज किंवा चिरंजीव इ०—बैल. म्ह० मूर्ख; त्रैअकली माणूस.

१०६६ गावगुंड—गावांतील मंडळींत प्रमुख; गावकऱ्यांच्या तर्फेने बोलणारा; गावढळच, पण त्यांतल्या त्यात हुशार. उ० सोकरजीसारख्या गावगुंडाला कोणतीहि गोष्ट अशक्य नाही!

१०६७ गाळीव मूर्ति—सर्व दुर्गुण गाळून आणि ते दुर्गुण शुद्ध रूपांत एकत्र करून बनविलेली मूर्ति. उ० बस्तेसिंह म्हणजे एक गाळीव मूर्तिच आहे!

१०६८ गुरुकिल्ली—मर्म, रहस्य, खुबी. [प्रत्यक्ष गुरूच्याच ताब्यांत असलेली किंवा फक्त गुरूलाच चालवितां येते, अशी किल्ली].

१०६९ गुरुमंत्र—मंत्र शिकविण्याचा अधिकार गुरूकडेच असतो आणि मंत्र सांगावयाचा तो गुप्त रीतीने व एकान्तांतच सांगितला पाहिजे, असा परिपाठ आहे. यावरून "गुरुमंत्र" म्हणजे यशस्वी होण्याचा गुप्त रीतीने उपदेशिलेला मार्ग.

१०७० गुलगुल गोष्टी—हलक्या हलक्या स्वरांत चाललेलें बोलणें म्हणजे प्रेमाच्या आणि रहस्याच्या गोष्टी. उ० कसल्या रे तुमच्या गुलगुल गोष्टी मघापासून चालल्या आहेत? अभ्यास-बिभ्यास कांही नाही वाटतें तुम्हांला करावयाचा?

१०७१ गुलाबाचें फूल—नाजूक पुरुष किंवा स्त्री; गुलजार, गोजीरवाणें मूल.

१०७२ गुलाबी थंडी—सुखकर होईल इतक्याच प्रमाणाची थंडी, अति तीव्र किंवा कडक नव्हे अशी थंडी. उ० श्रीमंताना गुलाबी थंडी भोगावयाला सापडते. कुणबी माणसाना सूर्योदयाच्या अगोदर शेतावर जावें लागतें !

१०७३ गुळाचा गणपति—मोठ्या पदीं असलेला पण दुसरा सांगेल तसें करणारा माणूस, स्वताला बुद्धि नसल्याकारणाने त्याला दुसऱ्याच्या तंत्राने चालावें लागतें आणि म्हणून ज्याला उच्चपद मरून काढण्यापलीकडे काहीच करतां येत नाहीं, असा माणूस, अजागळ किंवा बावळट माणूस.

१०७४ गुळावरच्या माशा—एखाद्या माणसाच्या वैभवकाळीं त्याला धरून असणारे पण त्याच्या आपत्काळीं त्याला सोडून देणारे लोक.

१०७५ गृहच्छिद्रें—"गृह" म्हणजे घर; छिद्र म्हणजे मर्म, वर्म, उणेंपणा किंवा निंदाविषय. "गृहच्छिद्र" म्हणजे घरांतील दोष, उणीवा किंवा वर्में कर्में. उ० सखारामभोवाचीं सारीं गृहच्छिद्रें वैजनाथपताला ठाऊक आहेत, म्हणून वैजनाथपताच्यापुढें तोंड वर करून बोलावयाची सखारामभोवाची छाती नाहीं !

१०७६ गोगलगाय—अगदी निरुपद्रवी माणूस; अत्यंत गरीब मनुष्य.

१०७७ गोडीगुलाबी—सलोखा, मित्रता; प्रेमभाव.

१०७८ गोमा गणेश पितळी दरवाजा, गोमाजी कापशे, गोमाजी तिमाजी—कोणीतरी मनुष्य (ज्याचें नाव सांगण्याची जरूरी नाहीं), एक मनुष्य (मग तो कोणी का असेना !), कोणीतरी माणूस (ज्याचें काहीं महत्त्व नाहीं). हीं सर्व नावें काल्पनिक आहेत ह्या नावाचीं कोणीहि माणसें होऊन गेलेलीं नाहींत "गोमा गणेश पितळी दरवाजा," ह्या नावाचा एक पुरुष होऊन गेला, असा कांहीं लोकांचा समज आहे आणि त्याच्या संबंधाने एक दंतकथाहि सांगण्यात येते. परंतु त्या दंतकथेला कांही ऐतिहासिक पुरावा नाहीं, असें प्रो० पोतदार यांनी आम्हाला सांगितलें.

१०७९ गोरज मुहूर्त—रानांत चरावयाला गेलेल्या त्या गाई व म्हशी त्या घरीं परत येत असतां त्यांच्या पायांनी धूळ उडते, तो समय म्हणजे संध्याकाळची वेळ.

१०८० गोळकाचें सोवळें—खोटें सोवळें, दिखाऊ आणि बाह्यात्कारी सोवळें. उ० गोळकाचें सोवळें सारा वेळ विळविळें.

१०८१ गौडबंगाल—मंत्रतंत्र, किमया, जादू वगैरे. [पूर्वी गौड आणि बंगाल हे देश यांतील विद्येंत प्रवीण होते].

१०८२. ग्रंथ

(क) एक अनुष्टुभ् श्लोकाचा एक ग्रंथ अशी संज्ञा आहे. ह्या श्लोकांत ३२ अक्षरें असतात. यावरून ३२ अक्षराच्या समुदायास १ ग्रंथ म्हणतात. "महाभारत हा लक्ष ग्रंथ आहे". ह्या वाक्याचा अर्थ "भारतांत एक लक्ष अनुष्टुभ् श्लोक आहेत."

(ख) विस्तार, अद्वातद्वा बोलणें किंवा लिहिणें; कुभांड रचणें; शिवीगाळ करणें. उ० कावेरीबाईच्या मुलानें गोदूबाईच्या लेकीला नुसतें कुठे मूर्ख पोरगी म्हटलें, त्यावरून गोदूबाईनें जो कांही ग्रंथ केला, तो पुसूच नये!

- १०८३ ग्रामकेसरी किंवा ग्रामसिंह—

(क) "ग्राम" म्हणजे गाव, "केसरी" म्हणजे सिंह. अरण्यात सिंह जसा पराक्रमी तसा गावांत कुत्रा पराक्रमी. यावरून कुत्र्याला वरील शब्द विनोदानें किंवा तिरस्कारानें लावतात

(ख) लक्षणेनें हा शब्द 'आहेरून धैर्य दाखविणारा आणि अंतर्यामीं भितरा' अशा माणसास लावितात.

१०८४ घटकेचें घड्याळ—एकच घटकाभर चालत राहणारें घड्याळ म्ह० लक्षणेनें मनुष्याचें क्षणभंगुर जीवित.

१०८५ घटपटादि खटपट—न्यायशास्त्राच्या विषयावर वादविवाद, त्यांतील विपयासंबंधाची उरस्फोड [न्यायशास्त्रांत उदाहरणें घेतांना "घट" (घागर) आणि "पट" (वस्त्र) ह्या दोन पदार्थांचीं उदाहरणें घेण्याची नैयायिकांची चाल आहे]. उ० नलगे व्याकरणाची न्यायाची घटपटादि खटपट ती! —मोरोपंत.

१०८६ घटोत्कचाचा बाजार—सोंदेगिरी, फसवेगिरी

"घटोत्कच" हा भीमाचा हिडिंबा राक्षसीपासून झालेला मुलगा. बलरामाची कन्या वत्सला हिचा विवाह दुर्योधनाचा पुत्र लक्ष्मण ह्याच्याशीं व्हावयाचा होता; म्हणून दुर्योधनपक्षीय मंडळी द्वारकेस आली. परंतु कृष्णाच्या आज्ञेवरून घटोत्कचानें वत्सलेस बलरामाच्या घरून पळवून नेलें आणि कृष्ण, सुभद्रा वगैरे मंडळींनी अभिमन्यूशीं तिचा विवाह करून टाकला. नंतर घटोत्कच आपल्या मायासामर्थ्यानें बलरामाच्या घरीं वत्सला होऊन बसला; आणि दुर्योधनपक्षीयांची फजिती करण्यासाठी आणखी मायेचा बाजार त्यानें भरविला. ह्या बाजारांत घटोत्कचाच्या कांही मित्रांनी दागिन्यांचीं व वस्त्रांचीं रूपें घेतलीं आणि बाकीचे राक्षसच दुकानदार होऊन त्यांनी जुन्या वस्तु घेऊन त्यांच्या मोबदला नव्या वस्तु देण्याचा क्रम सुरू केला. कौरवपक्षीय स्त्रिया ह्या मायावी वस्त्रालंकारांनी सजून लग्नाच्या समारंभासाठीं सिद्ध झाल्या. ऐन लग्नाच्या समयीं राक्षसांनी आपलीं मूळचीं रूपें धारण केलीं आणि सर्वांना घाबरवून आणि भेडसावून त्यांची दाणादाण उडवून दिली आणि त्यांना फजीत होऊन हस्तिनापुरास पळून जावयास लावलें.

१०८७ घड्याळ टिपरू—खायाला भाकर आणि तोंडी लावायाला मिरची असें अगदी साधें गरीबाऊ जेवण. [भाकरी वाटोळी आणि पातळ असल्याकारणानें तिला वाजवावयाच्या तासाची आणि मिरची लांब असल्याकारणानें तिला तासावर वाजविण्याच्या टिपराची उपमा विनोदानें दिली आहे].

१०८८ घमंडानंदन—बढाईखोर माणूस; आपल्या गुणांची किंवा कर्तृत्वाची ज्याला फाजील थोरवी वाटते व ती थोरवी ज्याच्या त्याच्या जवळ जो बोलून दाखवितो तो.

१०८९ घरकोंबडा—जो सदा घरांतच किंवा आपल्या गावांतच राहतो तो; चार चौघांकडे ज्याचें जाणें येणें नाही असा.

१०९० घागरगडचा सुभा—पाणी आणण्याचें काम. घागरगड = घागर नावाचा गड म्ह० किल्ला; तेथील सुभा म्ह० सुभेदाराचें काम. "घागरगडचा सुभा" ह्या शब्दसंहतींत विनोद आहे. उ० मी कसची बाई आता तुमच्या येथे बसावयास येणार? मला घागरगडचा सुभा घ्यावयाचा आहे ना? (म्हणजे घरात पाणी भरावयाचें आहे).

१०९१ घृतकुल्या मधुकुल्या—चारी ठाव, चमचमीत भोजन; खाण्या-पिण्याची चैन. घृत = तूप. कुल्या = पाट. मधु = मध. घृतकुल्या = तुपाचे पाट. मधुकुल्या = मधाचे पाट. ज्यात तूप आणि मध (म्ह० साखर), तूप आहेत, अशीं पक्वान्नें. उ० भाद्रपद महिन्यांत भिक्षुक मंडळींची चैन असते! रोज घृतकुल्या आणि मधुकुल्या!

१०९२ घेलाशेट—अर्धवट माणूस; जरासा बावळट माणूस. हा कोणी ऐतिहासिक माणूस नव्हता.

१०९३ घोड नवरा—मोठ्या वयाचा वर.

१०९४ घोड नवरी—मोठ्या वयाची वधू.

१०९५ घोड्याएवढी चूक—फार मोठी आणि अक्षम्य अशी चूक.

१०९६ घोड्याच्या पाठीवरचा कोस—लांबलचक, कंटाळवाणा कोस.

१०९७ चकारशब्द—एक अक्षरसुद्धा. उ० बापाच्यापुढे तो ह्मणण्या चकारशब्द बोलावयाचा नाही!

१०९८ चटकचांदणी—सुंदर आणि नखरेबाज स्त्री.

१०९९ चंडाळचौकडी—दुष्ट माणसांचा समुदाय.

११०० चढती किंवा उतरती कमान—उत्कर्षाची किंवा अपकर्षाची स्थिति; वाढतें किंवा उतरतें मान.

११०१ चतुर सावंजी—शब्दशः—कुशल, हुशार सावाजी. "सावाजी" हें विशेषनाम. लक्षणेनें:—मूर्ख माणूस. "सावाजी" हा विजापूरच्या राजाचा वजीर होता. तो तुळरकडचा राहणारा असावा. त्यानें अभंगात्मक कोडीं केलीं होतीं, असें म्हणतात.

११०२ चंदुलाल—चैनी, उधळ्या माणूस.

११०३ चरपटपंजरी—वायफळ भाषण किंवा लेखन; लांबलचक, फटाळवाणें वर्णन.

११०४ चर्वितचर्वण—एकदा चावलेलें पुनः चावणें; ज्याची एकदा रुचि घेतली आहे, तेंच पुनः चाखणें; तृप्ति न पावता पुनः तेंच तें खाणें, भोगणें इ०; ज्याची वाटाघाट अगोदर झाली आहे, त्याची पुनः पुनः वाटाघाट करणें. उ०

तुच्छें चर्वितचर्वणोपम सुखें जीं तींच तीं भोगितां।
ससारीं न तिरस्कृती उपजते हे कोण निर्लज्जता ! ॥ वामन—स्फुट श्लोक.

११०५ चौदा चौकड्यांचें राज्य—कृत, त्रेता, द्वापार आणि कलि हीं चार युगें मिळून जो काल, त्याला "चौकडी" असें म्हणतात. अशा चवदा चौकड्या मिळून जो काळ, त्या काळभर टिकणारें जें राज्य, तें "चौदा चौकड्यांचें राज्य" असलें राज्य रावणानें केलें.

११०६ चवदावें रत्न—मार; समुद्रमथनीं जीं चवदा रत्नें समुद्रातून निघालीं, त्यात शेवटचें रत्न चाबूक अशा समजावर "चवदावें रत्न" ह्याचा चाबूक असा अर्थ झाला. उ० शामूला चवदावें रत्न दाखविल्याशिवाय तो ताळ्यावर येणार नाही !

११०७ चाणाक्ष—धूर्त, हुशार. "चाणक्य" नावाचा एक ब्राह्मण होता. त्याने धूर्तपणाचीं कारस्थानें करून नंद घराण्याचा उच्छेद केला आणि चंद्रगुप्ताला गादीवर बसविलें. ह्यावरून "चाणाक्ष" किंवा "चाणक्ष" हा शब्द धूर्त मणसास लावतात. चाणाक्ष आणि चाणक्ष ही "चाणक्य" ह्या मूळ शब्दाचीं अपभ्रष्ट रूपें होत.

११०८. चांभारचौकशी—

१ एखादी वस्तु विकत घेतांना विनाकारण घासाघीस.

२ जी माहिती मिळवून आपणांला काही उपयोग नाही व देणाऱ्यालाहि जी त्रासदायक होते, अशी माहिती काढण्यासाठी विचारलेले प्रश्न.

११०९ चार अक्षरें—थोडीशी विद्या.

१११० चार घटका—थोडासा वेळ. उ० आपण या घनगराच्या पालात जाऊन बसू व त्यांशीं चार घटका संभाषण करू. कृष्णशास्त्री चिपळूणकर,-रासेलस.

११११ चार लोक—समाज, समाजातील माणसें.

१११२ चार खुंट जहागीर—भिक्षेकऱ्याची स्थिति, अत्यंत दारिद्री स्थिति. [ "चार खुंट" म्ह० पृथ्वीचे चार कोपरे; तेथपर्यंत पसरलेली जहागीर, म्हणजे फार मोठी जहागीर भिक्षेकऱ्याची झोळी चौकोनी फडक्याची असते. आतील पदार्थ काढून घेण्यासाठी हें फडकें जमिनीवर पसरलें, म्हणजे त्याचे चार कोपरे पूर्व, पश्चिम, दक्षिण आणि उत्तर, ह्या चार दिशाकडे असतात. ह्या जो फडक्याचा विस्तार तोच जहागिरीचा प्रदेश. ]

१११३ चारी ठाव जेवण—ताटाच्या चारी बाजूंस (म्ह० सर्व बाजूंस) खाद्य पदार्थ वाढलेले असून जें जेवण, तें चारी ठाव जेवण [मागें ले० ७४० पहा].

१११४ चार्वाक—"चार्वाक" हा नास्तिक मताचा प्रवर्तक होता. यावरून कोणाहि नास्तिक मनुष्याला "चार्वाक" हा शब्द लावतात.

१११५ चालता काळ—उद्दीचा किंवा वैभवाचा काळ. उ०

या तुझा चालता काळ। खायाला मिळती सकळ॥ —अमृतराय.

["चालता काळ" ह्याच्या उलट "पडता काळ" म्ह० अपकर्षाचे दिवस"].

१११६. चाळिशी—

(क) मनुष्याचें चाळिसावें वर्ष किंवा त्याच्या लगतचा अवधि.

(ख) चष्मा; उपनेत्र. ह्या वस्तूची जरुरी मनुष्याला बहुधा वयाच्या चाळिसाव्या वर्षी पडते. यावरून चष्म्याला "चाळिशी" असा प्रतिशब्द निघाला.

१११७ चिटपाखरूं—कोणीहि मनुष्य. उ० मी त्या वाड्यात शिरलों, तेव्हा मला तेथे चिटपाखरूं आढळलें नाही! उ० मी त्या मुलाटकीच्या घरांत निजत असें, तेव्हा माझ्या सोबतीला चिटपाखरूंतरी होतें काय? [ह्या शब्दाचा उपयोग नेहमी अकरणरूपी होतो].

१११८ चित्रगुप्त—सर्व प्राण्यांच्या चांगल्यावाईट कृत्याची नोंद ठेवणारा यमाचा जो कारकून, त्याचें नांव "चित्रगुप्त." यावरून जो लोकाचीं गुप्तपणें केलेलीं निंद्य कृत्यें दुष्ट हेतूने पाहत असतो, त्यालाहि "चित्रगुप्त" ही संज्ञा लावितात.

१११९ चिन्ह—विचित्र असा दिसणारा; सोंग.

११२० चिरंजीव—वडिलाने लहानास उद्देशून लिहितांना किंवा लहानाविषयी लिहितांना त्याच्या नावामागे योजावयाचा हा शब्द आहे. [चिरं = पुष्कळ दिवस. जीव = जिवत रहा, म्हणजे जग].

११२१ चिरीमिरी—बाक्षिशी; बक्षीस म्हणून दिलेला पैसा; घेणाराचा हक्क नसता त्याला आपण खुष होऊन दिलेले जे पैसे ते. आमच्या मताने व्युत्पत्तिः—जिरे, मिरे इ० हे मसाल्यांतील पदार्थ होत. धान्याच्या मानानें जिरे, मिरे इ० पदार्थ (जे केवळ चवीसाठी घातलेले असतात) ते अर्थात् थोडेच असतात. ह्यावरून "चिरीमिरी," ह्याचा अर्थ लहानशी, अल्प किंमतीची खुष करणारी बाक्षिशी.

११२२ चुकारतट्टू—आपणाला सांगितलेल्या किंवा नेमून दिलेल्या कामांत जो टंगळमंगळ करतो तो.

११२३ चुटक्यांचे मांडव—एका दुखणाईत बाईने असा नवस केला होता, की ह्या दुखण्यांतून मी बरी झालें, तर देवाच्या देवळापुढे मांडव घालीन. ती दुखण्यातून उठली, तेव्हा तिला मांडव घालणें प्राप्त झालें. परंतु मांडव घालावयाला

तिच्याजवळ पैसे नव्हते; तेव्हा तिनें असें केलें. देवळापुढे ज्या ज्या ठिकाणीं मांडवाचे खांब पुरावयाचे, त्या त्या ठिकाणीं जाऊन ती एक एक चुटकी म्ह० टिचकी वाजवी आणि एका चुटकीच्या आवाजाबरोबर "हा एक खांब झाला!" असें ती म्हणे. अशा रीतीनें खांब पुरणें झाल्यावर ती म्हणाली, "झाला मांडव! मीं नवस फेडिला!" यावरून "चुटक्यांचे मांडव," म्हणजे लुटूपुटीचा पराक्रम, बढाई, वल्गना, रिकामी तोंडपाटिलकी असा अर्थ झाला. [अनुरूप क्रियापद "घालणें"].

११२४ चोहोंचा आंकडा—प्रशस्तपणें घातलेली मांडी.

११२५ चौकोनी चिरा—ह्या त्या कामाला उपयोगी पडणारा माणूस. ह्या त्या मंडळींत साजणारा किंवा खपणारा माणूस. याच अर्थानें "अष्टपैलू माणूस" ह्याचाहि उपयोग होतो.

११२६ चौपदरी—भिक्षेची झोळी. उ० आज तूं विद्या न करतां पत्ते खेळून काळ घालवीत आहेस! उद्या चौपदरी हातीं धरणार आहेस की काय?

११२७ चौऱ्यांशींचा फेरा—जिवाला चौऱ्याऐंशी लक्ष वेगळ्या वेगळ्या प्राण्याचा देह धारण केल्यानंतर मोक्ष मिळतो, अशी हिंदूंची समजूत आहे. ह्या सर्व देहांत जे जिवाचें संक्रमण त्याला "चौऱ्यांशींचा फेरा," म्हणतात. तो शब्द लक्षणेने "अत्यंत गुंतागुंतीची स्थिति" किंवा "घोटाळ्याचा प्रसंग" ह्या अर्थानें योजला जातो. वरील शब्दसंहतींत "फेरा" ह्याच्या बद्दल "गरका," हाहि शब्द घालतात.

११२८ छत्तिसाचा आंकडा—विरोधाभाव; प्रेमाभाव; वैमनस्य. छत्तिसाचा आंकडा ३६ असा काढतात व त्याची आकृति परस्परांकडे पाठ करून बसलेल्या माणसांप्रमाणे दिसते. एकाचें तोंड पूर्वेकडेस तर दुसऱ्याचें पश्चिमेकडेस, अशी स्थिति असल्यास म्हणतात, "त्या दोघांत छत्तिसाचा आकडा आहे." याच्या उलट "त्रेसष्टी" म्ह० "पूर्ण सलोखा"

११२९ जगत्शेट—अति श्रीमंत माणूस; विरोधी लक्षणेनें भिकारी किंवा दरिद्री माणूस. या दुसऱ्या अर्थानें "जगत्शेटीचा नातू" अशीहि शब्दसंहति योजण्यांत येते.

११३० जड पारडें—श्रीमंत व वजनदार माणूस. [ह्या शब्दांत तराजूचें रूपक आहे. ज्या पारड्यांत काही जिन्नस असतो, तें दुसऱ्या किंवा रिकाम्या पारड्याहून जड असतें आणि हेलकावे खात नाही].

११३१ जडभरत—सुस्त व आळशी माणूस.

प्रियव्रतवंशोत्पन्न जो प्रसिद्ध ऋषभदेव, त्याचा ज्येष्ठ पुत्र 'भरत' हा होता. तो राज्य सोडून अरण्यात तप करावयाला गेला असतां, एका हरिणावर त्याची ममता जडली. मरणसमयीं त्याला त्या हरिणाच्या ध्यासानें पराकाष्ठेचें दुःख झालें. त्यामुळे तो पुढे हरिणाच्या जन्मास गेला. ह्या जन्मातून सुटल्यावर तो एका ब्राह्मणाच्या पोटीं

जन्मास आला. या वेळीं पूर्वजन्मांतील मोहपाशाची त्याला आठवण होती, म्हणून सर्व संग सोडून त्यानें जडचर्या अवलंबिली; म्हणून त्याला "जडभरत" असें नाव प्राप्त झालें. कोणी उठविल्यास उठावें, जेवावयास कोणीं कांहीं आणून दिल्यास तें खावें, असा ह्याचा आयुष्यक्रम असे. पुढे रहुगण राजानें ह्याला आत्मतत्त्वबोधानें कृतार्थ केलें. जडभरताच्या जडचर्येला अनुलक्षून "जडभरत" ह्या शब्दाचा अर्थ हल्ली सुस्त, आळशी माणूस असा झाला आहे.

११३२ जडवुडाचें मनुष्य—श्रीमंत आणि वजनदार माणूस.

११३३ जडीबुटी—औषधी काष्ठें, पाळेंमुळे वगैरे. यावरून, गुणावह वस्तु; अजब रीतीनें कार्य घडवून आणणारी वस्तु; असा ह्याचा अर्थ झाला. अडचणीच्या प्रसंगीं उपयोगी पडावें म्हणून बाजूस काढून ठेवलेले सोन्याचे दागिने किंवा पैसे वगैरे.

जडी—( हिंदुस्थानी भाषेंत ) पाळें, मुळें, विशेषतः औषधाच्या उपयोगाचीं बुटी ( हिंदुस्थानी भाषेंत ) औषधाला उपयोगी पडणारी वनस्पति. वनस्पतींचीं पाळें. मुळें वगैरे, प्रसंगीं उपयोगी पडतात. यावरून लक्षणेनें "जडीबुटी" ह्याचा अडचणीच्या प्रसंगीं उपयोगी पडणारें सोनें, द्रव्य वगैरे असा अर्थ झाला.

११३४ जन्माची गांठ—जन्मात न सुटणारी गाठ म्ह० विवाहसंबंध. हिंदु लोकात विवाहसंबंध एकदा जडला, की तो कायमचा टिकणारा असतो ( विशेषतः वरच्या जातींत किंवा पांढरपेशांत )

११३५ जन्माची भाकर—जन्मभर पुरणारी शेतकी किंवा नोकरी किंवा सावकारी वगैरे चरितार्थाचें साधन. उ० महाराज, मजवर दया करा आणि माझी जन्माची भाकर तोडूं नका ! ( याच अर्थानें "जन्माची वेगमी" हा शब्द योजला जातो ).

११३६ जांबुवंत—श्रीरामाच्या बरोबर जे कपि योद्धे लंकेवर चालून गेले, त्यापैकी एक. हल्ली "जांबुवंत" हा शब्द वृद्ध माणसास किंवा वेळेवर हजामत न करविल्याकारणानें ज्याच्या तोंडावर लांब केस वाढले आहेत, अशा माणसास लावतात.

११३७ जमदग्नि—अतिशय तापट आणि रागीट माणूस. ( "जमदग्नि" हा अति रागीट ऋषि होता. यानें स्त्रीवर कोपून पुत्राकडून तिचा शिरश्छेद करविला ).

११३८ जमीनअस्मानाचें अंतर किंवा फरक—फार मोठें अंतर; मोठी तफावत. उ० कित्येकांनी शिवाजीची तुलना ग्रीसचा बादशहा शिकंदर ह्याच्याशीं केली आहे. पण ती समर्पक दिसत नाहीं. कारण दोघांचे काळ, कर्तव्य आणि फलप्राप्ति ह्यांमध्यें जमीनअस्मानाचा फरक आहे. —गो० स० सरदेसाई.

[ पारशी भाषेंत जमीन = पृथ्वी. अस्मान् = आसमान् = आभाळ ].

११३९ जरीपटका—पेशव्यांचें निशाण.

११४० जाडें प्रकरण—वजनदार माणूस; असामान्य प्रतीचा विद्वान् किंवा श्रीमंत माणूस.

११४१ जावई शोध—भलतीच सुधारणा. जो बदल केल्याने वस्तु मुळाहून अधिक वाईट होते, असा बदल.

११४२ जिभेचा किंवा तोंडाचा पट्टा—अद्वातद्वा भाषण; क्रियापदः—चालविणें, सोडणें इ०.

११४३ जुलमाचा रामराम—निरुपायामुळे किंवा नाखुषीने पतकरलेली गोष्ट. (श्रीमंत मनुष्य किंवा अधिकारी पाजी असला, तरी त्याला नमस्कार किंवा रामराम किंवा सलाम करावा लागतो. न केल्यास तो मनांत अढी धरून नुकसान करतो. अशा माणसास केलेला जो नमस्कार, रामराम किंवा सलाम तो "जुलमाचा रामराम").

११४४ झाकलेलें माणिक—जो बाहेरून मूर्ख किंवा बिनअकली असा वाटतो, परंतु खरोखरी जो विद्वान्, शहाणा किंवा सुशिक्षित आहे तो.

११४५ झोटिंगबादशाही—अव्यवस्था; अव्यवस्थितपणाचा कारभार. "झोटिंग" म्हणजे पिशाचरूपाने भटकत असलेला मृत मनुष्याचा (विशेषतः मुसलमानाचा) आत्मा. यावरून शब्दशः "झोटिंगबादशाही" म्हणजे भुतांचा किंवा पिशाच्चांचा गोंधळ. लक्षणेने, कोणताहि लफंगेगिरीचा गोंधळ किंवा अव्यवस्था.

११४६ ढढ्ढाचार्य—ज्याला अगदी विद्या नाही, त्याच्याविषयी विनोदाने योजावयाचा हा शब्द आहे. पुढे ह्याच प्रकरणांत "दुढ्ढाचार्य" हा शब्द पहा.

११४७ ढालगजभवानी—स्त्रियांची नैसर्गिक शालीनता सोडून देऊन वागणारी स्त्री; अचरट किंवा मूढ गोष्टी करणारी स्त्री.

प्राचीन काळीं शत्रूच्या किल्ल्याचे दरवाजे किंवा तटबंदी फोडण्याच्या कामीं हत्तींचा उपयोग केला जात असे. हत्ती आपल्या गंडस्थळाचे रट्टे दरवाजावर किंवा भिंतीवर मारून ते दरवाजे किंवा त्या भिंती फोडून टाकीत असत. हे रट्टे मारतांना हत्तींच्या गंडस्थळांस इजा होऊं नये म्हणून त्यांच्या गंडस्थळांवर जड आणि जाडी ढाली बांधीत असत आणि हत्तींना "ढालगज" (ढाल बांधलेले गज म्हणजे हत्ती.) असें म्हणत असत. हे हत्ती अर्थात् धिप्पाड व शक्तिमान् असत आणि ते न भितां गंडस्थळाचे धडाके मारावयास सिद्ध होत. ह्यावरून "ढालगज" ह्या शब्दाचा अर्थ उपमा, रूपक वगैरेंच्या मार्गाने जातां जातां हल्ली अपकृष्ट किंवा अवनत झाला आहे. उद्धट, निर्लज्ज, धुत्रा असा "ढालगज" ह्याचा रूढ अर्थ झाला आहे. हा शब्द नामाप्रमाणेहि योजला जातो आणि स्त्रीसंबंधाने "ढालगज" हा शब्द योजताना त्याच्यापुढे "भवानी" "अचरट भवानी" हे शब्द कधी कधी लावतात. ह्या शब्दांत कांही विशेष अर्थ नाही, हें उघड आहे.

टीप:—"गज" म्हणजे हत्ती गज शब्दांतील "ज" हें अक्षर तालव्य आहे. "ढालगज" ह्या मराठी शब्दातील "ज" दन्ततालव्य उच्चारला जातो.

११४८ तरतें कूळ—ज्याला पैसा उसना दिला असतां बुडावयाची भीति नाही, असा मनुष्य. ज्याला दिलेला पैसा वसूल होऊं शकेल, असा मनुष्य.

११४९ तहानलाडू, भूकलाडू—फराळाचे पदार्थ; कांही वेळपर्यंत भूक शमविणारीं खाद्यें.

११५० तळहाताचा फोड—अत्यंत काळजीने आणि प्रेमाने जतन करावयाचा माणूस किंवा पदार्थ. उ०

केवळ पितृकरतळस्थ हा फोड ॥ —मोरोपंत.

११५१ ताज्या किंवा चालत्या घोड्यावरच्या गोमाशा—घोडा जिवंत आहे तोपर्यंतच त्याच्या अंगावर गोमाशा बसतात. घोडा मेल्यावर त्या बसत नाहीत. यावरून लक्षणेने ह्या शब्दसंहतीचा असा अर्थ झाला, की मनुष्याजवळ पैसा, अधिकार वगैरे असेतोपर्यंतच त्याच्या आश्रयाला असणारे लोक; कार्यसाधु, लाळघोटे, जीहुकमे असे लोक.

११५२ ताटाखालचें मांजर—पूर्णपणें आज्ञांकित माणूस. उ० लक्ष्मणराव हा गोविंदरावाच्या ताटाखालचें मांजर आहे!

११५३ तापत्रय—आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक अशीं जीं तीन प्रकारचीं दुःखें त्यांचा समूह. ताप = दुःख. त्रय = तिहींचा समुदाय. "तापत्रय" हा शब्द सर्व प्रकारचीं दुःखें या अर्थानें योजण्यात येतो. उ० सिद्धेश्वरभटजींचें कुटुंब निवर्तल्यापासून त्याचें तापत्रय चाललें आहे.

११५४ तारांबळ—त्रेधा; घादल. (पुढे "ज्योतिष" हें प्रकरण पहा).

११५५ तिसरा पाय—अति उत्सुकता. मनुष्याला तीन पाय असते, तर तो जास्ती वेगाने चालला असता, अशा कल्पनेवरून हा समस्तकल्प शब्द उत्पन्न झाला आहे.

११५६ तिसरें सवन किंवा तृतीय सवन—संगीत शास्त्रांत तीन "सवने" म्हणजे स्वरांचे प्रकार आहेत. पहिल्या सवनाला मंद्र, दुसऱ्याला मध्य आणि तिसऱ्याला तार असें म्हणतात. मंद्र, मध्य आणि तार हीं चढत्या क्रमाने उंच होत गेलेल्या स्वरांचीं सप्तकें आहेत. त्यावरून 'तिसरें सवन' म्हणजे अत्यंत उंच स्वरांचें सप्तक. तिसऱ्या सवनावर येणें किंवा जाणें, तिसरें सवन काढणें म्हणजे अत्यंत उंच स्वर काढणें. उ० हें मूल इतका वेळ हळूहळू रडत होतें; पण मी त्याची समजूत करावयाला गेलों, त्याबरोबर तें एकदम तिसऱ्या सवनावर गेलें! (म्हणजे मोठमोठ्याने रडूं लागलें!). उ० प्रतिपक्षीयानी लादलेल्या दोषांचें खंडन जेव्हा तो करूं लागला, तेव्हा तो तृतीय सवनावर गेला! (म्हणजे मोठमोठ्यानें ओरडून बोलूं लागला!)

११५७ तीर्थरूप—प्रत्यक्ष तीर्थच किंवा तीर्थाप्रमाणे पवित्र आणि वंद्य. आई आणि बाप यांच्या नांवांमागे मुलाने पत्रांत योजावयाचा हा शब्द आहे. "तीर्थरूप" हा शब्द पिता किंवा बाप ह्या अर्थानेहि स्वतंत्रपणें योजतात. उ० आमचे तीर्थरूप वारल्याला दहा वर्षें झालीं.

११५८ तुळशींत भांग—चांगल्या, बालबोध कुटुंबांत असलेला मूर्ख मुलगा. याच्या उलट "भांगेंत तुळस" म्हणजे ज्या कुटुंबांतील सारीं माणसें बदमाष; त्यांत असलेला सद्‌गुणी मुलगा.

११५९ तोंडपाटिलकी—हातानी म्हणजे स्वता कांहीएक काम न करतां लोकाना तोंडाने हुकूम सोडणें.

११६० त्राटिका—"ताडका" नांवाची एक दुष्ट राक्षसी होती. तिला श्रीरामचद्रानें ठार मारिलें. "त्राटिका" हा "ताडका" शब्दाचा अपभ्रंश. "त्राटिका" म्हणजे फजाग, त्रासदायक स्त्री.

११६१ त्रिशंकु—धड इकडे ना तिकडे असलेला किंवा कोणत्याहि पक्षास न मिळालेला माणूस. "त्रिशंकु" या नावाचा एक सूर्यवंशी राजा होता. त्याने यज्ञ केला, तेव्हा तो सदेह स्वर्गलोकीं गेला; परंतु देवांनी त्याला प्रतिबंध केला आणि त्याला खाली ढकलून दिलें. परंतु त्याला विश्वामित्र आपल्या तपाच्या सामर्थ्यानें पृथ्वीवर पडूं देईना. यामुळे तो मधल्या मधेच लोंबत राहिला. यावरून "त्रिशंकु" ह्याचा वरील-प्रमाणे अर्थ रूढ झाला.

११६२ त्रिस्थळी यात्रा—काशी, प्रयाग आणि गया या तीन स्थळीं जाऊन केलेली जी यात्रा ती "त्रिस्थळी यात्रा." यावरून एका माणसाला एकाच कामा-साठीं अनेक ठिकाणीं जाण्याचा प्रसंग येतो, त्याला "त्रिस्थळी यात्रा" किंवा "त्रिस्थळी" असें म्हणतात. "त्रिस्थळी" याचा अपभ्रंश "तिरस्थळी" हाहि याच अर्थानें योजिला जातो.

११६३ दगडाचे पेव—सदासर्वदा त्रास देणारी निरुपयोगी वस्तु किंवा निरुपयोगी वस्तूंचा संग्रह.

११६४ दगडावरची रेघ—न फिरणारे, खोटे न ठरणारे शब्द; जें खोटें व्हावयाचें नाही असें भाकीत. (दगडावर कोरलेलीं अक्षरें पुसलीं जात नाहीत, त्याप्रमाणे जे शब्द खोटे म्हणून पुसून टाकण्याचा किंवा रद्द करण्याचा प्रसंग येणें संभवनीय नाही, असे शब्द. "काळ्या दगडावरची किंवा चिऱ्यावरची रेघ" असेंहि म्हणतात).

११६५. दत्त—

(क) अकस्मात् घडलेली प्रिय किंवा अप्रिय गोष्ट.

(ख) अकस्मात् आलेला माणूस, जो आल्याने आपणास त्रास वाटतो किंवा आनद होतो.

(ग) दत्तात्रेयाची फेरी किंवा स्वारी—सदा भटकणारा माणूस.

हे तिन्ही अर्थ कसे निघतात, हें पुढील विवरणावरून स्पष्ट होईल

दत्त हा अत्रि ऋषीचा पुत्र हा ब्रह्मा, विष्णु आणि महेश ह्या तीन देवतांची एकदेहात्मक मूर्ति होय तो प्रातःस्नानासाठी काशीस जातो, मध्याह्नस्नानासाठी कोल्हापुरास जातो आणि रात्रीच्या विश्रांतीसाठी सह्याद्रीला जातो स्वयपाक सिद्ध होताच तो अकस्मात् कोल्हापुरास भिक्षेसाठी जातो, अशी श्रद्धाळू लोकांची समजूत आहे यावरून "दत्त म्हणून पुढे येऊन उभें राहणें" वगैरे वाक्प्रचार उत्पन्न झाले ह्या वाक्प्रचारांपैकीं काहींचे अर्थ अवनत झालेले आहेत आणि काही मूळ कथेपासून थोडेसे भ्रष्ट झाले आहेत तथापि ते सर्व कसे होत गेले, हें समजणें सोपें आहे

१ दत्तात्रेयाची फेरी किंवा स्वारी—सदा भटकणारा माणूस तो अमुक वेळीं अमुक ठिकाणीं सापडेल, असें निश्चित सांगता येत नाही

२ दत्त म्हणून उभा—आपण जेवावयास बसत आहों किंवा काही खाद्य खावयाला सुरुवात करीत आहों, अशा वेळीं जर कोणी पाहुणा किंवा मित्र आला, तर त्याला बरोबर घेऊन आपणास जेवावें किंवा खावें लागतें त्याला वगळून चालत नाही ह्याच्या योगानें असें होतें की, आपल्या वाट्याला उपभोग्य पदार्थ कमी येतो, आणि त्यामुळे आयत्या वेळीं आलेला मनुष्य आपल्या चैनींत कमीपणा आणणारा असा होतो यावरून "दत्त" म्हणजे अकल्पित आलेली अनिष्ट दैवगति, अनपेक्षित अडचण, असा अर्थ होऊन तो पुढीलसारख्या प्रयोगात नपुसकलिंगी किंवा पुल्लिंगी योजला जाऊ लागला उ० ज्या दत्ताला मी भीत होतो, तेंच माझ्यापुढे उभें राहिलें जो जोडीदार इसम मला नको होता, तोच दत्त म्हणून माझ्यापुढे उभा राहिला! शेतकऱ्यानी सरकारदस्त तर दर वर्षास तारखेच्या तारखेस भरला पाहिजे नाहीतर जमिनीचा लिलाव होण्याची पाळी यावयाची त्यात अवर्षण, टोळधाड वगैरे अवान्तर अरिष्टें अलीकडे वरचेवर कृपादृष्टि करू लागल्यामुळे दोन चार वर्षांनी यमस्वरूपी दुष्काळ दत्त म्हणून उभा आहेच! —बाळ गंगाधर टिळक

३ दत्त—अकल्पित म्हणजे ध्यानीं मनीं नसता घडलेली सुखकारक सायीची गोष्ट, अभावाचानें मिळालेली वस्तु, इ० उ० मी रामभाऊची आठवण काढली, तोंच रामभाऊ दत्त म्हणून दारात उभे!

टीप—अत्रीचा पुत्र तो आत्रेय, "आत्रेय दत्त" ह्याचें परिवृत्त रूप "दत्त आत्रेय" = दत्तात्रेय

११६६ दशग्रंथी ब्राह्मण—संहिता, ब्राह्मण, आरण्यक, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंटु, निरुक्त, छंद, ज्योतिष या दहा ग्रंथाचें ज्याने अध्ययन केलें आहे, असा ब्राह्मण

११६७ दिवाभीत—दिवा = दिवसाच्या वेळीं भीत = भ्यालेला म्ह०

भिणारा. घुबड दिवसाच्या प्रकाशांत येत नाही, म्हणून त्याला " दिवाभीत " असें नाव आहे. जो मनुष्य मंडळींत आवयास लाजतो किंवा भितो त्याला " दिवाभीत " असें म्हणतात.

११६८ दिल्लीचा सोदा—अत्यंत पटाईत भामटया. पूर्वी मुसलमानी राज्यांत दिल्लीचे भामटे फसवेगिरीचें काम मोठ्या कुशलतेने करीत असत.

११६९ दिशाभूल—खऱ्या दिशेसंबंधाने चूक; योग्य किंवा खऱ्या दिशेसंबंधाने अज्ञान; योग्य धोरणाविषयी अज्ञान; भलत्याच मार्गाकडे प्रवृत्ति किंवा कल. अनुरूप क्रियापद करणें, होणें, इ०. उ० माझी सर्व दिशाभूल करण्यासाठी त्याने प्रयत्न केला होता, पण तो फसला. उ० तुझ्या ह्या असल्या तर्कटाने माझी दिशाभूल होणार नाही.

११७० दीड शहाणा, दीड चतुर—मागे लें० ७५६, (२) पहा.

११७१ दुढ्ढाचार्य—कानडी भाषेत " दोड्ड " म्हणजे मोठा आणि " आचार्य " म्ह० गुरु; असे शब्द आहेत. सामान्य आचार्यांच्या वरच्या पायरीचा जो आचार्य त्याला " दोड्डाचार्य " अशी संज्ञा आहे. नम्रता मोठेपणा आपणांकडे ओढून घेऊन प्रौढी मिरविणारा माणूस, असा मराठींत " दुड्डाचार्य " ह्याचा अर्थ झाला आहे. " दुड्डाचार्य " ह्याचें अपभ्रष्ट रूप " ढड्डाचार्य ". ह्याच प्रकरणात मागे लें० ११४६ पहा.

११७२ देवजी धसाड्या—माकडाच्या खेळात नर माकडाला " देवजी धसाडा " ही पदवी दिलेली आहे. यावरून कोणाहि कुरूप व दाडग्या माणसास हा शब्द लावतात.

११७३ देवमाणूस—(क) देवतुल्य माणूस म्हणजे ज्याच्या अंगीं लबाडी नाही असा माणूस. (ख) सरळ आणि साधा माणूस. (ग) उपकारशील माणूस.

११७४ दौलतीचा खांब—ज्याच्या भाग्याने कुटुंबातील माणसास किंवा आश्रितांस सुखविलास भोगावयास सापडतात, असा पुरुष; कुटुंबातील मुख्य मिळविता माणूस. राजाच्या मंत्र्यांना " दौलतीचे खांब " (अरबी " अरकाने दौलत ") असें म्हणण्याचा परिपाठ असे.

११७५ द्राविडी प्राणायाम—प्राणायाम करतेवेळीं उजव्या हाताने समोरून नाक न धरता द्रविड लोक डोक्यामागून उजवा हात नेऊन त्याचीं बोटें वळवून नाक धरून प्राणायाम करतात; त्याला " द्राविडी प्राणायाम " असें म्हणतात. व्यवहारामध्ये " द्राविडी प्राणायाम " म्हणजे एखाद्या साध्या गोष्टीसाठी विनाकारण केलेला किंवा करावा लागणारा खटाटोप असा अर्थ होतो.

११७६ धन्वंतरी—हा देवाचा वैद्य होता. व्यवहारामध्ये रोग हटकून बरा करणाऱ्या वैद्यास हा शब्द लावितात.

११७७ धरमधका—विनाकारण भोगावे लागणारे कष्ट किंवा खाव्या लागणाऱ्या ठोकरा.

११७८ धारवाडी कांटा—बरोबर किंवा तंतोतंत वजन ज्यावरून समजतें, असा तराजू.

११७९ धारातीर्थ—धारा = तरवारीची धार. तीर्थ = पवित्र स्थान. धारातीर्थ = तरवारीची धार हेंच कोणी तीर्थ. यावरून "धारातीर्थ," म्हणजे समरभूमि हा अर्थ झाला. उ० सरदार पटवर्धन ह्यांच्या कुटुंबातील पुष्कळ पुरुष धारातीर्थी मरण पावले.

११८० धुळभेट—पहिली भेट; उभ्या उभ्या झालेली भेट.

११८१ धोपट मार्ग—सरळ मार्ग. ज्या मार्गानें गेलें असतां मनुष्य चुकण्याचा संभव नाही, असा मार्ग म्ह० वाट. उ०

विकट वाट वहिवाट नसावी धोपटमार्गा सोडुं नको. —अनंतफंदी.

११८२ नगद माल—उत्कृष्ट माल. सोन्यारुप्याचीं नाणीं किंवा अलंकार.उ० चोरट्यानी कोल्हापूरच्या वाटेंत नानासाहेब ठोसर याचा सारा नगद माल लांबविला.

११८३ नंगा नाच—नागव्यानें केलेला नाच; निर्लज्जपणानें घातलेला धुडगूस; अव्यवस्थित किंवा ताळतंत्र सोडून केलेला कारभार.

११८४ नंदीबैल—मूर्ख, अविद्वान्, बेअकली माणूस.

११८५ नरहरदेवाची पालखी—जें काम करावयाला सर्व लोकांची मदत आवश्यक असते व ज्याची जबाबदारी कोणा एका विशिष्ट माणसावर नसते आणि जें काम चांगल्या रीतीनें झाल्याची किंवा न झाल्याची कोणालाच पर्वा नसते, असें काम. [ नरहरदेवाची पालखी उचलण्याचें पुण्य आपल्याला लागावें म्हणून पालखीच्या दांड्याला आपला खांदा लावावयाविषयी भक्तमंडळी भारी उत्सुक असते. त्या प्रसंगीं अतिशय गोंधळ होतो व ती पालखी स्वस्थानावर गेली, म्हणजे हा गोंधळ शमतो ].

११८६ नवकोट नारायण—अतिशय श्रीमंत मनुष्य.

११८७ नवी नवरी—फार फार लाजणारी स्त्री. उ० अरे गोविंदा, पुढे येऊन बैस. असा नव्या नवरीसारखा लाजतोस काय ?

११८८ नाकांतला बाल—ज्याच्याबद्दल अतिशय काळजी वाटते किंवा ज्याच्यावर आपलें फार प्रेम असतें, असा माणूस. [ मागे लेखांक ५१,उपांक ४५ पहा].

११८९ नागवें कोल्हें—अगदी अकल्पित लाभ.

[ व्युत्पत्तिः—आम्हांला ठाऊक नाही ].

११९० नागवा पाऊस—सूर्याचें ऊन्ह असतांना पडत असलेला पाऊस; ज्याच्यावर सूर्याच्या आड येणाऱ्या ढगांचें आच्छादन नाही, असा पाऊस.

११९१ नारळाची आई—करवंटी. [ भिक्षेकरी लोक करवंटींत भिक्षा घेतात ]. उ० अरे पांड्या, ह्या वयात तू अभ्यास केला नाहीस, तर पुढे नारळाची आई तुझ्या हातांत येईल ! ( म्ह० तुला भिक्षा मागावी लागेल ).

११९२ नांवाने पूज्य—अत्यंत अभाव. उ० आज माझ्याजवळ पैशाच्या नांवाने पूज्य आहे.

११९३ निर्वाणीचा बाण—अखेरचा उपाय. [ निर्वाण = मुक्ति; शेवट; अगदी निरुपायास्तव आणि अन्य साधनें निष्फळ झाल्यानंतर सोडावयाचा बाण ].

११९४ नृसिंहावतार—उग्र स्वरूप. उ० त्या पोरापुढे जेव्हा जनूभाऊंनी नृसिंहावतार धारण केला, तेव्हा त्याने चोरी केलेली कबूल केली !

११९५ पंक्तिपठाण, पंक्तिवारगीर—श्रीमंत यजमानाच्या पंक्तीस जेवावयास जे लोक असतात ते. यजमानाची पंगत लांबलचक होऊन त्याचें वैभव मोठें दिसावें, म्हणून जे लोक पंक्तीस घेतलेले असतात आणि ज्यांचा उपयोग यथेच्छ भोजन झोडण्यापलीकडे कांही नसतो, असे लोक.

११९६ पंक्तिप्रपंच—पंक्ति = ओळ. प्रपंच = काटकसर. पंक्तींत काटकसर करणें म्हणजे श्रीमंत, शिष्ट किंवा आपल्यांशीं परिचित अशा मंडळींना उंची उंची खाद्यें वाढणें आणि गरीब किंवा तिऱ्हाईत माणसाना हलकीं सलकीं खाद्यें वाढणें हें आपल्या लोकात अत्यंत निंद्य म्हणून गणलेलें आहे. सारख्याच योग्यतेचीं माणसें असून त्यांपैकी वशिलेदारांस एका प्रकारें वागविणें आणि इतरास दुसऱ्याच तऱ्हेने वागावेणें ह्याला " पंक्तिप्रपंच " म्हणतात. अर्थात् " पंक्तिप्रपंच " म्ह० पक्षपात.

११९७ पंच पंच उषःकाल—सूर्योदयाच्या अगोदरच्या पांच घटकाचा काळ; प्रभातकाळचा सर्व अवधि.

११९८ पट्टीचा वैदिक—अग्रगण्य वैदिकात ज्याची गणना होते असा.

११९९ पडता काळ—अपकर्षाची किंवा उतरती कळा. [ मागे लें० १०४९ पहा ].

१२०० पढतमूर्ख—शिकलेला असूनहि जो मूर्खासारखें आचरण करतो तो.

१२०१ पंढरीची वारी—पुनः पुनः होणारी खेप; निष्फळ खेप. लक्षणेने एकाच परीक्षेस वारंवार जाऊन नापास होणारा उमेदवार.

१२०२ परसांतली भाजी—अनायासाने मिळणारी वस्तु; सुलभ रीतीने करितां येण्याजोगें काम.

१२०३ पळतें पीक—फळझाडांचा शेवटचा बहार.

१२०४ पागोट्याचा धनी—व्यापारांत किंवा व्यवहारांत ज्याचा चांगला लौकिक आहे, असा माणूस; पतीचा माणूस.

१२०५ पाण्यावरची रेघ किंवा रेषा—निश्चयाने खोटें ठरणारें भाकीत.

१२०६ पाप्याचें पितर—पापी लोक श्राद्धादिक कर्मे करीत नाहीत, त्यामुळें त्यांच्या पितरांस पिंडोदक मिळत नाही, म्हणून ते पितर रोड असतात; यावरून रोड आणि किडकिडीत माणसास "पाप्याचें पितर" असें म्हणतात. [ "पितर" हा शब्द मराठींत पुल्लिंगी व नपुंसकलिंगीहि योजतात.

१२०७ पायाखालची वाट—पूर्ण परिचयाची वाट.

१२०८ पिष्टपेषण—पिष्ट = पीठ, पेषण = दळणें, चिरडणें, भुगा करणें. पिष्टपेषण = एखाद्या गोष्टीचा कंटाळा येईल इतका तिचा पुन्हा पुन्हा खल करणें.

१२०९ पूर्व दिशा—पूर्व, पश्चिम वगैरे ज्या दिशा, त्यापैकी पहिली. सूर्य ज्या दिशेस उगवतो, ती दिशा पूर्वी म्ह० अगोदर ठरवून व तिला 'पूर्व दिशा' असें नांव देऊन नंतर तिच्या अपेक्षेने दक्षिण, उत्तर वगैरे दिशा ठरविण्यात येतात. अगोदर ठरविलेली दिशा म्हणून त्या दिशेस 'पूर्व' किंवा 'पूर्व दिशा' असें म्हणतात. लाक्षणिक अर्थानें 'पूर्व दिशा' म्हणजे निर्विवाद गोष्ट, शिरसामान्य किंवा कबूल करावयास पाहिजे अशी गोष्ट, आज्ञा, इ०. उ० सेनापतीची जी आज्ञा ती पूर्वदिशा असें म्हणून वागणारे सैनिकच कांहीं काम करून दाखवितील. व्यक्तिस्वातंत्र्याच्या सबबीवर सेनापतीची आज्ञा मोडणारे जे सैनिक ते सेनापतीच्या तोंडाला काळोखी आणतात ! उ. राजा करील ती पूर्व दिशा

१२१० पोटचा गोळा—प्रत्यक्ष आपलें मूल. उ० म्हाताऱ्या नवऱ्याला पोटचा गोळा वामनरावानें १५०० रुपये घेऊन दिला ! ( म्हणजे आपली मुलगी दिली ).

१२११ पोटाचा चाकर, पोटाचा पाईक—ज्याला आपल्या चरितार्थासाठी मेहनत करावी लागते, असा माणूस.

१२१२ प्रथमं वंदे—हलकट, नीच माणूस. उ० अरे, तो गोविंदराव प्रथमं वंदे आहे बरें का ! त्याच्याशीं जपून वाग !

१२१३ प्रमाण—दुसऱ्याला आज्ञा, उपदेश किंवा सल्लामसलत द्यावयाला योग्य म्हणून गणलेला माणूस; ज्याचा शब्द किंवा वचन, अनुल्लंघनीय आहे, असा माणूस किंवा ग्रंथ; सर्वमान्य; ग्राह्य. उ० बौद्ध धर्म वेदाला प्रमाण मानीत नाही.

१२१४ फुटका मणि—

( क ) अगदी लहान किंमतीचा दागिना. उ० सदानंदरावांच्या बायकोच्या अंगावर चोरी झाल्यानंतर फुटका मणिदेखील राहिला नाही !

( ख ) अगदी थोडेंदेखील द्रव्य. उ० मीं कर्जाचे पैसे सर्व वारिले; आता माझ्याकडे फुटका मणिहि नाही !

१२१५ बकध्यान—साधेपणाचें ढोंग; प्रामाणिकपणाचा बहाणा. ध्यान करीत असलेल्या माणसाप्रमाणे बक कसा दिसतो, हें पुढील श्लोकावरून लक्ष्यात येईल:—

उभा राहे एके चरणिं धरणीतें धरुनिया ,
तपश्चर्या वाटे करित वगु डोळे मिटुनिया ॥
बका ! ऐशा ढोंगें तव अमति मासेच फसत
परि शाते तूझें कपट लवलाही उमगती ॥ —कु० शा० चिपळूणकर.

१२१६ बगलबच्चा—बशिल्याचा माणूस.

१२१७ बगलभावार्थी—दिसावयाला गरीब, साधाभोळा, पण संधि सापडली की चोरी करणारा !

१२१८ बगल्या चोर—जो चोरीच्या उद्देशानें आलेला नसतो. पण जो संधि सापडतांच चोरी करावयाला सिद्ध असतो, तो.

१२१९ वडे बापके वेटे—बापाच्या किंवा वाडवडिलांच्या नांवावर, किंवा वैभवावर डौल मिरविणारा किंवा दिमाख करणारा माणूस.

१२२० बाजीरावाचा नातू—मिजासखोर माणूस.

१२२१ बादरायण संबंध—अति लांबचा किंवा दूरचा संबंध.

१२२२ बारभाई—भिन्न भिन्न मतांच्या व स्वभावांच्या माणसांचा एखाद्या विशिष्ट कामीं झालेला संयोग किंवा अशा संयोगापासून उद्भवणारा घोटाळा किंवा गोंधळ. उ० घरांतील कर्ता पुरुष मरण पावतांच रानड्यांच्या घरांत जी बारभाई माजली, ती सांगतां पुरवत नाही ! कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाही, असें होऊन गेलें !

१२२३ बारभाईचें कारस्थान—

१ भिन्न भिन्न मतांच्या व पक्षांच्या माणसांची कांही एका विशिष्ट ध्येयासाठी झालेली जूट किंवा त्यांनीं रचलेला व्यूह. हा शब्द उत्पन्न होण्याला पुढील ऐतिहासिक प्रसंग कारण झाला.

२ श्रीमंत माधवराव पेशवे हे क्षयाच्या आजारानें इसवी सन १७७२ च्या नोव्हेंबर महिन्यांत थेऊर येथे आपल्या वयाच्या अठ्ठाविसाव्या वर्षी मरण पावले; त्यांच्या पश्चात् त्यांचे धाकटे भाऊ नारायणराव ह्यांना पेशवाईची वस्त्रें देण्यांत आलीं. परंतु ते १७७३ च्या सप्टेंबर महिन्यांत मारले गेले. तेव्हा नारायणरावांचा चुलता राघोबादादा हा पेशवा झाला. तो कोणासहि आवडत नसे. त्याला पदच्युत करून नारायणरावांची बायको गंगाबाई—जी ह्या वेळीं गरोदर होती— तिच्या नांवानें सध्या पेशवाई चालवावी आणि नंतर गंगाबाई प्रसूत होऊन तिला पुत्र झाला, तर त्याच्या नांवानें आणि न झाला तर तिच्या मांडीवर दत्तक पुत्र देऊन त्याच्या नांवानें पेशवाई चालवावी, असें कांही दरबारी मंडळींनीं कारस्थान रचिलें. ह्या कारस्थानामध्यें मुख्यत्वेंकरून दोन भिन्न भिन्न पक्षांची माणसें सामील झालेलीं होतीं. ह्या कारस्थानामध्यें मुख्य माणसें पुढे दिल्याप्रमाणे होतीं. नाना फडणीस,

सखारामबापु, हरिपंत फडके, त्र्यंबकराव मामा पेठे, विसाजी कृष्ण बिनीवाले, मोरोब फडणीस, कृष्णराव काळे, पटवर्धन, रास्ते, घायगुडे इत्यादि.

ह्या कारस्थानाला 'बारभाईचें कारस्थान' म्हणतात. ह्यावरून त्यांत बाराच माणसें होतीं, असा समज-कोणीं करून घेतल्यास तो चुकीचा होईल. 'बारा' हा शब्द कोणतीहि विशिष्ट संख्या दाखवीत नाही, आणि 'भाई' ह्या शब्दाचा अर्थहि येथे भाऊ असा नाही. बारा आणि भाई हे दोन्ही शब्द लाक्षणिक अर्थाने योजलेले आहेत.

१२२४ बारा पिंपळावरचा मुंजा—एके ठिकाणीं स्थिर न बसणारा म्ह० सदा हिंडत असणारा माणूस.

१२२५ वालाग्र—वाल = केस. अग्र = टोक. बालाग्र = केसाच्या टोका-इतकें. उ० कासोबा घंटाळे ह्या माझें बालाग्र नुकसान करूं शकणार नाही!

१२२६ बावनकशी सोनें—अत्यंत शुद्ध सोनें. आपले पूर्वज सोन्याच्या शुद्धतेचे ५२ कस धरीत असत. ह्या बावन्न कसांपैकी ५२ कस ज्याचे उतरतात, असें सोनें. लक्षणेने "बावनकशी सोनें" म्हणजे पवित्र, निर्दोष माणूस किंवा पदार्थ.

१२२७ बाहेरची बाधा—भूत, पिशाच्च वगैरेंची पीडा.

१२२८ बाळकडू—लहान मुलांना घालावयाच्या औषधांच्या घुटीला "बाळ-कडू" म्हणतात. उ० कोळ्याच्या मुलांना पोहोण्याचें बाळकडूच असतें (म्हणजे त्यांना लहानपणापासून पोहोतां येतें).

१२२९ बिनभाड्याचें घर—तुरुंगवास.

१२३० बुडीत खर्च—जो खर्च केला असतां त्याच्या मोबदला कांही मिळत नाही, असा खर्च.

१२३१ बोकसंन्यासी—संभावितपणाचें पांघरूण घेऊन जो आपले कपट-विचार झाकीत असतो, असा मनुष्य.

१२३२ ब्र—एक शब्दमुद्रा. उ० काशीचे प्रसिद्ध पंडित गागाभट्ट यांची शिवाजीच्या राज्याभिषेकास पूर्ण संमति असल्याकारणाने महाराष्ट्रीय पंडित पिके पडून त्या विषीविरुद्ध ब्र काढण्याची त्यांची छाती झाली नाही!

१२३३ ब्रह्मगांठ—कधी न सुटणारी गांठ म्ह० संबंध. [व्युत्पत्ति:—ब्रह्मदेवाने बांधिलेली गाठ].

१२३४ भीष्मप्रतिज्ञा—हस्तिनापूरचा राजा जो शंतनु, त्याला पहिल्या बायकोपासून भीष्म हा पुत्र झालेला होता. अर्थात् हा भीष्म आणि नंतर भीष्माचे पुत्र, पौत्र हे राज्याचे वारसदार व्हावयाचे. परंतु शंतनु हा दैववशात् मत्स्यगंधा नांवाच्या मुलीवर आसक्त झाला आणि तिला आपली पत्नी करावें, असें त्याला वाटू

लागलें. मत्स्यगंधेने शंतनूला अशी अट घातली की, "तूं जर आपला वडील पुत्र भीष्म ह्याला किंवा त्याच्या पुत्रांस राज्य न देतां माझ्याच पुत्रांस राज्य देशील, तर मी तुझी पत्नी होईन." तेव्हा भीष्माने पित्याच्या संतोषासाठी अशी खडतर प्रतिज्ञा केली की, "मी स्वतः राज्यावरचा हक्क सोडतों, इतकेंच नव्हे तर माझे पुत्र वगैरे कदाचित् राज्यावर हक्क सांगून मत्स्यगंधेच्या पुत्रांशीं युद्ध करतील, यासाठी मी लग्न न करतां जन्मभर अविवाहितच राहीन!" ही खडतर प्रतिज्ञा भीष्माने ज्या निर्धाराने केली, त्याच निर्धाराने ती पाळिली आणि तो जन्मभर अविवाहित राहिला. ह्यावरून "भीष्मप्रतिज्ञा" म्हणजे खडतर किंवा स्वार्थपराङ्मुखतेने केलेली प्रतिज्ञा, असा अर्थ प्रचारांत आला.

१२३५ भाकडकथा—निष्फळ, नीरस आणि लांबलचक गोष्टी किंवा हकीगत. [ (क) भाकड म्ह० दूध न देणारी (गाय). (ख) निष्फळ. (ग) शुष्क, नीरस ].

१२३६ भगीरथप्रयत्न—अतिनेटाचा प्रयत्न. भगीरथाने अनेक कष्ट सोसून स्वर्गीची गंगा पाताळांत नेऊन आपले पितर उद्धरले. या पौराणिक कथेवरून वरील शब्द रूढ झाला.

१२३७ भरमसाट—अव्यवस्थित; ताळतंत्र सोडून असलेलें; मूर्खासारखें.

व्युत्पत्तिः—भ्रमिष्ट ह्यापासून भरमसाट हा शब्द निघाला आहे. भ्रमिष्ट मनुष्य असंबद्ध किंवा घोटाळा उत्पन्न करणारीं वाक्यें बोलतो. यावरून भरमसाट ह्याचा अर्थ अव्यवस्थित, प्रमाणरहित, मुद्द्याला सोडून असलेलें, ताळतंत्र न पाहता बोललेलें, असा झाला. 'भरमसाट' ह्याचा उपयोग नाम, विशेषण व क्रियाविशेषण यांप्रमाणे केला जातो. उ० असा उगीच भरमसाट बोलूं नको. तो वक्ता काहीतरी भरमसाटपणाने विधानें करूं लागला, म्हणून अध्यक्षानी त्याला बोलूं दिलें नाही.

१२३८ भिजत कांबळें—एखाद्या गोष्टीचा निकाल तावडतोब न लागतां ती तशीच पुष्कळ वेळ पडून राहिली असतां तिला 'भिजत कांबळें' म्हणतात. वाक्यांत योजण्याच्या वेळीं पडणें, ठेवणें इ० क्रियापदें योजितात. [ कांबळें लोकरीचें असतें., तें भिजत पडलें म्हणजे फार वेळ वाळतें., म्हणून तें पुष्कळ वेळ पाण्यात बुडवून ठेवावें लागतें. "कांबळें" ह्याच्याबद्दल "घोंगडें" हाहि शब्द योजण्याचा परिपाठ आहे ].

१२३९ भ्रमाचा भोपळा—ज्याच्याविषयीं प्रथम आपला चांगला ग्रह असतो तो पदार्थ कुचकामाचा आहे,असें आपल्या निदर्शनास आलें म्हणजे "भ्रमाचा भोपळा फुटला" असें म्हणतात. "भ्रमाचा भोपळा फुटणें" म्ह० खोट्या कल्पनेचें किंवा ग्रहाचें निरसन होऊन निराशा होणें.

१२४० मगरमिठी—घट्ट मिठी; बळकट पकड.

१२४१ मंडूकप्लुति—मंडूक = बेडूक; प्लुति = उडी. बेडूक उडीसाठी अवसान न घेतां एकदम उडी मारतो. ह्या साम्यावरून, वर्णनांत मधली हकीगत जर कोणी एकदम वगळली आणि तो पुढची हकीगत सांगूं लागला, तर 'त्याने मंडूकप्लुति केली' असें म्हणतात.

१२४२ मधुमक्षिकेचें व्रत—प्रत्येक ठिकाणीं जें कांहीं आपणांला उपयुक्त म्हणून घेण्याजोगें असेल, तें घेण्याची रीति. [ मधुमक्षिका = मधमाशी. व्रत = रीति, वर्तनक्रम. मधमाशी प्रत्येक फुलांतून मध गोळा करीत असते, ह्यावरून वरील शब्द रूढ झाला ].

१२४३ मधाचें बोट—आशा उत्पन्न होईल, अशा रीतीचें वचन किंवा आश्वासन. अनुरूप क्रियापद "लावणें", "लावून ठेवणें" इ०.

१२४४ मनु, मन्वंतर—जगाच्या उत्पत्तीपासून आतापर्यंतचा जो काळ, त्याला 'कल्प' असे म्हणतात. प्रत्येक कल्पांत चवदा भाग असून दर एका भागावर आधिपत्य करणारा एक एक मनु असतो. मन्वंतर म्हणजे दुसरा मनु किंवा एका मनूचें आधिपत्य संपून दुसऱ्या मनूचें आधिपत्य सुरू होईपर्यंतचा काळ. यावरून, 'मनु' म्हणजे विशिष्ट काळ, अनुकूल काळ, सिद्धीचा काळ, असा अर्थ झाला. मनु पालटणें, म्हणजे परिस्थिति बदलणें. उ० आता धान्य कापावयाचा मनु आहे. उ० गोविंदराव, आता वक्तशीरपणाने ऑफिसांत आलें पाहिजे बरें का! हल्लीचा मनु पालटलेला आहे, एक मिनिट उशीर झाला तर वरिष्ठांना खपत नाही.

१२४५ माकडाची जखम—ज्यांत अनेक लोक पडल्यामुळे विचका झाला आहे, असें काम.

एके प्रसंगीं एका माकडाला एक जखम झाली आणि त्यामुळे तें आजारी पडून अंथरूण धरून राहिलें. ह्या आजारी माकडाच्या समाचारासाठी त्याचे आप्त, इष्ट, मित्र, वगैरे लोक येऊं लागले. समाचारासाठी आलेलें प्रत्येक माकड त्या जखमेमध्ये बोट घालून आणि हळहळून म्हणे, "आयाई, ही जखम गहूमर खोल आहे. देवाच्या दयेने तूं लवकर बरा होशील! धीर सोडूं नको! समाचारासाठी आलेलें प्रत्येक माकड जखमेमध्ये आपलें बोट खुपसीत असल्याकारणाने, आणि ही बोट खुपसण्याची क्रिया फारशी नाजूकपणें केली जात नसल्याकारणाने प्रत्येक समाचाराच्या वेळीं ती जखम जास्ती जास्ती खोल होत गेली; आणि शेवटीं जखमेच्या जागीं आरपार भोक पडलें आणि तें आजारी माकड मरण पावलें!

१२४६. मागला पाय—

(क) नुकसानीची किंवा अपकर्षाची स्थिति किंवा प्रसंग.

(ख) पलायन ह्या अर्थानेहि "मागला पाय" ही शब्दसंहति योजिली जाते.

१२४७ मार्तीचे फुंले—नात्याचा संबंध नसतां ज्यावर आपण आपल्या

नातलगावर प्रेम करावें, तसें करीत असतों. परंतु अडचणीच्या वेळीं जो आपल्या उपयोगाला येण्याचा संभव नसतो, असा माणूस. उ० मातीचे कुल्ले लावल्याने लागत नसतात ! [ क्रियापद लावणें, चिकटविणें ].

१२४८ मानभाव—दिसण्यात सभ्य परंतु अंतर्यामीं कपटी असा माणूस. [ मानभावी पंथाचे लोक बोलण्यात गोड असतात, ह्यावरून " मानभाव " ह्याचा व्यवहारांत वरीलप्रमाणे अर्थ घेण्यांत येतो ].

१२४९ मायपोट—( क ) पोटाला देणारा माणूस (ख) चरितार्थाचें साधन. ( ग ) ज्यांत पुष्कळांचा समावेश होऊन चरितार्थ चालतो, असा उद्योग, धंदा, व्यापार, वगैरे. उ० रेल्वेखातें हें सर्वांचें मायपोट आहे.

१२५० मायेचा पूत—कर्तबगार किंवा पराक्रमी माणूस. [ शब्दश अर्थ " आईचा मुलगा " ].

१२५१ मारुतीचें शेपूट—कधी न संपणारी हकीगत. आपल्या इच्छेविरुद्ध एकसारखी वाढत जाणारी वस्तु, खर्च वगैरे. शिष्टाई करण्यासाठीं मारुति लंकेला गेला, आणि " सीतेला परत दे, " असा रावणाला आग्रहाचा उपदेश करूं लागला, तेव्हा रावणाला राग येऊन त्याने मारुतीच्या शेपटीला चिंध्या गुंडाळून त्यावर तेल ओतून तें पेटवून द्यावें, अशी आपल्या सेवकांस आज्ञा केली ह्या आज्ञेप्रमाणे सेवक चिंध्या गुंडाळू लागले. परंतु जों जों चिंध्या गुंडाळाव्या, तों तों शेपूट लांबत जावें, असें होतां होतां लंकेतील सर्व चिरगुटें संपलीं, पण शेपूट शिल्लकच राहिलें ! ह्या प्रसंगाला अनुलक्षून हा मारुतीच्या शेपटासंबंधाचा वाक्प्रचार रूढ झाला.

१२५२ माशाने गिळलेलें माणिक—माशाने गिळलेलें माणिक परत आपल्या हातीं येणें अशक्य असतें, ह्यावरून " माशाने गिळलेलें माणिक, " म्हणजे एखाद्याने गिळकृत केलेली वस्तु, जी परत मिळण्याची मुळीच आशा नाही, अशी वस्तु.

१२५३ माहेर, मायघर, माहेरघर—आईचें घर. आई प्रेमाने आणि कळकळीनें आपल्या मुलाचें पालनपोषण करते, यावरून " माहेर " (मायघर, माहेरघर ) याचे पुढील दोन अर्थ झाले.

( क ) वैभवाचें किंवा भरभराटीचें स्थान उ० उत्तरेकडे पाटणापासून दक्षिणेकडे म्हैसूरपर्यंत पसरलेल्या अफाट साम्राज्याची राजधानी या नात्याने पैठण शहर फारच प्रसिद्धीस येऊन व्यापार व कलाकौशल्य यांचें माहेरघर बनलें.

चिं० वि० वैद्य,–मध्ययुगीन भारत.

( ख ) उत्पत्तिस्थान. उ० पोपई हें फळ खरजेचें माहेर आहे.

१२५४ मिना बाजार—ज्या बाजारांत दुकानें चालविणाऱ्या बायकाच असतात आणि खरेदी करणाऱ्याहि बायकाच असतात आणि जो आनंदाच्या किंवा

उत्सवाच्या प्रसंगीं थोडक्याच दिवसांपुरता भरविलेला असतो, तो बाजार. असले बाजार अकबराने रूढ केले, असें म्हणतात. अशल्या बाजारांत बहुधा स्त्रियांच्याच उपयोगाचे जिन्नस विक्रीकरिता ठेविलेले असत.

१२५५ मुक्ताफळें—मोतीं. विपरीत लक्षणेने " मूर्खासारखे बोललेले शब्द."

१२५६ मुखस्तंभ—स्तंभाप्रमाणे म्ह० खांबाप्रमाणे मुख म्ह० तोंड न हालवितां उभा असलेला माणूस. ( हिरवटपणाने, लाजेने किंवा अन्य कारणाने जो बोलत नाही, तो ). उ० खायाला अगडबंब आणि म्हणायला मुखस्तंभ; आपस्तंभो मुखस्तंभो.

१२५७ मुष्टिमोदक—बुक्क्या.

व्युत्पत्ति—बुक्की मारतांना मूठ मिटावी लागते, तेव्हा तिचा आकार मोदकाप्रमाणे होतो. उ० त्या भामट्याला मुष्टिमोदक दिल्याशिवाय तो खरें सांगणार नाही!

१२५८ मेलेलें अन्न—दुसऱ्याच्या मेहेरबानीने चाललेला चरितार्थ. उ० मी उपाशी राहीन आणि कष्ट काढीन, पण मेलेलें अन्न कधी खाणार नाहीं!

१२५९ मेषपात्र—बावळट माणूस.

१२६० म्हशीने पाय दिलेलें नाक—चपटें किंवा अपरें नाक.

१२६१ यःपलाय—पळून जाणें; पलायन. उ० मुलें कृष्णा माळ्याच्या बागेंतील केळ्या धोंडे मारून पाडीत होतीं. पण मी इकडून ओरडतांच त्यांनी यःपलाय केलें. [ " यः पलायति जीवति, " जो पळून जातो, तो वांचतो; ह्यांतील पहिलीं चार अक्षरें ].

१२६२ यमाचें बोलावणें—मरण. [ यम हा प्राण्यांच्या आयुष्याची नोंद ठेवणारा देव. एखाद्या प्राण्याची आयुर्मर्यादा किती आहे, तें पाहून ती मर्यादा भरतांच तो त्या प्राण्यास स्वतः किंवा आपल्या दूतांकडून बोलावितो. यमाची जी राजधानी ती " यमपुरी " तेथे प्राण्यांनी केलेल्या पापकृत्याबद्दल यम त्यास दंड करतो. यावरून व्यवहारांत " यमपुरी " म्हणजे जेथे हालअपेष्टा भोगाव्या लागतात, असें ठिकाण. ' यमपुरी ' ह्याचा ' तुरुंग ' असाहि अर्थ आहे ].

१२६३ रडतराव—जो मनुष्य सदा सर्वदा रडत असतो, म्हणजे जो नेहमी रडकथा सांगत असतो, तो. ज्याच्या ठायीं अवसान किंवा हिंमत नाही, असा माणूस. " रडत राऊत " हाहि शब्द वरील अर्थाने योजला जातो.

१२६४ यादवी—भाऊबंदकीचीं भांडणें. [ कृष्णावतारीं यादवांमध्ये युद्ध जुंपून त्यांचा विध्वंस झाला ].

१२६५ राजश्री—विचित्र माणूस. विनोदाने किंवा सलगीच्या नात्याने कोणाविषयी बोलावयाचें असतां त्याला " राजश्री " असें म्हणतात. " राजश्री " हा शब्द संमानार्थ पुरुषाच्या नांवामागे लावितात. त्याचा विनोदी भाषणांत " तऱ्हेवाईक

मनुष्य" असा अर्थ केला जातो. उ० यावें राजश्री! नमस्कार! बसा इथे. पंधरा दिवस आपण कुठे दडी मारली होती? शनिवारीं सकाळची शाळा असते, हें ह्या राजश्रींच्या गावींहि नव्हतें!

१२६६. राम—

(क) सामर्थ्य; शक्ति; जोर. उ० त्या उपरण्यात आता कांही राम उरला नाही. ('राम' म्ह० वापर सहन करण्याची शक्ति).

व्युत्पत्तिः—भिक्षुक लोक रुपयाला 'राम' म्हणतात आणि तो रुपया दक्षिणा, ही म्हणण्यासारली दाक्षिणा समजतात. ज्या कार्यांत रुपया ही दाक्षिणा नाही, त्या कार्यांत 'राम नाही,' असें भिक्षुक म्हणतात. ह्यावरून जिवंत मायेच्या नियमानुसाराने '*त्यात कांहीं राम नाही*,' ह्या वाक्प्रचाराचा अर्थ त्यांत काही सामर्थ्य, शक्ति, जोर, ताकद, उपयोगी पडण्याची लायकी वगैरे नाही असा झाला.

(ख) राम म्ह० रुपया, सीताबाई म्ह० अधेली.

व्युत्पत्तिः—'राम' हा शब्द पुल्लिंगी आहे तसाच 'रुपया,' हा शब्दहि पुल्लिंगी आहे. येवढ्याच साम्यावरून भिक्षुक लोकांच्या मार्षेत राम म्ह० रुपया, असा संकेत रूढ झाला. सीताबाई आणि अधेली हे दोन्ही शब्द स्त्रीलिंगी आहेत, आणि सीताबाई ही रामाची अर्धांगी, म्हणून सीताबाई हा शब्द अर्धा रुपया म्हणजे अधेली ह्याचा वाचक झाला.

१२६७ रामाचे नांव—बिलकुल; काही नाही. उ० आमच्या आपत्काली पाटणकर मंडळींनी आम्हांस मदत केली, अशी तुमची समजूत आहे काय? छेः! रामाचें नांव! (म्ह० त्यांनी मुळीच मदत केली नाही!)

१२६८ रामबाण औषध—हटकून गुण करणारें औषध. [रामाचा बाण कधी फुकट जात नसे, व तो लक्ष्याचा वेध करावयाला चुकत नसे].

१२६९. रामराज्य—

(क) अत्यंत सुखाचें राज्य.

(ख) जी व्यवस्था करतांना आपणांस हवें तसें वागावयाची मोकळीक असते, म्हणजे कोणीहि मनुष्य आपणांस रागें भरावयास नसतो, अशी व्यवस्था. उ० घरांत तीन दिवस कोणी वडील मनुष्य नव्हतें, तेव्हा मुलांनी रामराज्य चालविलें होतें!

१२७० राक्षसी झोप— गाढ झोप; संकट आणणारी झोप.

१२७१ रुपेरी बेडी—सेवावृत्ति; द्रव्याच्या लालचीने करून घेतलेलें बंधन, विशेषतः सरकारी नोकरी.

१२७२. लंकेची पार्वती—

(क) जिच्या अंगावर एकहि दागिना नाही, अशी सौभाग्यवती स्त्री.

व्युत्पत्ति —लंकेत सोन्याची समृद्धि आहे, परतु पार्वती ( शंकराची स्त्री ) लंकेत गेली, तरी तिला त्या सोन्याचे दागिने करून अगावर घालता येत नाहीत कारण, ती वैरागी देवाची पत्नी.

(ख) खोगीर नसलेला आणि रोडका घोडा, अशा अर्थानेहि हा शब्द योजला जातो. व्युत्पत्ति वरच्या स्पष्टीकरणावरून लक्ष्यात येण्याजोगी आहे.

१२७३ लटपटपची—(क) घोटाळा, गोंधळ (ख) दुसऱ्याला फसविण्याच्या उद्देशाने केलेलें धरसोडीचें किंवा गोंधळविणारें भाषण उ० मी वस्ताद आहें माझ्यापुढे तुझी लटपटपची चालावयाची नाही! उ० धनीसाहेबानी तुमच्या अगावर डोळे वटारतांच त्याची लटपटपची उडाली! साक्षीदाराच्या पिंजऱ्यात कोणीहि मनुष्य उभा राहिला, तरी त्याची लटपटपची उडावयाचीच!

१२७४ लवकर्णाची स्वारी—गाढव. [गाढवाचे कान लाब असतात, ह्यावरून त्याला "लवकर्ण" अशी पदवी देण्यात आली आहे]

१२७५ लक्ष्मीपुत्र—अति श्रीमत मनुष्य. लक्ष्मी ही सपत्तीची देवता तिचा पुत्र अर्थात श्रीमंत असावयाचाच!

१२७६ लाख रुपयांची गोष्ट—अति शहाणपणाची, महत्त्वाची सूचना किंवा बोलणें

१२७७ लाडा कारभारी—ज्या कामांत आपला काही सबध नाही, त्यात पडणारा, लुडबुड्या

१२७८ वचनाचा धड—दिलेलें वचन पाळण्याविषयी दक्ष किंवा तत्पर.

१२७९ वर्षाचा दिवस—जो दिवस वर्षांतून एकदाच येतो, म्हणून त्याचें महत्त्व मनात आणून त्या दिवशीं योग्य त्या गोष्टी करणें जरूर आहे, असा दिवस, अशा दृष्टीने वर्षाचा दिवस = सणाचा दिवस, सण

१२८० वशिल्याचें तट्टू—अगीं काही गुण नसतां केवळ वरिष्ठाच्या कृपेने ज्याला काही लाभ होतो, ज्याच्या कांही सोयी होतात, ज्याला काही मानाची, लाभाची किंवा बढतीची जागा मिळते, असा मनुष्य

१२८१ वाघाची मावशी—माजर.

१२८२ वामकुक्षी—दुपारच्या जेवणानतर थोडा वेळ घेतलेली झोप. [निजताना डाव्या कुशीवर निजण्याची रूढि किंवा वैद्यशास्त्राची आज्ञा आहे]

१२८३ वितंडवाद—मूर्खपणाचा वादविवाद

१२८४ विहगदृष्टि किंवा विहगमदृष्टि—पक्ष्याची दृष्टि पक्ष्याप्रमाणे आपण आकाशात वातावरणाच्या उच्च थरांतून उडत आहों, अशी कल्पना केली आणि तेथून खालील भूप्रदेशाकडे नजर टाकली, तर आपणांस सूक्ष्म गोष्टी दिसणार नाहीत, स्थूल देखावा मात्र दिसेल. यावरून विहगमदृष्टीने किंवा विहगदृष्टीने एखाद्या

विषयाचें अवलोकन करणें म्ह० त्याच्या तपशिलांत न शिरतां ठळक गोष्टी तेवढ्याच पाहणें. उ० त्या सर्वांचा इतिहास नीट लक्षांत येण्यासाठी आर्य लोकांचा दक्षिणेंत प्रथम प्रवेश झाला, तेव्हांपासून दक्षिणच्या इतिहासाचें विहंगमदृष्ट्या निरीक्षण करणें अवश्य आहे. चिं० वि० वैद्य,—मध्ययुगीन भारत.

१२८५ वेडा पीर—छांदिष्ट माणूस; अचरट माणूस.

१२८६ वेड्यांचा बाजार—वेड्यांचा जमाव; मूर्खांची मंडळी.

१२८७ वेळेचा गुण—अमुक एका विशिष्ट वेळीं ही गोष्ट केली, तिचा हा परिणाम (किंवा फळ). उ० सावित्रीबाईचे अनरसे नेहमी चांगले होतात. पण आजचे विघडले! वेळेचा गुण! दुसरें काय!

१२८८ शतंभीष्म—"भीष्म" हा भारतीय युद्धांत मोठा पराक्रमी वीर होता. "शतंभीष्म" म्ह० शंभर भीष्म. ह्याचा व्यवहारांत "भीष्माहून शतपटीने पराक्रमी पुरुष" असा अर्थ घेण्यांत येतो. उ० अरे जा! तूं काय माझें वाकडें करणार आहेस! तुझ्यासारखे मीं पुष्कळ शतंभीष्म लोळविले आहेत!

१२८९ शिखंडी—"शिखंडी" हा प्रथम स्त्री असून नंतर त्यास पुरुषत्व प्राप्त झालें, अशी पौराणिक कथा आहे. यावरून ज्याच्या अंगीं कोणत्याहि प्रकारची धमकंदारी नाही, त्याला "शिखंडी" हा शब्द लावतात. षंढ.

१२९० शिराळशेट—पूर्वी 'दुर्गादेवी' नांवाचा दुष्काळ जेव्हां इ० स० १३९६ पासून १२ वर्षांच्या अवधीचा महाराष्ट्रांत पडला होता, तेव्हां "शिराळशेट" नांवाच्या एका लिंगायत वाण्याने लमाणी बैलांचे तांडे परदेशास पाठवून तिकडचें धान्य आणवून तें लोकांस पुरविलें. ह्या त्याच्या दयाशीलतेबद्दल बेदरच्या बादशहाने, "तुला काय बक्षीस देऊं?" म्हणून त्याला विचारलें. तेव्हां शिराळशेट म्हणाला, "मला औट घटका (म्हणजे ३॥ घटका), आपलें राजपद द्या आणि मी ज्या कागदावर सही करीन, ते आपण खरें म्हणून धरा." राजाने हें कबूल केलें, तेव्हां शिराळशेट तख्तावर बसला, आणि त्याने ह्या अवधींत हिंदु देवस्थानांच्या ज्या ज्या नेमणुका पूर्वी रद्द करण्यांत आलेल्या होत्या, त्या त्या पुन्हा मंजूर केल्या व कांहींना नवीन नेमणुका ठरवून दिल्या. हीं परोपकाराचीं कृत्यें करून पुन्हा ह्या महात्म्याने स्वतःसाठी कांही एक नेमणूक करून घेतली नाही! ३॥ घटका सरतांच तो तख्तावरून खाली उतरला. राजाने त्याच्या सहीच्या सर्व सनदा, देणग्या वगैरे पाळल्या. शिराळशेटाच्या महात्मतेचें स्मरण चिरस्थायी व्हावें यासाठी लोक त्याच्या नांवाने श्रावण शुद्ध षष्ठीच्या दिवशीं उत्सव करूं लागले! तो उत्सव अद्यापिहि केला जातो! "शिराळशेट" हा शब्द हल्ली व्यवहारांत सुखवस्तु, रंगेल व कसलीहि काळजी न बाळगणाऱ्या माणसाला लावतात व "शिराळशेटीचें राज्य" हा शब्द क्षणभंगुर वैभवास लावतात.

१२९१ शिवस्व—शिवाला अर्पण केलेली वस्तु परत घेतली, असतां किंवा उपभोगिली असतां, फार मोठें पातक लागतें. यावरून 'शिवस्व' म्हणजे जी घेता किंवा स्वीकारतां येत नाही, अशी वस्तु. जिला स्पर्शदेखील करतां कामा नये अशी किंवा जी घेतल्यास घेणाराच्या डोक्यावर तें कर्ज म्हणून बोजा राहतो, अशी वस्तु.

१२९२ शुष्ककाष्ठ—लचांड; झेंगट; त्रासदायक लटांबर. क्रियापद लावणें किंवा लावून घेणें. व्युत्पत्तिः—एका स्त्रीने आपल्या कुटुंबातील एक खरी पण लाजिरवाणी गोष्ट कोणा इसमास सांगितली. पति घरीं आला, तेव्हा तिने घडलेला खरा वृत्तान्त त्याला सांगितला. ती लाजिरवाणी गोष्ट तूं परक्याला कां सांगितलीस म्हणून पति तिला एका वाळक्या (सुकलेल्या) लाकडाने झोडपूं लागला, तेव्हा ती म्हणाली, "बोलायला गेलें सुपाष्ट (स्पष्ट), अन् पाठींत बसलं सुकलं काष्ट." सुकलें काष्ठ = वाळलेलें लाकूड.

१२९३ शुकाचार्य—श्रीव्यास मुनीचा पुत्र. हा मोठा ब्रह्मचारी होता. यावरून कडकडीत ब्रह्मचर्याचें व्रत पाळणारा जो मनुष्य असेल त्याला हा शब्द लावतात.

१२९४ शुक्राचार्य—असुरांचा गुरु शुक्राचार्य. हा एका डोळ्याने अंध होता. यावरून एका डोळयाने अंध मनुष्याला हा शब्द विनोदाने लावण्यांत येतो.

१२९५ शुंभ—ज्याला विद्येचा कांहीं संस्कार नाही, असा माणूस.

१२९६ शून्य—(विशेषण) १ पोकळ रिकामा. २ अविद्यमान, अस्तित्वांत नसलेला. (नाम) १. पोकळ. किंवा रिकामी जागा. २. अभाव. मराठींत शून्य म्ह० १. निष्फळ किंवा निरर्थक. २. आनंदहीन. उ० बहिणाबाईचा एकुलता एक मुलगा मेल्यापासून तिला जग शून्यसें वाटूं लागलें आहे.

१२९७ शूर्पणखा—या नांवाची रावणाची एक बहीण होती. ती शरिराने हिडीस होती. (क) स्वताच्या शरिराची जिला ऊर्जा नाही, जिचें अंग सदा मळलेलें, जिचे परकर किंवा साडीचोळी ओंगळ, जिचे केश सदा पिसकटलेले, अशा मुलीस किंवा स्त्रीस हा शब्द लावतात. (ख) कुरूप, भाडखोर अशाहि स्त्रीस हा शब्द लावतात.

१२९८ शेणाचा पोहो—गायी, म्हशी वगैरेंच्या विष्ठेची रास. यावरून "शेणाचा पोहो," म्ह० सुस्त किंवा आळशी माणूस. ज्याच्या अंगात यत्किंचित् चपळाई किंवा तल्लखपणा नाही, असा माणूस.

१२९९ शेंदाडशिपाई—भित्रा माणूस. शेंदाडें हें फळ सुपोल्या नारळाएवढें मोठें असतें, त्याची त्वचा अत्यंत पातळ असते आणि तें इतकें ढिसूळ असतें, की त्याला जरासा धक्का लागला, तरी तें फुटतें. त्यांतील गर मृदु असून बहुतेक जलरूपच असतो. शेंदाडासारखा शिपायी म्हणजे प्रत्यक्ष मारामारींत रट्टे खाण्याची ज्याला ताकद

नाही, असा शिपायी. भित्रा शिपायी; यावरून ओघानेच "शेंदाड शिपायी," ह्याचा अर्थ भित्रा माणूस असा झाला.

१३०० शेर—ठरलेला भाग; अन्नोदकाचा संबंध. उ० सुनेच्या पायगुणाने मला बढती मिळाली, मुलाची परीक्षा उतरली आणि एकंदरींत आम्हाला सुखाचे दिवस दिसूं लागले. पण बिचारी लग्न झाल्यांवर पाच वर्षांतच मेली! तिचा आमच्या घरचा शेर संपला! दुसरें काय!

१३०१ स्मशानवैराग्य—स्मशानात गेल्याने जें त्या क्षणापुरतें वैराग्य (म्ह० संसाराची किळस) मनात उत्पन्न होतें तें.

१३०२ श्रीगणेशा—आरंभ; सुरुवात; कोणत्याहि विद्येचीं मूलतत्त्वें. उ० मीं अजून वैद्यकीचा श्रीगणेशा देखील केला नाही!

१३०३ सतरा गुणांचा खंडोबा—अनेक रोग किंवा दुर्गुण ज्याच्या अंगीं आहेत, असा माणूस.

१३०४ सव्यसाची—हें अर्जुनाचें नाव. याला डाव्या अगर उजव्या हाताने सारख्याच कौशल्याने बाण सोडतां येत असत. यावरून एकाच साधनाने उलट सुलट कार्यें करणारा माणूस, असा ह्या शब्दाचा अर्थ झाला.

१३०५ सशाची अंधेरी—संकट आलें असतां तें दिसू नये आणि भीति वाटूं नये म्हणून डोळे झाकून घेणें; मूर्खपणाची डोळेझाक किंवा दुर्लक्ष्य.

१३०६ सतीचें वाण—प्राचीन काळीं मृत पतीच्या शवाबरोबर त्याची स्त्री त्याच्या चितेंत स्वतास जाळून घेत असे. ह्या कृत्याला 'सती जाणें" असें म्हणत. चितेंत प्रवेश करताना ती स्त्री आपल्या हातात फुलें, तादूळ, सुपाऱ्या, हळद, कुंकू, फणी वगैरे घेत असे. ह्या विधीला 'सतीचें वाण घेणें' असें म्हणत. हें वाण तिने हातात घेतलें, म्हणजे तें न टाकता त्याच्या सकट चितेंत जाणें तिला अपरिहार्य असे. वाण घ्यावयाच्या अगोदर तिला आपला सती जाण्याचा निश्चय सोडता येत असे. पण वाण घेतलें की, तिला चितेंत प्रवेश करण्यावांचून गत्यतर नसे.

ह्या प्रकारावरून 'सतीचें वाण घेणें' म्ह० येईल त्या संकटाला न जुमानता अंगीकृत कार्य शेवटास नेणें आणि प्रतिज्ञा निस्तरणें असा अर्थ झाला.

१३०७ सवा मणाची बिडी (किंवा बेडी)—बायको.

१३०८ ससेमिरा—वेड लावण्याइतकी चिंता, विवंचना किंवा ध्यास. अनुरूप क्रियापद लागणें किंवा लावणें.

कोणा एका राजपुत्राने एका अस्वलाचा विश्वासघात केला, म्हणुन त्या अस्वलानें त्याची आणि सर्व मानवजातीची अतोनात निर्भर्त्सना केली. ही निर्भर्त्सना चार श्लोकांत केलेली होती. ह्या चार श्लोकांचीं आद्याक्षरें स, से, मि, रा अशीं होतीं.

मग अस्वलाने राजपुत्राला शाप दिला की, तुझ्या पापाचें प्रायश्चित्त म्हणून तुला वेड लागेल आणि मीं म्हटलेल्या चार श्लोकांच्या आद्याक्षरें स, से, मि, रा हीं तूं बडबडत राहशील. हे चार श्लोक तूं कोणाच्या तरी तोंडून ऐकलेस, तरच तुझें वेड जाईल. अस्वलाच्या शापाने राजपुत्राला वेड लागलें. कांही काळाने कोणा एका राजकन्येच्या तोंडून हे चार श्लोक त्याच्या कानीं पडले. त्यायोगें त्याचें वेड गेलें आणि तिच्याशीं त्याचें लग्न होऊन तो सुखी झाला. ही गोष्ट विस्तारेंकरून 'बृहत्कथासार' ह्या ग्रंथात पाहावयास सापडेल.

१३०९ सहा महिन्यांची जांभई—लवकर सिद्धीस न जाणारें काम.

१३१० साखरेची सुरी—आपला दुष्ट हेतु प्रकट न होऊं देता गोड गोड भाषण करून दुसऱ्याचा नाश करणारा माणूस किंवा त्याचें कारस्थान.

१३११ साडे तीन शहाणे—सखाराम बापू फडके, विठ्ठल सुंदर, देवराव हिंगणे हे तीन पुरते शहाणे आणि नाना फडणीस हा अर्धा शहाणा, मिळून साडेतीन शहाणे पेशवाईत होऊन गेले. कोणी असें म्हणतात, की 'देवराव' ह्या नावाचा जो शहाणा तो 'देवराव हिंगणे' नसून तो 'देवराव चोरघे' हा होता. हल्ली व्यवहारांत कोणाहि मूर्ख आणि बढाईखोर माणसाला हा शब्द विपरीत लक्षणेने लावतात. ह्याचें रूप अनेकवचनी असतें. उ० गोविंदराव, तुम्ही तर मोठे साडेतीन शहाणेच दिसतां?

१३१२ सांबाचा अवतार—अत्यंत भोळा माणूस. सांब म्ह० शंकर. जो कोणी शंकराची आराधना करी, त्याला शंकर मागावें तें देत असे. मग त्या देणगीचा कांहीहि परिणाम होणारा असो!

१३१३ सांबाच्या पिंडीवरचा विंचू—जोड्याने सडकून काढला जाण्याची ज्याची लायकी आहे, पण जो मोठ्याच्या आश्रयाने राहिलेला असल्याकारणाने त्याला जोड्याने सडकून काढणें शक्य नाही, असा नीच माणूस.

१३१४ सुंठीचे फूल—क्वचित् प्रसंगीं घडणारी चांगली गोष्ट. (सुंठीच्या झाडाला ६० वर्षांनी फुलें येतात अशा समजावरून. ही शब्दसंहति उपयोगांत आली आहे).

१३१५ सुतळीचा तोडा—अगदी हलक्या किंमतीची वस्तुसुद्धा. उ० माझ्या पुतण्याची जिंदगी पंधरा वर्षे वहिवाटीला माझ्याकडे होती. त्याच्या सुतळीच्या तोड्याला न शिवता मी सारीं कामें करीत असें. मग तो वयात येतांच ती जिंदगी मीं त्याच्या हवालीं केली. (हा समस्तकल्प शब्द नकार-गर्भ वाक्यातच येतो).

१३१६ सुळावरची पोळी—अत्यंत धोक्याचें, जिवावरचें किंवा जिकिरीचें काम. जो लाभ मिळवावयाला जीव धोक्यात किंवा संकटांत घालावा लागतो, तो लाभ.

१३१७ सुतवाच—सुरुवात; प्रारंभ; एखाद्या विषयाचें अंधुक वर्णन; दिग्दर्शन. एखाद्या गोष्टीला सुतवाच्य करणें म्ह० आरंभ करणें. (सर्व पौराणिक कथा सूताने

शौनकास सांगितल्या आहेत म्हणून प्रत्येक कथेच्या आरंभीं 'सूत उवाच' असे दोन शब्द येतात. 'सूत उवाच' म्ह० 'सूत बोलला' 'सूत उवाच' ह्याचा अपभ्रंश 'सुतवाच्य सुतवाच्य करणें म्हणजे एखाद्या गोष्टीचें दिग्दर्शन करणें, ती अर्धवट सुचवून ठेवणें

१३१८ सुदामा, सुदामदेव, सुदाम्याचा अवतार—अतिशय हाडका आणि रोडका माणूस (सुदामा हा श्रीकृष्णाचा बालमित्र असून अति दरिद्री होता त्याला पोटभर खावयाला अन्न मिळत नसे, म्हणून तो अति कृश होता श्रीकृष्णाने नंतर त्याला श्रीमंत करून सोडलें)

१३१९ सूर्याचें पिलू—दिवा.

१३२० सूर्यापोटीं शनीश्वर—सूर्याचा मुलगा शनि शनीला त्याच्या मंदगती वरून "शनैश्चर" (म्ह० सावकाश चालणारा), असें नाव आहे सूर्य हा जगाचें कल्याण करणारा असून शनि हा ग्रह दुःख देणारा आहे भाग्यशाली आणि पराक्रमी बापाचा मुलगा जर मूर्ख असा निपजला, तर त्याला "सूर्यापोटीं शनीश्वर," असें म्हणतात ("शनीश्वर" हा "शनैश्चर ह्याचा अपभ्रंश)

१३२१ सोन्याचा दिवस—अतिशय सुखाचा किंवा आनंदाचा दिवस

१३२२ सोमलातले किडे—जन्मापासून वाईट परिस्थितींत वाढलेल्या मनुष्याला तीच परिस्थिति सुखकारक वाटू लागते आणि तींतून बाहेर पडावयाला तो कबूल नसतो अशा माणसाला "सोमलातला किडा" म्हणतात सोमल इतर प्राण्याना प्राणहारक असलें, तरी त्यातील किड्यान्ना तें पुष्टिदायक असतें

१३२३ हरळीची मुळी—१. हरळी हें एक प्रकारचें गवत आहे तें जमिनींतून कितीहि काळजीने उपटून काढून त्याचा बीमोड करण्याचा प्रयत्न केला, तरी तो सिद्धीस जात नाही गवताच्या मुळ्याचे जे फाटकेतुटके अवशेष चुकून राहिलेले असतील, त्याना पाण्याचा ओलावा मिळताच त्याच्यापासून हरळी वाढून ती सर्व जमीन व्यापून टाकते

२. जो धर्म, समाज, पंथ, जात, चाल, रीत, व्यसन इत्यादि छळ, गाजणूक, दुःख, अडचण, तिरस्कार वगैरे सोसूनहि आपलें अस्तित्व कायम ठेवू शकतो, त्याला "हरळीची मुळी" असें म्हणतात.

१३२४ हरीचा लाल—ज्याचें वर्तन सन्देहवाईक आणि मूर्खपणाचें आहे, त्याला प्रेमाने किंवा तिरस्काराने, "हरीचा लाल" असें म्हणतात

१३२५ हांजी हांजी—अभिमानशून्य अशा माणसाने स्वार्थासाठी मूर्ख-वरिष्ठाची, श्रीमंताची त्याच्याच पुढें केलेली स्तुति किंवा दाखविलेली श्वानवृत्ति, त्याच्या मूर्ख भाषणास दिलेला दुजोरा, खुशामत

(व्युत्पत्ति:— हा! श्री! हा!! श्री!! म्हणजे होय महाराज! अर्थात महाराज!). उ० फार्शीलापर्यंत दोघी हाजी करून इतक्या मोठ्या वैभवास चढला.

१३२६ हिंगाचा खडा—हिंग हा पदार्थ चवीला व वासाला उग्र आहे. त्याचा अगदी बारीक खडा जरी ज्या पदार्थाला लागला तरी त्याचा वास व चव ही त्या पदार्थाला लागतात. यावरून "हिंगाचा खडा" म्हणजे गडबड्या किंवा खट्याळ माणूस.

१३२७ हिडिंबा—कुरूप किंवा कजाग स्त्री. ["हिडिंबा," म्हणून एक दुष्ट, कुरूप, भयंकर राक्षसी होती. तिला कृष्णाने मारिले, अशी पौराणिक कथा आहे].

१३२८ होळीचे होळकर—होळीपुढे बोंब मारावयाला आलेले लोक; टारगट माणसांचा समुदाय.

१३२९. १. जे शब्द अर्थाने पुष्कळ अशीं तुल्य किंवा सम असतात आणि अगदी अल्प अशीं भिन्न असतात, त्याना आम्ही 'तुल्यकल्प' शब्द असें नांव देतों. ज्या प्रमाणात भाषा प्रगल्भ असेल, त्या प्रमाणात तिच्यांत तुल्यकल्प शब्दांची समृद्धि असते. मराठी भाषेंत शेकडो तुल्यकल्प शब्द आहेत, परतु ह्या विषय कडे अद्यापि कोणाहि महाराष्ट्रीयाचें लक्ष गेलेलें नाही.

२. तुल्यकल्प शब्द भाषेमध्ये कां आणि कसे उत्पन्न होतात, त्याची उत्पत्ति झपाट्याने केव्हा आणि मदपणाने केव्हा होते; तुल्यकल्प शब्दाच्या उत्पत्तीला मराठी भाषा कितपत अनुकूल किंवा प्रतिकूल आहे, तुल्यकल्प शब्दाची समृद्धि हे भाषेच्या आणि समाजाच्या प्रगल्भतेचें कसें माप आहे, इग्रजी भाषा तुल्यकल्प शब्दांच्या बाबतींत मराठी भाषेपेक्षा कमी समृद्ध आहे किंवा अधिक समृद्ध आहे आणि कां, तुल्यकल्प शब्दाची वर्गवारी कोणकोणत्या तत्त्वांवर करतां येण्याजोगी आहे; तसेंच तुल्यकल्प शब्दांच्या संबधाने प्रयकर्त्यांचीं कर्तव्यें काय आहेत, इत्यादि चर्चा भारी मनोरजक आणि लाभदायक आहे.

३. येथे आम्ही तुल्यकल्प शब्दांची नुसती दिशा दाखवितों:—

(क) काही शब्द अगदी भिन्न उगम पावून आलेले असतात आणि त्यांचे अर्थ आरंभापासूनच तुल्यकल्प असतात (ख) काही शब्द मूळच्या किंवा शुद्ध रूपांत भाषेंत रूढ असून त्यांचीं अपभ्रष्ट रूपेंहि रूढ होतात आणि नतर मूळचे शुद्ध शब्द आणि त्यांचीं अपभ्रष्ट रूपें ह्याच्यात तुल्यकल्पत्व उत्पन्न होतें. (ग) एकाच शब्दांचीं दोन अपभ्रष्ट रूपें तुल्यकल्प शब्द म्हणून रूढ होतात. कधी कधी हा मूळ शब्द भाषेंत टिकून राहतो आणि कधी कधी तो मृत होतो. (घ) दोन भिन्न भिन्न भाषातील पण एकच अर्थ दाखविणारे शब्द एकाच समाजात जुळल्यास त्याच्यांत तुल्यकल्पत्व उत्पन्न होतें.

अन्य रीतींनीहि तुल्यकल्प शब्द उत्पन्न होतात, परतु त्या विषयात आम्ही येथे शिरत नाहीं.

४ ह्या विषयाचें सागोपाग आणि शास्त्रीय पद्धतीचें विवेचन करण्याचें हें स्थळ नसल्याकारणाने, आम्ही येथे फक्त काही तुल्यकल्प शब्दाचे समूह घेऊन त्याच्यात विवेक कसा करावयाचा हें दाखवून त्या विवेकाच्या स्पष्टीकरणार्थ उदाहरणें देणार आहों.

५. हे समूह द्यावयाचे आधी वाचकाना एक सूचना देऊन ठेवणें महत्त्वाचें आहे. आम्हीं जे तुल्यकल्प म्हणून शब्द देणार आहों, त्यापैकी काही मुळीं तुल्यकल्पच नव्हेत आणि त्याच्यात विवेक करणें हें अत्यत पोरकटपणाचें आहे, असें कित्येक वाचकाना वाटण्याचा सभव आहे, इतकेंच नव्हे, तर काही तुल्यकल्प शब्द असे

आहेत की, त्यांच्यांत विवेक करणें, हें कित्येक वाचकांना हास्यास्पदहि वाटेल. परंतु त्याना आम्ही असें बजावतों की, त्याना जर कांही शब्द तुल्यकल्प नव्हेतच असें वाटलें, तर त्यावरून आपली मराठी भाषा सशक्त आणि निरोगी आहे, हें सिद्ध होईल. कारण, जे शब्द आम्ही तुल्यकल्प म्हणून देणार आहों, ते एके काळीं सर्वांशीं तुल्य होते. पुढें जिवंत भाषेचे व्यापार त्यांच्यावर घडून ते कालेंकरून तुल्यकल्प झाले; आणि ही त्यांची तुल्यकल्पता क्रमाक्रमाने आपणाला परिचित होऊन इतकी बद्धमूल झाली की, त्याना तुल्यकल्प हा शब्द लावणें हेंच निरर्थक झालें. दोन शब्दात प्रथम तुल्यत्व असणें, नंतर तुल्यकल्पत्व येणें व शेवटीं भिन्नत्व उत्पन्न होणें. हा जिवंत भाषेच्या व्यापारांपैकी एक मूल्यवान व्यापार आहे, हें वाचकांनी लक्ष्यात बाळगावें. एका भाषेमध्ये दोन समानार्थक शब्दांची गांठ पडली, म्हणजे त्याना ह्या तीन अवस्थांतून जावें लागतें. हें संक्रमण होत असतां एखादा शब्द भाषेच्या छांदिष्टपणामुळे मृत होतो. मग भेदनक्रियेचा व्यापार अर्थात् बंद पडतो. पण दोन्ही शब्द जर टिकून राहिले, तर भेदनक्रियेचा व्यापार त्यांच्यावर चालून शेवटीं ते तुल्यकल्प होतात. त्या स्थितींतूनहि ते टिकून राहिले तर ते भिन्न भिन्न म्हणून समजले जाऊं लागतात. एके काळीं ते एकच अर्थ दाखवीत होते किंवा तुल्यकल्प होते ह्याची आपणांस प्रतीतिहि होईनाशी होते. तेल आणि रोगण, न्याय आणि अद्‌ल, हे शब्द ह्या तिसऱ्या अवस्थेला येऊन पोंचलेल्या शब्दांपैकीच होत.

६. आम्हीं वर जीं विधानें केलीं आहेत, त्याच्या समर्थनार्थ " तेल " आणि " रोगण, " ही जोडी घेतों. हे दोन शब्द अगदी भिन्न भिन्न वस्तु दाखवितात, त्याच्यात काहीच साम्य नाही आणि ते तुल्यकल्प शब्दच नव्हेत, असें कित्येक वाचकाना वाटेल. परंतु " रोगण " ह्या शब्दाचा पूर्वेतिहास पाहिला म्हणजे वाचकाची खात्री पटेल.

७. मराठी भाषेमध्ये ' तेल ' हा एक शब्द विद्यमान असता " रोगण " हा सर्वांशी तत्तुल्य शब्द भाषेंत घुसू लागला, तेव्हा एका म्यानात दोन तरवारी राहूं शकत नाहीत, ह्या न्यायाने जिवंत भाषेचे व्यापार त्या दोहोंवरहि सुरू झाले. त्याचा परिणाम असा झाला की, ' तेल ' हा शब्द जसाचा तसाच टिकून राहिला, आणि ' रोगण ' ह्या शब्दाला प्रथम ' काही विशिष्ट प्रकारचें तेल, ' असा अर्थ प्राप्त झाला; आणि नंतर लाकूड, लोखंड, गोणपाट वगैरेंच्या संरक्षणासाठी फासलेला पातळ पदार्थ; मग त्यात तेल असो किंवा नसो—असा अर्थ झाला. हल्ली " रोगण " आणि "तेल" ह्यांच्या वाच्य वस्तुसंबंधाने कोणाचाहि घोटाळा होणें शक्य नाही. ह्या स्पष्टीकरणावरून " रोगण, " आणि " तेल " हे तुल्यकल्प शब्द कां, हें वाचकाना कळून येईल.

८. दुसरी जोडी आम्ही " अद्‌ल, " आणि " न्याय " ही घेतों. "अद्‌ल" हा शब्द प्रथम मराठींत आला, त्या वेळीं त्याचा अर्थ " न्याय ' असा होता. परंतु यांत्रिक पद्धतीनें जसे कवि निर्माण होत नाहीत, तसा कायद्याच्या यंत्राने न्याय होऊं

शकत नाही, असें आपल्या पूर्वजांच्या लक्ष्यांत येतांच "अद्‌ल" ह्या शब्दाचा अर्थ "ठोकर" असा साहजिक रीत्याच झाला. कारण न्यायासाठीं जो न्यायाच्या कारखान्यांत स्वतः जातो किंवा दुसऱ्याकडून खेचला जातो, तो ठोकर खाऊनच परत येतो. [मागे 'अद्‌ल घडणें' हा वाक्प्रचार पहा].

हल्ली "अद्‌ल" हा शब्द "ठोकर" ह्या अर्थानें इतका रूढ झाला आहे की, "अद्‌ल" आणि "न्याय" हे दोन शब्द आपण अगदी भिन्न म्हणून समजतों. एके काळीं ते तुल्यार्थक होते, ह्याचें आपणांस मानहि राहिलें नाही!

## १३३०. अनाचार, दुराचार, व्यभिचार

१ जातीला, धर्माला किंवा शास्त्राला संमत नाही, असें जें वर्तन तो अनाचार. समाजाला उपद्रवकारक किंवा वाइटाचें उदाहरण घालून देणारें जें वर्तन तो दुराचार. पहिल्या प्रकारचें वर्तन तें पाप. दुसऱ्या प्रकारचें वर्तन हा गुन्हा. कांही कृत्यांना दोन्ही शब्द लावतां येतात.

२ परस्त्रीशीं किंवा परपुरुषाशीं धर्मशास्त्रनिषिद्ध संग म्हणजे व्यभिचार.

## १३३१. आकृति, आकार

१ "आकृति" हा शब्द भौमितिक रूपाचा वाचक आहे. लांबी, रुंदी वगैरे परिमाणांनी दर्शविला जाणारा जो पदार्थाचा विस्तार, तो आकार ह्या शब्दानें दर्शविला जातो. "आकृति" ह्या शब्दाला वाटोळा, चौकोनी, त्रिकोणी वगैरे विशेषणें लागतात. "आकार" ह्या शब्दाला लहान, मोठा इत्यादि विशेषणें लागतात. उ० छापील पुस्तकांतील आकृति लहान आकाराच्या असतात त्याच आकृति खडूनें फळ्यावर मोठ्या आकाराच्या काढतात, अशासाठीं की वर्गांतील सर्व मुलांना त्या स्पष्टपणें दिसाव्या.

२ कधी कधी "आकार" हा शब्द शिथिलपणानें "आकृति" ह्याबद्दल योजतात, पण तसें न करावें हें बरें.

## १३३२. आम्ही, आपण

वक्ता जेव्हा कांही व्यक्तींच्या समुच्चयासंबंधानें कांही विधान करतो आणि त्या समुच्चयांत स्वताचा आणि तो ज्याच्याशीं बोलत आहे, त्याचा असा दोघांचाहि अंतर्भाव करतो, तेव्हा तो "आपण" हा शब्द योजतो. ज्याच्याशीं तो बोलत आहे त्याचा त्या समुच्चयांत वक्ता अंतर्भाव करीत नसला, तर तो "आम्ही" हा शब्द योजतो उ० राम—"सीते, आता आपण ह्या पुष्पक विमानांत बसून परत अयोध्येला जाऊं" येथे आपण म्हणजे मी, तूं आणि लक्ष्मण, हनुमान, बिभीषण. इ०. उ० राम—"तुला रावणानें चोरून नेलें तेव्हा आम्ही दंडकारण्यांत तुझा पुष्कळ शोध केला." येथे आम्ही म्हणजे मी आणि लक्ष्मण यांनी.

२ वक्ता जेव्हा दुसऱ्याच्या पुढे काही विधानें करीत असतो आणि तीं विधानें त्या दुसऱ्यालाहि लागू पडण्याजोगी असतात, तेव्हा त्याने "आपण" हा शब्द योजणें युक्त असतें परंतु वक्त्याला मध्येंच कधी कधी स्वगत भाषण करण्याची लहर येते आणि तो "आपण" हा शब्द न योजतां "आम्ही" हा शब्द योजतो अशी रचना झोकदार होते पण ती ज्याला साधेल, त्यानेंच करावी, अशी आमची इशारत आहे. निबंधमालेंत अशीं उदाहरणें पुष्कळ आढळतात.

## १३३३ आयुध, आऊत

१ "आयुध" हा संस्कृत शब्द असून त्याचा अर्थ लढण्याचें हत्यार असा आहे अर्जुनाचें गांडीव धनु, बलरामाचें मुसळ आणि नांगर आणि कृष्णाचें चक्र हीं आयुधें

२ "आऊत" हा शब्द "आयुध" ह्यापासून निघालेला असून शेतकऱ्याचीं साधनें ( नांगर वगैरे ) असा याचा अर्थ मराठींत झाला आहे

## १३३४. आशा, इच्छा

आपल्या सोयीची, फायद्याची किंवा आवडीची वस्तु हवी किंवा मिळावी असें जें वाटणें, त्याला "इच्छा" असें म्हणतात इच्छा सफल होण्याचा बराच संभव असल्यास तिला "आशा" म्हणतात उ० मी परीक्षेंत पास होईन, अशी मला आशा आहे कारण, मी प्रत्येक पेपरांतील बहुतकरून सर्व प्रश्न सोडविले आहेत उ० त्याच्या नोकरीची मुदत मजपेक्षां पुष्कळच कमी आहे, परंतु त्याच्यावर वरिष्ठाची मर्जी असल्यामुळे मला निदान सध्या तरी बढती मिळण्याची आशा नाही. उ० सदाशिवराव कोकणस्थ आहे, पण कऱ्हाडे जातीची मुलगी आपणाला सून मिळावी, अशी त्याची फार इच्छा आहे.

## १३३५ ईश्वर, देव

१ जगाचा कर्ता, नियंता किंवा चालक ह्या अर्थानें हे दोन्ही शब्द सारखेच योजले जातात ईश्वराची ( किंवा देवाची ) करणी आणि नारळांत पाणी ईश्वराचें ( किंवा देवाचें ) चिंतन ईश्वराला ( किंवा देवाला ) अशक्य काय ? इत्यादि वाक्यात ईश्वर आणि देव हे शब्द योजता येतात परंतु मराठींत देव ह्या शब्दाला आणखीहि एक अर्थ प्राप्त झाला आहे देवाच्या किंवा ईश्वराच्या एखाद्या विशिष्ट रूपाची जी धातु, पाषाण वगैरेंची मूर्ति केलेली असते आणि जिच्या ठायीं त्याची यथाशास्त्र स्थापना केलेली असते, त्या मूर्तीला "देव" हा शब्द लाविला जातो ईश्वर हा शब्द लाविला जात नाही उ० आज एकादशी आहे, आपले सगळे देव चिंचेने घास ( म्ह० बाळकृष्ण, अन्नपूर्णा वगैरेंच्या मूर्ति ) उ० मी रोज सध्याकाळीं देवदर्शनाला जातों ( तुळशीमार्गेतील रामाला किंवा कसब्यातील गणपतीला इ० ) उ० मी देवाला जाऊन आल्यावर तुला भेटेन

२. "ईश्वर" ह्याचा संस्कृतांत शंकर असा एक विशिष्ट अर्थ आहे. ओंकारेश्वर, रामेश्वर, कर्णेश्वर वगैरेंमध्ये त्याचा तो अर्थ आहे.

१३३६. उगाळणें, घासणें, चोळणें, झिजविणें :

१ ह्या चारी क्रियापदांमध्ये घर्षणाची क्रिया साधारण आहे आणि त्यांच्यांत जो फरक आहे, तो त्या क्रियेचें फल आणि रीति ह्यावरून उत्पन्न झाला आहे. जो पदार्थ आपण दगड, सहाण वगैरेंवर उगाळतो, त्याच्या घर्षणानें निघालेले कण आपणांस पाहिजे असतात. उदा, चंदन वगैरे पदार्थ आपण गंधासाठी उगाळतों.

२ जें आपण घासतों, त्याच्या घर्षणानें निघालेले स्वताचे किंवा त्याला चिकटलेले इतर पदार्थांचे कण आपणास नको असतात., ते टाकून द्यावयाचे असतात. आपण खरकटीं भांडीं घासून स्वच्छ करतों. सँड पेपरनें आपण टेबलाचा पृष्ठभाग घासून गुळगुळीत करतों.

३ रुधिराभिसरण नीट चालावें, शिरा सैल पडाव्या, म्हणून शरिराचे विशिष्ट भाग आपण चोळतों. उदार्चे वगैरे तेल लावून आपण कंबर वगैरे चोळतों, त्या भागाचा ठणका कमी व्हावा म्हणून.

४ जें कांहीं आपण झिजवितों त्याचे घर्षणानें नकोत ते कण काढून टाकून त्याला विशिष्ट आकार द्यावा किंवा तो न बोचेल असा करावा, हा आपला उद्देश असतो. मोरखुदाचा खडा आपण सहाणेवर घासून झिजवितों; त्याच्या कर्कश शिरा किंवा कोपरे डोळ्याला न बोचावे, असा आपला उद्देश असतो. पहार झिजवून सुई करूं इच्छिणारा जो माणूस तो मूर्ख होय.

५ उगाळणें, घासणें आणि झिजविणें, हीं तीन क्रियापदें अलंकारिक रीत्या योजिलीं, तरी त्यांत मूळच्या अर्थांची प्रतीति होतेच. जसें, कोळसा कितीहि उगाळला, तरी काळा तो काळाच ! त्याचे मर्मभेदक शब्द तूं किती दिवस उगाळीत बसणार ! माझा मतलब घे, उगाच शब्द घासू नको !

१३३७. उदासीन, तटस्थ, मध्यस्थ, त्रयस्थ, तिऱ्हाईत

१ "उदासीन" ह्याचा व्युत्पत्त्यर्थ "घडत असलेल्या गोष्टींकडे लक्ष न देतां दूर जाऊन बसलेला". "तटस्थ" म्हणजे तटावर बसून पाण्यांत पोहत असलेल्या माणसांकडे कुतूहलपूर्वक पाहणारा, पण स्वता न पोहणारा. "मध्यस्थ" म्हणजे दोन युध्यमान पक्षांनी एकमेकांशीं झोंबाझोंबी न करावी, म्हणून दोघांना अलग राखण्यासाठी मधोमध उभा राहणारा. ह्या व्युत्पत्तीवरून ह्या तीन शब्दांच्या अर्थांमध्ये साहजिकपणें जो भेद झाला, तो भेद पुढील विवेचनावरून स्पष्ट होईल,

२ जवळच बसलेला आणि घडत असलेल्या गोष्टींत भाग न घेणारा असा पहिल्या दोन शब्दांत साधारण अर्थ आहे. जो उदासीन असतो, तो घडत असलेल्या गोष्टींत भाग तर घेत नाहीच, पण त्या पाहावयाला उत्सुकहि नसतो. त्याला त्या दिसल्या तर तो त्या पाहतो, आणि त्याला त्या न दिसल्या तरी "कांहीं कां होईना," अशी त्याची वृत्ति असते.

३ जो तटस्थ आहे, तो घडत असलेल्या गोष्टी लक्ष्यपूर्वक पाहत असतो, आणि "आता काय बरें होईल," अशी त्याच्या मनांत उत्कंठा किंवा जिज्ञासा असते.

४ जो मध्यस्थ असतो, त्याने घडणाऱ्या गोष्टी पाहिलेल्या असतातच असा नेम नाही. जो पक्षपात करणार नाही अशी दोन्ही पक्षांची खात्री असून, दोन्ही पक्षांनी निकाल द्यावयासाठी अधिकृत केलेला जो माणूस, तो मध्यस्थ. घडलेल्या, घडत असलेल्या किंवा पुढे घडणाऱ्या अशा कोणत्याहि गोष्टीसंबंधाचा निकाल द्यावयाला मध्यस्थ नेमतां येतो.

५ 'उदासीन' ह्याचा मराठींत 'दुःखाने किंवा दुसऱ्या कांही कारणाने निरानंद, हतोत्सव' असा अर्थ झाला आहे. त्याचें अपभ्रष्ट रूप "उदास," "उधास" असेंहि वापरण्यांत येतें.

६. जो तिऱ्हाईत असतो, त्याचा घडत असलेल्या गोष्टींशीं कांही संबंध नसतो. घडत असलेल्या गोष्टींशीं ज्याचा कांही संबंध नाही, म्हणून ज्याचें मन समतोल असणें शक्य आहे, त्याला "त्र्यस्थ" हा शब्द लावला जातो. "त्र्यस्थ" हा सुशिक्षितांनी पतकरलेला शब्द आहे. त्याचेंच अपभ्रष्ट रूप "तिऱ्हाईत" हें होय.

## १३३८. कवि, शाहीर

"शाहीर" ह्या शब्दाचा अर्थ फारसी भाषेंत कवि असाच आहे; परंतु मराठी भाषेंत त्याला विशिष्ट अर्थ प्राप्त झाला आहे. समाजात मोठ्याने म्हणावयासाठी लावण्या किंवा पोवाडे किंवा पदें रचणारा किंवा स्वतः रचून स्वला म्हणणारा, किंवा लोकांनी रचलेलीं म्हणून दाखविणारा जो, तो शाहीर. अनंतफंदी, रामजोशी, सगनभाऊ, परशुराम इत्यादि हे शाहीर होते. मोरोपंत, वामन पंडित इत्यादि हे कवि होते.

## १३३९ काळ, वेळ, समय, वक्त

१. "काळ" हा शब्द बराच मोठा अवधि किंवा मुदत दाखवितो. "वेळ" हा शब्द त्याच्या मानाने अगदी थोडा अवधि दाखवितो, आणि "समय" हा शब्द अत्यंत लहान अवधि दाखवितो. काळाचा प्रदेश हजारों वर्षांचा असेल, वेळेचा प्रदेश पांच पन्नास वर्षांचा असेल, आणि समय हा एका क्षणाचाहि असूं शकेल. वेदाच्या काळीं आपले पूर्वज माती, सोनें, रुपें, तांबें-वगैरेंचीं भांडीं; लोखंडाचीं चिलखतें आणि नानाप्रकारच्या तरवारी; सुताचीं, रेशमाचीं, लोकरीचीं वस्त्रें ह्या वस्तु करीत, आणि वापरीत असत. ते घरें, किल्ले, देवळें, पूल वगैरे बांधीत असत.

२. शिवाजीच्या वेळीं देशप्रीति, धर्मप्रीति वगैरे सद्गुण मराठ्यांच्या अंगीं झळकूं लागले होते. बौद्ध धर्माच्या वैभवाचा काळ, शिवाजीच्या वैभवाची वेळ, श्रीमंत नारायणराव पेशवे ह्याच्या वधाचा समय, असे आपण प्रयोग करतों.

३. "वक्त," हा अरबी शब्दाचा अर्थ "वेळ" असा आहे; पण तो शब्द सुशिक्षित लोकांच्या वापरण्यांत फारसा येत नाही. त्याच्यापासून निघालेला "वक्तशीर"

हा मूल्यवान् आणि उपयुक्त शब्द आपण भाषेत पचवून घेतला आहे. "वक्तशीर" म्हणजे ठरलेल्या वेळीं ठरलेलें काम करणारा.

४. काळ, वेळ आणि समय ह्या तीन शब्दांत भेदनाक्रिया कोणत्या सरणीने घडली आहे किंवा घडत आहे, हें आम्हीं सांगितलें. तथापि पुढील सूचना विद्यार्थ्यांनी लक्षात नाळगाव्या:—

(अ) काळ आणि वेळ ह्या दोन शब्दांची, तसेंच वेळ आणि समय ह्या दोन शब्दांची, अदलाबदल प्रसंगविशेषीं करण्याची रूढि पडून गेली आहे. ह्यामुळे "वेळ" हा शब्द बहुतेक साधारण आहे. तो बहुतेक सर्व प्रसंगीं योजतां येण्याजोगा आहे, असें म्हणावयाला हरकत नाही.

(आ) "समय" हा शब्द बहुधा उच्च वर्गाचे लोकच योजतात. त्याच्याबद्दल खालच्या वर्गाचे लोक, "वेळ" किंवा "वक्त" हा शब्द योजतात.

(ई) पुढील वाक्प्रचार रूढीने ग्राह्य ठरविले आहेत.

(क) ऐन वेळ, वेळ मारून नेणें, वेळेचा गुण इ०.—येथे 'वेळ' हा शब्द समय ह्या अर्थाने योजला आहे. येथे "वेळ" हा शब्द योजला नाही, तर रूढीचा अतिक्रम होईल.

(ख) "काळ आला होता पण वेळ आली नव्हती," ह्या सांप्रदायिक वाक्यात "काळ" ह्या शब्दावर श्लेष आहे. येथे "काळ" ह्याचे दोन अर्थ यमराज आणि वेळ असे घ्यावयाचे, आणि "वेळ" ह्याचा "समय" असा अर्थ घ्यावयाचा.

(ग) "काळ वेळ," ह्या जोडीचा अर्थ "योग्य समय" असा घेतला जातो. उ० नान्या ! तुला कांहीदेखील अक्कल नाही ! कुटुंबावर हें संकट ओढवलें आहे, आणि तूं टोपीसाठी हट्ट घेऊन बसतोस ! तुला काळ वेळ काहीच कशी नाही समजत !

## १३४०. कृमि, किरीम

"कृमि" हा सामान्य जातिवाचक शब्द आहे. "किरीम" हा पोटामध्ये काही रोगांमुळे उत्पन्न होणारे जे जंतु, त्यांचा वाचक शब्द आहे. दुसरा शब्द पहिल्याचें अपभ्रष्ट रूप आहे.

## १३४१. कौशल्य, चातुर्य

कौशल्य म्ह० कांही साधनांनी, हातांनी किंवा दोहोंनाहि उपयोग करून सुंदर, सुबक, सोयीची, सफाईदार अशी वस्तु बनविण्याची ताकद, सामर्थ्य किंवा कारागिरी. उ० आपल्या वेदकालीन पूर्वजांच्या अंगीं हस्तिदंत, शिंग, धातु वगैरेंचे पदार्थ बनविण्याचें कौशल्य होतें. कलाकौशल्य, हस्तकौशल्य ह्या शब्दात कौशल्य ह्याचा हाच अर्थ आहे.

चातुर्य म्ह० प्रसंगविशेषीं युक्ति, हिकमत, हानी योजण्याचें जें बुद्धिसामर्थ्य तें. चातुर्य हा बुद्धिनिष्ठ गुण आहे. उ०

बांधकाम. हा अर्थ ह्या सर्व शब्दांत साधारण आहे. "किल्ला" हा शब्द सामान्यतः सर्व प्रकारांना लाविला जातो. परंतु बाकीचे शब्द वेगळे वेगळे प्रकार दर्शवितात.

२. परिस्थितीच्या संबंधाने किल्ल्यांचे तीन प्रकार आहेत. पाण्यात, बेटावर, अगर भूशिरावर बांधलेला असतो त्याला "जंजिरा" अगर "दुर्ग" असें म्हणतात. डोंगराळ किल्ल्यास "गड," मैदानांतील व शहर अगर अन्य स्थळ, ह्यांच्या समोवार असलेल्या किल्ल्यास "भुईकोट" अगर. नुसता "कोट," अशा संज्ञा आहेत. रायगड, प्रतापगड, पन्हाळगड हे डोंगरी किल्ले होत. सिंधुदुर्ग, सुवर्णदुर्ग वगैरे जंजिरे होत. विजापूर, सोलापूर, बदामी इत्यादि ठिकाणचे किल्ले भुईकोट होत."

—गो० स० सरदेसाई.

टीपः—"जंजिरा" हा शब्द फारसी भाषेंत नुसता 'किल्ला' ह्याचा वाचक आहे. मराठींत त्याला विशेष अर्थ रूढीने प्राप्त झाला आहे, हें विद्यार्थ्यांनी लक्ष्यात ठेवावे. किल्ला हा शब्द "किलाह्" ह्या अरबी-फारसी शब्दाचा मराठी अपभ्रंश आहे. 'दुर्ग' आणि 'कोट' हे शब्द संस्कृत आहेत. 'गड' हा हिंदुस्तानी शब्द आहे. "बाले किल्ला" हा शब्द अरबी—फारसी "बालाय् किलाह्" ह्यापासून आलेला आहे. "बाला" म्ह० उंच किंवा माथा. 'बालाय् किलाह्' किंवा 'बाले किल्ला' म्हणजे शत्रूच्या हालचालींवर टेहळणी करण्यासाठी डोंगरी किल्ल्यावर जें उंच बांधकाम, चारपांच माणसांना उभें राहतां येईल, इतक्या विस्ताराचें केलेलें असतें तें. डोंगरी किल्ल्याचा माथा.

शत्रूचें अतिशय मजबूत, अतिशय दुर्गम आणि अगदी अजिंक्य असें जें आश्रयाचें स्थान त्याचा वाचक म्हणून "बालेकिल्ला" हा शब्द अलीकडे योजला जाऊं लागला आहे; परंतु हा उपयोग चुकीचा होय.

## १३४९. जवाब, जाब

१. "जबाब" हा शब्द फारसी "जवाब" ह्यापासून मराठींत आला आहे आणि मराठींत आल्यावर त्याचा पुढे अपभ्रंश होऊन "जाब" हा शब्द झाला आहे.

२. "जबाब" म्हणजे उत्तर. विशेषतः कोर्ट—कचेऱ्यांत विचारलेल्या सवालास दिलेलें उत्तर. "जाब" हा उपर्युक्त अपभ्रंश असून तो संवाद किंवा समतोलपणा हा अर्थ दाखवितो. कमान, महिरप वगैरेंच्या मध्याच्या दोन्ही बाजूंस जाब देणारी म्ह० सारखी सारखी नक्षी असली, तर ती शोभिवंत दिसते. एका बाजूला कुराणांतील वाक्यें जाळीच्या रूपाने खोदलेलीं असलीं आणि दुसऱ्या बाजूला सपाट जमिनीवर जंगलाचा देखावा रंगानी दाखविला असला, तर ती कमान किंवा महिरप जाब नसल्याकारणाने शोभिवंत दिसत नाही.

## १३५०. ठेवणें, मांडणें

१ "ठेवणें" हा सामान्य अर्थाचा शब्द आहे आणि "मांडणें" हा शब्द

"काही विशेष प्रकाराने ठेवणें" असा अर्थ दाखवितो. आपणांस कोणताहि पदार्थ कोणत्याहि आधारावर कोठेहि ठेवतां येतो, तो तेथे स्थित असला म्हणजे झालें.

२ एखाद्या पदार्थाचा शक्य तितका अधिक भाग दिसेल किंवा डोळ्यांत भरेल अशा उद्देशाने किंवा शेजारच्या पदार्थांच्या सापेक्षत्वाने अधिक उठावदार दिसेल, किंवा त्याचे सर्व गुण व दोष सोयीने आकलन करता येतील अशा बुद्धीने एखादा पदार्थ ठेवलेला असतो, तेव्हा तो "माडला" असा आपण प्रयोग करतो. "मांडणें" ह्याचा हा मूळचा अर्थ खरा, परंतु कित्येक शब्दसंहतींत "मांडणें" हें क्रियापद योग्य म्हणून सतत योजलें गेल्याकारणाने "मांडणें" ह्याचा मूळचा खरा अर्थ प्रतीतीस येईनासा झाला आहे; परंतु तो त्यांत आहे, ह्यात शंका नाहीं. उ० दुकानदार गिऱ्हाइकाच्या सोयीसाठी आपले विकावयाचे जिन्नस नीट माडून ठेवतो. उ० स्वयंपाकाला सुरुवात करावयाच्या अगोदर स्वयंपाकी माणूस जरूर लागणारे पदार्थ आपल्या जवळ माडून ठेवतो. दुकान माडणें; ताटें, पाट, मांडी माडणें; सुनमुखाचे प्रसंगीं ताटांत दागिने माडणें इ०. भांडण, कज्जा, दावा, माडणें; शिवीगाळ मांडणें; चेष्टा, ढंग, गमजा माडणें; इत्यादि प्रयोगांत आम्हीं वर निर्दिष्ट केलेल्या अर्थाची प्रतीति होते.

## १३५१. डाग, लांच्छन

"डाग" हा शब्द वाच्य अर्थाने योजतां येतो, आणि लाक्षणिक अर्थानेहि योजतां येतो. "लाञ्छन" हा शब्द मराठींत केवल लाक्षणिक अर्थानेच योजला जातो. उ० आधणाच्या पाण्याने माझें मनगट भाजलें. त्याचा डाग अजून बुझला नाही. तुम्ही मदत करीन असें म्हणाला आणि आयत्या वेळीं मागे हटला, हा तुमच्या चारित्र्याला डाग लागला. तुमच्या मुलाने हे ढंग चालविले आहेत, हें तुमच्या घराण्यावर मोठें लांच्छन होय !

## १३५२. तोडणें, मोडणें, फोडणे

१. हत्याराने, अन्य साधनाने किंवा केवळ अंगच्या शक्तीने वस्तूवर तडाखा मारून तिचे दोन खंड करणें, हा "तोडणें" ह्याचा अर्थ आहे. उ० झाड, दोरी, जंगल इत्यादि तोडणें. 'मैत्री तोडणें' येथे "तोडणें" ह्याचा लाक्षणिक रीत्या उपयोग झाला आहे, तरी त्यात मूळचा अर्थ कायम आहे.

२. रूपात किंवा स्थितींत बदल करणें; रूपाचा किंवा स्थितीचा नाश करणें; एखादी सरणी किंवा क्रम बंद पाडणें किंवा विध्वंसणें; किंवा न अनुसरणें हे 'मोडणें' ह्याचे अर्थ आहेत. उ० घर, शॉप, दुकान, सभा, बंड, नियम, कायदा, क्रम, बाजार, संस्था, शाळा, रुपया, नोट, गाव, वस्ती, शिरस्ता, पागोटें, दागिना, वाद, मातीचें चित्र, चाल, रीति वगैरेंसंबंधाने "मोडणें" हें क्रियापद योजलें जातें. लाक्षणिक अर्थाने हें क्रियापद योजलें, तरी मूळचा अर्थ कायम असतो. उ० मन, मर्जी, मेळ, दिवस, वचन, व्यसन, मतभेद, वाद, मय इ० मोडणें.

३. 'फोडणें' ह्याचा अर्थ तोंड किंवा वाट करून देणें; लाच वगैरेंनी फितविणें; ठिसूळ किंवा टणक पदार्थांचा जोराच्या आघाताने नाश करणें; पदार्थांचे काहीं भाग काढून टाकून त्याला विशिष्ट आकार देणें. उ० पाण्याचा पाट फोडणें; गळू फोडणें; मातीचें भांडें फोडणें; भिंत, घर वगैरे फोडणें; कटांतून माणसाला फोडणें; डोळे फोडणें; दगड, खडी वगैरे फोडणें; मूर्ति इ० साठी दगड फोडणें.

४. कधी कधी एकाच मातीच्या पदार्थासंबंधाने 'मोडणें,' 'तोडणें' आणि 'फोडणें' ही क्रियापदें योजतां येतात, परंतु त्यांचे अर्थ वेगळे होतात, आणि ते वरील विवेकाला अनुसरूनच होतात, जसें भांडें फोडणें किंवा मोडणें; मातीचें चित्र मोडणें किंवा फोडणें; लाकूड तोडणें किंवा मोडणें; एखादी संस्था, शाळा, फोडणें किंवा मोडणें.

५. ह्या तीन क्रियापदांचीं उदाहरणें अर्थासह मागे 'क्रियापदें' ह्या प्रकरणांत दिलीं आहेत. [लेखाक ८३२ पहा.]

६. तोडणें, मोडणें (सकर्मक) आणि फोडणें, ह्यांचे जे अर्थ आहेत, त्यांच्याच अनुरोधानें "तुटणें" "मोडणें," (अकर्मक) आणि "फुटणें" ह्यांचे अर्थ होतात.

## १३५३. दूर, लांब

१. "दूर" हा शब्द संस्कृतांत विशेषण आहे आणि क्रियाविशेषणहि आहे. 'लांब' हा शब्द सं० "लम्ब" पासून आला आहे, परंतु मराठींत तो अर्थानें आणि रूपानेंहि संस्कृताहून भिन्न झाला आहे. "लंब," हा शब्द मराठींत विशेषण आहे, आणि क्रियाविशेषणहि आहे. अंतरावर, अंतराबर असलेला, असे "दूर" "लांब" ह्याचे अर्थ आहेत. परंतु लांबी, रुंदी-उंची किंवा जाडी-खोली अशीं जी पदार्थांचीं तीन परिमाणें, त्यापैकीं "लांब," हा शब्द पहिलें परिमाण दाखवितो, तसा "दूर" हा दाखवीत नाही. 'लांब' हा "दूर" ह्याचे दोन्ही अर्थ दाखवून शिवाय परिमाण हा तिसरा अर्थ दाखवितो. हा विवेक पुढील उदाहरणांवरून स्पष्ट होईल. १. पुण्याहून चिंचवड दहा मैल दूर किंवा लांब आहे. २ माझ्या अंगाला असा बिलगूं नको. दूर किंवा लांब बैस. ३ अलीकडे ह्या रामाचे कान लांब (दूर नव्हे) होत चालले आहेत. ४. ह्या सदऱ्याच्या बाह्या फार लांब. (दूर नव्हे) आहेत. हें टेबल पांच फूट लांब (दूर नव्हे) आहे.

२. लांबलचक (इ० योग्य लांबीपेक्षा अधिक लांब असल्याकारणानें जें बेढब किंवा ऐबट दिसतें, तें.

## १३५४. दोस्त, सोबती, मित्र

जे लोक मतानी, चालीरीतींनी, हिताहित संबंधानी किंवा धर्मांनी एकमेकाच्या उलट असतात, ते लोकहि एका साधारण ध्येयासाठी "दोस्त" होऊं शकतात. "मित्र"

हा शब्द पवित्र भावनेचा द्योतक आहे. त्यांचीं अंतःकरणें प्रेमानें निगडित झालेलीं आहेत, ते एकमेकांचे मित्र होत. "सोबती" ह्याचा अर्थ 'बरोबर असणारा' इतकाच केवळ आहे. उ० गेल्या सप्तवार्षिक महायुद्धामध्ये जर्मनी आणि तुर्कस्तान हे दोस्त होते, आणि इंग्लंड आणि फ्रान्स हे दोस्त होते. त्या प्रवासात आम्ही सात माणसें सोबती होतों. उ० मला त्या अंधेराच्या खोलींत जावयाची भीति वाटते. मला कोणीतरी सोबती लागतो.

## १३५५. धन, द्रव्य

( १ ) बाजारात जे प्रत्यक्ष मोबदल्यादाखल स्वीकारलें जातें आणि ज्याला व्यवहारात पैसा असें म्हणता येईल, तें द्रव्य, उ० आमच्या संस्थेला द्रव्यबल आणखी पुष्कळ पाहिजे आहे. द्रव्याभावामुळे हिंदुस्थानांतील पुष्कळ कारखाने बंद पडत आहेत; द्रव्यनिधि, द्रव्यसंचय इ० ( २ ) मूल्यवान्, मानार्ह असें जें कांहीं तें धन. उ० मानधन, यशोधन, विद्याधन, तपोधन, शौर्यधन, गोधन इ०. लाक्षणिक अर्थानें धन शब्द योजता येतो, तसा द्रव्य येत नाही. ( ३ ) गणितशास्त्रांत अधिक ह्या चिन्हानें दर्शविली जाणारी जी संख्या किंवा परिमाण त्याला धन असा पारिभाषिक शब्द लावला जातो. ह्याच्या उलट ऋण. ( ४ ) एखादी वस्तु बनवावयाची असतां तिचे जे घटक पदार्थ, वस्तु किंवा जिनसा त्यांना द्रव्य हा शब्द लावला जातो. उ० काड्याचीं द्रव्यें, औषधाचीं द्रव्यें, काच करावयाला वाळू, गारगोटी हीं द्रव्यें, होमाचीं द्रव्यें इ०. व्याकरण, न्याय, मीमांसा वगैरे शास्त्रांत द्रव्य याचे जे पारिभाषिक अर्थ आहेत, त्यांचा धन या शब्दाशीं घोटाळा होण्याचें कारण नाही, म्हणून ते येथे दिले नाहीत.

## १३५६. धाष्टर्य, धारिष्ट

१ "धृष्ट" ह्याचा संस्कृतांत "धीट" असा अर्थ असून त्याचें भाववाचक नाम "धाष्टर्य" असें आहे आणि त्याचा अर्थ "धीटपणा" असा आहे. परंतु मराठींत "धाष्टर्य" ह्याचा अर्थ अवनत झाला आहे. निर्लज्जपणाचा, आर्य स्वरूपाचा किंवा न शोभणारा असा जो धीटपणा त्याला "धाष्टर्य" म्हणतात. उ० तुझें मीं लहानपणीं लालन, पालन, पोषण केलें आहे. असे शब्द मला बोलायाला तुला धाष्टर्य कसें झालें?

२ "धाष्टर्य" याचें मराठींतील अपभ्रष्ट रूप "धारिष्ट" असें आहे आणि हा शब्द प्रशंसनीय धीटपणा, छातीठोकपणा, हिंमतदारी, प्रसंगीं न कचरतां धमकदारीनें पुढे जाणें हे गुण दाखवितो. उ० घराला आग लागली, तेव्हा त्यानें हिशेबाचीं दप्तरें मोठ्या धारिष्टानें बाहेर काढलीं!

## १३५७. घुणें, विसळणें

"घुणें" हा शब्द गुंतागुंतीची आणि कष्टाची क्रिया दाखवितो. चिरगुटें धुणें,

पाट धुणें, मांडीं धुणें इ०. जें काही धुवावयाचें असतें, त्याचा मळ, डाग वगैरे काढून टाकावयाला श्रम पडतात, मांड्याच्या आंतल्या किंवा बाहेरच्या पृष्ठभागाला वरवर चिकटलेले मातीचे वगैरे कण काढून टाकावयाचे असतां किंवा मांडें सोवळें करून घ्यावयाचें असता, तें आपण विसळतों म्ह० मांड्यात पाणी घालून तें हालवून ओतून टाकतों आणि वर पाणी ओततों. असें केल्याने तें मांडें स्वच्छ किंवा सोवळ्यात घ्यावयाला योग्य होतें.

## १३५८. नियम, नेम

१ हे दोन शब्द तुल्यकल्प होण्याच्या मार्गावर आहेत, परंतु ते अद्यापि पूर्णपणें तुल्यकल्प झाले नाहीत. "नियम" म्ह० ठराव किंवा सरणी. संस्कृतात सप्तमीच्या अनेकवचनाचें रूप करावयाचें असतां "सु" हा प्रत्यय लावावा असा नियम आहे. मराठींत भूतकाळीं स० कर्तरि बहुधा प्रयोग होत नाही, असा सामान्य नियम आहे.

२ 'नेम' हा शब्द 'नियम' ह्यापासून अपभ्रष्ट झाला आहे आणि त्याचा अर्थ संभवनीयता, बऱ्याच अंशीं खात्री, असा होऊं लागला आहे. उ० आज पाऊस पडेल काय? उत्तरः—कांहीं नेम सांगवत नाही. आज मुंबईहून गोविंदराव येतील काय? उत्तरः—त्याचा काय नेम? येतील देखील. मी सभेला जाईन, असा नेम नाही. चातुर्मासांत बायका अनेक प्रकारचे कठीण नेम करतात.

टीपः—सुशिक्षित लोक "नेम" हा शब्द अशुद्ध म्हणून तो योजावयाला योडेसे कचरतात आणि त्याचेबद्दल "नियम" हाच शुद्ध शब्द म्हणून योजतात. ह्या दोन शब्दांच्या लढाईत "नेम" शब्द टिकून राहतो किंवा नाही, हें पुढच्या पिढींत ठरेल.

## १३५९. निवड, पसंती

( १ ) आपल्यापुढे ज्या अनेक वस्तु आल्या आहेत, त्यापैकी आपणांस हव्या असतील किंवा आवडत असतील, त्या ठेवून घेऊन बाकीच्या टाकून देणें ह्या क्रियेला निवड करणें असें म्हणतात. ( २ ) जें आपण पसंत करतों तें आपणास आवडतें असतें, म्हणून तें आपण स्वीकारतों. तें अनेक वस्तूतून निवडून काढलेलें असेल किंवा नसेल. आपणांपुढे एकच वस्तु आलेली असून ती आपणास आवडली, तर ती आपण पसंत करूं शकूं. ( ३ ) निवड अनेक वस्तूतून केली जाते. पसंतीच्या क्रियेला अनेक वस्तु असल्याच पाहिजेत, असें नाही. ( ४ ) डाळ, तांदूळ वगैरे निवडणें म्हणजे त्यातून डोळ, खडे, पाखड वगैरे काढून टाकून देणें हा अर्थ ( १ ) मधून काढतां येतो.

उदाहरणें—ह्या पाटींतील पेरू तुम्हीं सरसकट घेतले तर पैशाला एक प्रमाणें देईन; पण निवडून घेणार असला तर पावलीला दहा देईन. उ० तुम्हांला मीं दहा मुली दाखविल्या त्यातून कोणतीच तुम्हांला पसंत पडत नाही काय? मला त्या मास्तराची शिकविण्याची तऱ्हा पसंत पडली नाही, म्हणून मीं झालेल्या दिवसाचा पगार देऊन टाकून त्याला रजा दिली.

## १३६०. निःसंशय, बेलाशक

१. "शक" ह्या अरबी शब्दाचा अर्थ "संशय" असा आहे. "बे" हा उपसर्ग अभाव दाखविणारा आहे, तसाच "ला" हाहि अभावदर्शक उपसर्ग आहे. 'लाशक,' 'बेशक' ह्या दोहोंचाहि 'संशयरहित' असा अर्थ होणार. आपण "बे" आणि "ला" असे एकाच अर्थाचे दोन उपसर्ग "शक" ह्या शब्दाला लावून "बेलाशक" असा शब्द तयार केला आहे.

२. 'निःसंशय' आणि 'बेलाशक' ह्या दोन्ही शब्दांचा व्युत्पत्त्यर्थ समान असला, तरी मराठींत दोहोंच्या अर्थांत भेद आहे. बेलाशक म्ह० न भितां, न कचरतां, संकोच न बाळगतां निःसंशय म्ह० खात्रीपूर्वक, खात्रीने. उ० आज निःसंशय पाऊस पडेल यदा तो परीक्षेंत निःसंशय पास होईल. तू छत्री न घेतां बेलाशक जा. आज पाऊस पडणार नाही. आणखी एक लाडू बेलाशक खा, तुम्हाला अजीर्ण होणार नाही, अशी मी हमी घेतों.

## १३६१. पळणें, धावणें

१. हीं क्रियापदें समानार्थक अशीं वाटतात, परंतु व्युत्पत्तीने ती भिन्न आहेत आणि व्युत्पत्तीला रूढि अनुसरूनच आहे. "पळणें," हें क्रियापद संस्कृत "प्र" किंवा "परा" (दूर) ह्या उपसर्ग "ई" (जाणें) ह्या धातूला लागून झालें आहे. "पळणें" ह्याचा अर्थ 'दूर जाणें' असा आहे. "धावणें," शब्द संस्कृत धाव (= धावणें) ह्या धातूपासून मराठींत आला आहे. "धावणें" ह्याचा अर्थ 'वेगानें एकामागून एक पावलें टाकून एखाद्या स्थळापासून दूर जाणें,' असा आहे. "धावणें" आणि "पळणें" ह्या दोहात "एखाद्या स्थळापासून दूर जाणें," एवढाच काय तो अर्थ साधारण आहे.

२. "धावणें" ह्या क्रियेचा काहीहि उद्देश असू शकेल. अति वेगाने चालण्याची क्रिया झाली म्हणजे बस्स. "पळणें" ही क्रिया स्वताच्या बचावासाठी, संकट टाळा-बयासाठी किंवा पुढे काही अडचण येईल, ती चुकविण्यासाठी केलेली असावी लागते. मग ती वेगाने चालत जाऊन केलेली असो किंवा सावपणाने चालत जाऊन केलेली असो. "धावणें" ह्यांत वेग प्रामुख्याने येतो, "पळणें" ह्या क्रियेंत बचाव किंवा चोरटेपणा प्रमुख असतो

३. मी मांजराच्या अंगावर काठी उगारून धावत गेलों, पण तें पळालें. ह्या वाक्यांत "धावणें" आणि "पळणें," ह्याची अदलाबदल करता येणार नाही. 'मी मांजराच्या अंगावर पळालों पण तें धावलें,' हें वाक्य मूर्खपणाचें आहे आपण म्हणतों कैदी तुरुंगांतून पळाला" (धावला नव्हे). बाजीरावाचा पराभव झाला, तेव्हा तो पुणें सोडून पळाला (धावला नव्हे)

पुढील मोरोपंती आर्येत धावणे आणि पळणें हीं दोन्ही क्रियापदें योग्य प्रकारें आणि मोठ्या मजेदार रीतीने योजलीं आहेत —

वाटेपुढे पळे तो स्त्रीसंगविरक्तची कुमारमणी ।
पुत्रस्नेहें धावे त्यामागे शंभुची उमारमणी ॥ —विराटपर्व, आर्या ६३.

४. "पळणें" ह्या क्रियेंत वेग असलाच पाहिजे असें नव्हे. चोरी करून पळून जाणारा अट्टल चोर कोणाला आपला संशय येऊं नये म्हणून मुद्दाम सावकाश चालतो.

५. "पळणें" ह्याचा आणखी एक अर्थ आहे, तोहि व्युत्पत्तीशीं जुळताच आहे, विरोधी नाही. परवानगीशिवाय किंवा वर्दी न देतां किंवा एखाद्याची नजर चुकवून निघून जाणें, असा 'पळणें' ह्याचा दुसरा अर्थ आहे. त्यांतहि वेगाने चालत जाणें बिलकूल संभवत नाही. वर्गांतून पळून जाणारा मुलगा धडाधडा धावत जात नाही, तो साधेपणानें वर्गाच्या बाहेर पडतो. एखादा तास चुकविणाऱ्या मुलासंबधानें म्हणतात, "तो इतिहासाच्या तासाला पळाला" ( धावला नव्हे ).

६. धावणें ह्या शब्दांतील प्रथमाक्षरावर अनुस्वार देण्याची चाल बंद पडल्यासारखीच आहे.

## १३६२. पुस्तक, पोथी

१. 'पुस्तक' हा शब्द संस्कृतात नपुंसकलिंगी आहे. मराठींत त्याचें रूपांतर "पोथी" असें स्त्रीलिंगी झालें आहे. प्राचीन काळीं आपण आर्य लोक पुस्तकें शिवीत नसूं, परंतु हल्ली "पुस्तक" हा शब्द डाव्या बाजूस शिवलेल्या पानांच्या समूहास लावण्यात येतो. पुस्तकाचीं वाचलेलीं पानें उजवीकडून डावीकडे वळविण्यांत येतात. पोथीचीं पानें सुटीं असतात आणि वाचून झालेलीं पानें खालून वर उलटावीं लागतात.

२. एखाद्या पुस्तकावर फार वापर पडला असतां त्याच्या शिवणीचे टांके सुटून किंवा तुटून पानें विस्कळीत होतात, तेव्हा आपण म्हणतों, "त्या पुस्तकाची अगदी पोथी होऊन गेली आहे!"

३ अलीकडे छापील पोथ्याहि शिवलेल्या असतात, परंतु त्याची शिवण बहुधा वरच्या बाजूस असते, पानांच्या डाव्या बाजूस नसते.

## १३६३. भगिनी, बहीण, वहिनी

१ "भगिनी" ह्या शुद्ध संस्कृत शब्दाची "बहीण" आणि 'वहिनी' हीं अपभ्रष्ट रूपें आहेत, आणि ह्या दोन अपभ्रष्ट शब्दांना मराठींत विशेष अर्थ प्राप्त झाले आहेत. हे विशेष अर्थ परस्परापासून भिन्न असले तरी, त्या दोहोंचा जो एकच उगम, त्याला धरूनच आहेत, ही मजा लक्ष्यात ठेवण्याजोगी आहे. एकाच आईबापाचीं दोन मुलें परस्परापासून भिन्न असतात, परंतु त्या दोघांच्याहि तोंडवळ्यांत आईबापाच्या तोंडवळ्याची झाक मारतेच मारते!

२ ह्या तिन्ही शब्दांचे अर्थ महाराष्ट्रीयाना ठाऊकच आहेत, म्हणून ते येथे देत नाही नवऱ्याच्या बहिणीस 'वन्सं' म्हणतात तो शब्द "भगिनीसम" ह्याचा तिसऱ्या पायरीचा अपभ्रंश होय

## १३६४. यात्रा, जत्रा

एखाद्या पवित्र म्हणून गणलेल्या स्थानाप्रत जाणें, तेथील धार्मिक किंवा लौकिक विधि करणें, आणि तेथून परत आपल्या गावाला येणें, ह्या सर्वांच्या समुच्चयाला "यात्रा" असें म्हणतात उ० मला काशीयात्रेला पाचशे रुपये खर्च आला माझ्या मातामहाने तीन वेळा काशीयात्रा केली उ० रामेश्वराची, गोकर्णाची, जगन्नाथाची, पंढरपूरची यात्रा.

"जत्रा" हा शब्द यावरूनच निघालेला आहे, पण त्याला काही विशिष्ट अर्थ प्राप्त झाला आहे एखाद्या गावीं प्रसंगविशेषी किंवा वर्षातील काही विशिष्ट दिवशीं काही विशिष्ट उद्देशाने जो बाजार भरतो, त्याला जत्रा असें म्हणतात उ० मुंबईस कोजागरी पौर्णिमेला गवालिया टॅंकवर जत्रा भरते उ० पुण्यास नवरात्रात चतुःशृंगीची जत्रा भरते

## १३६५ यंत्र, जातें, जंत्री

(१) पहिल्या शब्दापासून पुढचे दोन शब्द निघालेले आहेत पदार्थ घडविण्याचें किंवा बनविण्याचें जें बरेंच गुतागुतीचें साधन त्याला यंत्र म्हणतात उ० सिंगरचें शिवण्याचें यंत्र घड्याळ हें एक यंत्र आहे, टाईपरायटर हें एक यंत्र आहे

(२) यांत्रिक युगाच्या अगदी बाल्यावस्थेत जेव्हा दळावयाची युक्ति कोणीं एका कल्पक कारागिराने शोधून काढली, तेव्हा लोकाची उत्कृष्ट सोय होऊन त्यांना भारी आनंद झाला आणि त्या दळणाच्या साधनाला ते बहुमानपुरःसर यंत्र म्हणूं लागले पुढे 'जातें' हें त्याचें अपभ्रष्ट रूप झालें हल्लीच्या यांत्रिक युगांत सर्व प्रकारचीं यंत्रें इतकीं विपुल झालीं आहेत, की जात्याला यंत्र असें कोणीं म्हटलें तर लोक त्याला हसतील.

(३) जंत्री हें जाडी तार बारीक करावयाचें सोनाराचें एक हत्यार असतें. एका पोलादी पट्टीला क्रमाक्रमाने बारीक बारीक होत गेलेलीं भोकें पाडलेलीं असतात, त्यातून तार ओढून काढली, म्हणजे ती हवी तितकी बारीक करतां येते

(४) काही विशिष्ट माहिती सोयीने आणि नजर टाकल्याबरोबर दिसावी, म्हणून कागदावर रकाने पाडून किंवा कोष्टकात घालून किंवा दुसरी काही विशिष्ट प्रकारची मांडणी करून ती माहिती दिलेली असते त्या मांडणीला जंत्री असें म्हणतात उ० कायद्यांची, नियमाची, चवाची, सनांची, व्याज आकारणीची, ग्रंथांची, हकीगतीची जंत्री

१३६६. यादगिरी, आठवण

"आठवण" म्हणजे स्मरण; आणि आठवण किंवा स्मरण करून देणारी जी वस्तु तिला "यादगिरी" म्हणतात. चिठ्ठी, यादी, एखाद्या माणसाची स्वदस्तूरची सही किंवा दुसरा कोणताहि पदार्थ जो पाहिला असतां, एखाद्या विशिष्ट वस्तूची आठवण होते, त्या पदार्थाला "यादगिरी" म्हणतात.

१३६७. युद्ध, लढाई, मोहीम

१. लढाई ही अगदीं अल्प काळ टिकणारी, कांही तास, फार तर दोन दिवस, टिकणारी झटापट. युद्धामध्ये अनेक लढाया, वेढे वगैरे समाविष्ट झालेले असतात आणि तें अनेक वर्षे, शेंमर शेंमर वर्षेंदेखील चालतें.

२. मुक्कामाच्या मुख्य ठिकाणापासून निघून शत्रूवर हल्ला करावयासाठी सैन्य चाल करून जातें, तें परत मुक्कामाच्या ठिकाणाला येईपर्यंतचा जो अवधि किंवा त्या अवधींत घडलेल्या ज्या गोष्टी, त्यांना "मोहीम" असें म्हणतात. उ० शिवाजीचें मोंगलांशीं पहिलें युद्ध इसवी सन १६६२ ते १६७२ चाललें होतें. ह्या युद्धांत एकंदर पाच मोहिमी झाल्या. पहिली मोहीम १६६२–६३ सालीं झाली; दुसरी मोहीम इसवी सन १६६४ सालीं; तिसरी इसवी सन १६६५ मध्ये झाली; चवथी इसवी सन १६६७ मध्ये सुरू झाली आणि पांचवी इसवी सन १६७० मध्ये झाली. प्लासीची लढाई जून २३ इसवी सन १७५७ ह्या दिवशीं झाली.

३. युद्ध आणि लढाई ह्या दोन शब्दांतील भेद अगदी स्पष्ट आहे. एकाबद्दल दुसरा शब्द न घालण्याची इशारत विद्यार्थ्यांना आम्ही मुद्दाम देतों.

१३६८. रंग, वर्ण

१ तांबडा, पिवळा, हिरवा वगैरे शब्दांनी सुचविला जाणारा जो पदार्थांचा धर्म,–जो केवळ नेत्रांसच गोचर होतो,–त्याला "रंग" म्हणतात. "रंग" ह्या शब्दानें उक्त जो धर्म तो शरिरासंबंधानें किंवा मुखासंबंधानें सांगावयाचा असतांना "वर्ण" हा शब्द योजतात. उ० ह्या मुलाचा वर्ण गोरा आहे; वर्णानें तो तांबूस गोरा आहे. ह्या चंद्रकळेचा ( विशेष अशा लुगड्याचा ) रंग काजळासारखा काळा आहे; त्या चंद्रकळेचा रंग वैंगणी काळा आहे. त्याच्या मिशा पांढऱ्या झाल्या, पण डोक्याचे केस अजून काळ्या रंगाचेच आहेत.

२ "रंग" ह्या शब्दाचा लाक्षणिक अर्थ "संभव" असा आहे. हाहि अर्थ मूळ अर्थापासून ओघानेंच आलेला आहे. उ० आज पावसाचा रंग दिसतो; तो माणूस माझी विनंती मान्य करील, असा रंग दिसतो. "वर्ण" हा शब्द लक्षणेनें योजला जात नाही.

३ ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अतिशूद्र हे वर्ण होत. अ, आ, इ, ई.... आणि क, ख....इ० हे मराठी भाषेचे वर्ण होत. ह्या दोन्ही अर्थांनी वर्ण ह्याचा रंग ह्याच्याशीं घोटाळा होण्याचें कारण नाही.

१३६९. रूप, स्वरूप

१ "रूप" हा शब्द उत्तान किंवा बाह्य देखाव्याचा वाचक आहे. "स्वरूप" हा शब्द शौर्य, धैर्य, इमान, बुद्धिमत्ता, नीतिमत्ता, स्वत्वाचा विशेषपणा इत्यादि जे चारित्र्याचे किंवा स्वत्वाचे बद्धमूल म्हणजे खोलपर्यंत गेलेले गुणधर्म, इत्यादि त्या सर्वांच्या समुच्चयास मनश्चक्षूपुढे येणारी मूर्ति दाखवितो. अंकगणितांत $\frac{६}{१२}$ ह्या अपूर्णांकाची जी किंमत, ती $\frac{१}{२}$ ह्या अपूर्णांकाची किंमत आहे. $\frac{१}{२}$ हें $\frac{६}{१२}$ चें अतिसंक्षेप रूप होय (स्वरूप नव्हे). व्याकरणांत "घोडा" ह्या शब्दाचें "घोड्या" हें सामान्य रूप असें म्हटलेलें असतें ("सामान्य स्वरूप" नव्हे). "राम" शब्दाच्या तृतीयेच्या एकवचनाचें "रामाने" असें रूप होतें (स्वरूप नव्हे). "रात्रीं खाई तूप आणि सकाळीं पाही रूप" ह्या सांप्रदायिक वाक्यामध्ये "रूप" हा शब्द बाह्य दर्शनासंबंधानेच योजलेला स्पष्टपणें दिसत आहे. रूप म्हणजे चांगलें रूप किंवा सौंदर्य असाहि अर्थ आहे.

२ उ० शिवाजीच्या चळवळीचें खरें स्वरूप अवरंगजेबाला कधींच कळलें नाहीं.

३ उ० "मऱ्हाठ्यांच्या अंगीं नवीन जोम उत्पन्न झाला. त्यांच्या ठिकाणीं राष्ट्रैक्य उत्पन्न करून त्यांचें स्वराज्य स्थापन करतां येईल, ही अंधुक कल्पना प्रथम शिवाजीच्या डोक्यांत उत्पन्न झाल्यास आज (इसवी सन १६७४ चे सुमारास), सुमारें तीस वर्षें झालीं. ती कल्पना तडीस नेण्याइतकी आपल्या अंगीं योग्यता आहे, हें केवळ शिवाजीनेंच नव्हे, तर त्याचें साहाय्य करणाऱ्या सर्व मंडळींनी जगाच्या निदर्शनास आणून दिलें. म्हणून स्वराज्यस्थापनेच्या या कल्पनेला कायमचें स्वरूप देणें सर्वांस अवश्य वाटलें, यांत नवल नाहीं." —गो. स. सरदेसाई

४ उ० वरील मूल्यवान् वाक्यांवरून "स्वरूप" ह्याचा अर्थ स्पष्ट होईल. त्या वाक्यांतील मजकूर आमच्या प्रकृत विषयाचा अधिक चांगल्या रीतीनें खुलासा करील, अशा रूपांत तें आम्हांला घालतां आलें असतें, पण तसें न करतां आम्हीं तें आहे त्या रूपांतच मुद्दाम ठेवलें आहे.

५ उ० तुला मी इतके दिवस चांगला समजत होतों, पण आता मला तुझें स्वरूप कळून आलें. 'अपेश' हें 'अपयश' ह्याचें अपभ्रष्ट रूप होय. ऑक्सिजन हें एक वायुरूप मूलतत्त्व आहे. ऋणाय स्वरूपी.

६ उ० व्यवहारांत प्रांतिक भाषा बोलत असले, तरी पुस्तकांत व सभांमधून वापरावयाची भाषा आंग्ल, ह्यामुळें आंग्ल भाषेला प्रौढ व स्थायी स्वरूप आलें व सर्व प्रकारचे विचार प्रकट करण्याची तिची तयारी झाली. ह्या सर्व भाषांमधील शब्दरूप व वाक्यरचना बहुतेक मराठींतल्या प्रमाणे होती.

प्रोफेसर वै० का० राजवाडे,—आंग्ल-साहित्य.

## १३७०. वयस्कर, वयोतीत, वयोवृद्ध, वृद्ध, जरठ, म्हातारा

ज्याचें पोरवय पार निघून जाऊन अंगीं पोक्तपणा स्थिरावला आहे, ज्याचें शारीरिक आणि बौद्धिक सामर्थ्य पूर्णपणें विकास पावलेलें आहे, त्याला "वयस्कर" हा शब्द लावतात. हें वय सुमारें ३० ते ४५ पर्यंत असतें. ज्याचें शरीरसामर्थ्य आणि बुद्धि-सामर्थ्य वयःपरत्वें कमी किंवा नाहींसें झालेलें आहे, ज्याला कोणतेंहि, पराक्रमाचें शारीरिक किंवा बौद्धिक कार्य करण्याची ताकद उरली नाही, तो "वयोतीत." या दोन शब्दात तिरस्कार मुळीच नसतो. वय बरेंच असल्यामुळे जो आदरास पात्र आहे, त्याला "वयोवृद्ध" म्हणतात. पुष्कळ वयाचा जो माणूस तो 'वृद्ध'. 'वृद्ध' हा सामान्य अर्थ दाखविणारा शब्द आहे. तो शब्द योजणाऱ्याच्या मनांत तिरस्कार किंवा आदर असेल किंवा नसेल. "जरठ" हा शब्द कुचेष्टा करण्याच्या बुद्धीनेच सदैव योजला जातो. "म्हातारा" हा शब्द पन्नाशी उलटलेल्या कोणत्या त्या माणसाच्या संबंधाने योजतां येतो, परंतु बोलणारा माणूस सभ्य चालीचा असल्यास तो, 'म्हातारा' शब्द योजण्याचें बहुधा टाळतो. "वयातीत" हें "वयोतीत" ह्याचें अशुद्ध रूप आहे.

## १३७१. विरघळणे, वितळणें

१ मीठ, साखर, तुरटी वगैरे पदार्थ ताकात, दुधात, पाण्यात वगैरेंत द्रव होऊन मिसळतात, त्या क्रियेला विरघळणें म्हणतात. २ सोनें, चांदी, तांबें, मेण, लाख, तूप, राताबेल, बर्फ वगैरे पदार्थ उष्णतेने द्रवरूप होतात, त्या क्रियेला वितळणें म्हणतात. ३ (लाक्षणिक अर्थानें) ढग, दंडखोरांची टोळी, सैन्याची फळी, रस्त्यातील गर्दी, तमाशगिराभोंवतालची मंडळी वगैरेंचें हळुहळू नाहींसें होणें ह्या क्रियेला वितळणें म्हणतात. ४ बढाया, चेत, धैर्य, उत्साह, रंगाचा तजेला ह्याचें कमी होणें किंवा नाहींसें होणें ह्याला वितळणें म्हणतात. ५ दयेने अंतःकरण वितळतें. ६ आपली लबाडी उघडकीस आली असतां मनुष्य लज्जेने मनात विरघळतो. ७ जीर्ण झालेलें चिरगूट वितळतें किंवा विरघळतें.

## १३७२. शागीर्द, शिष्या, चेला, विद्यार्थी, शिष्य

१ ह्या पांची शब्दाचा मूळचा अर्थ "एखादी विद्या, कला किंवा हुनर शिकण्यासाठी आलेला किंवा राहिलेला मुलगा किंवा माणूस" असा आहे. परतु मराठींत "शागीर्द" हा शब्द श्रीमंताच्या पदरीं घंटा बडविण्यासाठी, तीर्थ देण्यासाठी, धोतरें धुण्यासाठी, यजमानाच्या पास तैनातीसाठी ठेविलेला माणूस असा अर्थ दाखवितो. आचारी किंवा स्वयपाकी अशाहि अर्थाने हा शब्द योजला जातो. "शिष्या" शब्द गुरूजवळ उपदेश घेणाऱ्या माणसाला लावतात. गायन, वादन, गुप्त पंथाची परिपाठी किंवा तालमींतील कामें शिकणारा माणूस, हा शिकविणाऱ्याचा चेला आणि शिकविणारा हा त्याचा वस्ताद. सतार, तबला वगैरे शिकविणाऱ्या हिंदूला 'बोवा' असेंहि म्हणतात. "विद्यार्थी" म्हणजे विद्या शिकू इच्छिणारा. "शिष्य"

ह्याचा विद्यार्थी असा अर्थ आहे, पण तो फारसा वापरण्यात येत नाही. तो "शिष्यवृत्ति" ह्या नवीनच रूढ होत चाललेल्या सामाजिक शब्दांत दृष्टीस पडतो. उ०नूतन मराठी विद्यालयात एकदर १८३५ विद्यार्थी आहेत. वस्ताद अहमदखानाचा मी चेला. त्याने मला कुस्त्यांचे पेच शिकविले. वस्ताद कुतुबुद्दीन यांनी मला सतार वाजवावयास शिकविली मी त्याचा चेला. उ० मी कऱ्हाडकरबोवाचा शिष्य. यजमानाशीं द्रोह केलेले शागीर्द वैभवाला चढलेले पुष्कळ पाहण्यांत येतात. शागीर्दांच्या घरीं आपली मुलगी द्यावयाला जागीरदार कचरत असतो. यजमानाला धुळीचे दिवे चारणारे शागीर्द आजपर्यंत पुष्कळ होऊन गेले आहेत.

"शागीर्द" ह्या शुद्ध शब्दाचें "शाग्रीद" हें अपभ्रष्ट रूप होय.

## १३७३. शाबूत, शाबीत

हे दोन्ही शब्द अरबी भाषेतील "साबित" ह्या एकाच शब्दापासून मराठींत आलेले आहेत. (१) अभग्न आणि (२) सिद्ध केलेला असे त्या शब्दाचे दोन अर्थ मुळांत आहेत. पण मराठींत दोन अर्थांनी दोन रूपें योजण्यात येतात. "शाबूत" ह्याचा अर्थ घड म्ह० न फुटलेला असा आहे. "शाबीत" ह्याचा अर्थ पुराव्याने सिद्ध केलेला असा आहे उ० मुलाने तें मातीचें चित्र खालीं पाडलें पण तें शाबूत आहे (म्ह० फुटलें नाही). कोर्टांत त्या माणसावर खुनाचा आरोप शाबीत झाला नाहीं (म्ह० सिद्ध झाला नाही).

## १३७४. सकट, अरिष्ट

"सकट" ह्याचा अर्थ अडचणीचा प्रसंग, पंचाईत किंवा पेच असा आहे. "अरिष्ट" हा शब्द आपल्या दुर्दैवाने ओढवलेल्या सकटांस लावतात दरवडा, भूकप, दोळघाड, अतिवृष्टि, अनावृष्टि वगैरे गोष्टी—ज्यांच्यावर आपला ताबा चालत नाही अशाच्या सबधाने, "अरिष्ट" हा शब्द योजला जातो. उ० कोणाच्या घरीं जेवावयास जाणें माझ्या प्रकृतीला सोसत नाही. रामभाऊनी तर मला अति आग्रहाने जेवावयास बोलावलें आहे. मी मोठ्या सकटांत (अरिष्टांत नव्हे) पडलों आहें. वरिष्ठाच्या भेटीस जाणें हें मला मोठें सकट वाटतें (अरिष्ट नव्हे). यदा माझीं शेतें उत्तम पिकलीं होतीं, पण नदीचा वरचा बांध फुटून तीं सारीं वाहून गेलीं! हें मनवर मोठें अरिष्ट गुदरलें!

## १३७५. साहाय्य, मदत, कुमक

"साहाय्य." हा शुद्ध संस्कृत शब्द आहे, त्याचा अर्थ एखाद्याच्या बरोबर जाणें किंवा असणें अर्थात् त्याच्या उपयोगी पडण्यासाठी. "मदत" आणि "कुमक" हे दोन्ही परभाषांतील शब्द आहेत. "मदत" आणि "साहाय्य" ह्या दोहोंचा "उपयोगी पडणें" असा अर्थ आहे. "कुमक" ह्याचाहि अर्थ तोच आहे, पण

त व्याकरणाच्या भाषेंत बोलावयाचें तर भाववाचक नाम नसून वस्तुवाचक नाम आहे. उ० फौजेला कुमक आली. टीपः—"साह्य" "सहाय्य," हीं अशुद्ध रूपें योजूं नये.

## १३७६. सोडणे, सोडविणें

( १ ) ज्याला आपण अटकेंत घातलें आहे किंवा नियंत्रणेंत ठेविलें आहे, ज्याला आपण आदरिलें आहे किंवा जवळ केलें आहे, त्याला त्या अटकेंतून किंवा नियंत्रणेंतून मुक्त करणें, त्याला दूर करणें किंवा दूर सारणें, त्याच्यापासून आपण दूर होणें, हा "सोडणें" ह्याचा अर्थ आहे. ( २ ) जो दुसऱ्याच्या अटकेंत आहे, ज्याच्यावर दुसऱ्यानें कांहीं नियंत्रणा घातली आहे. त्याला बुद्धिसामर्थ्यानें, रदबदलीनें, लांचानें, प्रार्थनेनें, हिकमतीनें किंवा वशिल्यानें त्या अटकेंतून किंवा नियंत्रणेंतून मुक्त करणें हा "सोडविणें" ह्याचा अर्थ आहे. ( ३ ) जें दुर्बोध दुर्ज्ञेय, किंवा आपल्या परीक्षेसाठी आपल्यापुढें आलें आहे. त्याचा उलगडा करणें असाहि "सोडविणें" ह्याचा अर्थ होतो. ( ४ ) उ० त्या चिमणीला सोड. लोकांच्या गायींनें तुझें शेत खाल्लें आहे खरें, पण तिला आता सोडून दे. माझा हात सोड. मला सोड आता; मला ऑफिसात जावयाला उशीर होत आहे. दारूच्या पायीं आतापर्यंत तुझी फार खराबी झाली; आता तरी दारूचें व्यसन सोड. इतके दिवस तुम्हीं मला नोकरीस ठेवून घेतलें; आता ह्या महागाईच्या दिवसांत मला सोडूं नका. जो पेंचात, अडचणींत, संकटात सापडला होता, त्याला मीं सोडविलें. दगडाखाली हात सापडला आहे खरा; तो हळूच सोडवून घेतला पाहिजे. परीक्षेत सहा प्रश्न होते; दोन प्रश्न मीं न वाचलेल्या पुस्तकांतील होते, ते मीं सोडले ( म्ह० उत्तरें न देतां वगळले ) आणि बाकीचे चार प्रश्न मीं सोडविले ( म्ह० त्यांचीं उत्तरें लिहिलीं ). तें कोडें मीं सोडविलें. गुंतलेला दोरा सोडविणें म्ह० त्याची गाठ सोडणें; घट्ट बसलेली गांठ सोडविणें. उ० आर्या—

सोडीना सोडविल्या वाचुनिया ती सती नवरदेवा. —मोरोपंत.

टीप—"सुटणें" ह्याचें प्रयोजक रूप सोडणें" आणि "सोडणें" ह्याचें प्रयोजक रूप "सोडविणें." परंतु कित्येक वाक्प्रचारात 'सोडविणें' हें "सुटणें" ह्याच्या प्रयोजक रूपाप्रमाणें योजलें जातें.

## १३७७. स्तंभ, खांब, रकाना

१. हे तीन शब्द अनुक्रमें संस्कृत, मराठी आणि अरबी-फारशी ह्या भाषांतले असून त्यांचे मूळचे अर्थ अगदी एकच आहेत. परंतु मराठींत त्या तिहींची गांठ पडल्याकारणानें त्यांच्यावर भेदनक्रिया घडून त्यांना विशिष्ट अर्थ प्राप्त झाले.

२. "खांब" हें "स्तंभ" ह्याचें अपभ्रष्ट रूप. "रकाना" ह्याचें मराठी अनेक वचन "रकाने" आणि अरबी अनेक वचन "अरकान."

३. घराला, मांडवाला, झोपडीला किंवा तंबू वगैरेंना जे उभे आधार असतात, त्यांना "खांब" म्हणतात. विजयाचें किंवा अन्य कांही गोष्टींचें स्मारक म्हणून उभारलेला जो उंच खांब त्याला "स्तंभ" म्हणतात. वर्तमानपत्रांत किंवा पुस्तकांत ओळी फाजील लांब होऊं नयेत, म्हणून किंवा अन्य सोयींसाठी, त्याचे जे उभे विभाग पाडतात, त्यांना "रकाने" असें म्हणतात. "स्तंभ," हा शोभेसाठी किंवा स्मरणासाठी असतो. "खांब," आधारासाठी असतो आणि "रकाना" सोयीसाठी असतो.

४. "खांब" हा शब्द लाक्षणिक अर्थानें फक्त एकाच शब्दसंहतींत आढळतो. राजाच्या मंत्र्यांना मुसलमान लोक "अरकाने दौलत" म्हणतात, त्याचें मराठींत रूपांतर आपण "दौलतीचे खांब" असें करतों.

५. "स्तंभ" हा शब्द एखाद्या संस्थेचा मुख्य माणूस—ज्याच्यावर सर्व मदार असते—त्याच्या संबंधानें योजतात; परंतु त्या वेळीं "आधार" हा शब्द पूर्वी जोडावा लागतो.

६. मुखस्तंभ," "आपस्तंभो मुखस्तंभो," "खावयाला अगडबंब आणि म्हणावयाला "मुखस्तंभ" ह्या शब्दांत किंवा वाक्यांत आढळणारा जो "मुखस्तंभ" शब्द, तो खरोखरी "मूकस्तंभ" आहे, हें विद्यार्थ्यांनें लक्षांत बाळगावें.

## १३७८. वायु, हवा, वारा

१. "हवा" ह्या अरबी शब्दाचा त्या भाषेंत "वारा" असा अर्थ आहे. परंतु मराठींत त्याला पुढील चार विशिष्ट अर्थ प्राप्त झालेले आहेत. १. उष्णता, थंडी, सर्दपणा इत्यादि गोष्टींच्या समुच्चयावर एखाद्या ठिकाणाची स्थिति. २. वातावरणाचे घटक थर. ३. एखाद्या विशिष्ट दिवसाची उष्णता, थंडी वगैरेंचें माप. ४. उघड्या जागेचें आणि हुशारी देणारें वातावरण. उ० पुण्याच्या हवेनें मला मलेरिया जडला. महाबळेश्वरची हवा उन्हाळ्यांत आल्हादकारक असते. पक्षी हवेंत उडतात. मी काल पर्वतीवर हवा खावयाला गेलों होतों.

२ वातावरण प्रकंपित झालें म्हणजे अंगावर ज्या त्याच्या लाटा येतात, त्याला "वारा" म्हणतात. उ० वाऱ्याची झुळूक. माझें धोतर पिळून वाऱ्यावर घाल, म्हणजे तें लवकर वाळेल. येथे वारा फार आहे, आपण घरांत जाऊन बसूं. आज जोराचा वारा सुटला आहे. वारा पडला म्हणजे गलबतें वल्हवावीं लागतात. सोसाट्याचा वारा सुटला म्हणजे होड्या, गलबतें हेलकावे खातात.

३ "वायु" हा शब्द सूक्ष्मपदार्थविज्ञानशास्त्रांत आणि रसायनशास्त्रांत वातावरणांतील हवेसंबंधानें योजतात, (मग ती हवा प्रकंपित स्थितींत असो किंवा नसो). तसेंच ऑक्सिजन, नैट्रोजन इ० हे 'वायु' किंवा 'वायुरूप' पदार्थ होत.

## १३७९. हात, पंजा

"हात" हा शब्द सबंध बाहूला किंवा मनगटाच्या पुढच्या भागाला लावतात. "पंजा" हा शब्द फक्त मनगटाच्या पुढच्या भागासंबंधाने योजला जातो. विशेषतः पांचीहि बोटें ताणलेलीं असता जो हाताचा आकार होतो, त्याच्या संबंधाने पजा हा शब्द योजला जातो. उ० लढाईमध्ये त्या शिपायाच्या हाताचा पंजा तुटला. माजर, माकड, सिंह, वाघ वगैरे प्राण्याच्या संबंधाने "पंजा" हा शब्द वापरला जातो. "हात" हा शब्द अनियंत्रितपणें माणसाच्या आणि जनावरांच्या ह्या अवयवासंबंधाने योजला जातो. उ० माकडाचा हात, अस्वलाचा हात, कांगारूचा हात. [ माणूस हा हाताचा जसा उपयोग करतो, तसा हे प्राणी करूं शकतात, असा आपला अभिप्राय असतो ].

## १३८०. हौस, इच्छा

१ एखादी वस्तु संग्रहाला असल्याने किंवा पाहावयाला किंवा भोगावयाला मिळाल्याने आपला दिमाख वाढेल, आपलें वैभव वाढेल किंवा आपली महत्त्वाकांक्षा तृप्त होईल, या भावनेने युक्त अशी त्या वस्तूसंबंधाची जी आवड, तिला "हौस" म्हणतात. "हवस्" ह्या अरबी शब्दाचें "हौस" हें अपभ्रष्ट रूप आहे.

२ इच्छेमध्ये आवड असते, पण तींत जरूरीचा भाग अधिक असतो. हौसेमध्यें इच्छा असते, पण सुखविलासवैभवादिकांच्या लालसेचा भाग अधिक असतो.

• • •

१३८१ "म्हण" हें नाम "म्हणणें" ह्यापासून निघालेलें आहे "म्हण" ह्या शब्दाचा अर्थ "लोकांनी वारवार म्हटलेलें किंवा उच्चारलेलें जें वाक्य तें" "म्हण" ह्याची शास्त्रीय व्याख्या येणेंप्रमाणे आहे "ज्यात काही अनुभव, उपदेश, माहिती, सार्वकालिक सत्य किंवा ज्ञान गोंविलेलें आहे, जें अल्पशब्दात्मक आहे, ज्यात काही चटकदारपणा आहे आणि लोकसमाजात वगैरे जें वारवार योजतात, असें वचन किंवा वाक्य ?" ह्या सत्रधाचा जास्ती खुलासा "म्हणींविषयीं चार शब्द," प्रकरण १ मध्ये पहा

१३८२ अचाट खाणें, मसणात जाणें—खाणें आणि पिणें ह्यात अतिरेक झाल्यास परिणाम वाईट होतो • ।

१३८३ अडला नारायण गाढवाचे पाय धरी—प्रसगीं शहाणा मनुष्य-देखील मूर्ख, बेवकूब किंवा हलकट माणसाचे आर्जव करतो

१३८४ अतकाळापेक्षा मध्यान्हकाळ कठीण—मरणाच्या वेदनापेक्षां भुकेच्या वेदना अधिक दु खदायक असतात

१३८५ अति तेथे माती—कोणतीहि गोष्ट अतिरेकास नेली असता तिचा परिणाम दु खकारक होतो

१३८६ अति शहाणा त्याचा बैल रिकामा—जो मनुष्य फार फार शहाणपणा करावयास जातो, तो अर्डी फसतो, म्हणजे त्याच्या हातून कोणतेंहि उपयोगी किंवा मोठें काम होत नाही [ बैलाकडून इतर लोकांप्रमाणे धोपट मार्गानें काम करून न घेता जर कोणी मनुष्य "त्या बैलाकडून मी कोणत्या वेगळ्या प्रकारचें काम करून घेतल्याने मला जास्ती फायदा होईल बरें ?" असा विचार करीत बसला, तर त्याचा तो बैल रिकामा राहून त्याचें शेत नागरलें जाणार नाही तें नाहीच !

१३८७ अधळा मागतो एकच डोळा—आपणाजवळ मुळीच काही नसलें, म्हणजे आपली इच्छाहि अल्पच तेव्हा आणि अल्पानेहि आपली तृप्ति होण्याजोगी असते !

१३८८ अधळ्या गायींत लगडी गाय शहाणी—जेथे अडाणी माणसें जमलेलीं असतात, तेथे जर कोणी एखादा माणूस त्यातल्या त्यात थोडासा जाणता असला, तर तो त्या सर्व मडळींत मोठा पडित म्हणून गणला जातो

१३८९ अन्नाचा मारलेला खाली पाही, तरवारीचा मारलेला वर पाही—ज्याला आपण पोसतों, तो आपल्या मिंधगिरींत असतो व आपणाशीं नम्रपणाने वागतो ज्याला आपण अधिकाराच्या, सत्तेच्या किंवा श्रीमतीच्या जोरावर चिरडतों, तो आपणाशीं ताठ्याने वागतो सौम्यपणामुळे मनुष्य नरम करता येतो, उद्धटपणाने तो आपला शत्रु होतो

१३९० अर्थी दान महापुण्य—तातडलेल्या, म्हणजे गरजू माणसाला जें द्यावें, त्यानेच मोठें पुण्य लागतें ! " तुरुत ( म्ह० त्वरित ) दान महापुण्य " असाहि पाठ आहे. " अर्थी " हा " आर्ता " ह्याच्या बद्दल अपपाठ होय. आर्त म्ह० विपन्न किंवा संकटात पडलेला.

१३९१ अर्धी टाकून सगळीला धावूं नये—समग्र वस्तु मिळविण्याचा प्रयत्न करताना हातीं असलेली अर्धी वस्तु टाकून देणें, हा मूर्खपणा आहे.

१३९२ असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ—भलत्याच माणसाशीं गाठ पडली असतां किंवा मैत्री जडली असतां, आपले प्राण धोक्यात पडतात.

१३९३ असतील शितें तर मिळतील भुतें—आपल्या जवळ पैसा असला म्हणजे मित्राची उणीव नसते.

१३९४ आईजीच्या जिवावर बाईजी उदार—दुसऱ्याचा पैसा खर्च करून औदार्य दाखविणें सोपें असतें ! जेथे दुसऱ्याचा पैसा खर्च व्हावयाचा आहे, तेथे मनाचा मोठेपणा दाखवावयाला कोण मागे हटेल ?

१३९५ आकारे रगती चेष्टा—बाह्य चिन्हांत अंतर्गत विचाराचें स्वरूप उमटतें. एखाद्या माणसाच्या बाह्य रूपावरून म्हणजे मुद्रादिकावरून काय करावयाचा त्याचा विचार आहे, हें जाणता येतें.

' आकारे रंगती चेष्टा ' म्हणजे आकारात चेष्टाचा रंग उठलेला असतो, म्हणजे आकारात चेष्टाचें प्रतिबिंब उटलेलें असतें. मनुष्याच्या आकारावरून तो कोणत्या प्रकारच्या कृति करील, हें व्यक्त होतें. हें वाक्य एका संस्कृत श्लोकाचा अपभ्रंश आहे. सबंध श्लोक येणेंप्रमाणे आहे—

आकारैरिंगितैर्गत्या चेष्टया भाषणेन च

नेत्रवक्त्रविकाराभ्यां लक्ष्यतेऽन्तर्गतं मनः ॥

ह्याचा अर्थ असा—आकार, शब्द, गति, चेष्टा ( हालचाली ), भाषण ह्यांवरून व डोळे, तोंड इत्यादिकांच्या विकृतींवरून, मनुष्याच्या मनातील गुह्य समजतें. ह्या मूळच्या अर्थावरून कालान्तराने " आकारे रगती चेष्टा " अशी म्हण शब्द व अर्थ ह्याचा चमत्कारिक विपर्यास होऊन तयार झाली आहे.

१३९६ आंथरूण पाहून पाय पसरावे—आपल्या स्थितीप्रमाणे वर्तन ठेवावें. आदा पाहून खर्च करावा. आपली ऐपत किंवा सामर्थ्य पाहून जें काही करणें तें करावें.

१३९७ आडात नाही तर पोहऱ्यांत कोठून येणार ?—आंतच जें नाही, तें बाहेर कसें येईल, वटेल किंवा दृष्टीस पडेल ? जें गुरूला ठाऊक नाही, तें शिष्यास तो कसें सांगेल ? पोटात न्यायबुद्धि नाही, तर निकाल न्यायाचा कसा होईल ? उ०

आडांत नाही तर पोहऱ्यांत
कोठून येईल? अशक्य मात।
गुरूस दुर्बोध असे स्वतास
तद्बोध होईल कसा मुलास? ॥ वि० वा० भिडे,—जीवजागृति.

१३९८ आधणांतले रडतात आणि सुपांतले हसतात—आधणांत पडलेल्या तांदुळाचें अंग भाजत असतें, म्हणून ते रडतात आणि सुपांतले तांदूळ चैनीने उड्या मारीत असतात (पाखडण्याची क्रिया चाललेली असतां). परंतु ह्या सुपातल्या तांदुळांसहि आधणांत जाऊन रडण्याचा प्रसंग लवकरच यावयाचा असतो. मनुष्याच्या स्थितींचीं परिवर्तनें होत असतात. आज जे सुखांत आहेत, त्यांना उद्या दुःखाची स्थिति येणें, हें सृष्टिनियमाला अनुसरून आहे.

१३९९ आधीं बुद्धि जाते मग लक्ष्मी जाते—आधी आचरण बिघडतें, मग अवदसा येते. मनुष्याला दारिद्र्य यावयाचें असलें, म्हणजे त्याला भलभलत्या गोष्टी करण्याची प्रवृत्ति होते.

१४०० आपला हात आणि जगन्नाथ—आपली इच्छा तृप्त करून घेण्याची पूर्ण परवानगी असल्यावर कोण कमी करील? "जगन्नाथ" म्ह० देव; मनुष्यांच्या सर्व कामना पुरविण्याचें सामर्थ्य ज्याच्या अंगीं आहे, तो.

१४०१ आपली पाठ आपणांस दिसत नाही—आपले दोष आपणास दिसत नाहीत. आपल्या पाठीमागे काय चाललें आहे, ते आपणास कळत नाही, अशा अर्थाने ह्या म्हणीचा उपयोग केला जातो.

१४०२ आपापाचा माल गपापा—जो माल किंवा वस्तु मिळवावयाला श्रम पडले नाहीत, तो माल उधळेपणाने किंवा मूर्खपणाने मनुष्य खर्चून टाकतो. अन्यायाने मिळविलेलें द्रव्य निष्काळजीपणाने खर्चिलें जातें.

१४०३ आयत्या बिळांत नागोबा—मुंग्यानी किंवा अन्य कांही प्राण्यानी, स्वतःस राहावयासाठी केलेल्या बिळांत नाग शिरून तें बळकावतो. त्याप्रमाणे दुसऱ्याला बाजूस सारून त्याच्या श्रमाच्या फळाचा उपभोग बलवान् माणूस घेतो.

१४०४ उखळांत डोकें घातल्यावर मुसळाला कोण भितो?—येईल तें संकट सोसावयाला मन तयार झाल्यावर कशाचीच भीति राहत नाही.

१४०५ उतावळा नवरा, गुडघ्याला बाशिंग—कुणबी लोकांत लग्नाच्या प्रसंगीं नवरा आणि नवरी यांच्या डोक्याला बाशिंगें बांधावयाची चाल आहे. कोणी नवरा लग्नाचा सोहाळा करून घेण्याला उतावळा होऊन नवरी मिळावयाच्या आधीच तिच्याबद्दल आपल्या गुडघ्यालाच बाशिंग बांधून घेऊन, हीच माझी नवरी असें म्हणून, "आता माझें लग्न ह्या नवरीशीं लावा," असें लोकांना म्हणू लागला, तर तें

हास्यास्पद होईल. उतावळेपणाने कोणी मनुष्य मूर्खासारखें वर्तन करतो, तेव्हा सदरहू म्हण त्याचा उपहास करण्यासाठी योजतात.

१४०६. उथळ पाण्याला खळखळ भारी—ज्याच्या अंगीं विद्वत्तेचा किंवा दुसरा कोणत्याहि प्रकारचा गुण नसतो, तो बढाई फार मारतो. खरोखरी गुणी माणूस बढाई मारीत नाही.

१४०७. उधारीचें पोतें सवा हात रितें—माल उधार घेतल्याने वजन, माप व भाव वगैरेसंबंधाने घासाघीस घालतां येत नाही; शिवाय हिशेबाच्या वेळीं देखील माल विकणारा खोटे आंकडे नमूद करतो. तेणेंकरून गिऱ्हाइकाचें मोठें नुकसान होतें. उधारीचे सवदे करूं नयेत, असा ह्या म्हणींतील उपदेश आहे.

१४०८. उलट्या चोराच्या बोंबा—एरव्हींचा चोर चोरी करून हळूच मुकाट्याने पळून जातो. परंतु वस्ताद चोर असतो, तो लागलाच पळून न जातां "चोरी झाली! चोर पकडा!!" अशी आपणच बोंब मारून आपणांवर वहीम न येईल अशी युक्ति योजतो. लोक जमा होऊन कशाची चोरी झाली, कोणीं चोरी केली वगैरे तपासांत गुंतले असतां हा चोर तेथून निसटून जातो. आपणच कांही गुन्हा करून पुनः आपणच ओरड करून गुन्हा छपविणाऱ्या माणसासंबंधाने ही म्हण योजतात. येथे "उलट्या" हें "बोंबा" ह्या शब्दाचें विशेषण आहे. रूढीने तें "चोराच्या" ह्या शब्दाच्या पूर्वी घातलें आहे.

१४०९. ऊन्ह पाण्यानें घरें जळत नसतात—बाह्यात्कारीं खरेसे दिसणारे परंतु वस्तुतः खोटे असे आरोप एखाद्यावर केल्याने त्याची बेअब्रू होत नाहीं किंवा त्याच्या कीर्तीला कळंक लागत नाही.

टीप.—आधण येऊन सळसळणारें पाणी घरावर ओतून घर जाळतां येत नाहीं. निखारे घरावर घातल्यास मात्र तें पेटतें. यावरून वरील म्हणीची उत्पत्ति झाली आहे.

१४१० एकाने गाय मारली, म्हणून दुसऱ्याने वासरूं मारूं नये—एकानें काही चुकी केली, म्हणून दुसऱ्याने ती किंवा तसली चुकी करूं नये. कारण, मग दोघेहि दोषीच ठरतील.

१४११ एका म्यानांत दोन सुऱ्या राहात नाहीत—दोन तेजस्वी माणसें शेजारीं शेजारीं राहूं शकत नाहीत. त्यांच्यांत तेढ येण्याचा संभव असतो. दोन सवती शांततेने नांदत नाहीत.

१४१२ एका हातानें टाळी वाजत नाही—भांडण एका पक्षाकडूनच होतें असें नाही. दुसऱ्या पक्षाचाहि त्यांत काही तरी दोष असतोच !

१४१३ ऐकावें जनाचें, करावें मनाचें—लोकाचें मत घ्यावें आणि मग आपणास प्रशस्त वाटेल, तें करावें.

१४१४ कडू कारलें तुपांत तळलें, साखरेंत घोळलें, तरी कडू तें कडूच! दुर्जन कशानेहि सुधारत नाही. वाईट गोष्ट चांगली करण्याचा प्रयत्न फुकट जातो.

१४१५ कधी तुपाशीं, कधी उपाशीं—सांसारिक स्थिति सदा सारखीच राहते, असें नव्हे. तिच्यांत बदल होतो. कधी तुपाशीं भाकरी खावयाला मिळते, तर कधी कधी उपाशी राहण्याचीहि पाळी येते.

१४१६ कर नाही, त्याला डर नाही—ज्याच्या हातून पाप घडलेलें नाही, त्याला भीति बाळगण्याचें कांही कारण नाही.

१४१७ करंगळी सुजली म्हणून डोंगरांएवढी होईल काय?—हाताची करंगळी सुजली आणि मोठी झाली, तरी ती डोंगराएवढी कधींहि होणार नाही. प्रत्येक पदार्थाच्या वाढीला मर्यादा म्हणून कांही तरी असतेच!

१४१८ करावें तसें भरावें—ज्या प्रकारचें कृत्य करावें, त्या प्रकारचे परिणाम भोगण्यास तयार असलें पाहिजे. म्हणजे वाईट कृत्य केल्यास वाईट परिणाम भोगण्यास व चांगलें कृत्य केल्यास चांगले परिणाम अनुभवण्यास प्रत्येकानें तयार असलें पाहिजे. [ ह्या म्हणीचा उपयोग नेहेमी वाईट कृत्याच्या परिणामासंबंधाने होतो ].

१४१९ कसायाला गाय धारजिणी—दुष्ट आणि कठोर माणसाशीं सारे लोक गरिबीने वागतात! "कसाबाला" असाहि पाठ आहे.

१४२० कांस्याचा नायटा (होतो)—एखादी अनिष्ट गोष्ट अगदी क्षुल्लक असतां ती कधी कधी विकोपास जाऊन भयंकर परिणाम होतात.

१४२१ काठी मारल्याने पाणी दुभंगत नाही—खऱ्या मैत्रीचा भंग आगंतुक कारणानी होऊं शकत नाही.

१४२२ काडीची सत्ता आणि लाखाची मत्ता बरोबर होत नाहीत—थोड्याशा अधिकाराने जें काम होतें तें पुष्कळशा पैशाने देखील होत नाही.

१४२३ काडीचोर तो माडीचोर—क्षुल्लक अपराध करणारा माणूस मोठा अपराधहि करावयाला प्रवृत्त होतो.

१४२४ कान आणि डोळे यांच्यांत चार बोटांचें अंतर—पाहिलेली गोष्ट व ऐकिलेली गोष्ट यात केव्हा केव्हा अंतर असतें. ऐकिलेली गोष्ट पुढे खोटी ठरण्याचा संभव असतो, पण पाहिलेली गोष्ट सर्वथैव खरीच असते.

१४२५ कावळ्याच्या शापाने गुरें मरत नाहीत—हलकटाच्या निंदेने थोरांचें वैभव उणें होत नाही!

१४२६ कुत्र्याचें शेंपूट नळींत घातलें तरी वाकडेंच—मूर्खाच्या मनावर उपदेशाचा परिणाम होत नाही.

१४२७ कुंभारणीच्या घरांत जाईल तो किडा कुंभारीणच होतो—

कुंमारीण या नांवाचा एक किडा आहे. तिच्या घरात दुसऱ्या कोणत्याहि जातीचा किडा गेला, तरी त्याचें रूपांतर होतें आणि तोहि कुंमारीणच बनतो, अशी समजूत पूर्वीपासून चालत आलेली आहे. उलट मताच्या मंडळींशीं मी सहवास करीन; त्याची मतें मी खोडून टाकीन, माझीं मतें मी त्यांना स्वीकारावयास लावीन, अशी बढाई मारून जर कोणी मनुष्य उलट मताच्या मंडळींत गेला, तर तो त्याच्या आदरसत्काराने, गोड भाषणाने, हळूहळू नरम पडत जातो, स्वताचीं मतें हळू हळू सोडून देऊं लागतो, प्रतिपक्षाचीं मतें त्याला खरीशीं वाटूं लागतात, आणि शेवटी तो पूर्णपणें त्याच्या पक्षांत सामील होतो.

१४२८ कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ—गोत = सं० गोत्र = वंश, कूळ, कुटुंब. कुऱ्हाडीचा दांडा लाकडाचा असतो. हा दांडा कुऱ्हाडीच्या पोलादी फाळाला बसविला, म्हणजे ती कुऱ्हाड झाडें तोडण्याच्या उपयोगाला येते आणि तो लाकडी दांडा आपल्या कुटुंबांतील व्यक्तींच्या म्हणजे वृक्षांच्या नाशास कारण होतो. देशद्रोही मनुष्य आपल्याच देशाच्या नाशास कारण होतो म्हणून त्याच्याविषयी बोलतांना ह्या म्हणीचा उपयोग करतात.

१४२९ कुसंतानापेक्षा निसंतान बरें—वाईट पुत्र असण्यापेक्षा मुलीच नसलेले बरे!

१४३० कोठे इंद्राचा ऐरावत आणि कोठे शामभटाची तटाणी!—इंद्राचा ऐरावत आणि शामभटाची तटाणी ह्यांची तुलना कसची? एक अति थोर पदार्थ किंवा माणूस आणि दुसरा अति क्षुद्र पदार्थ किंवा माणूस, ह्यांची बरोबरी करणें हा मूर्खपणा होय. "कोठे राजा भोज आणि कोठे गंगा तेलीण?" ह्या म्हणीचाहि तसाच उपयोग केला जातो.

१४३१ कोंबडें झाकलें म्हणून तांबडें फुटावयाचें राहत नाही—तांबडें फुटणें म्ह० सकाळ होणें. सूर्य उगवतांना त्याचे किरण तांबूस असतात. जी गोष्ट होणारच होणार, ती क्षुल्लक अडथळ्यास जुमानीत नाही.

१४३२ कोंड्याचा मांडा करून खावा—कोंडा हें अति गरिबाचें व मांडा हें अति श्रीमंताचें खाणें आहे. गरिबानी कोंड्याचा पदार्थ संतोषवृत्तीने खाल्ला, तर त्यांना तो मांड्याप्रमाणे गोड लागेल. आपल्याला जें मिळत असेल, त्यांत तृप्त राहावें.

१४३३ कोरड्याबरोबर ओलें जळतें—चुलींत कोरडें लाकूड चांगलें जळतें, ओलें जळत नाही. परंतु ओलें म्हणचे न जळण्याजोगें लाकूड असलें, तरी तें कोरड्या लाकडाच्या साहचर्यानें जळू शकतें. वाइटाच्या संगतीस चांगला लागल्यास वाइटाच्या नाशाबरोबर चांगल्याचाहि नाश होतो.

१४३४ कोल्हा काकडीला राजी—ज्या वस्तूवर आपला मुळीच हक्क नाही, ती वस्तु अल्प प्रमाणात मिळाली, तरी हलकट माणूस खूष होतो.

१४३५ कोळसा किती जरी उगाळला तरी तो काळाच—कोळसा जसा बाहेरून काळा, तसाच आंतूनहि काळा असतो. तो कितीहि उगाळला आणि वरचा पृष्ठभाग कितीहि झिजविला, तरी आंतहि तो काळाच असावयाचा! वाईट गोष्टीची कितीहि वाटाघाट केली, तरी ती चांगली असें कधी ठरावयाचें नाही!

१४३६ खर्चणाराचें खर्चलें आणि कोठावळ्याचे पोट दुखतें—यजमान उदारपणानें लोकास भोजन घालण्याचें ठरवितो, परंतु हा परोपकार किंवा दानधर्म, दुष्ट आणि मत्सरी कोठावळ्यास पाहवत नाही आणि तो काटकसर करूं पाहतो. आपण औदार्य दाखवावयाचें नाही तें नाही आणि दुसरा कोणी औदार्य दाखवीत असला, तर त्याच्याआड यावयाचें, अशा दुष्ट माणसाविषयी बोलतांना ह्या म्हणीचा उपयोग केला जातो.

१४३७ खऱ्याला मरण नाही—खरें कधी लपत नाही; तें केव्हाना केव्हा तरी उघडकीस आणि प्रत्ययास येतें.

१४३८ खाई त्याला खवखवतें—तेलकट किंवा वाशेरा पदार्थ एखाद्याने खाल्ला असतां तो त्याच्या घशात कंडू उत्पन्न करून त्याला अस्वस्थ करतो. त्याप्रमाणें कोणी काही वाईट काम केलें असलें, तर तें त्याच्या मनांत सदासर्वदा डाचत राहतें आणि त्याला अस्वस्थ करतें. तसेंच एखाद्या माणसाने काही वाईट काम केलेलें असलें आणि लोक दुसऱ्या कशाच्याहि संबंधाने बोलत असले, तरी ते त्याच्या वाईट कामा-संबंधानेच बोलत आहेत, असें ह्या माणसाला वाटत असतें आणि तो अस्वस्थ होतो.

१४३९ खाऊं जाणें तो पचवूं जाणें—जो मनुष्य धमकदारीनें एखादा पदार्थ खातो, तो मनुष्य तो पदार्थ पचविण्यास समर्थ असतो. अंगीं पचविण्याची शक्ति असल्याशिवाय कोणी मनुष्य काही खात नाही. त्याप्रमाणे जो मनुष्य वाईट कृत्य करावयास तयार होतो, तो त्याची निस्तरणी करावयासहि समर्थ असतो. ही म्हण चागल्या अर्थानेहि योजली जाते. जो मनुष्य एखादें कृत्य धमकदारीने करावयास उद्युक्त होतो, तो तें शेवटासहि लावूं शकतो.

१४४० खाण तशी माती—ज्या जातीची खाण असेल, त्याच जातीची त्या खाणींत माती असावयाची.

१४४१ खिळ्यासाठी नाल गेला, नालासाठी घोडा गेला, घोड्यासाठी स्वार गेला, एवढा अनर्थ खिळ्याने केला—क्षुल्लक गोष्टींत जरी हयगय केली तरी तिजपासून परंपरेने मोठा अनर्थ गुदरतो.

१४४२ गरजवंताला अकल नसते—जरूर पडली म्हणजे भलभलत्या गोष्टी करण्याचीहि पाळी येते. गरजू मनुष्य मूर्खासारखा वागतो.

१४४३ गर्जेल तो पडेल काय?—बडबड करणाराचे हातून कार्य होत नसतें! [ येथे पावसाचें रूपक आहे ].

१४४४ गर्वाचें घर खाली—अभिमानाचा परिणाम अपमानांत किंवा नुकसानींत व्हावयाचाच !

१४४५ गाजराची पुंगी वाजली तर वाजली, नाही तर मोडून खाली—झाल्यास फायदा होईल, नाहीतर तोटातरी खास होणार नाही, अशा अर्थी धरील म्हण योजण्यात येते ! [ येथे खाली म्ह० खाता येते, असा अर्थ आहे ].

१४४६ गांठचा एक बाहेरच्या शंभरांवरोवर—जें पूर्णपणें आपल्या कबजात आहे, तें थोडें असलें, तरी त्याची योग्यता जास्ती आहे; आणि जें केवळ अपेक्षित आहे, तें पुष्कळ असलें, तरी त्याची योग्यता कमी आहे.

१४४७ गाड्यावरोबर नळ्याची यात्रा—दोन परस्परसंलग्न वस्तूंपैकी एकीला जी स्थिति प्राप्त होते, तीच निश्चयाने दुसरीलाहि प्राप्त होते.

१४४८ गाड्यावर नाव आणि नावेवर गाडा—जो मनुष्य आज श्रीमत आहे, विपद्ग्रस्ताचा परामर्श घेतो, तो दैवगतीने विपन्न दशेस येतो आणि विपन्न दशेस आला म्हणजे त्याचा परामर्श त्याने पूर्वी पोशिलेला मनुष्यच श्रीमंत होऊन घेऊ लागतो ! संसारात अशीं चमत्कारिक परिवर्तनें घडतात की, गरिबाचा श्रीमंत होतो आणि श्रीमंताचा गरीब होतो ! आज हा त्याच्याहून मोठा असला तर उद्या ही स्थिति पालटून तो ह्याच्याहून मोठा होतो.

१४४९ गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ—पुष्कळ गाढव एका ठिकाणीं जमले तर फलनिष्पत्ति काय व्हावयाची ? ते गोंधळ करणार आणि एकमेकाना लाथा मारणार ! मूर्ख लोक एके ठिकाणीं गोळा झाले, तर ते काय करतात ! ते मूर्खपणाचींच कृत्यें करितात !

१४५० गाढवाने शेत खाल्ल्याचें पाप ना पुण्य—गायीने शेत खाल्लें, तर एका पवित्र प्राण्याचें पोट भरेल आणि शेताच्या मालकाला पुण्य लागेल; पण गाढवाने शेत खाल्लें, तर नुकसानी होऊन पुण्य काहीच नाहीं ! हलकटावर किंवा निरुपयोगी माणसावर केलेले उपकार अनाठायीं जातात.

१४५१ गाढवापुढे वाचली गीता कालचा गोंधळ बरा होता—ज्याला उपदेशाचें ग्रहण करण्याची पात्रता नाही, त्याला उपदेश करण्याचे श्रम न घेतां, पूर्वीची अव्यवस्था, अडचण किंवा गैरसोय, पतकरणें, हें अधिक बरें. "गावढ्यापुढे" असाहि पाठ आहे. *गावढ्या म्ह० अशिक्षित खेडवळ माणूस.*

१४५२ गाढवाला गुळाची चव काय माहीत ?—चांगल्या वस्तूचे गुण तिच्याशीं परिचित नसणाराला किंवा अडाण्याला कळत नाहीत.

१४५३ गाव आहे तेथे महारवाडा आहेच—प्रत्येक समाजात कांही वाईट माणसें असावयाचींच !

१४५४ गांवच्या गावात गाढवी सवाशिणी—जेथें चांगल्याचा अभाव असतो, तेथें एखाद्या टाकाऊ किंवा नादान वस्तूसहि महत्त्व येतें!

१४५५ गूळ नाही पण गुळाची वाचा तरी असावी—आपण गरीब असलों, तर आपण पैशानें दुसऱ्याला मदत करू शकणार नाही. पण त्याच्याशीं गोड बोलणें शक्य असतें. तें तरी आपण करावें आपणाला गूळ देता आला नाही, तरी आपण गुळासारखी गोड वाचा तरी बोलावी. त्यांत आपलें काही वेचत नाही

१४५६ घटका पाणी पिते, घड्याळ टोले खाते—वेगवेगळ्या माणसांना त्यांच्या त्यांच्या कर्मानुसार वेगवेगळे सुखदुःखादि भोग प्राप्त होतात.

१४५७ घर फिरलें म्हणजे घराचे वासेहि फिरतात—प्रतिकूळ परिस्थितींत ल्हानमोठे सर्वच उलट वागूं लागतात.

१४५८ घर बांधून पाहावें आणि लग्न करून पाहावें—घर बांधावयाला किंवा लग्न करावयाला, खर्च आपल्या अदमासापेक्षा नेहेमी जास्ती होतोच होतो. घर बांधल्याशिवाय आणि लग्न केल्याशिवाय, त्या त्या कामास किती किती खर्च होतो, हें कळत नाही.

१४५९ घराची ओज अंगण सांगतें—एखाद्या घरांत कितपत टापटीप आहे, हें अंगणाची स्थिति पाहून समजतें. ओज म्ह० शोभा, टापटीप.

१४६० घरासारखा पाहुणा होतो, पण पाहुण्यासारखें घर होत नाही—परक्या ठिकाणीं मनुष्य गेला असतां त्याला त्या ठिकाणच्या चालीरीति, भाषा वगैरे स्वीकाराव्या लागतात. त्या ठिकाणचे लोक त्याच्या चालीरीति, भाषा वगैरेंचा स्वीकार करीत नाहीत.

१४६१ घरोघरीं मातीच्याच चुली—सर्वसाधारण स्थिति सर्वत्र एकसारखीच.

१४६२ घुसळतींपेक्षा उकळतीच्या घरीं अधिक—कष्ट करून पोट भरणारापेक्षा दुसऱ्याला लुबाडणाराची चैन अधिक असते.

१४६३ घोडें खाई भाडें—लोकांना बसावयासाठी किंवा ओझ्यासाठी मालकानें घोडें दिलें, तर त्याला भाडें मिळतें खरें; परंतु भाड्याचे आलेले पैसे सगळेच किंवा बहुतेक सगळेच घोड्याच्या गवतासाठी खर्च होतात. ज्या धंद्यांत विशेषशी किफायत नाही, त्याचें वर्णन करतांना ही म्हण योजतात

१४६४ चढेल तो पडेल आणि पोहेल तो बुडेल—जो कोणी काही धमकदारीचें काम करावयास प्रवृत्त होईल, त्याला कधी वेळेनुसार अपयश येईल आणि तसें अपयश आल्यास त्यांत काही कमीपणा आहे, असें नाही.

१४६५ चांभाराच्या देवाला खेटरांची पूजा—"जशास तसें" या न्यायानें वागणें चांगलें.

१४४४ गर्वाचें घर खाली—अभिमानाचा परिणाम अपमानांत किंवा नुकसानींत व्हावयाचाच !

१४४५ गाजराची पुंगी वाजली तर वाजली, नाही तर मोडून खाल्ली—झाल्यास फायदा होईल, नाहीतर तोटातरी खास होणार नाही, अशा अर्थी वरील म्हण योजण्यांत येते ! [ येथे खाली म्ह० खातां येते, असा अर्थ आहे ].

१४४६ गांठचा एक बाहेरच्या शंभरांबरोबर—जें पूर्णपणें आपल्या कबजांत आहे, तें थोडें असलें, तरी त्याची योग्यता जास्ती आहे; आणि जें केवळ अपेक्षित आहे, तें पुष्कळ असलें, तरी त्याची योग्यता कमी आहे.

१४४७ गाड्याबरोबर नळ्याची यात्रा—दोन परस्परसंलग्न वस्तूंपैकी एकीला जी स्थिति प्राप्त होते, तीच निश्चयानें दुसरीलाहि प्राप्त होते.

१४४८ गाड्यावर नाव आणि नावेवर गाडा—जो मनुष्य आज श्रीमंत आहे, विपद्ग्रस्ताचा परामर्श घेतो, तो दैवगतीनें विपन्न दशेस येतो आणि विपन्न दशेस आला म्हणजे त्याचा परामर्श त्यानें पूर्वी पोशिलेला मनुष्यच श्रीमंत होऊन घेऊं लागतो ! संसारात अशीं चमत्कारिक परिवर्तनें घडतात कीं, गरिबाचा श्रीमंत होतो आणि श्रीमंताचा गरीब होतो ! आज हा त्याच्याहून मोठा असला तर उद्यां ही स्थिति पालटून तो ह्याच्याहून मोठा होतो.

१४४९ गाढवांचा गोंधळ आणि लाथांचा सुकाळ—पुष्कळ गाढव एका ठिकाणीं जमले तर फलनिष्पत्ति काय व्हावयाची ? ते गोंधळ करणार आणि एकमेकांना लाथा मारणार ! मूर्ख लोक एके ठिकाणीं गोळा झाले, तर ते काय करतात ! ते मूर्खपणाचींच कृत्यें करितात !

१४५० गाढवानें शेत खाल्ल्याचें पाप ना पुण्य—गायीनें शेत खाल्लें, तर एका पवित्र प्राण्याचें पोट भरेल आणि शेताच्या मालकाला पुण्य लागेल; पण गाढवानें शेत खाल्लें, तर नुकसानी होऊन पुण्य काहीच नाहीं ! हलकटावर किंवा निरुपयोगी माणसावर केलेले उपकार अनाठायीं जातात.

१४५१ गाढवापुढे वाचली गीता कालचा गोंधळ बरा होता—ज्याला उपदेशाचें ग्रहण करण्याची पात्रता नाही, त्याला उपदेश करण्याचे श्रम न घेतां, पूर्वीची अव्यवस्था, अडचण किंवा गैरसोय, पत्करणें, हें अधिक बरें. “ गांवढ्यापुढे ” असाहि पाठ आहे. गांवढ्या म्ह० अशिक्षित खेडवळ माणूस.

१४५२ गाढवाला गुळाची चव काय माहीत ?—चांगल्या वस्तूचे गुण तिच्याशीं परिचित नसणाराला किंवा अडाण्याला कळत नाहीत.

१४५३ गाव आहे तेथे महारवाडा आहेच—प्रत्येक समाजात कांही वाईट माणसें असावयाचींच !

१४५४ गांवच्या गावात गाढवी सवाशिणी—जेथें चांगल्याचा अभाव असतो, तेथे एखाद्या टाकाऊ किंवा नादान वस्तूसहि महत्त्व येतें!

१४५५ गूळ नाही पण गुळाची वाचा तरी असावी—आपण गरीब असलों, तर आपण पैशानें दुसऱ्याला मदत करू शकणार नाही. पण त्याच्याशीं गोड बोलणें शक्य असतें. तें तरी आपण करावें आपणाला गूळ देता आला नाही, तरी आपण गुळासारखी गोड वाचा तरी बोलावी त्यात आपलें काही वेंचत नाही

१४५६ घटका पाणी पिते, घड्याळ टोले खाते—वेगवेगळ्या माणसाना त्याच्या त्याच्या कर्मानुसार वेगवेगळें सुखदु खादि भोग प्राप्त होतात.

१४५७ घर फिरलें म्हणजे घराचे वासेहि फिरतात—प्रतिकूळ परिस्थितींत ल्हानमोठे सर्वच उलट वागूं लागतात.

१४५८ घर बाधून पाहावें आणि लग्न करून पाहावें—घर बाधावयाला किंवा लग्न करावयाला, खर्च आपल्या अदमासापेक्षा नेहेमी जास्ती होतोच होतो घर बाधल्याशिवाय आणि लग्न केल्याशिवाय, त्या त्या कामास किती किती खर्च होतो, हें कळत नाही.

१४५९ घराची ओज अगण सागतें—एखाद्या घरात कितपत टापटीप आहे, हें अगणाची स्थिति पाहून समजतें. ओज म्ह० शोभा, टापटीप

१४६० घरासारखा पाहुणा होतो, पण पाहुण्यासारखें घर होत नाही—परक्या ठिकाणीं मनुष्य गेला असता त्याला त्या ठिकाणच्या चालीरीति, भाषा वगैरे स्वीकाराव्या लागतात. त्या ठिकाणचे लोक त्याच्या चालीरीति, भाषा वगैरेंचा स्वीकार करीत नाहीत

१४६१ घरोघरीं मातीच्याच चुली—सर्वसाधारण स्थिति सर्वत्र एकसारखीच.

१४६२ घुसळतींपेक्षा उकळतीच्या घरीं अधिक—कष्ट करून पोट भरणारापेक्षा दुसऱ्याला लुबाडणाराची चैन अधिक असते.

१४६३ घोडें खाई भाडें—लोकाना बसावयासाठी किंवा ओझ्यासाठी मालकाने घोडें दिलें, तर त्याला भाडें मिळतें खरें, परतु भाड्याचे आलेले पैसे सगळेच किंवा बहुतेक सगळेच घोड्याच्या गवतासाठी खर्च होतात. ज्या धद्यात विशेषशी किफायत नाही, त्याचें वर्णन करताना ही म्हण योजतात

१४६४ चढेल तो पडेल आणि पोहेल तो बुडेल—जो कोणी काही धमकदारीचें काम करावयास प्रवृत्त होईल, त्याला कधी वेळेनुसार अपयश येईल आणि तसें अपयश आल्यास त्यांत काही कमीपणा आहे, असें नाही.

१४६५ चाभाराच्या देवाला खेटराची पूजा—"जशास तसें" या न्यायाने वागणें चागलें.

१४६६ चार दिवस सासूचे आणि चार दिवस सुनेचे—सासूच्या वैभवाचे दिवस असतां ती सुनेवर अधिकार गाजविते; पुढे सून मोठी होऊन ती कर्ती सवरती झाली, म्हणजे घरांत तिचा अधिकार चालतो, आणि सासूचें महत्त्व कमी होतें.

१४६७ चोरांची पावलें चोरांस ठाऊक—चोरांचीं कृत्यें, वर्तनक्रम, लबाड्या वगैरे चोरांस माहीत असतातच.

१४६८ चोराच्या मनांत चांदणें—चोराला अंधेर सोयीचा असतो; कारण, चोरी करून अंधेरांत गुपचूप रीतीने पळून जाणें शक्य असतें. परंतु चांदण्यांत कोणी आपणांस पाहील की काय, पकडील कीं काय, अशी त्याला भीति असते, म्हणून 'चांदणें पडलें की काय? पडेल की काय!' हे विचार त्याच्या मनांत डिवचत असतात. यावरून ह्या म्हणीचा अर्थ असा की, ज्या कोणी कांही बदकर्म केले असतें, त्याला तें उघडकीस येईल की काय, अशी सदैव भीति असते.

१४६९ चोराच्या वाटा चोराला ठाऊक—चोराचीं वर्तनें, कावे वगैरे चोरासच माहीत असतात. [ लेखाक १४६७ पहा. ]

१४७० जगीं सर्वसुखी असा कोण आहे?—ज्याला सर्व सुखें प्राप्त झालीं आहेत, असा ह्या जगात कोण मनुष्य आहे? कोणी नाही.

१४७१ जनीं जनार्दन—पांचा मुखीं परमेश्वर. लोकांस संमत कार्य केल्याने यश येतें. समाजाला जें प्रिय तेंच देवालाहि प्रिय.

१४७२ जन्मा घाली तो भाकर देईच—जो आपणास जन्म देतो, तो आपलें पालनपोषण करतोच करतो!

१४७३ जळत किंवा जळतें घर भाडयाने कोण घेतो?—एखादी वस्तु आपलें नुकसान करील, असें स्पष्ट दिसत असतां ती स्वीकारावयाला कोण तयार होईल!

१४७४ जळत्या घराचा पोळता वांसा (घेतां आला तरी घ्यावा) —घराला आग लागलेली असली आणि त्यातून अर्धवट जळलेला वासा जरी ओढून काढून वाचविता आला, तरी तो वाचविण्याचा प्रयत्न करावा.

१४७५ जळांत राहून माशाशीं वैर (करूं नये)—जेथे आपणांस वागावयाचें, तेथे सलोख्याने वागावें, द्वेष संपादन करूं नये.

१४७६ जानवें घातल्याने ब्राह्मण होत नाही—बाहेरून एखाद्या व्यक्तीच्या भूमिकेचा देखावा केल्याने आपल्या अंतर्यामीं त्या व्यक्तीचे उच्च गुण येतात, असें नव्हे.

१४७७ जित्राची खोड मेल्यावांचून जात नाही—मनुष्याला जी खोडी लागलेली असेल, ती तो जिवंत आहे तोपर्यंत राहावयाचीच!

१४७८ जी खोड बाळा ती जन्मकाळा—लहानपणीं ज्या सवयी लागतात किंवा असतात त्या जन्मभर टिकतात.

१४७९ ज्या गावच्या बोरी त्याच गावच्या बाभळी—एका गांवांतील लोक एकमेकांना चांगले ओळखीत असतात. बोरींना काटे असतात, तसे बाभळींनाहि असतात. "आम्ही गुळगुळीत आहों" असा बोरींचा डौल बाभळीपाशी टिकावयाचा नाही आणि बाभळीचा डौल बोरीपाशी टिकावयाचा नाही. मनुष्यें दुसऱ्याचीं वर्मेंकर्में काढताना ही म्हण योजतात. उ० तू माझ्यापुढे ऐट कशाला मारतोस? तुझीं सर्व कार्बीबेरीं मला ठाऊक आहेत. अरे! ज्या गावच्या बोरी, त्याच गावच्या बाभळी, समजलास?

१४८० ज्याच्या मनगटांत जोर तो बळी—द्रव्याचें, अधिकाराचें किंवा माणसाचें बळ, हें मनगटाच्या बळाहून कमी प्रतीचें होय!

१४८१ ज्याची खावी पोळी, त्याची वाजवावी टाळी—जो कोणी आपणांस खाऊ घालीत असेल, त्याच्या नावानें टाळ्या वाजवाव्या; अन्न वगैरे देऊन जो आपला चारितार्थ चालवीत आहे, त्याची स्तुति करावी किंवा त्याची कीर्ति पसरीत असावें. आपणावर ज्याचे उपकार झाले असतील, त्याच्याशीं बेइमान किंवा निमकहराम होऊं नये.

१४८२ ज्याचें करावें बरें तो म्हणतो माझेंच खरें—एखादा माणूस ज्याचें कल्याण करीत असतो, तो त्याच्या माथीं दोष लावून त्याचें करणें बरोबर नाही, आपलेंच म्हणणें किंवा वर्तन बरोबर आहे, असें म्हणत असतो. ही म्हण कृतघ्नपणाची निर्भर्त्सना करणारी आहे.

१४८३ ज्याचें मन त्याला ग्वाही देतें—आपण पाप केलें आहे किंवा नाही, हें ज्याचें मन त्याला सांगत असतें

१४८४ ज्याच्या हातीं ससा तो पारधी—ज्याने खरोखरी सशाची पारध केली असते, त्याच्या पराक्रमाकडे लोकांचें दुर्लक्ष होतें, आणि ज्याच्या हातीं तो ससा असतो, त्यालाच पारध केल्याचें श्रेय देण्यांत येतें! [ह्या म्हणीचा उपयोग वेगळ्या रीतीनेंहि केला जातो].

१४८५ झाकली मूठ सव्वा लाखाची—आपलें ज्ञान, संपत्ति वगैरेंच्याबद्दल आपण मुळीच बोललों नाही, तर तें आपलें ज्ञान, संपत्ति, वगैरे हीं आहेत त्याच्यापेक्षा अधिक वाटतील. आपण बढाई मारूं लागल्यास तीं खरोखरी आहेत, त्याच्यापेक्षा कमी आहेत असें लोकांस वाटूं लागेल. आपण होऊन आपली स्थिति उघडी करून दाखविणें बरोबर नाही

१४८६ टाकीचे घाव सोसल्यावांचून देवपण येत नाही—दगडावर टाकीचे घाव मारून मारून त्याच्यापासून देवाची मूर्ति घडविलेली असते, देवत्व प्राप्त

व्हावयाला टांकीचे घाव सोसावे लागतात. त्याप्रमाणे जेव्हा अपरंपार कष्ट सोसावे, तेव्हा वैभवाची स्थिति प्राप्त होते.

१४८७ डोळे पापी—सारें पाप, सारा खोडसाळपणा, काय तो डोळ्यांचा असतो. आपल्याला न कळतां पुष्कळ भलभलत्या गोष्टी होत असतात, त्या आपणाला चालतात आणि खपतात; परंतु एखादी क्षुल्लक गोष्टहि जर आपल्या डोळ्यादेखत घडली तर ती आपणांस खपत नाही!

१४८८ टिटवी देखील समुद्र आटविते—क्षुद्र माणूसहि प्रसंग पडल्यास मोठें कृत्य करूं शकतो. क्षुल्लक माणसाच्या हातून देखील कधी कधी पराक्रमाचीं कामें होतात.

१४८९ ढवळ्याशेजारीं पोवळा बांधला, वाण नाही, पण गुण लागला—ढवळ्या बैलाच्या शेजारीं पोवळा बैल बांधला असतां ढवळ्याचे चांगले गुण पोवळ्यास न लागतां ढवळ्याचे वाईट गुण मात्र पोवळ्यास लागतात. चांगल्या माणसाच्या सहवासांत वाईट माणूस राहिला असता चांगल्याचे चांगले गुण वाइटास न लागतां, चांगल्याच्या अंगीं जो एखादा दुसरा वाईट गुण असेल, तेवढामात्र तो वाईट माणूस चटदिशीं उचलतो.

१४९० तळें राखी तो पाणी चाखी—ज्याच्याकडे काही वस्तु रक्षणासाठी ठेविलेली असते, तो त्या वस्तूचा स्वतः उपयोग करून घेतोच.

१४९१ ताकाला जावें आणि भांडें कां लपवावें?—दुसऱ्याजवळ भिक्षा मागावयाचा कमीपणा पतकरल्यावर मग तें भिक्षा मागणें छपवून ठेवण्याचें काय कारण? एवीतेवी कमीपणा पतकरला, मग तो कमीपणा एकाच्या नजरेस आला काय आणि दहाच्या नजरेस आला काय एकच!

१४९२ ताटांत सांडलें काय आणि वाटींत सांडलें काय एकच—जेथे दोन माणसांचें हिताहित एकच असतें, तेथे एखादा लाभ ह्याला झाला काय किंवा त्याला झाला काय एकच.

१४९३ तापल्या तव्यावर भाकरी भाजून घ्यावी—सर्व साधनसामग्रीची अनुकूलता असताना आपलें इष्ट कार्य करून घ्यावें.

१४९४ तुरूत दान महापुण्य—'तुरूत' म्ह० त्वरित; त्याच वेळीं केलेलें. योग्य वेळीं म्ह० जेव्हाच्या तेव्हा दान किंवा धर्म करण्यांतच मोठें पुण्य असतें. योग्य वेळ निघून गेल्यावर जें देणें, करणें वगैरे तें फुकट!

१४९५ तेरड्याचा रंग तीन दिवस—तेरडा म्हणून एक लहानसें झुडूप आहे. त्याचीं फुलें भारी भपकेदार असतात. आज त्याच्या फुलाचे जे रंग असतात, ते उद्या वेगळे होतात. उद्याचे रंग परवाला आणखी कांही वेगळेच होतात. अंगांत खरी धमक नसतां नुसता देखावा किंवा भपका केला, तर तो फार वेळ टिकत नाही!

१४९६ थेंबें थेंबें तळें साचे—एक एक थेंब जमून जमून इतका मोठ पाण्याचा सांठा होतो की, त्याला 'तळें' असें नांव येतें. त्याप्रमाणे पैपैने पैसे साचवि. तरी कालांतराने मोठी रक्कम शिलकीस पडते!

१४९७ दगडाचा दोर होत नाही—भलत्याच वस्तूपासून एखादी विशिष्ट वस्तु निष्पन्न करण्याची आशा बाळगणें व्यर्थ आहे!

१४९८ दगडाचें नांव धोंडा आणि धोंड्याचें नांव दगड—ही गो स्पष्ट आहे! तिच्याबद्दल वाटाघाट करीत बसण्याचें कारण नाही! दगड म्हणा किंव धोंडा म्हणा, एकच.

१४९९ दगडाचें पेव घालतां खळखळ, काढतां खळखळ—निरुपयोगी वस्तूसाठी त्रास करून घेणें हा मूर्खपणा आहे.

१५०० दगडापेक्षा वीट मऊ—तिच्यापेक्षा ही गोष्ट कांही अंशीं बरी. त्यातल्या त्यांत हें बरें.

१५०१ दसकी लकडी एकका बोजा—एका माणसाने एक एक लाकूड जरी दिलें, तरी तीं लाकडें जमतां जमतां इतकीं जमतात की, तें एका माणसा. ओझें होतें. सर्वांनी जरी थोडा थोडा हातभार लावला, तरी एक मोठें कार्य होऊं शकतें!

१५०२ दांड्याने पाणी तोडले म्हणून निराळें होत नाही—लोकांनं कळागाति लावून देण्याचा प्रयत्न केल्याने दृढ व खरी मैत्री भग्न होत नाही. "काठी मारल्याने पाणी दुभगत नाही" ही म्हण पहा.

१५०३ दांत कोरून कोठें पोट भरत असतें?—भलत्याच कामीं चिक्कूपणा करून कसें चालेल? मोठ्या कार्यास लहान साधन पुरत नसतें!

१५०४ दिलमें चंगा तो कथौटीमें गंगा—अंतःकरण प्रसन्न असल्यास पवित्र गंगा आपणाजवळ असल्याप्रमाणेच होय!

१५०५ दिवस बुडाला, मजूर उडाला—मजूर कधी आस्थेने काम करीत नाही. संध्याकाळ होईल केव्हा आणि मी परत आपल्या घरीं जाईन केव्हा, असें त्याला झालेलें असतें. संध्याकाळीं जर त्याचें अगदी थोडेंहि काम शिल्लक राहिलेलें असलें, तर तें संपवून मग घरीं जावें, असें कधी त्याच्या मनांत येत नाही. कारण त्याची माडोत्री दृष्टि असते. लोकांच्या कामाबद्दल कळकळ न बाळगणाऱ्या माणसासंबंधाने ही म्हण योजतात.

१५०६ दिव्याखाली अंधार—दिवा लोकांना प्रकाश देतो, पण त्याच्या स्वतःच्या अंगाखाली अंधेरच असतो! मोठा प्रतिष्ठित, नामांकित मनुष्य असला, तरी खुद्द त्याच्या अंगीं कांहीतरी दुर्गुण असतात. त्यांची त्याला दादहि नसते.

१५०७ दुधाने तोंड भाजलें, तो ताकसुद्धा फुंकून पितो—एकदा

एखाद्या बाबतींत काही अदल घडली, म्हणजे मनुष्य प्रत्येक बाबतींत सावधगिरी बाळगितो व ती सावधगिरी कधी कधी अतिरेकालाहि जाते !

१५०८ दुनिया झुकती है झुकानेवाला चाहिये—नादी लागणारे किंवा फसवणारे मूर्ख किंवा अजागळ लोक पुष्कळ असतात. त्यांना नादी लावणारा किंवा फसविणारा मनुष्य मात्र पाहिजे ! ( वरील म्हणीचें मराठी भाषांतरहि त्याच अर्थानें योजलें जातें. परंतु हिंदी रूपांत तिचा अधिक प्रचार आहे ).

१५०९ दुभत्या गाईच्या लाथा गोड—दूध देणारी जी गाय ( म्ह० जी भाकड नव्हे ती ), तिच्या लाथा मनुष्य सोसतो. ज्याच्यापासून आपणाला कांही लाभ करून घ्यावयाचा असतो, त्यानें आपला कितीहि तिरस्कार केला, तरी तो आपण मुकाट्यानें सोसतों !

१५१० दुरून डोंगर साजरे—दुरून डोंगर सुंदर दिसतात, पण जवळ गेलें असतां त्याचें भयंकर स्वरूप कळून येतें. [ " जवळ जाता काटेकुटे " ह्या शब्दांची जोड कधी कधी ह्या म्हणीस देतात ].

१५११ दुसऱ्याच्या डोळ्यांत भसकिनी बोट शिरतें—दुसऱ्याच्या दोषावर टीका करावयास मनुष्य एका पायावर तयार असतो !

१५१२ दुसऱ्याच्या डोळ्यांतलें कुसळ दिसतें, पण स्वतःच्या डोळ्यांतलें मुसळ दिसत नाही—दुसऱ्याची क्षुल्लकहि चूक दिसते, पण स्वतःचा मोठा दोष दिसत नाही !

१५१३ देव कराया दोन डोया, किडवळ कराया तीन डोया—एखाद्या राजाच्या मनात प्रजाजनाला उत्कर्षाच्या स्थितीस चढवावें, असें आलें, तर तें दोन पिढ्यांत ( म्ह० साठ वर्षांत ) करूं शकतो, आणि प्रजाजनाला अपकर्षाच्या स्थितींत लोटावें असें आलें, तर तो तें तीन पिढ्यांत ( म्ह० नव्वद वर्षांत ) करूं शकतो. चांगला राजा साठ वर्षांत प्रजाजनाला वैभवसंपन्न करूं शकतो आणि वाईट राजा नव्वद वर्षांत त्यांना हीन, दीन, अनाथ आणि दुबळें करूं शकतो. डोई म्ह० पिढी. मागें डोकें शब्द पाहा.

१५१४ दैव देतें आणि कर्म नेतें—सुदैवानें आपणास एखादी वस्तु दिली, तरी पूर्व जन्माचें कर्म प्रतिकूल असल्यास, ती वस्तु आपणास पचत नाही, किंवा लाभत नाही.

१५१५ दोही घरचा पाहुणा उपाशी—दोन आधारांवर अवलंबून राहणारा मनुष्य फशी पडतो ! दोन्ही पक्षांशीं सलोखा ठेवणाऱ्या माणसावर एकाहि पक्षाचा भरंवसा नसतो, आणि अंतीं त्याची फसगत होते.

१५१६ धर्म करतां कर्म उभें राहतें—दुसऱ्यावर उपकार म्हणून करावयाला जावें, तों कधी कधी आपल्यावरच कांहीतरी संकट ओढवतें !

१५१७ नराने काम होतें, तेथे, कुन्हाड कशाला ?—जेथे क्षुल्लक साधनाने किंवा अल्प शक्तीने काम होण्याजोगें आहे, तेथे मोठें साधन किंवा पुष्कळ शक्ति कशाला योजावी !

१५१८ नव्याचे नऊ दिवस—नवीन वस्तूचें कौतुक नऊ दिवस (म्ह० थोडा वेळ) केलें जातें. वस्तु नवीन आहे, तोपर्यंतच तिचे गोडवे गायिले जातात; ती जुनी झाली, म्हणजे तिच्याकडे दुर्लक्ष्य केलें जातें किंवा तिची हेळसांड केली जाते.

१५१९ नाक दाबलें म्हणजे तोंड उघडतें—एखाद्याला पेंचात अडकविल्याशिवाय तो आपल्या म्हणण्यास कबूल होत नाही. [आपला श्वासोच्छ्वास नाकानें चालतो, तसा तोंडानेंहि चालू शकतो, आणि नाक आणि तोंड ह्या दोहोंपैकी एकतरी उघडें असावें लागतें. ह्यासाठी एखाद्याचें आपण नाक दाबलें, की त्याला तोंड उघडावेंच लागतें !

१५२० नावडतीचें मीठ अळणी—नावडत्या माणसानें कोणतीहि गोष्ट, कितीहि चांगली केली, तरी ती वाईटच दिसते ! नावडत्या स्त्रीचें प्रत्यक्ष मीठदेखील अळणी लागतें !

१५२१ नासलीं मिरीं जोंधळ्याला हार जात नाहीत—समर्थ किंवा कर्तृत्ववान् मनुष्य कितीहि खालावला, तरी तो नादान आणि कर्तृत्वशून्य माणसाहून अधिक योग्यतेचा किंवा लायकीचा असावयाचाच !

१५२२ पडलेलें शेण माती घेऊन उठतें—शेण जमिनीवर पडलें आणि तें आपण तेथून उचलून दुसरीकडे फेकून दिलें, म्हणजे त्या शेणाबरोबर जमिनीवरील कांही तरी माती जातेच जाते. जमीन जरा चांगली चोपून तयार केलेली व स्वच्छ असली, तरी शेणाबरोबर कांही तरी मातीचे कण जातातच. त्याप्रमाणे चांगल्या मनुष्यावर कांही टपका आला, आणि त्या टपक्याचें जरी त्यानें सर्वांशीं निरसन केलें, तरी त्याची थोडीतरी बदनामी होतेच होते !

१५२३ परदुःख शीतल—दुसऱ्याच्या दुःखाची खरी कल्पना लोकांस होत नाही, आणि म्हणून तें दुःख असेल त्याहून कमी तीव्र आहे, असें लोकांस वाटतें !

१५२४ पळणारास एक वाट, शोधणारास बारा वाटा—लबाडी करणें सोपें, पण ती हुडकून काढणें कठीण असतें !

१५२५ पळसाला पानें तीन—कोठेहि गेलें तरी मनुष्यस्वभाव सारखाच असावयाचा; कोणतीहि स्थिति घेतली, तरी तींत सुखदुःखें सारखींच असतात.

दुःखें सुखें तुल्यचि सर्व ठायीं, सुखार्थ कां रे भ्रमतोस वायीं ?
सर्वत्र पानें पळसास तीन, ह्या बाघ देखों नियमा जगीं न ॥

वि० वा० भिडे—जीव जागृति.

१५२६ पांचा मुखीं परमेश्वर—पांच माणसें जें बोलतील, तें खरें. पांच

म्ह० अनेक लोक, पुष्कळ लोक जें बोलतात, तें देवाचेंच बोलणें धरून चालावयाला कांही हरकत नाही. ह्याच अर्थाची " जनीं जनार्दन, " अशीहि एक म्हण आहे.

१५२७ पांची बोटें सारखीं नसतात—सर्व मनुष्यें सारख्या स्वभावाचीं किंवा सारख्याच कर्तृत्वाचीं नसतात.

१५२८ पाण्यांत काठी मारली, तर का पाणी दोन जागीं होतें?—खरी दृढ मैत्री किरकोळ भाडणानें भग्न होत नाही, आणि लोकांनी कलागती लावण्याचा प्रयत्न केला, तर तो निष्फल होतो. एका दिलाच्या माणसांत सहसा फूट पाडतां येत नाही.

१५२९ पिंडीं तें ब्रह्मांडीं—जें आपल्या ठायीं आहे, तेंच सर्व जगांत आहे. जगाचें स्वरूप ओळखावयाचें असल्यास आपलें स्वतःचें स्वरूप ओळखावें म्हणजे बस झालें.

१५३० पुढच्यास ठेच मागला शहाणा—एकाला अडचण आलेली पाहून इतर लोक सावध होतात.

१५३१ पुराणांतील वांगीं पुराणांत (राहतात)—जें पुराणांत वाचिलें, किंवा जें पुराणिकानें सांगितलें, तें आचरणांत कोण पाळणार? उपदेश जागच्या जागींच राहतो आणि मनुष्याच्या लहरीप्रमाणें वर्तन घडत असतें!

१५३२ फासा पडेल तो डाव, राजा बोलेल तो न्याव—फाशांनी दिलेलें दान आपल्या इच्छेच्या किंवा सोयीच्या उलट असलें, तरी तें पतकरावें लागतें. त्याप्रमाणें राजानें दिलेला न्याय सत्याच्या आणि प्रजाहिताच्या उलट असला, तरी तो नाइलाज म्हणून पतकरावा लागतो.

१५३३ फार झालें, हसूं आलें—कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक झाल्यास ती अंगवळणीं पडून तिचें कांही वाटेनासें होतें.

१५३४ फुटका डोळा काजळानें साजरा करावा—आपल्या अंगचा जो दोष नाहीसा करून टाकणें शक्य नाही, त्याचा होईल तितका उपयोग किंवा फायदा करून घ्यावा.

१५३५ बळी तो कान पिळी—ज्याच्या अंगीं पैशाचें, अधिकाराचें, वशिल्याचें किंवा पहिलवानगिरीचें सामर्थ्य असतें, तो असमर्थाचा कान पिळतो म्ह० त्याला छळतो किंवा त्याच्यावर आपला अंमल चालवितो!

१५३६ बाप तसा बेटा—जे बापाच्या अंगचे गुण, तेच मुलाच्या अंगीं असावयाचे!

१५३७ बापाला बाप म्हणेना, तो चुलत्याला काका कसा म्हणेल?—जवळच्या नातलगाला जो ओळखीत नाही, तो दूरच्याला काय ओळखणार? अत्यंत

समाननीय मनुष्याला जो मान देत नाही, तो साधारणपणे समाननीय अशा मनुष्याला मान देणार नाही, हें उघडच आहे.

१५३८ बुगडया गेल्या, पण भोकें राहिलीं—उत्तम स्थिति गेली, तरी एके काळीं उत्तम स्थिति होती, असें सिद्ध करणारीं चिन्हें मात्र राहिलीं (राहतात).

१५३९ बुडत्याचा पाय खोलांत—अवनति होऊं लागली म्हणजे ती हजार बाजूनी होते।

१५४० बोलणाराचें तोंड दिसतें, करणाराची कृति मात्र कोणाला दिसत नाही—रागें भरणाऱ्या मनुष्याचे शब्द सर्वांना ऐकू जातात, पण खोटें काम करणाऱ्याचे अन्याय मात्र कोणाला दिसत नाहीत उ० सासू—"आता हें दूध लवडिलेंस, मघाशीं ती भाजी ओवळी केलीस, हे तुझे अपराध लोकाना कळत नाहीत; पण मी रागें भरलें म्हणजे माझें मात्र तोंड दिसतें! लोक म्हणतील, काय बाई तरी ही सासू! एकसारखी सुनेला बोलत असते!"

१५४१ भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी—मागऱ्या मनुष्याला कांहीं वस्तु दिली असता तेवढ्याने त्याची तृप्ति न होतां तो जास्ती जास्तीच मागत सुटतो!

१५४२ भरल्या गाडयास सूप जड नाही—मोठ्या कामात एखादें बारीक काम सहज करून टाकतां येतें किंवा उरकून घेता येतें!

१५४३ भांडणाचें तोंड काळे—भांडणाचा परिणाम लाजिरवाणा असतो!

१५४४ भिकेची हुंडी शिक्यास चढत नाही—भिक्षा मागून आणलेल्या पदार्थाला बरकत नसते. दुसऱ्यावर अवलबून असणाऱ्याच्या हातून मोठें कार्य काय होणार!

१५४५ भित्र्याच्या पाठीस ब्रह्मराक्षस—भित्रा माणूस भीतीचें कारण नसतां देखील भीत असतो! [ जणों काय त्याच्या पाठीमागें ब्रह्मराक्षसच लागलेला आहे ].

१५४६ भुकेला कोंडा आणि निजेला धोंडा—सडकून भूक लागलेली असली म्हणजे कोंड्यासारखा निःसत्त्व पदार्थहि अति रुचकर लागतो, तसेंच झोप येण्याजोगी शरिराची व मनाची स्थिति असली म्हणजे मऊ गादीवर निजल्यापेक्षा धोंड्यावरहि चांगली झोप लागते!

१५४७ मऊ सापडलें म्हणून कोपराने खणू नये—मेहरबानीमुळे मिळालेल्या सवलतीचा दुरुपयोग करू नये

१५४८ मन जाणे पापा—आपण केलेलें पाप दुसऱ्याला कळलें नाही, तरी ज्याचें त्याला तें कळतेंच कळतें! आपण पाप केलें आहे की नाही, हें ज्याचें मन त्याला सांगत असतेंच!

१५४९ मन राजा मन प्रजा—हुकूम करणारें आपलें मन आणि तो हुकूम पाळणारेंहि आपलें मनच असतें म्हणजे-बरें वाईट करणें, हें आपल्या इच्छेवरच असतें!

१५५० मनाएवढी ग्वाही त्रिभुवनात नाही—मनासारखा खरें सांगणारा साक्षीदार साऱ्या दुनियेंत नाही!

१५५१ मनास मानेल तोच सौदा—आपणाला आवडत असेल, तोच सौदा करावा, सौद्याबद्दल लोकांनी नापसती दर्शविली, तरी तिकडे लक्ष्य देऊ नये

१५५२ मनीं असे (किंवा वसे) ते स्वप्नीं दिसे—ज्या गोष्टीचा आपणास निदिध्यास लागलेला असतो, ती गोष्ट स्वप्नात देखील दिसते!

१५५३ मस्करीची होते कुस्करी—थट्टेचा परिणाम कित्येक वेळा भयंकर होतो. कुस्करी म्ह० अग कुस्करणें. थट्टा करता करता दोन माणसें शेवटीं एकमेकांचीं अगें कुस्करू लागतात म्हणजे मारामारी करू लागतात!

१५५४ मिळमिळीत सौभाग्यापेक्षा झळझळीत वैधव्य बरें—प्रेम न करणारा पति असून जें सौभाग्य असतें, त्याच्यापेक्षा पति मरून वैधव्याची स्थिति आलेली बरी!

१५५५ माजराच्या गळ्यात घंटा कोणीं बांधावी?—दुर्घट काम करावयास कोणी सरसावत नाही. [इसापनीतींतील एका प्रसिद्ध गोष्टीवरून ही म्हण निघाली आहे].

१५५६ मातीचे कुल्ले लावल्याने लागत नाहीत—परक्याला आपला अर्से नुसतें म्हणून तो आपला होत नाही, खरें प्रेम असावें लागतें, तेव्हा तो आपलासा होतो.

१५५७ मान सांगावा जनां आणि अपमान सांगावा मना—आपला सन्मान झाला असेल तो लोकांस सांगावा, आणि अपमान झाला असेल त्याची वाच्यता करू नये म्ह० तो अपमान मनांतल्या मनांतच ठेवावा.

१५५८ मारणाराचा हात धरवतो, पण बोलणाराचें तोंड धरवत नाही—दांडग्या माणसास आवरणें सोपें, पण अद्वातद्वा किंवा मनास येईल, तें बोलणाऱ्या माणसास गप्प करणें कठीण!

१५५९ मुंगीला मुताचा पूर—मुताचें पाणी अगदी थोडें असतें, परंतु तें मुंगीला वाहवून नेण्याला पुरें इतकें असतें. जो पैशाने, शक्तीने किंवा सामर्थ्याने, कमी दर्जाचा माणूस आहे, त्याला थोडकासा जरी खर्च आला, आजार आला किंवा धोका, गोता वगैरे आला तरी त्याला तो असह्य होतो!

१५६० मुंगी होऊन साखर खावी, हत्ती होऊन लाकडें फोडूं नयेत—नम्रता धारण करून आपला फायदा करून घ्यावा. ताठ्याने वागून दुःखें भोगीत बसूं नये

मुगी ल्हान असून तिला साखर खावयाला मिळते, हत्ती मोठा आणि बळकट असूनहि त्याला लाकडें फोडावीं लागतात, म्ह० ऊस खाण्याची पाळी येते ह्या वस्तुस्थितीवरून ही म्हण ठरल्न झाली आहे लाकडें फोडणें म्ह० कष्टाचीं कामें करणें, असाहि कोणी अर्थ करतात.

१५६१ मुलाचे (पोराचे) पाय पाळण्यांत दिसतात—मुलगा पुढे कसा निघेल, हें त्याच्या लहानपणींच कळतें

१५६२ मूर्ति तितक्या प्रकृति—निरनिराळीं माणसें निरनिराळ्या स्वभावाचीं असतात.

१५६३ मेलें मढें अगीला भीत नाही—लोचट किंवा निगरगट्ट मनुष्याला कितीहि बोललें, तरी त्याला शरम वाटत नाही ज्याची एकदा अब्रू गेली, त्याला ज्यास्ती बेअब्रूची भीति वाटत नाही!

१५६४ म्हशीचीं शिंगें म्हशीला जड होत नाहीत—आपलीं माणसें, आपला सरजाम वगैरे आपणांस जड वाटत नाहीत.

१५६५ म्हातारीने कोंबडें झाकून ठेवलें, म्हणून उजेडावयाचें राहत नाही—जी गोष्ट व्हावयाची ती क्षुल्लक प्रतिकाराने थांबत नाही. मत्सरी लोकांनी गुणवान् मनुष्याला कोन्याकोपऱ्यात ठेवण्याचा प्रयत्न केला किंवा त्याची गुणवत्ता प्रसिद्ध न होऊ देण्याचा प्रयत्न केला, तरी तो पुढे येतोच आणि आपल्या गुणवत्तेने लोकांस दिपवून टाकतोच!

१५६६ राजा बोले दळ हाले, काजी बोले दाढी हाले—राजाने हुकूम देतांच सर्व सैन्य त्याच्या हुकुमाप्रमाणे चालतें, परंतु काजीने हुकूम दिला, तर तो कोणी ऐकत नाही. हुकूम देतांना त्याची दाढी हालेल, हाच काय तो परिणाम होणार! समर्थांच्या शब्दाला मान मिळतो, क्षुल्लक माणसाच्या शब्दाला मिळत नाही! ["दळ" म्ह० सैन्य].

१५६७ राजाला दिवाळी काय माहीत?—ज्याच्या घरीं नेहमीच उत्सव, त्याला उत्सवाचें महत्त्व वाटत नसतें!

१५६८ राज्याअंतीं नरक आणि नरकाअंतीं राज्य—पापें केल्यावाचून राज्य प्राप्त होत नाही आणि राज्य चालविणें आणि टिकविणें हें पापें केल्याशिवाय शक्य होत नाही. म्हणून आधी (नरकांत नेणारीं) पापें केल्याने राज्य मिळतें आणि राज्यानंतर नरकात पडावें लागतें

१५६९ रिकामा न्हाची भिंतीला तुंबड्या लावी—अंगाला तुंबडी लावून रक्त काढणें, हें न्हाव्याचें काम न्हाव्याला काही काम नसलें म्हणजे तो भिंतीला तुंबड्या लावीत बसतो, म्हणजे काहीतरी भलत्या गोष्टी करीत बसतो त्याप्रमाणे कोणी मनुष्य रिकामा असल्यास तो काहीतरी भलभलत्याच गोष्टी करीत बसतो.

१५७० लकडीवाचून मकडी वठणीस येत नाही—माकडाच्या चेष्टा किंवा खोडकरपणाचीं कृत्यें बंद करावयाला काठीचा मार द्यावा लागतो, सौम्य उपायांनी माकड वळत नाही. त्याप्रमाणे द्वाड माणसाला, सुधारण्यास कडकच उपाय योजले पाहिजेत.

१५७१ पोटचें द्यावें पण पाठचे देऊं नये—आपलें मूल पाहिजे तर दुसऱ्याच्या हवालीं करावें, परंतु आपलें धाकटें भावंड दुसऱ्यावर विसंबूं नये! [ह्या म्हणींत "पाठचें" ह्याचा अर्थ "शरण आलेला किंवा आश्रयाला असलेला माणूस" असाहि घेण्यात येतो ].

१५७२ लेकीस बोले, सुनेस लागे—कोणी स्त्री लेकीच्या अपराधावरून लेकीला रागें भरली, तरी त्या स्त्रीच्या सुनेला असें वाटत असतें की, ती बाह्यात्कारे जरी लेकीला रागें भरत आहे, तरी तिच्या मनात आपणालाच टोमणे मारावयाचे आहेत! [मागल्या पिढीपर्यंतच्या सुनाची हीन दीन स्थिति ह्या म्हणींत वर्णिलेली आहे].

१५७३ वाकडया बोटाशिवाय तूप निघत नाही—तुपाच्या तपेलींत बोट घालून तें वाकडें केल्याशिवाय तूप बाहेर काढता येत नाही. सरळ मार्गांने इष्ट कार्य साधत नसतें. थोडा तरी वक्र मार्गाचा अवलंब करावा लागतो.

१५७४ वारा पाहून पाठ द्यावी—आपणाला वाऱ्याचा उपद्रव न होईल अशा रीतीनें आपण पाठ फिरवावी. देश, काल, वर्तमान वगैरे पाहून वर्तन करीत असावें.

१५७५ वासरांत लंगडी गाय शहाणी—जेथे सारेच अडाणी आहेत, तेथे एखादा किंचित् शहाणा असला, तरी त्याचा मानमरातब होतो किंवा त्याला पुढारीपण देण्यात येतें!

१५७६ वाहत्या गंगेंत हात धुऊन घ्यावा—सर्व साधनें अनुकूल असतां होईल तो फायदा करून घ्यावा.

१५७७ विटलें मन आणि फुटलें मोतीं सांधत नाही—एखादी वस्तु आपणास आवडेनाशी झाली, म्हणजे ती पुन्हा आवडती होणें शक्य नसतें; तसेंच मोतीं फुटलें म्हणजे तें पुन्हा धड करणें, हें शक्य नसतें. मन हें मोत्याप्रमाणें मूल्यवान, तेजस्वी किंवा स्वच्छ असतें; पण तें एकदा फुटलें की गेलें! "फुटलें मोतीं तुटलें मन सांधूं न शके विधाता," अशा रूपानेंहि ही म्हण योजली जाते.

१५७८ निशीं विद्या तिशीं धन—वयाच्या विसाव्या वर्षापासून विद्या फलद्रूप होऊं लागते. एखाद्या माणसाला विद्या कितपत आली आहे किंवा त्याची विद्या कितपत फलद्रूप होईल, ह्याची अटकळ त्याच्या वयाच्या विसाव्या वर्षी करतां येते आणि तो पैसा कितपत मिळवील, ह्याची अटकळ त्याच्या तिसाव्या वर्षी करतां येते.

१५७९ शहाण्याला मार शब्दाचा—शहाण्या माणसाला एक शब्द

बोलल्याने तो ताळ्यावर येतो. मूर्खाला टोणप्याचा मार दिल्याशिवाय तो सुधारत नाही "मूर्खाला टोणप्याचा" अशीहि ह्या म्हणीला पुरवणी जोडण्यात येते. "टोणपा" म्ह० लठ दांडकें.

१५८० शिकविलेली बुद्धि आणि बांधलेली शिदोरी फार वेळ पुरत नाही—शिकविलेली बुद्धि जशी फार वेळ टिकत नाही, तशी पडक्यांत बांधलेली शिदोरीहि फार वेळ उपयोगी पडत नाही त्याप्रमाणे लोकापाशी कोणी जडधीने बुद्धि शिकून घेतली, तरी अडचणीच्या वेळीं तो गोंधळून जावयाचा, त्याप्रमाणे लोकानी दिलेली शिदोरी गरीब मनुष्यास एका वेळेस पुरेल, पण त्यानंतर त्याला उपाशी राहण्याची पाळी येणार!

१५८१ शितावरून भाताची परीक्षा—वस्तूच्या अत्यल्प भागावरून तिच्या समग्र स्वरूपाविषयी अटकळ बांधता येते. पुढे "न्याय" ह्या प्रकरणात स्थालीपुलाक न्यायाचें स्पष्टीकरण पहा.

१५८२ शेजी देईल काय आणि मन धायेल काय?—शेजारणीने एखादा पदार्थ कितीहि सढळ हाताने दिला, तरी त्याच्या योगाने मनाची तृप्ति होऊ शकत नाही.

१५८३ शेळी जाते जिवानिशीं, खाणार म्हणतो वातड—शेळी कापून तिच्या मांसाचे खावयाचे पदार्थ करतात खाणाराला ते पदार्थ आवडले नाहीत आणि त्याचें समाधान झालें नाही, तर शेळीचा जीव व्यर्थ गेला असें होतें. एखाद्याने दुसऱ्याचें काही काम जीव तोडून केलें आणि तें त्यास पसत पडलें नाही, म्हणजे तो ही म्हण योजतो.

१५८४ षट्कर्णी करणे आणि घोटाळ्यात पडणे—दोन माणसांनी मिळून काही मसलत केली, तर ती गुप्त राहते तीन माणसात ती गुप्त राहत नाही तीन माणसें मसलतींत जमल्यास ती मसलत फुटून काम बिनसतें.

१५८५ सत्तेपुढे शहाणपण नाही—ज्याच्याजवळ अधिकाराचें बळ आहे, त्याच्यापुढे शहाण्याचें कांही चालत नाही.

१५८६ सदा मरे त्याला कोण रडे?—अधिकाधिक कष्टमय स्थिति येत गेल्यास ती अंगवळणी पडते आणि तिच्याबद्दल त्रास वाटेनासा होतो

१५८७ समर्थाच्या घरचें श्वान, त्याला सर्व देती मान—समर्थांच्या घरच्या हलक्या सलक्या माणसास देखील लोकांकडून मान मिळतो! मोठ्या माणसाच्या नगलबच्चयांची योग्यता मोठी असें समजण्यात येऊन त्याना मोठा मान देण्यात येतो!

१५८८ सरड्याची धाव कुंपणापर्यंत—सरड्याने कितीहि लांबची मजल मारली, तरी ती कुंपणापर्यंतच असणार! त्याप्रमाणे ज्याचें सामर्थ्य, ऐपत किंवा ताकद अत्यल्प आहे, त्याने आपणाकडून कितीहि मोठें काम केलें, तरी तें अल्पच असणार!

१५८९ साखरेचा खाणार त्याला देव देणार—ज्याच्या नशिबीं साखर खाणें आहे (म्ह० सुख भोगणें आहे) त्याला साखर (म्ह० सुखोपभोगाचीं साधनें) देवच पुरवितो. भाग्यवंताला कशाचीहि उणीव पडत नाही!

१५९० सारीं सोंगें येतात, पण पैशाचें सोंग येत नाहीं—सर्व स्थितींची बतावणी करतां येतें; परंतु श्रीमंतीची करतां येत नाही. जी स्थिति नाही, तिचा देखावा करणें शक्य आहे; परंतु जवळ पैसा नसतां आपण पैसेवाले आहों, असा खोटा डामडौल करता येत नाही किंवा केला, तरी तो फार वेळ कायम ठेवतां येत नाही.

१५९१ सुतासाठी मणि फोडणें बरोबर नाही—क्षुल्लक वस्तु बचावण्यासाठी मूल्यवान् वस्तूचा नाश पतकरणें योग्य नाही.

१५९२ सुंभ जळेल पण पीळ जळणार नाही—सुंभाची दोरी जळली, तरी तिचा पीळ शाबूत असतो. हट्टी मनुष्याचें हट्टामुळे नुकसान झालें, तरी त्याचा हट्ट नाहीसा होत नाही!

१५९३ हजीर तो वजीर—जो ऐन वेळेला हजर असतो, त्याचा फायदा होतो. गैरहजर मनुष्याची आठवण धरून त्याचा वाटा तो हजर झाल्यावर त्याला द्यावयासाठी बाजूस काढून ठेवण्याची कोणी तसदी घेत नाही!

१५९४ हत्तीच्या पायीं येतें आणि मुंगीच्या पायीं जातें—एखाद्या विशिष्ट ठिकाणीं जावयाचें असता तेथे हत्ती लवकर जाऊन पोंचतो; मुंगीला फार वेळ लागतो. आजार, विपत्ति वगैरे येतांना लवकर येतात, पण जातांना सावकाश जातात!

१५९५ हात फिरे तेथे लक्ष्मी फिरे आणि तोंड फिरे तेथे अवदसा फिरे—उद्योगशील मनुष्याच्या घरीं संपत्ति नांदते; उद्योग न करतां जो नुसती वटवट करतो किंवा शिव्या देतो, त्याला दारिद्र्य येतें.

१५९६ हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागूं नये—जें आपल्या कबजात पूर्णपणें आलेलें आहे, तें आपणास दुसरा काही मोठा लाभ होईल, अशा आशेनें सोडून देऊं नये. कारण, जें हातांत असेल, तें कदाचित् गमावेल आणि जें हातांत नाही, तें मिळणारहि नाही!

१५९७ हातच्या काकणाला आरसा कशाला?—स्पष्ट किंवा अनायासें दिसणारी वस्तु पाहावयाला आरसा कशाला हवा?

टीपः—आपलें कपाळ, नाक, डोळे वगैरे आरशावाचून आपणाला दिसत नाहीत, परंतु आपलीं कांकणें आपल्याला सहज दिसतात.

१५९८ हिरा तो हिरा आणि गार ती गार—हिरा कितीहि मळलेला असला आणि गार कितीहि गुळगुळीत आणि चकचकीत असली, तरी त्या दोहोंपैकीं हिरा कोणता आणि गार कोणती, हें ओळखता येतें. साधु कितीहि विपन्न स्थितींत असला आणि दुष्ट कितीहि वैभवशाली असला, तरी मनाच्या उदारतेवरून साधु आपणांस सहज ओळखता येतो!

◆ ◆ ◆

## १२ : सांप्रदायिक वाक्यें आणि वाक्यखंड

१५९९. १. ह्या प्रकरणांत आम्ही काही वाक्यें आणि वाक्यखंड देणार आहों. त्यांतील शब्दांत, त्या शब्दांच्या अर्थांत किंवा त्यांच्या मांडणींत व्याकरणदृष्टया काही विशेषपणा असतो, असें नव्हे, तर काही विशिष्ट मजकूर बोलून दाखवावयाचा असता तो अन्य तऱ्हेनें बोलून न दाखवितां तोंच सांप्रदायिक वाक्यें आणि तेच सांप्रदायिक वाक्यखंड त्या त्या प्रसंगीं योजण्याचा परिपाठ पडून गेला आहे.

२. म्हणी आणि सांप्रदायिक वाक्यें, ह्यांच्यांत असा फरक आहे की, म्हणी-मध्ये काहीतरी उपदेश, सार्वकालिक सत्य, अनुभव किंवा माहिती भरलेली असते, आणि म्हणून म्हणींना स्वताची स्वतंत्र अशी अवस्थिति असते. म्हणींनी उक्त जें विधान, त्याला स्वताच्या पायावर उभें राहतां येतें त्या विधानाची सत्यता लोकांच्या प्रतीतीस आणून द्यावयाची जरुरी नसते ती प्रतीति सर्व लोकांना आलेली असते, म्हणून म्हणींनीं दुसऱ्या विधानांचें समर्थन करता येतें. म्हणींचें स्वताचें समर्थन झालेलेंच असतें. 'पांचामुखीं परमेश्वर' किंवा 'गरजवंताला अक्कल नसते,' ह्या म्हणी होत. त्यांना स्वत ची अवस्थिति आहे, आणि त्या योग्य प्रसंगीं दुसऱ्या विधानांचें समर्थन करावयाला समर्थ आहेत.

३. सांप्रदायिक वाक्याच्या अंगीं हें सामर्थ्य नसतें. 'घोडें मैदान जवळ आहे,' 'हा सूर्य आणि हा जयद्रथ, ' पी हळद आणि हो गोरी,' इत्यादि सांप्रदायिक वाक्यें स्वतंत्रपणें काहीच कार्य करू शकत नाहींत त्यांना दुसऱ्या वाक्याची जोड दिल्याशिवाय त्याचा कांही उपयोग होऊं शकत नाही. ह्या सांप्रदायिक वाक्याचा उपयोग करून घ्यावयाच्या वेळीं त्यातील मुख्य शब्द कायम ठेवून त्याच्यात थोडेसे फेरबदलहि करून घ्यावे लागतात.

४. काही सांप्रदायिक वाक्यें दिसण्यात हुबेहूब म्हणींसारखीं दिसतात आणि काही वाक्यें तर अशीं आहेत की, त्यांना सांप्रदायिक वाक्यें म्हणावें किंवा म्हणी म्हणावें हें ठरविणें कठीण असतें शिवाय म्हणीमध्ये थोडासा फेरफार केल्याने तिचें सांप्रदायिक वाक्य बनवितां येतें, आणि सांप्रदायिक वाक्यांत थोडासा फेरफार केल्याने त्याचा म्हणीप्रमाणे उपयोग करतां येतो. आमच्या मताने जीं वाक्यें केवळ सांप्रदायिक वाक्येंच होत, म्हणी नव्हेत, त्यांचा संग्रह ह्या प्रकरणात आम्ही करणार आहों.

५. सांप्रदायिक वाक्यखंड हे पूर्ण वाक्यांच्या रूपाचे नसतात. 'डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच', 'डोळा न फुटे आणि काडी न मोडे अशा प्रकारें', 'डोकें खाजवावयाला वेळ नसणें,' 'चावून चिकट आणि ओढून बळकट,' 'गंगेंत घोडे न्हाणें' इत्यादि हीं सांप्रदायिक वाक्यखंडांचीं उदाहरणें होत. ह्याचाहि ह्याच प्रकरणांत आम्ही समावेश करणार आहों. "म्हणींविषयीं चार शब्द", ह्या आमच्या निबंधातील प्रकरण ५ वें पहा.

१६०० आठ हात लाकूड नऊ हात धलपी—अक्षम्य किंवा अत्यंत मूर्खपणाची आतिशयोक्ति कोणीं केल्यास हा उद्गार काढला जातो.

१६०१ उंटावरून शेळ्या हाकणें—एखादें काम अंग मोडून स्वतः न करतां तें दुसऱ्यावर कोलणें किंवा आपण स्वतः केलें तरी कसेंबसें उठवळपणानें करणें.

टीपः—दहा दिशांनी तुरू तुरू धावणाऱ्या शेळ्या उंटावर बसून हाकणें किंवा आवरणें ही गोष्ट अशक्य आहे किंवा निदान दुष्कर आहे; ती झाली तरी चांगली व्हावयाची नाही.

१६०२ उचलली जीभ आणि लावली टाळ्याला—मन मानेल तसें बोलणें; ताळमेळ, सत्यासत्य, योग्यायोग्य वगैरेसंबंधानें विचार न करतां हवें तसें मनुष्य बहकत सुटला, म्हणजे त्याला म्हणतात, "अरे! असें काय बरळत सुटला आहेस! उचलली जीभ आणि लावली टाळ्याला!"

टीपः—बोलतांना जीभ उचलून टाळ्याला लावावी लागते, हें खरें आहे. परंतु एवढीच क्रिया केल्यानें भागत नाही. जें बोलावयाचें त्याचा अगोदर विचार करावा लागतो.

१६०३ उंदराला मांजर साक्ष—उंदराचा अडचणींतून बचाव करण्यासाठीं, त्याची तरफदारी करण्यासाठीं किंवा त्याच्यावरचा ठपका नाहीसा करण्यासाठीं, मांजर प्रसंगविशेषीं उंदराशीं मित्रत्वानें वागेल. पण मांजराच्या पोटांत कपट असतें; म्हणून उंदरानें मांजराची मदत घेणें धोक्याचें होईल. संकटसमयीं शत्रूचें साहाय्य मागणें परिणामीं नाशकारक असतें.

टीपः—व्यवहारांत ह्या वाक्याचा भलताच अर्थ केला जातो आणि तें म्हणीप्रमाणे योजण्यात येतें. दोन माणसें कांही बदमाषपणाच्या कृत्यांत सामील असलीं, तर एकाची बेगुन्हाई ठरावयाची वेळ आली असतां दुसरा तो बेगुन्हा आहे, अशी साक्ष देणारच! आणि त्याला वांचविण्याचा प्रयत्न करणारच! अशा अभिप्रायानें वरील वाक्याचा उपयोग केला जातो.

१६०४ तो उष्ट्या हातानें कावळा देखील हाकलणार नाही—तो भारी अदत्त आहे. त्याच्यापासून अल्प वस्तुदेखील मिळावयाची नाही.

व्युत्पत्तिः—आंचवावयाच्या पूर्वी हात खरकटा असतो. त्याला शितें वगैरे चिकटलेलीं असतात. तशा हातानें कावळ्याला हाकलल्यास त्या हाताच्या झटक्यानें एखादें शीत उडून लांब जाईल आणि तें कावळ्याला खावयाला मिळेल. तेंदेखील त्याला मिळूं न देण्याइतकी अनुदार बुद्धि ह्या माणसाची आहे. असा ह्या वाक्याचा अर्थ आहे.

१६०५ कढी पातळ होणें—आजारानें रोडावणें. कढीला लावावयाचें तितकें हरभऱ्याचें पीठ न लावलें, तर ती पातळ होते आणि पचपचीत व बेचव लागते. त्याप्रमाणें

आजारांतून नुकताच उठलेला माणूस रक्तमांसादिकांच्या कमीपणामुळे किडकिडीत होतो. त्याचें वर्णन करताना असें म्हणतात, "राममाऊ आजारांतून उठले आणि त्यांचा पुनर्जन्म झाला. पण बिचाऱ्याची जी कढी पातळ झाली आहे, ती पुसतां सोय नाही!"

१६०६ कधी नव्हताचा—प्रिय, परंतु क्वचित् प्रसंगीं मात्र भेटणारा, दिसणारा, येणारा किंवा घडणारा. उ० तूं कधी नव्हताचा माझ्या येथे जेवावयाला आला आहेस, म्हणून तुझ्या सन्मानार्थ मी आज श्रीखंड पुरीचा बेत करणार!

१६०७ कागदी घोडे नाचविणें—पत्रव्यवहारांचें अवडंबर माजविणें आणि आपण एखाद्या कामीं योग्य प्रयत्न करीत आहों, असा पोकळ देखावा करणें.

१६०८ काळावर दृष्टि देऊन—पुढे स्थिति किंवा परिस्थिति सुधारतां येईल, हें मनात आणून, अधीर किंवा उतावीळ न होतां.

१६०९ कुत्र्याचे पाय मांजरावर आणि मांजराचे पाय कुत्र्यावर घालणें—(१) असंभवनीय गोष्टी तरळत सुटणें. (२) इष्ट हेतु साधण्यासाठी ह्या त्या नीच युक्त्या लढविणें.

१६१० केसाने गळा कापणें—गोड भाषणानें मनांतील कपट झाकून एखाद्याचा नाश करणें.

१६११ खाकेत कळसा आणि गावांत वळसा—एखादी वस्तु आपल्या जवळच आहे, याचें भान नसल्यामुळे ती साऱ्या गावभर शोधीत सुटणें.

१६१२ खाजवून खरूज काढणें—कारण नसतां कुरापत काढून भांडण सुरू करणें.

१६१३ खायाला काळ आणि धरणीला भार—अत्यंत निरुपयोगी माणूस. जो मनुष्य खातो आणि कांहीतरी काम करतो, त्याने खाल्लें अन्न सत्कारणीं लागतें. जो खातो मात्र आणि काही काम करीत नाही; त्यानें खाल्लें अन्न फुकट गेलें असें होतें. त्यामुळे तो मनुष्य पृथ्वीला भारभूत असा समजला जातो. उ० तो मनुष्य खायाला काळ आणि धरणीला भार असा झाला आहे.

टीपः—"काळ" म्हणजे अन्न संपविणारा किंवा अन्नाचा नाश करणारा.

१६१४ खाल्ल्या घरचे वांसे मोजणें—कृतघ्नपणा करणें. (मागे श्लोक १८४ पहा.)

१६१५ खाववेना तर राववेना आणि लवंडूनहि देववेना—उपभोग्य पदार्थांचा अतिशय लोभ धरावयाचा आणि तो पदार्थ उपभोगण्याची ताकद उरली नसली तरी त्या पदार्थांचा लोभ धरावयाचा, दुसऱ्यासहि तो द्यावयाचा नाही आणि टाकूनहि द्यावयाचा नाही; अशा प्रवृत्तीची निंदा करताना वरील वाक्य योजतात.

१६१६ गंगेत घोडे न्हाणें—कृतकृत्य होणें; उत्कटतेने इच्छिलेली वस्तु मिळवून धन्य होणें.

१६१७ गव्हाची कणीक करणें—चांगलें, सोयीचें, हितकारक, फायदेशीर किंवा अनुकूल असेल, तें उगाच अधिक प्रसंग करून वाईट, गैरसोयीचें, अहितकारक, नुकसानीचें किंवा प्रतिकूल असें करणें; बिघडविणें.

१६१८ गळा कापला, खोकला गेला (किंवा मिटला किंवा वारला)—खोकल्याचें निवारण करावयासाठी गळाच कापून टाकला. जेथे मूळच्या दुःखापेक्षा त्या दुःखाच्या निवारणाचा उपाय जास्ती त्रास देणारा असतो, तेथें हें वाक्य योजतात.

१६१९ गाव जळाला, मारुति गावानिराळा—मारुतीने लंका जाळली, पण ह्या आगीपासून त्याला स्वतःला कांही इजा झाली नाही; कारण, गाव जळत असता तो गावाबाहेर सुरक्षित ठिकाणीं बसून ही गंमत पाहत बसलेला होता. कोणी मनुष्य दुसऱ्याचें कांही मोठें नुकसान करून नंतर आपण बेगुन्हा आहों असें दाखवूं लागला, तर हें वाक्य योजलें जातें.

१६२० गुळाचा गणपति आणि गुळाचा नैवेद्य—एखाद्या माणसाच्या मालकीचा जो पदार्थ, त्यांतूनच त्याला कांही देणगी देणें. गंगेच्या पाण्याचें अर्घ्य घेऊन तेंच गंगेला देणें.

१६२१ घे सुरी आणि घाल उरीं—फाजील उत्सुकता, उत्कंठा किंवा घाई ह्यांची निंदा करावयाची असता ह्या वाक्याचा उपयोग केला जातो.

१६२२ चावून चिकट आणि ओढून बळकट—एखाद्या गोष्टीबद्दल कोणी विनाकारण चिकित्सा करीत असला, आणि ह्या चिकित्सेमुळे ती गोष्ट बिघडत असली किंवा बिघडण्याचा संभव असला, तर हें वाक्य योजलें जातें. उ० अरे, तो म्हणतो आहे, तें कबूल कर. त्यात तुझा फायदा आहे. उगीच चावून चिकट ओढून बळकट करीत बसलास, तर तुला तितकेंदेखील तो देणार नाही !

टीपः—कांही पदार्थ तोंडातील लाळेने आपोआप विरघळतात, आणि अनायासाने खातां येतात. पण ते उगाच चावीत बसल्याने चिकट मात्र होतात आणि मग ते खावयाला त्रास पडतो.

१६२३ घोडे मैदान जवळच आहे—तू घोड्यावर बसणारा पटाईत आहेस, असें तुला वाटतें. दाखीव तुझा पटाईतपणा. हा पहा घोडा आणि हें पहा मैदान !

टीपः—एखादा मनुष्य आपल्या अंगीं अमुक गुण आहे अशी बढाई मिरवीत असला, तर तो गुण दाखविण्याला जी संधि पाहिजे असते, ती आली असतां हें वाक्य उच्चारलें जातें. बढाई मारणारा स्वतः हें वाक्य उच्चारतो किंवा इतर लोकहि उच्चारतात.

१६२४ (त्याच्या) जिभेला हाड नाही—(त्याची) जीभ हवी तशी तो वळवितो, म्हणजे तो हवें तें खोटें बोलतो !

टीप:—जिभेला हाड नसतें आणि ती हवी तशी वळविता येते, ही निसर्गाची योजना आहे. पण वाईट मनुष्य त्या योजनेचा दुरुपयोग करतो.

१६२५ डोकें खाजवावयाला वेळ नाही—डोकें खाजविण्याला फारसा वेळ लागत नाही आणि खाजवावयाला फारसे श्रमहि पडत नाहीत. परंतु वेळदेखील नाही आणि तितके श्रम देखील करण्याची सोय नाही, असें दाखविण्यासाठी हें वाक्य योजतात. उ० अरे, हें तुझें काम मला करता येणार नाही. माझ्या अंगावर हल्ली इतकीं कामें शिल्लक आहेत, की मला डोकें खाजवावयाला देखील वेळ (फुरसद) नाही !

१६२६ डोंगर पोखरून उंदीर काढणें—मोठ्या प्रमाणावर कामाला सुरुवात करून अत्यल्प फळ पदरात पडलें म्हणजे म्हणतात, "तू डोंगर पोखरून उंदीर बाहेर काढलास !"

१६२७ डोळा न फुटे आणि काडी न मोडे, अशा रीतीनें—कोणत्याहि पक्षास वाईट न वाटेल किंवा राग न येईल अशा रीतीनें; नाजूकपणानें; सौम्य उपायानें; कोणाचेंहि मन न दुखविता.

१६२८ डोळ्याचें पातें लवतें न लवते तोंच (किंवा इतक्यांत)—अगदी थोड्या काळात.

टीप:—डोळ्याचें पातें एक वेळ लवविण्यास जितका वेळ लागेल, तितक्या वेळात म्हणजे अत्यल्प काळांत.

१६२९ डोळ्यांत केर आणि कानांत फुंकर—एके ठिकाणीं चुकी किंवा न्यून आणि दुसऱ्या ठिकाणीं दुरुस्ती किंवा तजवीज केल्यास तें करणें हास्यास्पद होतें.

१६३० तहान लागल्यावर विहीर खणणें—जी अडचण पुढे येणारच येणार, तिच्यासंबंधानें आगाऊ तजवीज करून न ठेवणें.

१६३१ तुपासाठी किंवा तुपाच्या लालचीनें उष्टें खाणें—मोठ्या लाभासाठी थोडीशी गैरसोय किंवा मानहानि सोसावयाला तयार होणें.

१६३२ तुम्ही आम्ही एक, कंठाळीला मेख—बोलण्यात मैत्रीचा आविर्भाव करणें, परंतु मित्राला कांही पदार्थ देण्याची वेळ आली असता मागे हटणें; अशा प्रकारच्या बाह्यात्कारी स्नेहाच्या प्रकाराचा ह्या सांप्रदायिक वाक्याने उपहास केला जातो.

१६३३ तेल गेलें, तूप गेले, हातीं आलें धुपाटणें—दोन्हींकडून नुकसानी झाली; दोन्ही उद्दिष्टें साध्य झालीं नाहीत.

१६३४ तोंड नाही तोबरा, पोट नाही नगारा—तो इतका खादाड आहे

की, तोबऱ्याप्रमाणे तो तोंडांत घास भरतो आणि त्याचा आहार इतका मोठा आहे की, त्याचें खाणें झाल्यावर त्याचें पोट नगाऱ्याइतकें मोठें होतें!

१६३५ दिल्ली तो बहुत दूर है—देशाभिमानाने प्रेरित होत्साते मराठे वीर प्रतिज्ञा बोलीत की, आम्ही दिल्लीपर्यंत मुलूख काबीज करूं. तेव्हा त्यांना खचवावया- साठीं किंवा त्याचा उपहास करण्यासाठी मोगल बादशहाचे कैवारी त्यांना म्हणत, "दिल्ली तो बहुत दूर है!" परतु मराठे वीरांनी इ० स० १७३७ त दिल्ली गाठली! अद्यापि व्हावयाचें काम पुष्कळ उरलें आहे, गाठावयाचा पल्ला मोठा आहे, असें म्हणावयाचें असता, हें वाक्य योजतात.

१६३६ द्राक्षे आंबट—जी वस्तु आपणास पाहिजे असते, ती प्रयत्न करूनहि मिळण्याजोगी नसते, तेव्हा ती वाईट आहे, अशी व्यर्थ टीका करावयाची आणि आपली फजिती लपवावयाची; ह्या लबाडीचा उपहास करताना हा संप्रदाय योजला जातो.

१६३७ पी हळद आणि हो गोरी—हळद प्यायल्याने मनुष्य गोरें होत नाही आणि होत असलें, तरी तानडतोब होत नाही. जेव्हा एखादी मूर्खपणाची इच्छा करून त्यापासून इष्टकार्य घडवून आणण्याची कोणी मनुष्य इच्छा करतो आणि पुन्हा तें इष्टकार्य-तावडतोब घडून आलें पाहिजे अशी इच्छा करतो, तेव्हा ह्या वाक्यानें त्याचा उपहास केला जातो.

१६३८ पैसा दक्षिणा आणि लक्ष प्रदक्षिणा—भटाला द्यावयाचा एक पैसा आणि त्याने आपल्यासाठी देवाला लाख प्रदक्षिणा घालाव्या अशी अपेक्षा करावयाची, ह्या मूर्खपणासंबधाने हें वाक्य योजतात.

१६३९ पोटांत एक आणि ओठांत एक—लबाड माणसाचे विचार वेगळे असतात आणि बोलणें वेगळें असतें. म्हणजे त्याच्या खऱ्या विचारात आणि बोलून दाखविलेल्या विचारात, तफावत असते.

१६४० बाबावाक्यं प्रमाणम्—आमचे बाबा असें म्हणतात, म्हणून हें असेंच! [ज्याला स्वतःचा विचार म्हणून काहीच नाही आणि जो दुसऱ्याच्या विचाराला फाजील महत्त्व देतो, त्याच्या उपहासार्थ ह्या वाक्याचा उपयोग होतो].

टीपः—ही मूळची म्हण असून हल्ली ती सांप्रदायिक वाक्याप्रमाणे योजली जाते. तिचा जन्म सावतवाडीस झाला, असें एका गृहस्थाने आम्हास सांगितलें. त्या प्रांतातील लोकांनी ह्या म्हणीच्या उत्पत्तीसंबंधाची माहिती आम्हांस द्यावी, अशी त्यांना विनंती आहे.

१६४१ मनांत मांडे पदरांत धोंडे—भव्य मनोराज्य आणि अखेरीस निराशा.

१६४२ मुसळाला अंकुर फुटणें—अशक्य म्हणून मानली गेलेली गोष्ट घडून येणें. उ० तुमचा तो गोविंदराव आता वाईट संगति सोडून देऊन कापडाचें दुकान का चालवीत आहे! मुसळाला अंकुर फुटला, असेंच म्हटलें पाहिजे!

१६४३ सूठभर मिया हातभर दाढी—एखाद्या पदार्थाचा एकच अवयव किंवा भाग प्रमाणाबाहेर असतो, तेव्हा त्याच्या बेडौलपणाचा उपहास करताना हा उद्गार काढतात.

१६४४ मेल्या म्हशीला मणभर दूध—मनुष्य जिवंत आहे तोपर्यंत त्याच्या गुणांचें चीज केलें जात नाही. तो मेला म्हणजे त्याच्या गुणांचें चीज केलें जातें. इतकेंच नव्हे तर ते गुण वाढवून प्रशंसिले जातात.

१६४५ मोर नाचतो म्हणून लांडोरहि नाचते—मोराला नाचतांना पाहून लांडोरहि नाचू लागली, तर तें हास्यास्पद होतें; कारण तिला पिसारा नसतो, म्हणून तें नाचणें शोभिवत होऊं शकत नाही.

१६४६ लंकेत सोन्याच्या विटा—निरुपयोगी वस्तु. लंकेत सोनें विपुल आहे आणि तेथील सर्व व्यवहार, सोन्याच्या विटा नाण्यांप्रमाणे खर्चून चालतो, परतु त्या विटा तेथेंच उपयोगी; येथे त्यांचा कसा उपयोग करून घ्यावयाचा? हाताशीं न येणारी अशी वस्तु विपुल असली, तरी तिचा उपयोग होत नाही.

१६४७ लाथ मारील तेथें पाणी काढील—तो पराक्रमी, कर्तबगार आहे.

१६४८ लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडें पाषाण—पुष्कळ माणसें लोकाना असें करावें, तसें करावें म्हणून उपदेश करीत असतात; पण त्याचें स्वताचें आचरण त्या उपदेशाच्या उलट असतें!

१६४९ शिळ्या कढीला ऊत आणणें—जुन्या पुराण्या गोष्टीला नवें स्वरूप देऊन किंवा स्मरणांतून गेलेला प्रसंग उकरून काढून, त्याबद्दल वाटाघाट करणें, किंवा त्या-संबंधाने प्रतिष्ठा मिरविणें. तसें कोणीं केलें म्हणजे शिळ्या कढीला त्याने ऊत आणला असा प्रयोग करतात.

टीपः—दुपारची कढी संध्याकाळला उरली असली, तर ती रुचकर करण्या-साठी तिला एक कढ देतात; यामुळे ती ताज्या कढीसारखी स्वादिष्ट लागते. यावरून वरील संप्रदाय उत्पन्न झाला आहे.

१६५० शेंडी तुटो, की पारंबी तुटो—कसलाहि प्रसंग आला तरी; कितीहि अडचणी किंवा संकटें आलीं तरी.

१६५१ शेरास सव्वाशेर—प्रतिपक्ष्यापेक्षा वरच्या प्रतीचा प्रतिपक्षी. तो वस्ताद तर त्याच्याहून हा अधिक वस्ताद!

१६५२ सकट घोडे बारा टक्के किंवा सब घोडे बारा टक्के—सारेच घोडे बारा टक्के किंमतीचे! जेथे गुणावगुणाची पारख करणारा मनुष्य नसतो आणि जेथे गुणी, अवगुणी व निर्गुणी माणसाची किंमत सारखीच लेखण्यात येते, तेथे हा वाक्याचा उपयोग करतात. उ० मन लावून काम करावेंसें वाटत नाही. कारण, आमच्या

वरिष्ठाला सब घोडे बारा टक्के आहेत (म्हणजे त्याला कामसू व मेहेनती माणसें आणि अंडाणी व सुकार माणसें सारखींच वाटतात).

१६५३. सगळेंच मुसळ केरांत!—अत्यंत मोठी आश्चर्यकारक चुकी झाली! महत्त्वाची गोष्ट लक्ष्यात आली नाही! विलक्षण दुर्लक्ष्य झालें, खरें!

व्युत्पत्तिः—सुईसारखी बारीकसारीक वस्तु दिसेनाशी होईल, हरवेल, केरांत जाईल; पण मुसळासारखी वस्तु केरांत जाणार नाही. पण ती जर गेली, तर मालकाच्या दक्षतेला काय म्हणावें!

१६५४ समुद्रांत जाऊन कोरडा—अनुकूल परिस्थिति प्राप्त झालेली असून ज्याला कांही फायदा झाला नाही किंवा ज्याने काही फायदा करून घेतला नाही असा.

१६५५ सगळ्या गलबतांत अर्धी सुपारी माझी—शब्दच्छल करून जो मनुष्य दुसऱ्याच्या मालकीच्या वस्तूंत आपला हक्क सांगतो, त्याची निंदा करतांना ह्या वाक्याचा उपयोग केला जातो.

१६५६ साळ्याची गाय आणि माळ्याचें वासरूं—

(क) एखाद्या कार्याला लागणारी साधनसामग्री भिन्न भिन्न ठिकाणापासून गोळा केली असतां, ह्या संप्रदायाने त्या प्रकाराचें वर्णन केलें जातें. उ० आमचा मांडव म्हणजे साळ्याची गाय आणि माळ्याचें वासरूं. गोविंदरावाच्या घरचे वांसे, सदाशिवरावाच्या घरचे चिवे (बांबू), दामू अण्णाच्या पहारी आणि विनूबोवाचें खुंट. अशी दहा घरची सामग्री गोळा करून हा मांडव उभारला.

(ख) परस्परांशीं न जुळणाऱ्या म्हणजे विसंगत वस्तु भिन्न भिन्न ठिकाणांहून गोळा करून आणून एक सुबक वस्तु बनवूं पाहणाऱ्या माणसाचा उपहास करतांना हें साम्प्रदायिक वाक्य योजलें जातें. उ० त्या पंडिताचा वेदान्तग्रंथ म्हणजे साळ्याची गाय आणि माळ्याचें वासरूं असा आहे. कारण, त्याच्या ग्रंथांत बादरायणाचें सूत्र, शंकराचार्यांचें विवरण, आश्मरथ्याचा दाखला, काशकृत्स्नाचा समन्वय, औडुलोमीचा सिद्धान्त आणि शेवटीं स्वताची मखलाशी!

१६५७ हालवून खुंटा बळकट करून घेणें—संदिग्ध गोष्ट निश्चित ठरवून घेणें.

१६५८ हा सूर्य आणि हा जयद्रथ—एखादें विशिष्ट कार्य घडून यावयाला ज्या दोन गोष्टींची अनुकूलता असावी लागते, ती आता आहे. कार्य घडावयाला आता कांही अडचण उरला नाही.

१६५९ हातीं धरल्या रोडका, आणि डोईं धरल्या थोडका—ज्याच्यापासून कोणत्याहि उपायांनी कांहीहि प्राप्त व्हावयाचें नाही असा.

१६६० हाळवायाच्या घरावर मक्षार्पण करणें किंवा तुळशीपत्र ठेवणें—लोकाच्या पैशाने औदार्य दाखविणें. रामभाऊंचे पैसे गोविंदरावाला आपले म्हणून देणें, आणि गोविंदापुढे आपली फुशारकी मिरविणें!

१६६१ हां हां म्हणतां—अत्यल्प काळांत.

• • •

१६६२. १. ज्या उपमा आणि जीं रूपकें योजण्याचा संप्रदाय पडून गेला आहे, त्याच्या याद्या ह्या प्रकरणांत आम्ही देणार आहों. तो रागानें गुंजेसारखा लाल झाला ह्या वाक्यात "गुंज" हें उपमान, "तो" हें उपमेय, "लालपणा" हा त्या दोन वस्तूंतील साधारण धर्म, आणि "सारखा" हा शब्द उपमेचा वाचक आहे उपमान, उपमेय, साधारण धर्म आणि उपमाबोधक शब्द अशीं उपमेचीं चार अंगें असतात.

२. "त्या माणसाचें भाषण म्हणजे एरंडाचें गुऱ्हाळ" ह्या वाक्यांत उपमाबोधक शब्द नाही. "नीरसपणा" हा साधारण धर्महि उक्त नाही. "तो मनुष्य आम्हाचा टाकाळच आहे," म्हणजे तो शुभाशुभ प्रसंगीं सारखाच उपयोगी पडणारा आहे. येथेंहि साधारण धर्म आणि साम्यबोधक शब्द वाक्यांत योजलेले नाहीत. ह्या दोन वाक्यांची मांडणी रूपकात असते तशी आहे.

३. उपमेच्या रूपातील वाक्य रूपकाच्या रूपात, आणि रूपकाच्या रूपातील वाक्य उपमेच्या रूपात, सहज घालता येतें, आणि तसें केल्यानें अर्थात् कांहीं न्यून येतें, असें नव्हे. तथापि काही वाक्यें उपमेच्याच रूपात, आणि काही वाक्यें रूपकाच्याच रूपात, योजण्याचा संप्रदाय पडून गेला आहे.

१६६३ सांप्रदायिक उपमा—

(१) अजगरासारखा लोळत पडलेला किंवा निजलेला. (२) इंगळासारखा लाल. (३) एरंडासारखा उंच. (४) कातड्यासारखी लोचट (पोळी) (५) कुंभकर्णासारखा झोपाळू. (६) कापरासारखें पांढरें स्वच्छ (तूप.) (७) कापसासारखा हलका किंवा मऊ. (८) काल्यासारखें गार (अंग) (९) कावळ्यासारखा छिद्रान्वेषी. (१०) कोळशासारखा काळा. (११) कोल्ह्यासारखा लबाड. (१२) खेटरासारखें रंगलेलें तोंड (विडा खाऊन). (१३) खेटरासारखें तोंड (फजिती उडाल्यामुळे). (१४) गरुडासारखें नाक (म्ह० गरुडाच्या चोंचीसारखें). (१५) गाजरासारखा तांबडा. (१६) गायीसारखा गरीब. दीन. (१७) गुंजेसारखा लाल. (१८) गुळासारखें मऊ आणि तांबूस (सोनें). (१९) घोरपडीसारखा बिलगणारा (२०) जमदग्नीसारखा रागीट. (२१) जाईच्या फुलासारखा नाजूक. (२२) तक्षकासारखा दीर्घद्वेषी, सुनशी व दांत धरणारा माणूस. (२३) पोलादासारखें बळकट (शरीर). (२४) तिळाएवढा लहान (२५) तीन मिऱ्यांच्या उतरंडीएवढें (लहान मूल). (२६) दगडासारखा टणक, कठीण (२७) दोरीसारखा नरम (हवा तसा वाकवितां येईल असा). (२८) धुतल्या तांदुळासारखा स्वच्छ (निष्पाप) (२९) नव्या नवरीसारखा लाजणारा. (३०) नक्षत्रासारखी सुंदर (मुलगी). (३१) नारदासारखा कळलाव्या. (३२) फुलासारखा हलका. (३३) भाकरीसारखा टणक किंवा दडदडीत (लुगड्याचा कांठ किंवा लुगडें). (३४) पाली-

सारखा पांढरा फटक (आजारी माणूस). (३५) पिठासारखें स्वच्छ (चादर्णे.) (३६) बोकडासारखी दाढी वाढलेला. (३७) मधासारखा गोड (सुस्वभावी माणूस). (३८) मोराच्या आसवासारखें स्वच्छ पाणी. (३९) रेशमासारखी मऊ (पोळी). (४०) लोण्यासारखें मऊ (अंग). (४१) विषासारखा कडू. (४२) विळ्याइतका वाकडा. (४३) शंखासारखें स्वच्छ (पाणी.) (४४) शेळीसारखा चरणारा (सदा खात असणारा माणूस). (४५) सरड्यासारखा रंग (= मतें) पालटणारा. (४६) सर्पासारखा दांत धरणारा. (४७) साखरेसारखा गोड (बोलणारा). (४८) सुंभासारखा पीळदार (= हट्टी). (४९) सोन्यासारखा पिवळा.

१६६४. सांप्रदायिक रूपकें—

(१) आग्या वेताळ—तापट आणि भयंकर आरडाओरडा करणारा माणूस. (२) कावळा—दुसऱ्याचा कमीपणा हुडकून काढणें, हा ज्याचा स्वभाव तो. (३) कर्ण—उदार; जें मागावें तें देणारा. (४) कैकेयी—द्वाड; कजाग स्त्री. (५) कोळ्याचें किंवा माशाचें जाळें—विरविरीत चिरगूट. (६) खरवड—त्रासदायक; खणपटीस बसणारा माणूस. (७) गाढव—मूर्ख; बेअकली माणूस. (८) गोगलगाय—गरीब; निरुपद्रवी माणूस. (९) घोरपड—त्रासदायक, टाळतां न येण्याजोगें माणूस किंवा काम. (१०) जमदग्नि—अति रागीट माणूस. (११) जांबुवंत—फार दाढी वाढलेला माणूस. (१२) त्राटिका—कजाग, हट्टी अशी स्त्री. (१३) पाषाण, फत्तर, दगड—मूर्ख माणूस. (१४) धर्मराज—नीतीने चालणारा, पापभीरु माणूस. (१५) बकासुर—ज्याची भूक फार खाल्ल्याशिवाय तृप्त होत नाही, असा माणूस. (१६) बगळा—बाहेरून साधा, पण आतून कपटी. (१७) बैल—बेअकली माणूस. (१८) भवानी—कुरूप आणि ओंगळ स्त्री. (१९) रेडा—लठ्ठ, सुस्त आणि निरुपयोगी माणूस. (२०) सांब—भोळा, निष्कपट माणूस. (२१) हिडिंबा—कुरूप स्त्री.

◆ ◆ ◆

१६६५. आपल्या मनांत आलेला विचार महत्त्वाचा आहे, तो लवकर बोलून दाखविला पाहिजे, असें जेव्हा आपणांला वाटत असतें, तेव्हा आपण शब्दाची निवड करण्यांत वेळ न घालवितां आयत्या वेळीं जो शब्द सुचेल, तोच आपण योजतों, आणि आपलें काम भागवून नेतों. आपण योजलेला शब्द व्याकरणदृष्ट्या शुद्ध आहे किंवा नाही, तो कर्णमधुर आहे किंवा नाही, याची आपण परवा करीत नाही. हा योजलेला शब्द जर सार्थ असला, आणि बहुजनाने पुढे त्याचा स्वीकार केला असला, तर तो भाषेमध्ये रूढ होतो आणि तेणेंकरून भाषेमध्ये उपयुक्त भर पडते. अशा रीतीने मराठी भाषेमध्ये सामील झालेले शेकडो शब्द आहेत. व्याकरणदृष्ट्या ते सर्व शब्द अशुद्ध आहेत, इतकेंच नव्हे तर, त्यांपैकीं बहुतेक कर्णकटु आहेत. परंतु ज्याअर्थी ते भाषेत स्थान पटकावून बसले आहेत, त्याअर्थी त्यांचा आपण स्वीकार केला पाहिजे. त्यांपैकी कांही खाली देतों.

१६६६. (१) अंगमेहनत—स्वतः म्ह० जातीने केलेले श्रम. (२) आंकडेशास्त्र—एखाद्या देशांतील किंवा समाजांतील लोकांचे व्यापार, उद्योगधंदे, शिक्षण, आरोग्य वगैरेंसंबंधाच्या आकड्यांवरून मिळालेल्या माहितीच्या आधाराने सिद्धान्त ठरविण्याचें शास्त्र. (३) आपखुशीने किंवा स्वखुषीने—दुसऱ्याच्या आग्रहावरून किंवा भिडेवरून नव्हे, अशा रीतीने. (४) कर्मकटकट—त्रासदायक आणि किरकिरीचें काम. (५) कानमंत्र—गुप्त रीतीने केलेला उपदेश किंवा सुचविलेली युक्ति. (६) गुरुकिल्ली—लहानच पण इटकूनच कार्य सफल करून देणारी खुबी. (७) जगजाहीर किंवा जगप्रसिद्ध—सर्व जगाला किंवा सर्व लोकांना ठाऊक असलेला. (८) जनलज्जा, मनलज्जा—लोकांची लाज; स्वतःची लाज. (९) जन्मखूण—जन्माच्या वेळेपासूनच शरिरावर असलेली खूण. (१०) जन्मखोड—जन्मापासून अंगांत चाललेली वाईट चाल. (११) पंक्तिपठाण, पंक्तिवारगीर—मागे लें० ११९५ पहा. (१२) पोटपूजा—भोजन किंवा फराळ. (१३) पोटार्थी—पोट कसें भरतां येईल याची विवंचना ज्याला एकसारखी लागलेली आहे, असा माणूस. (१४) बक्षीसपत्र—अमुक वस्तु मी अमक्याला बक्षीस दिली, अशा संबंधाचा कागद किंवा दस्तऐवज. (१५) मर्जीनुरूप—मर्जीला येईल त्या प्रकारें. (१६) महदंतर—फार मोठी तफावत किंवा फरक. (१७) महद्भाग्य—मोठें भाग्य; अनुकूल दैव. (१८) माणुसबळ—साहाय्य करणारी माणसें. (१९) मुहूर्तमेढ—शुभ समयीं रोविलेला मांडवाचा पहिला खांब; कोणत्याहि मोठ्या कार्याच्या सुरवातीची गोष्ट. (२०) वडलोपार्जित—वडिलांपासून मिळालेलें असें; स्वकष्टार्जित नसलेलें. (२१) वेळेनसार—कदाचित. (२२) सत्यानाश—पूर्ण नाश. (२३) सभाधीट—मंडळींत बोलावयाला न भिणारा. (२४) सवडीनुसार—सवड सापडेल त्याप्रमाणे.

◆ ◆ ◆

१६६७ १ "न्याय" म्हणजे दाखला किंवा दृष्टान्त मराठीमध्ये म्हणींनी किंवा सांप्रदायिक वाक्यांनी जें काम होतें, तें संस्कृतात न्यायांनी होतें. उ० तुला सबंध पुस्तक वाचावयाची तसदी घेण्याचें काही कारण नाही. एक दोन पानें वाचलीं म्हणजे तुला स्थालीपुलाकन्यायानें साऱ्या पुस्तकाचें स्वरूप कळून येईल. येथे मराठींत आपण "शितावरून भाताची परीक्षा" ही म्हण योजून अभिप्रेत अर्थ दर्शवितों.

२ संस्कृतात शेकडो न्याय आहेत, त्यापैकी मराठींत जे वारंवार योजले जातात, त्यांचे स्पष्टीकरण आम्ही पुढे देतों.

१६६८ अंधदर्पणन्याय—अधळ्याला आरशाचा काही उपयोग होत नाही. ज्या वस्तूचा एखाद्याला काही उपयोग नाही, त्याला ती दिली असता ह्या न्यायाचा उपयोग करतात. उ० मी हा गाव सोडून जाणार आहें. आता तू मला आपल्या घरांत बिऱ्हाडाला जागा देत आहेस, मला ती अंधदर्पण न्यायाने निरुपयोगी होय.

१६६९ अंधपरंपरान्याय—एका अंधळ्याच्या पाठीमागून दुसरा अंधळा, दुसऱ्या अंधळ्याच्या मागून तिसरा अंधळा, अशा रीतीने अनेक अंधळे चालत असले, तर ते सारेच खड्ड्यात पडावयाचे; कारण, त्याच्यात चांगली वाट दाखविणारा असा कोणी असणें शक्य नाही. त्याप्रमाणे माणसें विचार न करता मेंढराप्रमाणे एकामागून एक अशी जातात आणि प्रसंगविशेषीं नुकसान सोसतात; तेथे ह्या न्यायाचा उपयोग करतात. उ० हे लोक अंधपरंपरान्यायानें चाललेले आहेत. त्यांच्यांत खरा विचार करणारा असा कोणी नाही; अर्थात् त्यांना परिणामीं दुःखच भोगावें लागणार!

१६७० अशोकवनिकान्याय—रावणानें सीता चोरून नेऊन लंकेमध्ये अशोकवनात ठेविली. सीतेला त्याने त्याच स्थळीं का ठेविलें, दुसरीकडे कां ठेविलें नाही, हें सांगणें अशक्य आहे. जेथे दोन किंवा अधिक प्रकार सारख्याच प्रमाणात सोयीचे किंवा गैरसोयीचे असतात, तेथे कोणतातरी एखादा स्वीकारावा लागतो. हा प्रकार स्वीकारला हा पक्षपात झाला, असें म्हणतां यावयाचें नाही. यावरून, मनांत पक्षपात करण्याची मुळीच इच्छा नसतां जेथे कोणतातरी एक प्रकार अंगीकारला जातो, तेथे ह्या न्यायाचा उपयोग केला जातो. उ० मी रामभाऊंच्या घरावरून बागेंत गेलों, आप्पासाहेबांच्या घरावरून गेलों नाहीं, हें केवळ अशोकवनिकान्यायानें झालें.

१६७१ अहिनकुलन्याय—"अहि" म्हणजे साप आणि "नकुल" म्हणजे मुंगूस. साप आणि मुंगूस या दोन प्राण्यांत शत्रुत्वाचा संबंध आहे. दोन माणसांत शत्रुत्व दाखवावयाचें असतां ह्या न्यायाचा उपयोग करतात.

१६७२ काकतालीयन्याय—ताडाच्या झाडाच्या फांदीवर कावळा बसला आणि त्याच वेळीं जर कर्मधर्मसंयोगानें ती फांदी मोडली, तर बसणें आणि मोडणें

ह्या दोन क्रियांचा एकमेकींशीं कांहींच कार्यकारणभाव नसतो.' त्याप्रमाणे यदृच्छेनें किंवा अकल्पिक रीतीनें एखादी गोष्ट घडून आली असून तिचा संबंध दुसऱ्या एखाद्या विशिष्ट गोष्टीशीं कोणी माणूस जोडूं लागला, तर तें करणें हास्यास्पद होतें. यावरून "काकतालीयन्याय" म्हणजे यदृच्छा किंवा कर्मधर्मसंयोग असा अर्थ होतो व "काकतालीयन्यायानें" म्हणजे यदृच्छेनें किंवा कर्मधर्मसंयोगानें, असा अर्थ होतो.

१६७३ कूपमंडूकन्याय—"कूप" म्हणजे विहीर आणि "मंडूक" म्हणजे बेडूक. बेडकाला आपली विहीर हें अत्यंत मोठें जग आहे, असें वाटत असतें. विहिरीच्या बाहेर किती मोठें जग पसरलेलें आहे, ह्याची त्याला काहीच कल्पना नसते. जो मनुष्य आपला गाव किंवा देश सोडून गेलेला नाही, तो माझाच गाव किंवा देश मोठा, अशी धन्यता मानीत असतो. अशा मनुष्याचा उपहास करावयाचा असता ह्या न्यायाचा उपयोग करतात.

१६७४ कूपयंत्रघटिकान्याय—कूप = विहीर. घटिका = लहान घट, म्हणजे लोटा किंवा गाडगें. कूपयंत्रघटिकान्याय = विहिरीच्या रहाटगाडग्याचा न्याय. रहाटाच्या माळेंतील एका बाजूचे लोटे रिकामे असतात, दुसऱ्या बाजूचे भरलेले असतात, खालचे लोटे भरत असतात, वरचे रिकामे होत असतात; कांही खाली जात असतात व कांही वर येत असतात; असा प्रकार होत असतो. त्याप्रमाणे जगांत श्रीमंताचे गरीब व गरिबाचे श्रीमंत होत असतात; अशीं जीं परिवर्तनें होतात, तीं कूपयंत्रघटिकान्यायानें होतात, असें म्हणतात.

१६७५ गतानुगतिकन्याय—"गत" म्हणजे पुढे गेलेला; "अनुगतिक" म्हणजे मागून जात असलेला. एक पुढे गेला म्हणून दुसऱ्यानें विचार न करता त्याच्या मागून जाणें किंवा पूर्वींचे लोक अमुक अमुक करीत होते, म्हणून पुढच्या लोकांनीहि त्याच्याप्रमाणे करणें, हें मूर्खपणाचें लक्षण होय. हा मूर्खपणा दाखवावयाचा असतां ह्या न्यायाचा उपयोग केला जातो.

१६७६ घुणाक्षरन्याय—किड्यानें लाकूड कोरलें म्हणजे कधी कधी कोरलेल्या रेषांनी एखाद्या अक्षराची आकृति होते. ही आकृति त्या किड्यानें बुद्धिपुरस्सर केलेली नसते, ती केवळ यदृच्छेनें, झालेली असते. कर्मधर्मसंयोगानें किंवा यदृच्छेनें एखादी गोष्ट घडून आली, म्हणजे या न्यायाचा उपयोग केला जातो.

१६७७ चंद्रचकोरन्याय—चकोर पक्ष्याचें चंद्रावर अत्यंत प्रेम असतें. पराकाष्ठेचें प्रेम दाखवितांना ह्या न्यायाचा उपयोग करतात.

१६७८ नारिकेलपाकन्याय—नारळाचें कवच (करवंटी) फार टणक असतें, परंतु तें कवच फोडण्याची एकदा तसदी घेतली म्हणजे आंत गोड खोबरें असतें. तें खावयाला मिळतें. एखाद्या वस्तूचें बाह्य रूप रुक्ष असें असलें, तरी अंतःस्वरूप आल्हादकारक असूं शकतें. असा अर्थ दाखवावयाचा असतां नारिकेलपाकन्यायाचा

उपयोग करतात. उ० हा ग्रंथ प्रथम नीरस असा वाटतो, परंतु त्याच्या विषयांत जों जों आपली गति होत जाते, तों तों नारिकेलपाकन्यायाने त्यात गोडी लागूं लागते !

१६७९ नीरक्षीरन्याय—दुधात पाणी पूर्णपणें मिसळून जातें आणि त्या दोहोंचा एक जीव होऊन जातो. दोन वस्तूंचा पूर्णपणें मिलाफ झाला, असें बोलावयाचें असतां, ह्या न्यायाचा उपयोग करतात.

१६८० पिष्टपेषणन्याय—पिष्ट = दळलेलें किंवा धान्य वगैरे दळून तयार झालेलें पीठ, त्याचें " पेषण " म्हणजे दळणें किंवा पीठ करणें. पुनः तेंच तेंच करणें. व्यर्थ पुनरावृत्तीला हा न्याय लावतात. मराठींत "चर्वितचर्वण," ह्या सम्प्रदायाचा याच अर्थानें उपयोग केला जातो.

१६८१ बीजांकुरन्याय—अगोदर बीज उत्पन्न झालें किंवा अगोदर अंकुर उत्पन्न झाला, हें ठरविता येत नाही. कारण, बीजापासून अंकुर होतो आणि अंकुरापासून बीज होतें. जेथे दोन पदार्थ एकमेकाचीं कारणें असतात व कार्येंहि असतात, तेथे हा न्याय योजतात.

१६८२ वीचितरंगन्याय—पाण्यांत एक लाट उत्पन्न होते, तिला मागची लाट पुढे ढकलते. ह्या दुसऱ्या लाटेला तिच्या मागची लाट पुढे ढकलते. असें होत असतांना क्रमाक्रमानें सर्व लाटा किनाऱ्यावर आपटून फुटत असतात. . त्याप्रमाणे एका पिढीचीं माणसें मरण पावतात, त्याच्या मागून त्यांच्या जागीं दुसऱ्या पिढीचीं माणसें येतात, पुढे तींहि मरतात. ही जगाची रहाटी वीचितरंगन्यायानें घडत असते.

१६८३ वृद्धकुमारीवरन्याय—एका वयोवृद्ध परंतु अविवाहित स्त्रीनें इंद्राजवळ वर मागितला की, " माझ्या पुत्रांनी सोन्याच्या ताटांत दूधभात खावा. " ह्या एका वरानें ( १ ) त्या स्त्रीचें लग्न होणें, ( २ ) तिला पुष्कळ पुत्र होणें, ( ३ ) घरांत धनधान्याची समृद्धि होणें इत्यादि अनेक गोष्टी तिनें मिळविण्याचा प्रयत्न केला. अगदी लहान वस्तु मागावयाची, परंतु ती अशा खुबीनें मागावयाची की, ती प्राप्त झाल्यानें अनेक गोष्टी मिळावयाच्या, तें वृद्धकुमारीवरन्यायानें होय

१६८४ शाखाचंद्रन्याय—एखाद्याला चंद्र दाखवावयाचा असतां " तो पहा, त्या वकुळीच्या टोकाला आहे " वगैरे सारख्या वाक्यानें चंद्राचें स्थान दाखवितात. खरोखरी फांदीपासून शेकडो मैलांच्या अंतरावर चंद्र आहे. यावरून एखाद्या ज्ञात वस्तूशीं अज्ञात वस्तूचा नसता संबंध जोडून देऊन ती अज्ञात वस्तु ज्ञात करून देतात, तें शाखाचंद्रन्यायानें.

१६८५ सिंहावलोकनन्याय—सिंह चालत असतां मधून मधून मागे वळून पाहत असतो. आपण एखादें काम करीत असतां तें किती झालें व कसें झालें, हें पाहण्यासाठी मागच्या कामाचें थोडक्यात निरीक्षण करतों, तें सिंहावलोकनन्यायानें करतों.

१६८६ स्थालीपुलाकन्याय—"स्थाली" म्हणजे तपेली आणि " पुलाक "

म्हणजे भात. एखाद्या तपेलींतील भात शिजला आहे किंवा नाहीं, हें पाहावयाचें असतां एक शीत दोन बोटांत घेपून पाहतात. तें चांगलें शिजलेलें हाताला लागलें, म्हणजे सारा भात चांगला शिजला आहे, असें आपण अनुमान काढतों. एका लहानशा भागाची चांचणी करून सर्व वस्तूची परीक्षा आपण करतों, ती स्थाली-पुलाकन्यायानें करतों. ह्याच अर्थाची मराठी म्हण, "शितावरून भाताची परीक्षा."

१६८७ हंसक्षीरन्याय—दुधांत पाणी मिसळलेलें असल्यास, तें पाणी न घेतां हंस दूधच घेऊन पितो, अशी आपल्या लोकांची कल्पना आहे. एखाद्या वस्तूं-तील दोषांकडे लक्ष न देतां तिच्या गुणांची वाखाणणी करतात, ती हंसक्षीरन्यायानें. उ० "मराठी भाषेचे वाक्प्रचार, म्हणी इ०," ह्या आमच्या पुस्तकांतील दोषांकडे कडी नजर न करतां विद्वान् लोक हंसक्षीरन्यायानें गुणांचें ग्रहण करतील, अशी आम्ही उमेद बाळगून आहों.



# १६ : संस्कृत भाषेंतील वाक्यें आणि वाक्यांचे खंड

१६८८ संस्कृत भाषेंतील शेकडो वाक्यें, आणि वाक्यांचे खंड, मराठींत हर-हमेश योजण्यांत येतात. त्याचा संग्रह ह्या प्रकरणांत केला आहे. हीं संस्कृत वाक्यें व वाक्यांचे खंड सारेच व्याकरणशुद्ध असतात, असें नव्हे. विष्णुस्य हृदयं शिवः, शिवश्च कंठश्च, शुभस्य शीघ्र वगैरे अशुद्ध आहेत. पुढील संग्रहांत आम्हीं शुद्ध रूपें ठिक-ठिकाणीं दाखवून दिलीं आहेत.

१६८९ अजापुत्रं बलिं दद्यात्—गरीब किंवा निराश्रित मनुष्यालाच सर्व लोक छळतात. श्रीमंताच्या किंवा समर्थाच्या वाटेस कोणी जात नाहीत. [ यज्ञांत शेळीच्या पुत्रास म्हणजे बोकडास, बलि देतात. वाघ, सिंह वगैरे हिंस्र पशूस देत नाहीत. ह्या चालीवरून हें वाक्य निघालें ].

१६९० अतिपरिचयादवज्ञा—एखाद्याशीं आपली दाट ओळख झाली किंवा एखाद्या माणसाकडे आपण फार फार जाऊं लागलों, म्हणजे तो आपला अनादर करूं लागतो.

१६९१ अति सर्वत्र वर्जयेत्—कोणत्याहि गोष्टींत अतिरेक करूं नये मर्यादेबाहेर कोणतीहि गोष्ट करूं नये. ह्याच अर्थाची मराठी म्हण, " अति तेथें माती."

१६९२ अधिकस्याधिकं फलं—अधिक केल्यास अधिक फलप्राप्ति होते. विद्यार्थ्यानें अधिक मेहनत केल्यास तो अधिक हुशार होईल, वगैरेंसारख्या प्रसंगीं ह्या वाक्याचा उपयोग करतात.

१६९३ अव्यापारेषु व्यापारः—ज्या कामांत आपण पडूं नये, त्या कामांत पडणें; भलतीच गोष्ट करावयाला प्रवृत्त होणें. ज्या गोष्टीशीं आपला कांहीं संबंध नाहीं, त्या गोष्टींत मन घालून आपण कांहीं पंचाइतींत पडलों असतां " हा माझा अव्यापारेषु व्यापार झाला, " असें म्हणतात. [ पंचतंत्रांत एका खुंटी उपटणाऱ्या वानराची गोष्ट आहे, तींतील एका श्लोकाचा हा चरण आहे. ]

१६९४ अहो रूपमहो ध्वनिः—ह्यानें त्याची स्तुति करावी, आणि त्यानें ह्याची स्तुति करावी, असा प्रकार जेथें होत असतो, तेथें " अहो रूपमहो ध्वनिः " अशा वाक्यानें त्याची निंदा किंवा थट्टा करण्यांत येते.

१६९५ इंद्राय तक्षकाय स्वाहा—शत्रूला चुकविण्यासाठीं जर कोणी लाचार मनुष्य एखाद्या बलवान् इसमाकडे आश्रयासाठीं गेला, आणि शत्रु जर ह्या आश्रयदात्या इसमापेक्षा बलवत्तर असला, तर तो त्या आश्रयदात्यासकट त्या लाचार माणसाचा विध्वंस उडवितो, म्हणजे दोघांचाहि एकदम विध्वंस करितो. ह्याला " इंद्राय तक्षकाय स्वाहा " करणें असें म्हणतात. [ पूर्वी जनमेजय राजानें सर्पसत्र

चालविलें होतें, त्यांत तो सर्पांची आहुति धावयाला लागला होता. इतर सर्पांप्रमाणे आपलीहि आहुति अग्नींत पडणारच, असें मनात आणून तक्षक इंद्राकडे आश्रयार्थ गेला. हें जनमेजयास समजताच तो म्हणाला, " इंद्राय तक्षकाय स्वाहा ! " म्हणजे इंद्रासह-वर्तमान तक्षकाची आहुति पडो ! ह्यावरून वरील वाक्याचा अर्थ " शत्रूला आश्रय देणाऱ्यासकट शत्रूचा विध्वंस होवो ! "

टीपः—इंद्र, तक्षक आणि स्वाहा हे तीन शब्द शेजारीं शेजारीं ठेवून असंस्कृत-ज्ञाने हें संस्कृताप्रमाणे दिसणारें वाक्य गमतीने बनविलें आहे.

१६९६ आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः —दक्षिणी लोक एखाद्या कामाला सुरुवात करून ठेवण्यांत पटाईत असतात. तें काम शेवटास नेण्याची त्यांना धमक नसते. ते प्रथम उत्साह दाखवितात; आणि नतर उदासीन होतात किंवा आळशावतात.

१६९७ इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः —इकडे फजिती पावलेला आणि तिकडेहि फजिती पावलेला; दोन्हींकडून ज्याची फसगत झाली आहे, असा.

१६९८ ऋणं कृत्वा घृतं पिबेत्—ऋण काढून तूप प्यावें, चैन करावी, मग ती फर्जाऊ पैशावर केली तरी हरकत नाही. चार्वाकाच्या एका श्लोकाचा हा एक चरण आहे.

१६९९ एरंडोऽपि द्रुमायते—ज्या गावात वृक्ष नाहीत, त्या गावात एरंडच वृक्ष गणला जातो. मूर्खांच्या मडळात एखादा जरासा अक्कलवान् असला, तरी त्याची बडेजावी होते; तेव्हा त्याची निंदा किंवा थट्टा करावयाची असता ह्या वाक्याचा उपयोग करतात.

१७०० कर्तुमकर्तुं अन्यथा कर्तुम् (समर्थ)—हरें तें करावयाला समर्थ. [ शब्दशः अर्थ असा.—जें अस्तित्वांत नाही, तें अस्तित्वात आणावयाला म्हणजे मनात आल्यास एखादी गोष्ट करावयाला, मनांत न आल्यास न करावयाला किंवा केलेली असेल तींत बदल करावयाला समर्थ ].

१७०१ कर्मणो गहना गतिः —कर्मांची गति जाणणें शक्य नाही !

१७०२ कोटश्च कीटाय—य.कश्चित्; क्षुल्लक.

टीपः—इद्राय तक्षकाय स्वाहा ह्याचेवरील टीप पहा.

१७०३ क्वचित्काणो भवेत्साधुः —काणा किंवा एका डोळ्याने अंधळा मनुष्य प्रायः सरळ स्वभावी नसतो म्ह० बहुतकरून लबाड असतो.

१७०४ खटाटोपो भयंकरः किंवा फटाटोपो भयंकरः —अंगीं सामर्थ्य किंवा अवसान थोडकेंच असून अवडबर मात्र मोठें !

१७०५ खल्वाटो निर्धनः क्वचित्—ज्याच्या डोक्यावर टक्कल आहे, असा मनुष्य प्रायः दरिद्री नसतो.

१७०६ गतं न शोचेत्—गेलेल्या म्ह० नष्ट झालेल्या वस्तूबद्दल व्यर्थ शोक करीत बसू नये.

१७०७ गुणाः पूजास्थानं—मनुष्याला आदर प्राप्त होतो, तो त्याच्या गुणावरून.

१७०८ चक्षुर्वै सत्यम्—जें प्रत्यक्ष डोळ्यानी पाहिलेलें असेल, तेंच खरें (कानानी ऐकिलेलें असेल तें खोटें). एखादी गोष्ट लोकानी सांगितलेली असेल, ती खरी धरून चालूं नये, ती प्रत्यक्ष पाहिली असेल, तरच खरी समजावी.

१७०९ चंचुप्रवेशान्मुसलप्रवेशः—चोंच शिरकावण्यापुरती जागा मिळाली म्हणजे मुसळ शिरकावण्याइतकी जागा करून घेता येते. प्रथम थोडासा अवकाश मिळाला म्हणजे तेवढ्यावर जास्ती जागा मिळविता येते.

१७१० जिवश्च कंठश्च—शुद्ध रूप "जीवश्च कंठश्च" जीव की गळा अशासारखी दृढ मैत्री.

१७११ दूरतः पर्वता रम्याः—दुरून डोंगर साजरे (जवळ जातां काटेकुटे).

१७१२ द्रव्येण सर्वे वशाः—द्रव्य दिल्याने सर्व लोक आपणास वश करून घेतां येतात.

१७१३ धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम्—धर्माचें रहस्य गुहेमध्ये ठेविलेलें असतें (म्ह० गूढ किंवा अज्ञेय असतें); किंवा धर्माचें रहस्य गुहेच्या एकान्तवासात जाऊन राहिल्याशिवाय समजण्याजोगें नाही. खाली "महाजनो येन गत. स पंथाः" पहा.

१७१४ धर्मस्य त्वरिता गतिः—धर्माचें फळ तावडतोब मिळतें किंवा धर्म करावा असें मनात येतांच तो करूं लागावा, उशीर लावूं नये.

१७१५ न दुःखं पंचभिः सह—आपल्या दुःखात पांच वाटेकरी असले म्हणजे दुःख वाटत नाही. एखाद्या संकटाच्या प्रसंगीं आपल्याबरोबर पुष्कळ लोक असले म्हणजे त्या संकटाची तीव्रता फारशी जाणवत नाही. ह्याच अर्थाची मराठी म्हणः—दहांत मरण लग्नासमान.

१७१६ न देवाय न धर्माय—देवाच्या कार्याला नव्हे आणि धर्माच्याहि कार्याला नव्हे. व्यर्थ किंवा अनाठायीं केलेला खर्च किंवा मेहनत ह्यासंबंधाने बोलतांना ह्या शब्दांचा उपयोग केला जातो.

१७१७ न भूतो न भविष्यति—पूर्वी झाली नाही आणि पुढे होणार नाही, अशी गोष्ट. उ० तैमूरलंगाचा क्रूरपणा न भूतो न भविष्यति, असा होता.

१७१८ न हिंदुर्न यवनः—जो हिंदुधर्म पाळीत नाही आणि मुसल्मानी धर्महि पाळीत नाही, असा माणूस.

१७१९ निरंकुशाः कवयः—कवींना कोणताहि निर्बंध नसतो.

१७२० बहुरत्ना वसुंधरा—पृथ्वीवर नाना प्रकारचीं रत्नें आहेत. ह्या जगांत अनेक आश्चर्यकारक वस्तु आहेत. त्याची आपणास कांहीच माहिती नाही

१७२१ निर्वीरमुर्वीतलं—सामना करावयास कोणी वीर उरला नाही, अशी स्थिति.

१७२२ निःस्पृहस्य तृणं जगत्—ज्याला कोणत्याहि वस्तूची इच्छा नाही, त्याला जग हें तृणतुल्यच होय.

१७२३ नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण—चाकाच्या परिघाप्रमाणे ( मनुष्याची ) स्थिति खाली जाते आणि वर जाते. हीन दीन मनुष्य वैभवास चढतो व वैभवशाली मनुष्य हीन दशेस येत असतो, अशी या जगाची रहाटी सतत चाललेली आहे.

१७२४ परोपदेशे पांडित्यम्—दुसऱ्याला उपदेश करतेवेळीं शहाणे, पण स्वतः आचरण करताना मूर्ख.

१७२५ पुराणमित्येव न साधु सर्वम्—एखादी वस्तु, गोष्ट किंवा चालरीत जुनी आहे म्हणजे पूर्वीपासून चालत आली आहे, येवढ्यावरूनच ती चांगली आहे, असें ठरत नाही.

१७२६ द्रविडो लुडबुडाम्यहम्—शब्दशः अर्थ—मी द्रविड लुडबुडत आहे. पूर्वी पेशवाईमध्ये कोणी एक द्रविड ब्राह्मण श्रीमंताची भेट घेऊन काही दक्षिणा मिळेल, ह्या आशेने पुणे येथे आला. परंतु पुण्यास आल्यावर त्याला असें कळलें की, श्रीमंतांची स्वारी पुरंदरगडीं आहे. तेव्हा तो द्रविड पुरंदरगडास गेला. तेथे त्याला कळलें कीं, श्रीमंत दोन दिवसांच्या मागे सासवडास गेले. म्हणून तो सासवडास गेला. श्रीमंत पुरंदरगडास पुन्हा गेले हें, त्याला सासवडात सांगण्यांत आलें! अर्थात् श्रीमंताची गाठ पडली नाही! तेंव्हा त्याने त्रासून आपल्या स्थितीच्या वर्णनाचा पुढील श्लोक रचिला—

गडाच्च सास्वडं यामि, सास्वडाच्च पुनर्गडम् ।
गडसास्वडयोर्मध्ये द्रविडो लुडबुडाम्यहम् ॥ १ ॥

जेव्हा एखाद्या पदार्थाला किंवा मनुष्याला कायमचें स्थान न मिळता त्याची इकडून तिकडे व तिकडून इकडे अशी उचलबांगडी होत असते, तेव्हा म्हणतात, त्याचें "द्रविडो लुडबुडाम्यहम्" असें चाललें आहे!

१७२७ प्रथमग्रासे मक्षिकापातः—पहिल्याच घासाला माशी लागणें. जेवायाला बसल्यावर पहिला घास तोंडांत घालावा तोंच माशी तोंडात गेली, तर सर्व जेवणाचा विचका होतो. त्याप्रमाणे इष्ट वस्तु अगदी साध्य व्हावयाच्या वेळीं किंवा एखाद्या गोष्टीला आरंभ करावयाच्याच वेळीं, काही हरकत आली, तर "प्रथमग्रासे मक्षिकापातः" असें म्हणतात

१७२८ पिंडे पिंडे मतिर्भिन्ना—जितकीं माणसें तितके स्वभाव. समानार्थक मराठी म्हण—"मूर्ति तितक्या प्रकृति।"

१७२९ बालादपि सुभाषितं ग्राह्यम्—लहान मुलाचें देखील चांगलें भाषण स्वीकारावें.

१७३० बुद्धिः कर्मानुसारिणी—मागच्या जन्मींच्या कर्मांप्रमाणेच मनुष्याला बुद्धि होते म्ह० कांही गोष्ट करण्याची प्रवृत्ति होते.

१७३१ भवति न भवति—"भवति" म्ह० होते, "न भवति" म्ह० होत नाही. अमुक वस्तु अशी होते किंवा होत नाही, असा वादविवाद; वाटाघाट. उ० ह्या विषयासंबंधानें आज पांच वर्षें भवति न भवति होऊन शेवटीं असें ठरलें की, आहे तीच व्यवस्था पुढे चालू ठेवावी.

१७३२ भिन्नरुचिर्हि लोकः—भिन्न भिन्न लोकांच्या आवडी भिन्न भिन्न असतात. एकाला जें पसंत पडेल, तें दुसऱ्यालाहि पसंत पडेल, असा नियम नाही.

१७३३ मनःपूतं समाचरेत्—मनाला योग्य वाटेल तें करावें.

१७३४ महाजनो येन गतः स पंथाः—मोठे मोठे लोक ज्या मार्गानें गेले, तोच मार्ग खरा; म्ह० त्याच मार्गानें जाणें हें बरें. ज्या श्लोकाचा एक चरण वरील वाक्य आहे, तो येणेंप्रमाणें—

श्रुतिर्विभिन्ना स्मृतयश्च भिन्नाः, नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम्।
धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां, महाजनो येन गतः स पंथाः॥

ह्याच श्लोकाचा दुसरा एक पाठ पुढे दिल्याप्रमाणे आहे—

तर्केऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्ना, नैको ऋषिर्यस्य वचः प्रमाणम्।
धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम्, महाजनो येन गतः स पन्थाः॥

महाभारत—वनपर्व अ० ३१२, श्लोक ११५.

१७३५ मुखमस्तीति वक्तव्यम्—तोंड आहे म्हणून बोलावयाचें. जेव्हां कोणी माणूस मूर्खासारखें कांही तरी बरळत असतो, म्ह० योग्य, अयोग्य वगैरेंचा विचार न करता बोलत असतो, तेव्हां त्याची निंदा करितांना ह्या वाक्याचा उपयोग करतात.

१७३६ मूले कुठारः—मूळावरच कुऱ्हाड. ज्या मुद्दयावर एखादा सिद्धान्त उभारलेला असतो, तो मुद्दाच खोडून टाकणें.

१७३७ मौनं सर्वार्थसाधनम्—मुकाट्यानें बसलें म्हणजे सर्व हेतु सफल होतात.

१७३८ यथा राजा तथा प्रजा—जसा राजा असेल, तशी प्रजा असते. राजा नीतिमान् असल्यास प्रजाजन नीतिमान् असतात. राजा दुराचारी असल्यास प्रजाजन दुराचारी असतात.

१७३९ यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नो करणीयं नाचरणीयम्—एखादी गोष्ट जरी योग्य असली, तरी ती लोकरूढीच्या उलट असल्यास करूं नये व आचरूं नये.

१७४० यावत्तैलं तावदाख्यानम्—जोपर्यंत दिव्यांत तेल असेल, तोपर्यंतच आख्यान, गोष्ट किंवा संभाषण. तेलाच्या अभावामुळे दिवा विझला, की सर्व गोष्टी बंद पडावयाच्या. मनुष्याजवळ द्रव्य वगैरे असतें, तोपर्यंत त्याच्या चैनी चालतात. द्रव्य संपलें म्हणजे त्या बंद पडतात.

१७४१ यावच्चंद्रदिवाकरौ—जोपर्यंत चंद्र आणि सूर्य जगांत कायम आहेत तोपर्यंत; अनंत काळपर्यंत.

१७४२ योजकस्तत्र दुर्लभः—एखाद्या वस्तूचा योग्य स्थलीं आणि योग्य प्रसंगीं उपयोग करणारा माणूस दुर्मिळ असतो. उपयोगाच्या वस्तु जगांत पुष्कळ आहेत. त्यांची योजना करणारा माणूस मात्र मिळणें कठीण आहे. ज्या श्लोकाचा एक चरण वरील वाक्य आहे, तो असा आहे.

अमंत्रमक्षरं नास्ति, नास्ति मूलमनौषधम्।
अयोग्यः पुरुषो नास्ति, योजकस्तत्र दुर्लभः॥

१७४३ येन केन प्रकारेण—कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारानें. कांहींना कांहीतरी करून. योग्यायोग्याचा विचार न करतां. संबंध श्लोक येणेंप्रमाणे—

घटं भिंद्यात्पटं छिन्द्यात् कुर्याद्वा रासभध्वनिम्।
येन केन प्रकारेण प्रसिद्धः पुरुषो भवेत्॥

१७४४ राजा कालस्य कारणम्—राजा हा जसा चांगल्या काळास आणतो, तसा वाईट काळासहि आणतो. राजा चांगला असल्यास प्रजेला चांगले दिवस येतात आणि वाईट असल्यास वाईट दिवस येतात. प्रजेचीं सुखदुःखें राजावर अवलंबून असतात. [ मागें म्हणींच्या प्रकरणांत "देव कराया दोन डुया, किडवळ कराया तीन डुया," ही म्हण पहा ].

१७४५ रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति—रामाचें कल्याण असो! रावणाचें कल्याण असो! दोन परस्परविरुद्ध असे पक्ष असतां कोणत्याच पक्षाला दुखवूं नये म्हणून प्रयत्न करणारा मनुष्य कोणत्याच पक्षासंबंधाने आपलें मत स्पष्टपणें सांगत नाही. त्याच्यासंबंधाने पुढीलसारखें वाक्य योजण्यांत येतें. 'रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति' असें म्हणणाऱ्या माणसाकडे आपला तंटा तोडून घ्यावयाला जाण्यांत काय अर्थ आहे?

१७४६ वचने किं दरिद्रता—बोलण्यांत कमीपणा कशाला? अघळपघळ बोलावें, मग करणें किंवा देणें तें आपल्या इच्छेला येईल, तितकेंच करावें किंवा द्यावें.

१७४७ वचस्येकं मनस्येकं—बोलण्यांत एक आणि मनांत दुसरेंच. याला समानार्थक मराठी सांप्रदायिक वाक्य " ओठांत एक आणि पोटांत एक."

१७४८ वादे वादे जायते तत्त्वबोधः—वादविवाद केल्याने एखाद्या गोष्टीचें मर्म म्ह० खरें स्वरूप किंवा रहस्य समजतें. संबंध श्लोक असा आहे:—

मार्गे मार्गे निर्मल-ब्रह्मवृंदं, वृंदे वृंदे तत्त्वचिंतानुवादः ।
वादे वादे जायते तत्त्वबोधः, बोधे बोधे भासते चंद्रचूडः ॥

१७४९ विनाशकाले विपरीतबुद्धिः—विनाशकाल प्राप्त झाला असतां मनुष्याची बुद्धि फिरते. हानि होण्याचा काल आला म्हणजे मनुष्यास भलभलत्या गोष्टी करण्याची बुद्धि होते.

१७५० विषादप्यमृतं ग्राह्यं—विषापासून जरी अमृत प्राप्त होण्याजोगें असलें तरी तें घ्यावें, त्याचा अव्हेर करूं नये. वाइटापासून चांगलें मिळत असेल, तर तें घ्यावयाला हरकत नाही.

१७५१ शठे शाठ्यं समाचरेत्—लबाडाशीं व्यवहार करतांना लबाडी खुशाल करावी. ' शठ प्रति शाठ्यं ' ह्याचाहि वरील अर्थानेंच उपयोग केला जातो.

१७५२ शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णुस्य हृदयं शिवः—शिवाचें हृदय विष्णु आणि विष्णूचें हृदय शिव. शिव तोच विष्णु आणि विष्णु तोच शिव; शिव आणि विष्णु हे दोन्ही एकच होत. दोन माणसांतील मैत्रीचा दृढपणा दाखवावयाचा असतां वरील वाक्य योजतात. " विष्णुस्य " हें " विष्णोः " याचें प्रचारात असलेलें अशुद्ध रूप.

१७५३ शिष्यापराधे गुरोर्दंड.—शिष्याच्या अपराधाबद्दल गुरूला शिक्षा. अडाणी विद्यार्थ्यांनें बरोबर उत्तरें दिलीं नाहीत, म्हणजे गुरूने काही शिकविलेंच नाही, असा त्याच्यावर ठपका ठेवण्यात येतो.

१७५४ शिष्टागमने अनध्यायः—कोणी संभावित गृहस्थ आपल्या घरीं आला असतां अध्ययनाला सुट्टी दिली पाहिजे म्ह० अध्ययन बंद ठेविलें पाहिजे.

१७५५ शुभस्य शीघ्रम्—( शुद्ध रूप शुभं च शीघ्र) फायदेशीर गोष्ट तातडतोब केलेली बरी !

१७५६ शेषं कोपेन पूरयेत्—निरुत्तर झालेला माणूस मुद्याची उणीव रागानें भरून काढतो ! वादांत हार येऊं लागली म्हणजे मनुष्याला राग येऊन तो चरफडूं किंवा शिव्या देऊं लागतो.

१७५७ सर्वारंभास्तडुलाः प्रस्थमूलाः—हे अशुद्ध वाक्य व्यवहारांत वारंवार ऐकूं येतें. त्याचें शुद्ध रूप " सर्वारंभास्तंडुलप्रस्थमूलाः " असें आहे. सर्वारंभाः म्ह० सगळे आरंभ; सगळ्या कामाचे आरंभ; सगळीं कामें. हा कर्मधारय समास.

तंडुल म्ह० तांदूळ. प्रस्थः किंवा प्रस्थं म्ह० चिपटें किंवा मूठ. तांदुळाची मूठ किंवा मूठभर तांदूळ. मूठभर तादूळ आहेत, मूळ म्हणजे आधार ज्याचा असे. हा बहुव्रीहि समास. ह्या वाक्याचा हा असा अर्थ आहे. सर्व कामें मूठभर तांदुळावर आधारलेलीं म्ह० अवलंबून राहिलेलीं असतात. तडुल ह्याचे लाक्षणिक अर्थ (१) उदरनिर्वाहाची सामग्री. (२) पैसा. (१) कोणतेंहि मोठें काम करावयाला हातीं घेतांना त्या माणसाला चरितार्थाची ददात असतां कामा नये. (२) त्या माणसाला त्या कामीं पैशाचा मुबलक पुरवठा पाहिजे. उ० तुझे सर्व विचार जरी चागले आहेत, तरी ते ह्या वेळीं मी निरुपयोगी समजतों. कारण, सर्वारंभास्तण्डुलाः प्रस्थमूलाः (म्ह० तुजजवळ पैशाचा पुरवठा नाही. तूं काय करूं शकणार ?)

१७५८ साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः —शेपूट आणि शिंगें नसलेला हा खरोखर पशुच होय! बुद्धिहीन किंवा अशिक्षित माणसाचें हें वर्णन आहे.

१७५९ सुखं च मे शयनं च मे—मला चैनींत राहून झोपा ताणावयास पाहिजेत!

१७६० स्वभावो दुरतिक्रमः —स्वभाव बदलता येत नाही! या वाक्याशीं समानार्थक मराठी म्हण "स्वभावाला औषध नाही!"



## १७ : ज्योतिषांतील पारिभाषिक शब्दांपासून उत्पन्न झालेले वाक्प्रचार

१७६१ (एखाद्याच्या) राशीस लागणें किंवा बसणें—त्याची पिच्छा पुरविणें; त्याच्या पाठीस लागणें; त्याला छळणें किंवा सतावून सोडणें. मेष, वृषभ इत्यादि बारा राशि क्रांतिवृत्तावर आहेत आणि ह्या राशींत रवि वगैरे ग्रह एक महिन्यापासून २॥ वर्षेपर्यंत असतात. यावरून "एखाद्याच्या राशीस बसणें" म्ह० सदासर्वदा त्याच्या जवळ राहून त्याला त्रास देणें, असा अर्थ झाला आहे.

१७६२ त्याचा माझ्याशीं बारावा बृहस्पति आहे—त्याचें माझ्याशीं वैर आहे. त्याचें माझ्याशीं पटत नाहीं. जन्मराशीपासून बाराव्या राशींत बृहस्पति (म्ह० गुरु) असल्यास तो त्या माणसास फार दुःख देणारा असतो, असें फलज्योतिषांत सांगितलेलें आहे.

१७६३ राहूसारखें मागे लागणें किंवा येणें; राहूकेतूप्रमाणे पाठ घेणें—पिच्छा पुरविणें; नाश करण्याची संधि मिळण्यासाठी टपून बसणें. "राहु" आणि "केतु" ह्या नांवांचे दोन दैत्य असून ते सूर्य आणि चंद्र यांना संधि साधतांच ग्रासतात, म्ह० खाऊन टाकतात. तेणेंकरून सूर्यग्रहण आणि चंद्रग्रहण हे प्रकार होतात, अशी समजूत असे.

१७६४ शनि, शनैश्चर— शनि हा ग्रह आपल्या राशीपासून द्वादशस्थानीं असल्यास तो फार पीडा देतो. यावरून "शनि" किंवा शनैश्चर" ह्याचा अर्थ, दुश्मान् अथवा वाईटावर टपलेला माणूस, असा झाला आहे. आकाशांत शनि ह्या ग्रहाचा एक फेरा व्हावयास सुमारें ३० वर्षें लागतात. हा काल इतर ग्रहाच्या कालाहून जास्ती आहे, म्हणजे तो सावकाश चालतो; म्हणून त्याला "शनैश्चर" (शनैस् + चर) सावकाश चालणारा असेंहि म्हणतात.

१७६५ उदरीं शनि येणें—समृद्ध किंवा श्रीमंत होण्याचीं सर्व साधनें, कारणें हीं अनुकूल असणें. [जन्मराशीला शनि हा ग्रह आला असतां वैभव प्राप्त होतें, असा फलज्योतिषाचा सिद्धान्त आहे].

१७६६ ओढून चंद्रबळ आणणें—मौंजीबंधनाच्या विधीला मुलाच्या लग्न-कुंडलींत चंद्राचें बळ असावें लागतें. तें नसल्यास तें आहे असें धर्मे तरी ठरवून मौंजीबंधन आपल्या हौसेसाठी उरकून घेतात. जगामध्ये कित्येक लोक असे असतात कीं, त्यांना एखादी गोष्ट करावयाची इच्छा आणि हौस असतां बाह्यात्कारी ते नाखुषी दर्शवीत असतात. मनांतून ती गोष्ट करा असा लोकांनी आपणाला मोठेपणा देऊन आग्रह केला, म्हणजे तेणेंकरून आपला बडीजाव वाढेल, असें त्यांना वाटत असतें. ह्या खोट्या नाखुषी दर्शविण्याला "ओढून चंद्रबळ आणणें" असें म्हणतात. उ०

रावसाहेब, आपण "अप्रतिबंध व्यापार" ह्या विषयावर व्याख्यान द्यावेंच द्यावें, अशी मंडळीची इच्छा आहे. मला काय येतें, मला वेळ कोठे आहे, वगैरे आपल्या सबबी आम्हांस खऱ्या वाटत नाहीत. आता उगीच ओढून चंद्रबळ आणू नका. हो म्हणा म्हणजे झालें!

१७६७ कपिलाषष्ठीचा योग—

(क) अगदी दुर्मिळ किंवा क्वचित् प्रसंगीं मिळणारी संधि; कधीमधी घडून येणारा संयोग किंवा पडणारी गांठ.

(ख) अति आश्चर्यकारक आणि अगदी अनपेक्षित प्रकारें आनंददायक गोष्टी एकाच वेळीं जुळून येणें ही जुळणी. [ज्योतिषशास्त्रांत भाद्रपद महिना, कृष्णपक्षांतील षष्ठी ही तिथि, हस्त हें महा नक्षत्र, व्यतिपात, मंगळवार व दिवस नक्षत्र रोहिणी ह्या गोष्टी एका वेळीं जुळून आल्या, म्हणजे त्याला "कपिलाषष्ठीचा योग" असें नांव दिलेलें आहे].

१७६८ खडाष्टक किंवा षडाष्टक—एका माणसाच्या राशीपासून दुसऱ्याची रास सहावी व दुसऱ्याच्या राशीपासून पहिल्याची रास आठवी, अशी असली, म्हणजे "त्या दोघांत खडाष्टक आहे," असें म्हणतात. उदाहरणार्थ एकाची मेष रास असून दुसऱ्याची कन्या रास असली, किंवा एकाची कर्क रास आणि दुसऱ्याची कुंभ रास असली, तर "त्या दोघात खडाष्टक आहे, असें म्हणतात. हें खडाष्टक दोन प्रकारचें असतें. दोन माणसातील प्रीति दाखविणारें तें प्रीतिखडाष्टक, आणि वैर दाखविणारें तें मृत्युखडाष्टक. परतु व्यवहारात त्या दोघात खडाष्टक आहे," ह्याचा अर्थ त्या दोघांत वैर आहे, असा समजतात.

१७६९ गंडांतर—अपमृत्यु; कोणतेंहि मोठें संकट, ज्यावर आपली नियत्रणा चालू शकत नाही असें संकट.

१७७० गर्गाचार्यांचा मुहूर्त—प्रातःकाळाच्या किंचित् अगोदरचा काळ. हा काळ शुभ, असें गर्गाचार्यांचें मत आहे.

१७७१ घटका भरणें—"घटका" म्हणून एक तांब्याचें पात्र असतें; त्याच्या बुडाला एक बारीक छिद्र असतें. हें पात्र पाण्यांत तरगत सोडलें, म्हणजे त्या छिद्रांतून पाणी आंत भरतें, व बरोबर घटकेच्या अवधीनें तें पात्र पाण्यांत बुडतें. लग्न, मुंज वगैरे विधींमध्यें काल मोजण्यासाठी हें पात्र पाण्यांत सोडतात. घटकेचा कालावधि संपतांच हें पात्र पाण्यात बुडतें; यावरून "एखाद्याची घटका भरणें" म्हणजे त्याच्या आयुष्याचा काल किंवा अवधि भरणें म्हणजे समाप्त होणें, असा अर्थ समजतात.

१७७२ घबाड मुहूर्त—जेव्हा वाराचा अंक व तिथीचा अंक ह्या दोहोंच्या बेरजेच्या तिपटींत १५ मिळवून येणाऱ्या संख्येला साताना भागलें असता बाकी तीन उरते, तेव्हा ता काळ कोणत्याहि कामाला शुभ म्हणून ज्योतिषशास्त्राचा सिद्धान्त आहे.

त्याला "घबाड मुहूर्त," अशी संज्ञा आहे. यावरून "घबाड मुहूर्त" म्हणजे अत्यंत शुभ समय किंवा अनुकूल काल, असा अर्थ समजतात.

१७७३ जातक—एखाद्या मनुष्याच्या जन्मसमयावरून त्याच्या आयुष्यात त्याला पुढे प्राप्त होणारी सुखदुःखें वगैरेंबद्दलची अटकळ करण्याचें फलज्योतिषशास्त्र. यावरून "जातक" ह्या शब्दाचा मेळ, सलोखा असा अर्थ रूढ झाला. उ० त्याचें आणि तुझें जातक जमेल, असा रंग दिसत नाही; म्ह० तुम्हा दोघांचें पटेल असें दिसत नाही.

१७७४ तारांबळ होणें किंवा उडणे—घाईमुळे बुजल्यासारखें होणें. उ० जेवावयाची वेळ होऊन गेली होती, मंडळी पाटावर येऊन बसली होती; इतक्यात माझें मूल रडू लागलें, तेव्हा माझी जी तारांबळ झाली ती कांही पुसूच नये! [लग्न, मुंज वगैरे विधींमध्ये शुभ मुहूर्त न चुकावा म्हणून उपाध्ये फार जपत असतात. मंत्र-तंत्रादि वेळच्या वेळीं आटोपण्यासाठी घाई करीत असतात. ह्या घाईचा कळस "ताराबलं चन्द्रबलं तदेव" वगैरे शब्द म्हणतांना होतो. यावरून "एखाद्याची तारांबळ उडणें" म्हणजे त्याची घादल होणें, असा अर्थ झाला].

१७७५ अमवस्याच्या मुळावर येणें किंवा जन्मणें—दिवस नक्षत्र 'मूळ' हें असतां जर एखाद्या मुलाचा जन्म झाला, तर तें मूल कोणातरी नातलगाचा नाश सुचवितें. तो माझ्या मुळावर जन्मला आहे किंवा आला आहे म्ह० तो माझा सत्यानाश करील.

१७७६ रेवती नक्षत्र—अश्विनी, भरणी वगैरे जीं सत्तावीस नक्षत्रें आहेत, त्यात रेवती हें शेवटचें नक्षत्र आहे. ह्या नक्षत्रावर ज्या कामास प्रारंभ झाला आहे, तें काम लवकर शेवटास जात नाही, असा आपल्या लोकाचा समज असे. एखाद्या कामाला रेवती नक्षत्र लागणें, म्ह० तें रेंगाळत पडणें.

१७७७ साडेसाती किंवा शनीचा फेरा—दुर्दैवाचा फेरा; आपत्काल; उपद्रव. एखाद्या माणसाच्या जन्मराशीपासून शनि १२, १ आणि २ ह्या राशींत असतां "त्या माणसास साडेसाती आली आहे" असें म्हणतात. ह्या तीन राशी क्रमण्यास शनीला ७॥ वर्षें लागतात. ह्या ७॥ वर्षांच्या मुदतींत त्या माणसास अतोनात दुःखें भोगावीं लागतात, अशी समजूत आहे.

१७७८ साडेतीन मुहूर्त—कोणतेंहि काम करावयास दसरा, बलिप्रतिपदा, आणि वर्षप्रतिपदा हे तीन अत्यंत उत्कृष्ट मुहूर्त आणि अक्षय्य तृतीया, (किंवा कित्येकांच्या मतें नागपंचमी) हा साधारणपणें उत्कृष्ट (म्हणजे अर्धवट उत्कृष्ट) मुहूर्त असें समजतात.

१७७९ व्यतिपात—विष्कंभ, प्रीति, आयुष्मान वगैरे सत्तावीस योग आहेत. त्यांत व्यतिपात हा सतरावा आहे; हा योग असतां संकट प्राप्त होतें. यावरून

दुष्ट व खोडकर मुलाला " वितिपात " किंवा " व्यतिपात " म्हणण्याची रूढि पडली आहे.

१७८० शकुनगांठ बांधणें—एखाद्या कार्याला निघालें असता प्रथम जो शकुन होतो, तो चांगला किंवा वाईट असेल, त्याप्रमाणे त्या कार्यात यश किंवा अपयश मिळतें, अशी त्या माणसास अटकळ बांधतां येते. त्या शकुनाची आठवण राहण्याकरता तो पदरास जी गाठ बांधतो, तिला " शकुनगाठ " म्हणतात ही गाठ शुभाची किंवा अशुभाचीहि सूचक असते. उ० त्या माणसाची सगत तुझ्या नुकसानीस कारण होईल, अशी मीं दोन महिन्यापूर्वीच शकुनगाठ बांधून ठेविली होती ( म्हणजे मी अटकळ करून होतों किंवा माझी खातरी होऊन चुकली होती ).

[ टीप·—" शकुनगांठ, " याच्याबद्दल " गांठ " किंवा " खूणगाठ, " असेंहि म्हणतात ].

१७८१ संक्रांत—मेष, वृषभ इत्यादि बारा राशींपैकीं एका राशींतून दुसऱ्या राशींत सूर्याचें जें गमन, त्याला " सक्रांति " असें म्हणतात. ह्या गमनाची जी अधिदेवता, तिलाहि " सक्राति " असें म्हणतात. ही सक्रांतिदेवता दर वर्षी कोणत्या तरी वाहनावर बसून जात असते त्या वर्षी ती ज्या वाहनावर बसली असेल त्या वाहनाचा, ज्या दिशेस जात असेल त्या दिशेस, ज्या पदार्थाकडे पाहत असेल त्या पदार्थाचा, अतोनात नाश त्या वर्षी होतो. यावरून " यंदा अमक्यावर सक्रांत बसली, " " यंदा आमच्या घरावर संक्रात आली आहे " वगैरेंसारखे प्रयोग केले जातात. " एखाद्यावर सक्रांत बसणें, " म्हणजे त्याचा नाश किंवा नुकसान होणें.

समाप्त

# सूची

## या सूचींतील आंकडे लेखांकांचे दर्शक आहेत.

